# मिलिन्द प्रश्न

अनुवादक

भदन्त सदानंद महास्थवीर

'सद्धम्मादित्य'

पारमिता प्रकाशन, नागपूर.

# मिलिन्द प्रश्न



प्रकाशन :
**पारमिता प्रकाशन**
मेश्राम नरेशचंद्र दामोधर
१२९-डी ब्लॉक, नंदनवन घरकुल परिसर,
नंदनवन, नागपूर-४४० ००९

मुंबई विभाग :
अचिंत्य नरेशचंद्र मेश्राम
चैत्यभूमी, दादर मुंबई.
9665884094, 9422116052
7028281334, 09595997357

**कव्हर डिझाईन :**
एन. टी. मेश्राम
नवा नकाशा, नागपूर.

**अक्षर जुळवणी :**
पी. एम. कॉम्प्युटर्स, नागपूर.

धम्मचक्र प्रवर्तन दिन २०१५

सहयोग राशी : २५०/-

# प्रस्तावना

बौध्द साहित्यामध्ये 'मिलिंदप्रश्न' या अतुलनीय ग्रंथाला फारच मानाचे असे मौलिक स्थान आहे. शेकडो उपमा अलंकारांनी नटलेला-सजलेला हा अद्वितीय ग्रंथा जगामध्ये तार्किकदृष्ट्या अत्यंत मोलाचा असा समजावा लागेल. या ग्रंथात निसर्गात घडणाऱ्या अनाकलनीय, कठीण आणि अत्यंत क्लिष्ट घटनांवर प्रकाश टाकण्यात आला आहे. राजा मिलिंद यांनी अत्यंत बुध्दिचातुर्याने आणि चिकित्सक पध्दतीने विचारलेल्या अत्यंत अवघड प्रश्नांची उकल अनेक उपमा आणि दाखले देऊन भन्ते नागसेन यांनी अत्यंत सरळ सोप्या आणि सुगम पध्दतीने देऊन राजा मिलिंदाला निरूत्तर केले होते.

समग्र उत्तर भारतात आपले एकमुखी राज्य करणारा बॅक्ट्रीयाच्या ग्रीक राजामध्ये मिलिंद राजाचे नांव मुख्यत्वे घेतल्या जाते. तो अत्यंत बुद्धिमान, कुशल तर्कशास्त्री, चाणाक्ष, अत्यंत चिकित्सक, गाढा अभ्यासक होता. त्याने तार्किक वादविवादामध्ये अनेक बौध्द भिक्षूंना सळो की पळो करून सोडले होते. त्याला आपल्या बौध्दिक सामर्थ्यावर उच्च कोटीच्या तर्कज्ञानावर प्रचंड अभिमान होता. सर्वच धर्मातील नावलौकिक मिळालेल्या अनेक पंडितांना, मालमौलविना तसेच विद्वान बौध्द भिक्षूंना आपल्या वाक्चातुर्याने वादविवादामध्ये पराजित केल्यानंतर त्याचा गर्व हा शिखराला पोहचला होता. अशातच त्याची भेट भन्ते नागसेन या वाक्चातुर्यात निष्ठात असलेल्या प्रकांड पंडिताशी झाली. भन्ते नागसेन हे विलक्षण बुद्धिचे, महान गाढे अभ्यासक, चाणाक्ष, श्रेष्ठ वाक्पटू, उच्च कोटीचे वादविवादपटू, महान चिकित्सक म्हणून त्या काळात नावारूपास आले होते. त्यांच्या डोळ्यात विलक्षण तेज होते आणि त्यांच्या संपूर्ण चेहरा ज्ञानाच्या प्रकाशपूंजानी सातत्याने प्रकाशमान दिसत होते. म्हणूनच की काय आपल्या प्रथम भेटीतच राजा मिलिंदाने अंशी हजार भिक्षूंच्या मध्यभागी बसलेल्या भन्ते नागसेनास आपल्या बुद्धिचातुर्याने ओळखले होते.

प्रस्तुत ग्रंथाचा मुळ रचयिता नेमका कोण आहे हे अजूनही माहीत नाही. परंतु काही विद्वानांच्या मते मिलिन्द प्रश्न हा ग्रंथ प्रथमतः संस्कृत मध्ये किंवा अन्य प्राकृत भाषामध्ये लिहिला गेला असावा आणि त्यानंतरच तो पाली भाषेत अनुवादित करण्यात आला. या ग्रंथाची रचना भगवान बुद्धांच्या महापरिनिर्वाणानंतर ५०० वर्षांनी म्हणजेच इ.स. पूर्व प्रथम शताब्दीत झाली असावी असे जाणकारांचे मत आहे. यानंतर विश्वातील अनेक भाषामध्ये या ग्रंथाचे अनुवाद प्रकाशित झाले. भारतात १९३७ मध्ये या मौथलक ग्रंथाचा पहिला हिंदी अनुवाद प्रकाशित सारनाथ येथील प्रकांड पंडित बौध्द भिक्षू जगदीश काश्यप यांनी त्याचा सुगम, सरळ आणि सुबोध असा अनुवाद केला. त्यानंतर तो अनेक प्रादेशिक भाषांमध्ये उपलब्ध करण्यात आला. त्यापैकी हा एक पहिला प्रश्न होय जो मराठीमध्ये मराठी भाषीक बौध्द धर्मावलंबियासाठी उपलब्ध होत आहे.

# प्रस्तावना

बौध्द साहित्यामध्ये 'मिलिंदप्रश्न' या अतुलनीय ग्रंथाला फारच मानाचे असे मौलिक स्थान आहे. शेकडो उपमा अलंकारांनी नटलेला–सजलेला हा अद्वितीय ग्रंथा जगामध्ये तार्किकदृष्ट्या अत्यंत मोलाचा असा समजावा लागेल. या ग्रंथात निसर्गात घडणाऱ्या अनाकलनीय, कठीण आणि अत्यंत क्लिष्ट घटनांवर प्रकाश टाकण्यात आला आहे. राजा मिलिंद यांनी अत्यंत बुध्दिचातुर्याने आणि चिकित्सक पध्दतीने विचारलेल्या अत्यंत अवघड प्रश्नांची उकल अनेक उपमा आणि दाखले देऊन भन्ते नागसेन यांनी अत्यंत सरळ सोप्या आणि सुगम पध्दतीने देऊन राजा मिलिंदाला निरूत्तर केले होते.

समग्र उत्तर भारतात आपले एकमुखी राज्य करणारा बॅक्ट्रीयाच्या ग्रीक राजामध्ये मिलिंद राजाचे नांव मुख्यत्वे घेतल्या जाते. तो अत्यंत बुद्धिमान, कुशल तर्कशास्त्री, चाणाक्ष, अत्यंत चिकित्सक, गाढा अभ्यासक होता. त्याने तार्किक वादविवादामध्ये अनेक बौध्द भिक्षूंना सळो की पळो करून सोडले होते. त्याला आपल्या बौध्दिक सामर्थ्यावर उच्च कोटीच्या तर्कज्ञानावर प्रचंड अभिमान होता. सर्वच धर्मातील नावलौकिक मिळालेल्या अनेक पंडितांना, मालमौलविना तसेच विद्वान बौध्द भिक्षूंना आपल्या वाक्चातुर्याने वादविवादामध्ये पराजित केल्यानंतर त्याचा गर्व हा शिखराला पोहचला होता. अशातच त्याची भेट भन्ते नागसेन या वाक्चातुर्यात निष्ठात असलेल्या प्रकांड पंडिताशी झाली. भन्ते नागसेन हे विलक्षण बुद्धिचे, महान गाढे अभ्यासक, चाणाक्ष, श्रेष्ठ वाक्पटू, उच्च कोटीचे वादविवादपटू, महान चिकित्सक म्हणून त्या काळात नावारूपास आले होते. त्यांच्या डोळ्यात विलक्षण तेज होते आणि त्यांच्या संपूर्ण चेहरा ज्ञानाच्या प्रकाशपूंजानी सातत्याने प्रकाशमान दिसत होते. म्हणूनच की काय आपल्या प्रथम भेटीतच राजा मिलिंदाने अंशी हजार भिक्षूंच्या मध्यभागी बसलेल्या भन्ते नागसेनास आपल्या बुद्धिचातुर्याने ओळखले होते.

प्रस्तुत ग्रंथाचा मुळ रचयिता नेमका कोण आहे हे अजूनही माहीत नाही. परंतु काही विद्वानांच्या मते मिलिन्द प्रश्न हा ग्रंथ प्रथमतः संस्कृत मध्ये किंवा अन्य प्राकृत भाषामध्ये लिहिला गेला असावा आणि त्यानंतरच तो पाली भाषेत अनुवादित करण्यात आला. या ग्रंथाची रचना भगवान बुद्धांच्या महापरिनिर्वाणानंतर ५०० वर्षांनी म्हणजेच इ.स. पूर्व प्रथम शताब्दीत झाली असावी असे जाणकारांचे मत आहे. यानंतर विश्वातील अनेक भाषामध्ये या ग्रंथाचे अनुवाद प्रकाशित झाले. भारतात १९३७ मध्ये या मौथलक ग्रंथाचा पहिला हिंदी अनुवाद प्रकाशित सारनाथ येथील प्रकांड पंडित बौध्द भिक्षू जगदीश काश्यप यांनी त्याचा सुगम, सरळ आणि सुबोध असा अनुवाद केला. त्यानंतर तो अनेक प्रादेशिक भाषांमध्ये उपलब्ध करण्यात आला. त्यापैकी हा एक पहिला प्रश्न होय जो [illegible] बौध्द धर्मावलंबियासाठी उपलब्ध होत आहे.

# अनुक्रमणिका

## उपरी कथा



## खण्ड १

### प्रकरण पहिले

### पूर्व योग



## खण्ड २

### प्रकरण पहिले

### (क) लक्षण प्रश्न

## प्रकरण दुसरे

## (ख) लक्षण प्रश्न (पुढे चालु)



## प्रकरण तिसरे

## (ग) लक्षण प्रश्न (पुढे चालु)

## प्रकरण चवथे

### (घ) लक्षण प्रश्न (पुढे चालु)



## खण्ड ३

## प्रकरण पहिले

### (क) विमतिच्छेदन प्रश्न



## प्रकरण दुसरे

### (ख) विमतिच्छेदन प्रश्न (पुढे चालु)



## प्रकरण तिसरे

### (ग) विमतिच्छेदन प्रश्न (पुढे चालु)

## प्रकरण चवथे

## (घ) विमतिच्छेदन प्रश्न (पुढे चालु)



## प्रकरण पाचवे

## खण्ड ४

## प्रकरण पहिले

## मेण्डक प्रश्न (क) महावर्ग

## प्रकरण दुसरे
## (ख) योगी कथा



## प्रकरण दुसरे
## (ग) योगी कथा (पुढे चालु)

## प्रकरण चवथे

## (घ) योगी कथा (पुढे चालु)



## प्रकरण पाचवे

## (च) योगी कथा (पुढे चालु)

## प्रकरण सहावे

## (छ) योगी कथा (पुढे चालु)

## प्रकरण सातवे

## (ज) योगी कथा (पुढे चालु)



## प्रकरण आठवे

## (झ) योगी कथा (पुढे चालु)

**प्रकरण चवथे**



**प्रकरण पाचवे**



**प्रकरण सहावे**



**प्रकरण सातवे**



**ग्रंथ विस्तार**

**राजा मिलिन्दाची प्रव्रजा**

### नमो तस्स भगवतो अरहतो सम्मा सम्बुध्दस्स

# मिलिन्द प्रश्न

## उपरी कथा

प्राचीन काळी ऐश्वर्य संपन्न अशा सागल नावाच्या नगरात मिलिंद नावाचा राजा राज्य करीत होता. याच नगरात राजा मिलिंद याने स्थवीर नागसेन यांचेकडे जाऊन भेट घेतली. यांची ही भेट गंगा नदी व सागराच्या संगमाप्रमाणे एक दुसऱ्यास प्रभावित करणाऱ्या दोन विद्वानांची गंभीर व उदात्त अशी ठरली. ज्ञान सत्याचा प्रदीप दाखवून अज्ञान अंधकारास दूर करणाऱ्या वक्तृत्व संपन्न, प्रज्ञावान अशा स्थवीर नागसेनास राजाने अनेक विषयांवर अति बारीक सारीक प्रश्न विचारले.

नागसेनाने दिलेली उत्तरे देखील अतिशय गंभीर, अर्थपूर्ण, तत्काल हृदयात बसणारे, कर्णप्रिय, आश्चर्यकारक, आनंददायक, अभिधम्म व विनयाच्या गांभीर्याने परिपूर्ण, सूत्रास अनुकूल तसेच उपमा आणि तर्काच्या दृष्टीने न्यायसंगत असे आहेत.

हे श्रोतागणांनो, तुमची मने एकचित्त करा आणि सर्व प्रकारच्या शंका कुशंकाचे निरसन करणारी सूक्ष्म प्रश्नोत्तरे प्रसन्न चित्ताने ऐका.

**सागल नगराचे वर्णन**

असे ऐकीवात आहे की, सागल नावाचे नगर यवन लोकांच्या व्यापारांचे फार मोठे केंद्र होते. हे नगर नदी व पर्वताच्या अत्यंत रमणीय अशा पठारावर वसले होते. निसर्गतःच रमणीय अशा नदीच्या तटावर, पर्वताच्या पायथ्याशी वसलेल्या या नगरात अत्यंत सुंदर सुशोभित असे विशाल भवन, बगीचे, क्रीडांगणे, उद्याने, पुष्करणी व तलाव होते. असे हे नगर वृक्षवल्लीच्या जगात रमणीय पृष्ठ भागावर वसले होते. अत्यंत कुशल अशा कारागिरांनी या शहराची रचना करतांना आपले सर्व कौशल्य पणास लावले होते. त्याच्या समस्त शत्रूंचे पारिपत्य झाल्याने प्रजेला कसल्याही प्रकारचे दुःख व भय नव्हते. विविध प्रकारचे आश्चर्य कारक असे मनोरे व कोठारे तेथे होती. नगराचे सिंह-द्वार विशाल व सुंदर होते. अंतःपुराच्या सभोवार खंदक व पिवळ्या रंगाच्या दगडांची तटबंदी केली होती. रस्ते चौक व पटांगणे शहरातील सर्व भागात विभागली गेली होती. विविध

अशा मूल्यवान वस्तूंनी खचाखच भरलेली दुकाने उत्कृष्टपणे यथास्थानी सजविली होती. ठिकठिकाणी अत्यंत सुंदर शेकडो दान शाळा होत्या. हिमालयाच्या उत्तुंग शिखरांशी स्पर्धा करणाऱ्या शेकडोच काय पण हजारो उंच उंच अशा इमारती होत्या. हत्ती, घोडे, रथ आणि शहरात फिरणाऱ्या लोकांची शहरातील सडकेवर एक सारखी ये जा सुरू असे. जिकडे तिकडे सुंदर स्त्री-पुरूषांचे थवेच्या थवे सदैव ये जा करतांना दृष्टीस पडत असत. सर्व प्रकारच्या लोकांनी भरलेले हे नगर अतिशय शोभायमान भासत होते. क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य, शूद्र, श्रमण, ब्राह्मण आणि गणाचार्य इत्यादी सर्व थरांतील लोक तेथे राहत असत. मोठ मोठ्या विद्वज्जनांचे तेथे प्रसिद्ध केंद्र होते. काशी, कोईमतूर इत्यादी शहरांतील सर्वत्र मौल्यवान व प्रसिद्ध कापडांची भव्य दुकाने होती. विविध प्रकारच्या फुलांची आणि सुगंधित द्रव्यांची सुद्धा दुकाने होती. मौल्यवान रत्नांनी तर कपाटचे कपाट भरले होते. सौंदर्य प्रसाधनांच्या व्यापाऱ्यांची दुकाने तर जिकडे तिकडे दृष्टीस पडत असत. कार्षापण चांदी, सोने व कासे आणि मौल्यवान हिरे इत्यादी सर्व वस्तूंनी संपन्न नगर म्हणजे बहुमूल्य रत्नांनी चमकणारा एक खजाना वाटत होते. सर्व प्रकारच्या धन, धान्य व विविध उपभोग्य वस्तूंनी राजाचा कोष परिपूर्ण भरलेला होता. अनेक प्रकारचे खाद्य व पेय्ये तेथे होती. उत्तर कुरू प्रमाणे पिकाऊ तसेच आलकनंदा देवपुराप्रमाणे शोभायमान असे ते सागल नगर होते.

### ग्रंथाचे सहा खण्ड

यानंतर त्यांच्या (मिलिंद व नागसेन) पूर्व जन्मीच्या गोष्टी सांगण्यात येतील, त्या सहा खण्डात विभाजन करून सांगेन ते येणे प्रमाणेः-

१. पूर्वयोग

२. लक्षण प्रश्न

३. विमतीच्छेदन

४. मेंडक प्रश्न

५. अनुमान प्रश्न

६. उपमाकथा प्रश्न

यात मिलिन्द प्रश्नांचे दोन विभाग आहेत (अ) लक्षण आणि (ब) विमतिच्छेदन. मेण्डक प्रश्नांचे सुद्धा (अ) महावर्ग व (ब) योगीकथा नावाचे दोन विभाग आहेत.

## खण्ड १

# १. पूर्व योग

### १. त्यांच्या पूर्व जन्माची कथा

'पूर्वयोगा' चा अर्थ आहे की, त्यांनी पूर्व जन्मी केलेली कर्मे.

प्राचीन काळी भगवान काश्यप (बुद्ध) चे समयी गंगा नदीच्या काठी एका आश्रमात एक फार.मोठा भिक्षुसंघ वास्तव्य करीत होता. व्रताचारी आणि शील संपन्न ते भिक्षू प्रातःकाळी उठून बुद्ध गुणांचे स्मरण करत असता संपूर्ण अंगण झाडून काढीत व केर कचरा एकत्र करीत असत.

एके दिवशी एका भिक्षूने काण्या एका श्रामणेरास तो कचरा फेकून देण्यास सांगितले. परंतु त्याने त्यांच्या आज्ञेकडे मुद्दामच कानाडोळा केला. दुसऱ्यांदा व तिसऱ्यांदा सांगितल्यानंतर सुद्धा त्याने त्याकडे मुळीच लक्ष दिले नाही. हे पाहून 'हा श्रामणेर फारच उद्धट आहे असा विचार मनात येताच रागाच्या भरात भिक्षूने त्या श्रामणेरास झाडूच्या दांड्याचा एक फटका मारला. तेव्हा त्याने भीतीमुळे रडत रडत कचरा फेकत असता आपल्या मनाशी असा संकल्प केली की, 'जोपर्यंत मला निर्वाणपद प्राप्त होत नाही, तोपर्यत मी हे साफ सफाईचे पुण्यकर्म करीत राहीन व त्यामुळे होणाऱ्या फल प्राप्तीच्या योगाने जेथे जेथे माझा पुनर्जन्म होईल, तेथे तेथे मी तळपणाऱ्या सूर्याप्रमाणे अत्यंत तेजस्वी होईन. कचरा फेकून तो स्नानासाठी गंगा नदीच्या तीरावर गेला. गंगेचे शब्दायमान असे तरंग पाहून त्याने पुन्हा दुसरा संकल्प असा केला की, जेथे जेथे मी जन्म घेईन तेथे तेथे मी या लाटांच्या जलद वेगाप्रमाणे प्रत्युत्पन्न-मती आणि प्रतिभा संपन्न होईन.'

तो भिक्षू देखील झाडूच्या ठिकाणी झाडू ठेऊन स्नानासाठी गंगेच्या घाटावर जात असता त्याने त्या श्रामणेराचा वरील संकल्प ऐकला आणि आपल्या मनाशीच विचार करू लागला की, 'हा श्रामणेर माझ्यामुळे प्रेरित होऊन जर असा संकल्प करीत आहे. तर मला का त्याची फळ प्राप्ती होणार नाही.' असे म्हणून त्या भिक्षूने देखील असा संकल्प केला की, 'मी सुद्धा जेथे जेथे जन्म घेईन, तेथे तेथे गंगेच्या लाटांच्या तरंगाप्रमाणे प्रत्युत्पन्नमति होईन आणि त्यांनी विचारलेल्या समस्त प्रश्नांचा उकल करून सांगण्यास समर्थ होईन.'

देवलोक आणि मानव लोकात जन्म घेत घेत त्या दोघांनीही एक बुद्धांतर व्यतीत

केले.

तेव्हा यांच्या जन्मजन्मांतराच्या परिभ्रमण अवस्थेत तथागत बुद्धाने सुद्धा त्या दोघांना पाहिले आणि मोग्गली-पुत्र तिष्य स्थवीरास पाहून जसे भाकित केले होते, तसेच यांच्या संबंधी देखील भाकित केले की, 'माझ्या महापरिनिर्वाणानंतर पाचशे वर्षांनी हे दोघेही जन्मास येतील आणि ज्या धर्म विनयाचे मी सूक्ष्मपणे निरूपण केले. त्यांचे प्रश्नोत्तरे उपमा आणि युक्तिवादाच्या साह्याने स्पष्टीकरण करतील.'

त्यानुसार त्या दोघांपैकी श्रामणेर हा जम्बुद्वीपातील सागल नावाच्या नगरीचा मिलिन्द नावाने प्रसिद्धी पावलेला राजा झाला. तो मोठा पण्डित, चतुर, बुद्धिमान आणि समर्थ असा शासक होता. तो भूत भविष्य आणि वर्तमान अशा तीनही योगांच्या बाबतीत जागरूक होता. त्याने स्वतः अनेक विद्यांचा अभ्यास केला होता जसे :- (१) श्रृती, (२) स्मृती, (३) सांख्य, (४) योग, (५) न्याय, (६) वैशेषिक, (७) गणित, (८) संगीत, (९) वैद्यक, (१०) वेद, (११) सर्व पुराणे, (१२) इतिहास (१३) ज्योतिष्य, (१४) मंत्रविद्या, (१५) तर्क (१६) तंत्र, (१७) युद्धविद्या, (१८) छन्द व (१९) सामुद्रिक अशा एकोणवीस विद्यांमध्ये तो पारंगत होता. वादविवादात अद्वितीय आणि अजिंक्य असा होता. तो सर्व तिर्थकरांमध्ये श्रेष्ठ मानल्या जात होता. प्रज्ञा, बल, वेग, शौर्य, धन, भोग इत्यादी सर्व बाबींमध्ये संपूर्ण जम्बूद्वीपात राजा मिलिन्दाची बरोबरी करू शकेल असा कोणीही नव्हता. तो अफाट संपत्तीचा धनी आणि उन्नतिशील होता. त्याच्या सेनेचा व वाहनांचा तर अंतच नव्हता.

जेव्हा एके दिवशी आपल्या अनंत अशा चतुरंगी सेनेचे निरीक्षण करण्याच्या हेतूने राजा मिलिन्द नगराबाहेर पडला. सेनेची पाहणी करून होताच त्या वादप्रिय राजाने लोकायत आणि वितंडवादी लोकांशी वार्तालाप करण्याच्या उद्देशाने सूर्याकडे पाहिले आणि आपल्या मंत्र्यांना उद्देशून तो म्हणाला, ''सूर्यास्ताला अजून बराच अवकाश आहे, तो पर्यंत आपण काय करावे? ज्यांच्यासह नगरात जाऊन वार्तालाप केल्यास तो माझ्या शंका कुशंकाचे निरसन करू शकेल असा कोणी एखादा सम्यक सम्बुद्धाचे सिद्धांत जाणणारा श्रमण, ब्राह्मण किंवा गणाचार्य पण्डित आहे काय?

राजाने हे उद्‌गार ऐकून पाचशे यवनांनी त्यांना सांगितले की, महाराज असे सहा पण्डित आहेत - १) पूरण कस्सप, २) मक्खली गोसाल, ३) निगंठनाथ पुत्त, ४) संजय वेलट्टिपुत्त, ५) अजित केसकंबली, आणि ६) ककुध कच्चान. ते संघनायक. गण-नायक, गणाचार्य, प्रज्ञा आणि तिर्थकर आहेत. लोकांत त्यांचा फार मान आहे.

तेव्हा, हे महाराज आपण त्यांच्याकडे जावे आणि आपल्या शंकाचे निरसन करावे.

## २. पूरण कस्सपाशी मिलिन्द राजाची भेट

त्यानंतर पाचशे यवनासह मिलिंद राजा सुंदर रथावर बसून पूरण कस्सपाकडे गेला आणि पूरण कस्सपाकडे त्यांच्या कुशलते विषयी विचारपूस केली. याप्रमाणे अनौपचारिक चर्चा केल्यानंतर एके बाजूस बसला आणि पूरण कस्सपाला तो म्हणाला, ''भंते कस्सप, जगाचे पालन कोण करतो?'' महाराज, ''जगाचे पालन पृथ्वी करते.'' कस्सपाने उत्तर दिले.

''भंते कस्सप, जर पृथ्वी जगाचे पालन करते तर अवीची नरकात जाणारे जीव पृथ्वीचे अतिक्रमण करून का बरं जातात?''

राजाचा हा प्रश्न ऐकून पूरण कस्सपाची तर बोबडीच वळली. त्याच्या तोंडून शब्दच बाहेर पडेना. खांदे पाडून तो चुपचाप हतबद्ध होऊन बसला.

## ३. मक्खली गोसालशी राजा मिलिंदाची भेट

यानंतर मिलिंद राजाने मक्खली गोसालास पृछा केली, ''भंते गोसाल, पाप आणि पुण्य ही कर्मे आहेत काय? तसेच चांगल्या व वाईट कर्मांची फळे भोगावी लागतात काय?''

''नाही महाराज, पापकारक किंवा पुण्यकारक अशी काही एक कर्म नाहीत. तसेच चांगल्या किंवा वाईट कर्मांची फळे भोगावी लागत नाहीत महाराज येथे जे क्षत्रिय आहेत ते परलोकातही क्षत्रियच राहतील, येथे जे ब्राम्हण, वैश्य, शूद्र, चांडाळ किंवा पुक्कुस आहेत ते परलोकात गेल्यावरही अनुक्रमे ब्राह्मण, वैश्य, शूद्र, चांडाळ किंवा पुक्कुसच राहणार. वस्तुतः पाप आणि पुण्य कर्मांने काय होणार ?'' गोसाल उत्तरला.

''भंते गोसल जेथे जर क्षत्रियादी आहेत ते सर्व परलोकी गेल्यावरही क्षत्रियादी म्हणूनच राहत असतील आणि पाप-पुण्याचा कोणताच परिणाम होणारा नसेल तर या लोकी जे लुले-पांगळे आहेत ते परलोकी गेल्यावर सुद्धा लुळे-पांगळेच राहतील, जे लंगडे आहेत ते लंगडेच व्हावयाचे आणि जे कानतुटे आणि नकटे आहेत ते सर्व कानकटे व नकटेच व्हावयाचे तर ?''

राजाच्या या प्रश्नावर गोसाला अगदी चुपचाप बसला.

हे पाहून राजाच्या मनात असा विचार आला की, 'हे जम्बुद्वीपच तुच्छ आहे. येथील पण्डित ज्ञानाच्या दृष्टीने अगदी करकरीत कोरे व नामधारी असून सुद्धा त्यांच्या खोटेपणामुळे व दिखाऊपणामुळेच त्यांची व्यर्थ कीर्ती पसरली आहे. माझ्याशी चर्चा

करून माझ्या शंकांचे निरसन करू शकेल असा लायक कोणीही श्रमण-ब्राह्मण येथे नाही.'

एके दिवशी असाच मिलिंद राजा आपल्या मंत्र्यांना उद्देशून म्हणाला, ''आजची रात्र फारच रमणीय आहे, तेव्हा कोणत्या श्रमण, ब्राह्मणापाशी जाऊन मी वार्तालाप करू? कोण बरे माझ्याशी चर्चा करून माझ्या शंका दूर करू शकेल ? असे धाष्टर्य असलेला कोणी आहे काय ?''

राजाचे असे आव्हानयुक्त कथन ऐकून सर्व मंत्री चूप होऊन त्यांच्या तोंडाकडे पाहत उभे राहिले.

त्यावेळी बारा वर्षापासून विद्वज्जनांनी खाली बसलेल्या सागल नगरात त्याला एकही श्रमण, ब्राह्मण किंवा गृहस्थ पण्डित मिळाला नाही. यदाकदाचित एखाद्या ठिकाणी कोणी श्रमण, ब्राह्मण किंवा गृहस्थ पण्डित राहतो आहे असे का राजाच्या ऐकीवात आले की, तत्काळ राजा तेथे जाऊन त्याला प्रश्न विचारीत असे. प्रश्नोउत्तरात राजाचे समाधान करता न आल्यास ते अगदी गोंधळलेल्या स्थितीत गाव सोडून कोठे तरी निघून जात असत. जे कोणी गाव सोडण्यास असमर्थ असत ते आपले पांडित्य न दाखविता आपल्या निवासस्थानी अगदी गूपचूप बसून राहत असत. साधारणतः सर्वच भिक्षू सागल नगराचा त्याग करून हिमालय पर्वतावर निघून गेले होते. त्यावेळी हिमालय पर्वताच्या पायथ्याशी असलेल्या सुरक्षित अशा स्थानावर कोटिशत अर्हत वास करीत होते.

## ४. आयुष्यमान अस्सगुत्ताचे भिक्षुसंघास पाचारण

त्यावेळी आयुष्यमान अस्सगुत्ताने कोणी एखादा कुलपुत्र ज्या श्रेष्ठ पदाच्या प्राप्तीसाठी गृहत्याग करून श्रमणत्वाचा अंगीकार करतो त्या श्रेष्ठ निर्वाणपदाचा याच जीवनात लाभ करून घेतला होता. त्यांच्यात अपूर्व अशी श्रवण शक्ती होती. त्या श्रवण शक्तिच्या सामर्थ्यावर त्यांनी मिलिंद राजाचे उद्‌गार ऐकले आणि युगंधर पर्वताच्या पठारावर आपल्या भिक्षू-संघाची सभा बोलविली आणि भिक्षू-संघास उद्देशून त्यांनी पृच्छा केली की, ''हे आवुस ! मिलिंद राजाशी चर्चा करून त्यांच्या शंकांचे निवारण करील असा कोणी एखादा समर्थ भिक्षू आपणांमध्ये आहे काय?''

असे विचारल्यानंतर ते सर्व कोटीशत अर्हत गप्प बसून राहीले. हाच प्रश्न तीनदा विचारल्यानंतर देखील एकानेही तोंड उघडले नाही.

तेव्हा आयुष्यमान अस्सगुत्त तेथे एकत्र जमलेल्या संघ सदस्यांना म्हणाले, ''हे आवुस ! तावर्तिस भवनामध्ये वैजयंत राजवाड्याच्या पूर्वेस केतुमती नावाचा प्रासाद

(वाडा) आहे. तेथे महासेन नामक एक देवपुत्र राहतो. तो मिलिंद राजाशी चर्चा करून त्यांच्या शंकाचे निवारण करण्यास समर्थ आहे.''

## ५. महासेन देवपुत्रास मनुष्यलोकी येण्याची विनंती

यानंतर ते कोटिशत अर्हत युगंधर पर्वतावर अंतर्धान होऊन तावर्तिस भवनात प्रगट झाले. तेथे एक राजा होता. त्याचे नाव सक्क. त्याने दुरूनच अफाट भिक्षुंच्या संघाला येताना पाहिले आणि संघाच्या स्वागतासाठी तो त्यांना सामोरे आला. आदराने अस्सगुत्तापुढे मस्त नमवून आतिथ्य सेवेसाठी तो एके बाजूस उभा राहिला व अस्सगुत्तास म्हणाला–

''भंते अस्सगुत्त, महान सत्पुरूषांच्या संघाचे कोणत्या कारणास्तव आगमन झाले आहे? आपल्याला कोणत्या गोष्टीची गरज पडली? मी सदैव संघाच्या सेवेकरीता तयार आहे. भंते ! सांगा ! मी आपणासाठी काय करू ?''

यावर संघनायक अस्सगुत्त म्हणाले, 'हे महाराज ! जम्बुद्वीपातील सागल नावाच्या नगरात मिलिंद नावाचा राजा आहे. वादविवाद करण्यात त्याची बरोबरी करणारा दुसरा कोणी नाही. तेव्हा त्याच्यावर मात करणे तर दूरच राहिले. एवढा तो जबरदस्त आहे. तो समस्त संघ संस्थापकांमध्ये श्रेष्ठ समजला जातो. निरनिराळ्या संघाकडे जाऊन त्यांना कोंड्यात टाकणारे बिकट प्रश्न विचारून हैरान करण्याची त्याची सवय आहे.'

सक्क म्हणाला, ''भंते अस्सगुत्त, देवपद सोडून मनुष्य लोकी जन्म घेणारा तो हाच मिलिंद राजा होय. आणि भंते अस्सगुत्त येथे शेजारीच केतुमती प्रसादात महासेन नामक देवपुत्र वास्तव्य करीत आहे. तोच मिलिंद राजाशी चर्चा करून त्यांचे शंका निवारण करू शकेल. असा तो समर्थ आहे. त्या महासेन देवपुत्राने मनुष्य लोकी जन्म घ्यावा म्हणून आपण त्यांना प्रार्थना करू या.''

यानंतर देवांचा राजा सक्क भिक्षू संघाला सामोरे करुन केतुमती प्रसादात जाऊन दाखल झाला आणि महासेनाला आलिंगन देऊन म्हणाला, ''हे मारिस, मनुष्य लोकात आपण जन्म घ्यावा, अशी भिक्षूसंघ आपणास प्रार्थना करीत आहे.''

''नाही भंते, मनुष्य लोकाशी मला काही कर्तव्य नाही. कामकाजाच्या व्यर्थ रगड्यात भरडल्या जाणाऱ्या जीवनास क्षणाची देखील उसंत मिळत नाही. असे त्राही-त्राही करून सोडणारे मानवी जीवन आहे. तेव्हा भंते, मी येथे देवलोकातच क्रमशः वरच्या पायऱ्या गाठून जन्म ग्रहण करीत असता मुक्तीचे शिखर गाठीन'' याप्रमाणे सक्काने तीनदा मनुष्य लोकी जन्म घेण्याची विनंती केली, परंतु तीनही वेळा महासेनाने वरील

प्रमाणेच उत्तर दिले.

यावर आयुष्मान अस्सगुत्त म्हणाले, ''हे मारिस, समस्त देवलोकासहित साऱ्या जगात राजा मिलिंदाच्या तर्काचे सडेतोड उत्तर देऊ शकेल असा आपल्याशिवाय दुसरा कोणाही दृष्टीस पडत नाही. तेव्हा आपणच मनुष्य लोकी जन्म घेऊन दशबल बुद्धाच्या पवित्र शासनाचे रक्षण करावे अशी भिक्षूसंघ आपणास विनंती करतो.''

''राजा मिलिंदाच्या तर्काला भेदून बुद्ध शासनाचे आपण रक्षण करू शकाल'', हे ऐकून महासेनाला अतिशय आनंद झाला. आणि 'असेच आहे तर ठीक आहे, मी मनुष्य लोकी जन्म ग्रहण करीन, असे त्याने अभिवचन दिले.'

तेव्हा देवलोकातील हे काम आटोपून तावर्तिस प्रासाद सोडून भिक्षू हिमालय पर्वताच्या रक्षिततळ या प्रदेशात परत आले.

## ६. अस्सगुत्ताद्वारा रोहणास दंड

तेथे आयुष्मान अस्सगुत्ताने आपल्या भिक्षू संघास पृच्छा केली की, हे आवुस, अशा महत्त्वाच्या प्रसंगी आपल्यापैकी अनुपस्थित असलेला कोणी भिक्षू आहे काय?

अशी पृच्छा केली असता कोणत्या एका भिक्षूने सांगितले की, 'होय भंते, आज पासून सात दिवसापूर्वीच आयुष्मान रोहण हिमालय पर्वतावर गेले असून त्यांनी तेथे समाधी लावली आहे.'

''तर त्यांच्याकडे आताच्या आता दूत पाठवा.''

आयुष्मान रोहणकडे दूत पोचण्याची व त्यांनी समाधीतून उठण्याची एकच गाठ पडली. आणि दूताकरवी 'संघ आपल्याला बोलावीत आहे' हे जाणून त्यांनी तात्काळ ते स्थान सोडले व रक्षिततळ प्रदेशात कोटिशत अर्हतांच्या समोर येऊन ते उपस्थित झाले.

तेव्हा आयुष्मान अस्सगुत्त आयुष्मान रोहणास म्हणाले, ''आवुस रोहण, बुद्ध शासन असे संकटात सापडले असून देखील तुम्ही इकडे संघ कार्यात लक्ष घालीत नाही. हे कसे?''

''भंते, ही माझ्याकडून चूक झाली.''

''आवुस रोहण, तर याबद्दल तुम्ही दंड भोगला पाहिजे''

''ठीक आहे भंते, मी कोणते दंड कर्म करू ?''

''आवसु रोहण, हिमालय पर्वताच्या पायथ्याशी कजंगल नावाचे एक ब्राह्मणाचे गाव असून तेथे सोनुत्तर नावाचा एक ब्राह्मण आपल्या कुटुंबासह राहतो. त्या ब्राह्मणाचे घरी एक पुत्र जन्मा येऊन त्याचे नाव नागसेन असे ठेवण्यात येईल. तेव्हा आपण सात वर्ष दहा महिने त्याच ब्राह्मणाचे घरी भिक्षेसाठी जात राहावे; आणि नागसेन बाळास कसेही करून प्रव्रजित करावे व घेऊन यावे. जेव्हा तो प्रव्रजित होईल तेव्हाच आपण दंडकर्मातून मुक्त व्हाल.''

''ठीक आहे भंते'', असे म्हणून आयुष्मान रोहणने देखील तया दंडकर्माचा स्वीकार केला.

इकडे महासेन देवपुत्राने सुद्धा देवलोक सोडून सोनुत्तर ब्राह्मणाच्या पत्नीच्या उदरी प्रतिसंधी धारण केली. प्रतिसंधी धारण करता क्षणीच तीन आश्चर्यकारक घटना घडून आल्या. त्या अशा – १) सर्व शस्त्रास्त्रे प्रज्वलित झाली, २) दुष्काळ असून देखील नवीन पीक भरपूर प्रमाणात आले, आणि ३) जोरदार वृष्टी वर्षाव झाला.

इकडे रोहण देखील प्रतिसंधी ग्रहण करण्याच्या वेळेपासून सात वर्ष दहा महिने न चुकता त्या सोनुत्तर ब्राह्मणाचे घरी भिक्षेस जात राहिला. परंतु एवढ्या काळात त्यास चुकून देखील एखाद्यावेळी वाटीभर भात, चमचाभर आंबट पाणी किंवा नमस्कारही लाभला नाही, किंवा स्वागताचे शब्दसुद्धा लाभले नाहीत. उलट अपमान व तिरस्काराचे कटु शब्द मात्र गिळंकृत करणे त्याच्या नशिबी आले. एवढचे नव्हे तर त्यास समंजसपणे 'भंते, पुढे जा' असे सांगणारी एखादी व्यक्ति देखील त्या घरी दिसून आली नाही. परंतु सात वर्षे दहा महिने लोटल्यानंतर एके दिवशी 'भंते, आपण पुढे जा' असे कोणी तरी बोलले आणि त्याच क्षणी सोनुत्तर आपले काम आटोपून बाहेरून घरी परत येत होता. तेव्हा रस्त्यामध्येच त्याच्या घरून परत जात असलेल्या रोहण स्थवीराची गाठ पडली तेव्हा ब्राह्मण त्यांस म्हणाला, ''हे साधु पुरूषा, तुम्ही माझ्या घरी गेले होते काय?''

''होय ब्राह्मण, गेलो होतो.'' असे रोहण उत्तरले.

''पण तेथे काही मिळाले काय?'' सोनुत्तराचा प्रश्न.

''होय, ब्राह्मण, मला मिळाले.''

हे एकून तो मनोमनच आनंदला व घरी गेला आणि घरच्या लोकांना विचारले ''तुम्ही त्या भिक्षूस काही दिले काय?''

''आम्ही त्यांस काहीही दिले नाही.''

घरच्या लोकांकडून वरील उत्तर ऐकून सोनुत्तरास त्या भिक्षूचा फार संताप आला आणि दुसऱ्या दिवशी तो आपल्या दरवाज्यासमोर स्थवीर होण्याची वाट पहात बसला. नेहमी येणाऱ्या भिक्षूंनी माझ्या घरी काहीही मिळाले नाही तरी मिळाले म्हणून खोटे का सांगावे ? याबद्दल आज मी त्याला लाजेने खाली पहावयास लावीन, असा तो विचार करीत होता.

नित्त्याप्रमाणे रोहण स्थवीर ब्राह्मणाच्या घरी गेले. तेव्हा ब्राह्मण त्यांस म्हणाला-

''काल माझ्या घरी तुम्हाला काहीही दान मिळाले नाही तरी माझ्याजवळ तुम्ही मिळाले म्हणुन सांगितले. तुम्हा लोकांना असे खोटे बोलण्याचा केव्हापासून परवाना मिळाला.''

यावर स्थवीरांनी उत्तर दिले ''हे ब्राह्मण, सात वर्षे दहा महिन्यापासून मी सतत तुमच्या घरी येतो आहे. परंतु या अवधीत 'भंते पुढे जा' एवढे सौजन्याने सांगणारा तुमच्या घरी कोणीही माझ्या दृष्टीस पडला नाही. काल निदान एवढे सौजन्य तर लाभले. त्याला उद्देशून मी काल तुम्हाला तसे सांगितले त्यात खोटेपणा काय आहे ?''

यावर सोनुत्तराच्या मनात विचार आला की, 'हे बौद्ध केवळ शाब्दिक सौजन्याने इतके भारावून गेले की, प्रत्यक्ष आपणास दानच मिळाले म्हणून आपली भरपूरस्त्यात प्रशंसा करतात. मग प्रत्यक्ष दान दिले तर आपल्याबद्दल केवढी कृतज्ञता व्यक्त करतील!' या विचाराचा सोनुत्तर ब्राह्मणाच्या मनावर चांगलाच परिणाम झाला आणि त्याने आपल्याकरीता वाढलेल्या भोजनातून वाटीभर भात आणि त्यानुसार व्यंजन (भाजी) त्या भिक्षूस दान दिली आणि म्हणाला ''यापुढे माझ्या घरून दररोज असेच दान आपणास मिळेल.''

त्या दिवसापासून त्या भिक्षूच्या विनयशील आचार विचारांचा त्या ब्राम्हणावर खूप प्रभाव पडला. त्यांनी दररोज आपल्या घरी यावे असे त्यास वाटु लागले आणि यापुढे नेहमी आपल्या घरी भोजनास यावे म्हणुन त्याने स्थवीरास प्रार्थना केली.

स्थवीर रोहणने चूप राहूनच निमंत्रणाचा स्वीकार केला. दररोज भोजनोपरांत जाण्यापूर्वी रोहण स्थवीर काहीना काही भगवान बुद्धांचा उपदेश करीत असत.

## ७. नागसेनाचा जन्म

सोनुत्तराची पत्नी आता गरोदर होती. दहा महिने पूर्ण झाल्यानंतर तिने एका सुंदर मुलास जन्म दिला. त्याचे नाव नागसेन असे ठेवण्यात आले. तो वाढू लागला. सात

वर्षाचा झाला. तेव्हा त्याचे वडील त्यास म्हणाले. ''प्रिय बाळ नागसेन, आपल्या वंशपरंपरेची विद्या तू शिकावीस, हे बरे.''

''ती विद्या तरी कोणती आहे पिताजी ?''

''बाळ नागसेन, तीन वेद आणि दुसरे कलेचे ज्ञान. हीच खरी विद्या''

''पिताजी, मी हे सर्व शिकेन.''

तेव्हा सोनुत्तर ब्राह्मणाने कोणत्या एका ब्राह्मण आचार्यास एक सहस्त्र मुद्रा गुरूदक्षिणा म्हणून दिल्या आणि त्यांच्याकरिता आपल्या घरीच योग्य ठिकाणी नागसेनास शिकविण्यासाठी आसन लावून दिले व शिक्षकास म्हणाला, ''हे ब्राह्मण, तुम्ही नागसेनास पवित्र वेद धर्म शिकवा.''

आचार्याने नागसेनास वेद-मन्त्र शिकविण्यास सुरवात केली. मूळतःच तल्लख बुद्धी व हुशार नागसेनाने पहिल्या उजळणीतच वेद-मन्त्र मुखोद्‌गत केले आणि त्यांचा अर्थही पूर्णपणे समजून घेतला. कोणत्या श्लोकांचे निश्चित स्थान तो अचूकपणे ओळखीत असे. त्याच्या अंतःकरणात एक प्रकारची वेदासंबंधी दिव्य दृष्टी प्राप्त झाली. त्यातील शब्द ज्ञान, अध्याक्षरे, व्याकरण आणि वेदातील पात्रांचे चारित्र्य यासंबंधी अंतरंग त्यास पूर्णपणे समजले. तो भाषातज्ज्ञ, व्याकरणतज्ज्ञ तसेच लोकमन आणि महापुरूष लक्षण शास्त्राबरोबर तो अनेक शास्त्रांतही पूर्णतः पंडित झाला.

यानंतर नागसेनाने वेद शास्त्रात पारंगता प्राप्त केल्यानंतर आपल्या वडिलास विचारले, ''पिताजी, आपल्या ब्राह्मण वंशपरंपरेनुसार एवढेच शिकायाचे होते की, अजून यापुढे शिकायाचे आहे ?''

''बाळ नागसेन, जगातील सर्व ज्ञान वेदातच आहे. आता काही शिकायाचे उरले नाही.''

तेव्हा नागसेनाने गुरू समोर अंतीम उजळणी करून घेतली व तेथून तो बाहेर पडला. तो आपल्या पुर्व संस्कारानुरूप एकांत स्थळी जाऊन गुरूजवळ शिकलेल्या ज्ञानाचा आढावा घेत चिंतन करीत बसतो. परंतु वेद विद्येत आदी मध्ये व अंतीम अवस्थेत मानवोपयोगी महत्तपूर्ण असे त्याला काही एक सापडले नाही. तेव्हा तो बेचैन झाला व मनाशीच म्हणाला, 'हे तिन्ही वेद म्हणजे तुच्छ आहेत, पोकळ आहेत, भुश्याप्रमाणे त्यात सार नाही, अर्थ नाही की सत्य नाही.'

इकडे स्थवीर रोहण वत्तनीय आश्रमात बसले होते. त्यांनी ध्यान शक्तीच्या बळावर

नागसेनाच्या अंतःकरणाने व्यक्त केलेली प्रतिक्रिया जाणून घेतली. त्यांनी आपले चिवर बदलले. हाती भिक्षापात्र घेतले; व वत्तनीय येथून अदृष्य होऊन कजंगल नावाचे ब्राह्मण गाव गाठले.

## ८. नागसेनाची आयुष्मान रोहणशी भेट

स्थवीर रोहण सोनुत्तराचे घरी चालला होता. त्यावेळी नागसेन दारातच उभा होता. स्थवीरास पाहून तो मनोमन आनंदला. प्रमुदित झाला. रोहणच्या तेजयुक्त, शांत मुद्रेकडे पाहून या भिक्षूस मानवी जीवनाचे सार माहीत असावे, असे वाटून भिक्षू प्रती त्याच्या मनात प्रीती उत्पन्न झाली व तो त्याच्या जवळ जाऊन म्हणाला, ‘‘हे महाशय, असे डोक्याचे मुंडण केलेले व पीत वस्त्र धारण केलेले आपण कोण?’’

‘‘बाळा, मी एक भिक्षू आहे.’’ रोहण उत्तरले.

‘‘तुम्ही भिक्षू कसे आहात ?’’ पुन्हा नागसेनाने पृच्छा केली.

‘‘पाप रूपी मळाचा नाश करण्यासाठी मी भिक्षू झालो आहे. रोहण उत्तरले. पण महाशय, आपण इतर लोकांसारखे डोक्यावर केस कां ठेवीत नाही?’’

पुन्हा नागसेनाचा प्रश्न,

‘‘अरे, दुष्ट कृत्यांचे डाग समाजातून काढण्यासाठी उच्च प्रतीचे जीवन जगत असता त्यात सोळा दोष आड येतात. हे जाणून भिक्षू डोक्याचे व दाढीचे केस काढीत असतात.’’

‘‘ते सोळा दोष कोणते बरे ?’’

रोहण म्हणाले, ‘‘केस आणि दाढी ठेवल्याने (१) वेळोवेळी सावरावे लागते, (२) श्रृंगारावे लागते, (३) तेल लावावे लागते, (४) केसं धुवावे लागतात, (५) पुष्पमाळ बांधावी लागते, (६) अत्तर लावावे लागते, (७) सुगंधित ठेवावे लागते (८) हिरडा वापरावा लागतो, (९) आवळ्याचे तेल लावावे लागते, (१०) रंगवावे लागते, (११) बांधावे लागते, (१२) कंगीने विंचरावे लागते, (१३) वेळोवेही नाव्ह्यास बोलवावे लागते, (१४) केस मोकळे करावे लागतात, (१५) केसात उवा पडतात, आणि (१६) जेव्हा केस झडू लागतात, तेव्हा लोकांना तो छळ वाटतो. त्यामुळे ते दुःखी होतात, पश्चाताप करतात. काही वेळा तर उर बडवून रडू लागतात आणि मोहाच्या जाळ्यात सापडतात. बाळा, या सोळा बाधा आड आल्या असता मनुष्याला कुशल गोष्टींचे विस्मरण होण्याची संभावना असते.’’

“मग आपले वस्त्र देखील इतर लोकांच्या वस्त्रासमान नाहीत. हे का ?” नागसेनाने पुनः जिज्ञासेने विचारले.

“बाळ, गृहस्थाच्या सुंदर वस्त्रात सुप्त अशा पाच लालसा असतात. त्यामुळे भयानक धोका उद्‌भवण्याची शक्यता असते मात्र काषाय वस्त्र धारण करणारास त्यांचा संपर्कही नसतो. म्हणूनच माझी वस्त्रे इतर लोकांच्या वस्त्रांहून अगदी वेगळी आहेत.” असे रोहण स्थवीराने सांगितले.

‘हे महाशय, आपणास यथार्थ ज्ञान अवगत आहे काय ?’ नागसेनाने परत पृच्छा केली.

“होय बाळ, मला यथार्थ ज्ञान अवगत आहे. याशिवाय जगातील सर्वोत्तम मंत्रही मला अवगत आहेत.” रोहण उत्तरले.

“हे महाशय, ते मला देखील शिकवाल काय ?”

“होय तर शिकवू शकेन.”

“मग शिकवा ना मला ते ज्ञान”

“पण त्यासाठी ही योग्य वेळ नाही. कारण आता मी भिक्षाटनासाठी नगरात आलो आहे.” असे रोहणने सांगितले.

तदनंतर नागसेनाने रोहणच्या हातातील भिक्षापात्र आपल्या हातात घेऊन त्यांना घरात घेऊन गेला, आणि आपल्या हाताने उत्तमोत्तम पक्वान्नाचे भोजन वाढून त्यांना तृप्त केले. आयुष्मान रोहणाने भोजन आटोपून पात्रातील हात काढून घेतल्यावर शांत भावाने बसले असता नागसेन त्यांना म्हणाला, “हे महाशय, आता शिकवा ना मला तो सर्वोत्तम मंत्र.”

यावर रोहण स्थवीर म्हणाले, “पण त्यासाठी आधी तू सर्व बंधनातून मुक्त होऊन आई-बापाच्या सम्मतीने प्रव्रजित होऊन माझ्या सारखा भिक्षू वेश धारण केला पाहिजे. तर मी शिकविलेल्या ज्ञानाचा तुला लाभ होईल.”

**नागसेनाची प्रव्रजा**

तेव्हा नागसेन आपल्या आई-वडिलाकडे जाऊन त्यांना म्हणाले, “आई आणि बाबा, हा भिक्षू जगातील सर्वश्रेष्ठ मन्त्र आपणास अवगत असल्याचा दावा करतो, परंतु जो भिक्षू नाही त्यास तो मन्त्र ते शिकवीत नाहीत. तेव्हा त्यांचे जवळ प्रवर्जित

होऊन ते ज्ञान मी संपादन करू इच्छितो. यासाठी मला आपली सम्मती हवी.''

खऱ्या ज्ञानाच्या प्राप्तीसाठी गृहत्याग करून प्रवर्जित होण्याची वेळ नागसेन वर यावी; याबद्दल त्याच्या आई-वडीलांना अतिशय दुःख झाले. परंतु 'ज्ञान लाभ करून आपला पुत्र परत आपल्याच घरी येईल.' या खुळ्या समजूतीने त्यांनी त्याला सम्मती दिली.

आयुष्मान रोहण नागसेनास घेऊन वत्तनीय आश्रमाच्या विजंभवत्थु येथे गेले. तेथे एक रात्र मुक्कामास राहून दुसऱ्या दिवशी हिमालयाच्या पायथ्याशी असलेल्या रक्षित काळ या ठिकाणी जाऊन कोटिशत अर्हतांच्या संघात नागसेनास प्रवर्जित केले. प्रवर्ज्या घेतल्यानंतर नागसेन रोहण स्थवीरास म्हणाले, ''भंते आता मी आपल्या संघाची वस्त्रे धारण केली आहेत. तेव्हा मला त्या मंत्राचे शिक्षण द्यावे.''

तदनंतर रोहण स्थवीरास विचार आला. ''प्रथम याला मी काय शिकवावे सुत्त की अभिधम्म?'' परंतु नागसेन पंडित आहे. अभिधम्मावर हा लवकरच प्रभुत्व मिळवू शकेल असे नागसेनाची बुद्धिमत्ता पाहून स्थवीरास वाटले आणि त्यांनी प्रथम अभिधम्मच शिकविला.

श्रामणेर नागसेन अभिधम्म शिकू लागला. त्याची स्मरण शक्ती दांड़गी होती. त्यामुळे त्याने लवकरच सर्व अभिधम्म अगदी तोंडपाठ केला.

अभिधम्मावर प्रकाश टाकणारी मुख्यतः सात पुस्तके आहेत. ती अशी :-

**(१) धम्मसंगीणि** :- यात पाप, पुण्य आणि अव्याकृत म्हणजे पापही नाही व पुण्यही नाही. यावर तीन व दोन प्रकारांनी खुलासा केला आहे.

**(२) विभंगप्पकरण** :- स्कंध विभंग इत्यादी. याचे १८ विभाग आहेत.

**(३) धातु कथाप्पकरण** :- संग्रह, असंग्रह इत्यादी. यात १४ विभाग आहेत.

**(४) पुग्गलपञ्ञति** :- स्कंध प्रज्ञप्ति, आयतन प्रज्ञप्ति इत्यादी. याचे ६ विभाग आहेत.

**(५) कथा वत्थुप्पकरण** :- स्वपक्षात पाचशे आणि विपक्षात पाचशे सुत्ते अशा एक हजार सुत्तांचा यांत संग्रह आहे.

**(६) यमकप्पकरण** :- मूळ-यमक, स्कंध-यमक इत्यादी. यात १० विभाग आहेत.

**(७) पट्ठानप्पकरण** :- हेतू प्रत्यय इत्यादी. यात २४ प्रकरणे आहेत.

या सातही मोठमोठ्या ग्रंथांचा श्रामणेर नागसेनाने अभ्यास केल्यानंतर नागसेन आपल्या उपाध्यायास म्हणाला, ''भंते, सध्या एवढेच पुरेसे आहे. एवढ्या अभ्यासानेच मी आपणास सर्व काही विवरण करून सांगू शकेन.''

नंतर नागसेन कोठिशत अर्हता समोर जाऊन उपस्थित झाला व त्यांना विनयपूर्वक म्हणाला, ''हे भंते, मी आपल्या समोर सर्व अभिधम्म पिटकाचे विस्ताराने विश्लेषण करू इच्छितो. कुशलधम्म आणि अव्याकृत धम्म अशा तीन विभागात मी अभिधम्माची छाननी करावयाचे ठरविले आहे.''

''ठीक आहे, नागसेन आपण अभिधम्माचे विश्लेषण करून सांगावे.''

तेव्हा नागसेनाने सातही ग्रंथांवर विस्तृत प्रवचनाद्वारे सात महिन्यात पूर्ण विवेचन करून सांगीतले. त्यावेळी धरणी कंप पावली, देवगणांनी साधुकार देऊन अनुमोदन केले, ब्रह्मदेवांनी टाळ्या वाजवून आनंद व्यक्त केला आदि दिव्य चंदन चूर्ण व मंदार पुष्पांचा वर्षाव होऊ लागला.

## १०. नागसेनाचा अपराध व त्यासाठी दंड - विधान

आता नागसेनाच्या वयाला वीस वर्षे पूर्ण झाली होती. तेव्हा रक्षित तळाच्या कोटिशत अर्हतानी नागसेनाला उपसंपदा दिली. आता नागसेन भिक्षू झाले. रात्र संपली आणि दुसऱ्या दिवशी सकाळी चीवर परिधान करून नागसेनाने हाती आपले भिक्षापात्र घेतले व गुरू सहवर्तमान भिक्षाटन करावयास गावात गेले. रस्त्याने ते जात असता नागसेनाच्या मनात असे विचार आले की, 'माझे उपाध्याय अगदीच तिरस्कारणीय व मूर्ख आहेत. भगवान बुद्धाच्या मुखातून बाहेर पडलेला ज्ञानोपदेश बाजूला ठेवून त्यांनी मला प्रथम अभिधम्म शिकविला. हे त्यांच्या निर्बुद्धीपणाचे व अपरिपक्तेचेच लक्षण होय.'

त्यावेळी रोहण स्थवीर ध्यान बळाच्या शक्तिवर नागसेनाच्या मनाचा वेध घेत चालले होते. तात्काळ त्यांनी नागसेनाच्या मनातील विचार ओळखले व नागसेनाकडे फिरून म्हणाले, ''नागसेन तुझ्या मनाने तू अनुचित विचार करीत आहेस. गुरूप्रती असे विचार करणे हे तुला शोभण्यासारखे तर नाहीतच परंतु तुझ्या दृष्टीनेही ते बरे नाही.''

'माझे उपाध्याय दुसऱ्याच्या चित्तात उठलेले विचार आपल्या ध्यान शक्तीने समजू शकतात, ही किती आश्चर्यकारक व अद्‌भूत बाब आहे. याची जाणीव भिक्षू नागसेनास झाली. खरोखरच माझे आचार्य महापंडित आहेत. आता आपण त्यांची क्षमा मागितली

पाहिजे,' असे त्यांस मनोमन वाटू लागले. ते म्हणाले, "भंते, मला क्षमा करा. यापुढे चुकून देखील मी असा विचार करणार नाही."

तद्नंतर रोहण स्थवीर म्हणाले, "नागसेन, एवढ्या सबबीवर मी तुला क्षमा करू शकत नाही." त्यासाठी ऐक, सागल नावाचे एक महासंपन्न असे नगर आहे. तेथे मिलिन्द नावाचा राज राज्य करतो. तो भिक्षूसंघास अनेक कोड्यांत टाकणारे कूट प्रश्न विचारून त्यांना तंग करतो व खाली पहावयास लावतो. तेव्हा तू सागल नगरात जाऊन मिलिंद राजाशी भेट घे व युक्तिवादात त्याचा पराभव करून असे तोंडघशी पाड की, पुन्हा तो कधी कोणास हैराण करणार नाही. तरच मी तुला क्षमा करीन.

"भंते, एकटा मिलिंद राजाच काय पण समस्त जंबुद्धीपातील सर्व राजांनी एकत्र येऊन मला जरी प्रश्न विचारले तरी त्यांच्या सर्व प्रश्नांची उत्तरे देऊन सिद्धांत सांगेन व त्यांना शांत करीन. पण आपण मला क्षमा करा."

"ठीक आहे, मी तुला क्षमा करीत आहे."

"पण भंते, आता लवकरच पावसाळा सुरु होईल. तेव्हा वर्षावासाचे तीन महिने मी कोठे घालवावे?"

नागसेन, यावेळी वत्तनीय विहारात महास्थवीर अस्सगुत्त राहतात. तू त्यांचेकडे जा आणि माझ्या वतीने तू त्यांच्या चरणावर विनम्र अभिवादन करून सांग की, माझे उपाध्याय आपल्या चरणावर नतमस्तक होऊन पंचांग प्रमाण करून आपली विचारपूस करीत होते व आपली प्रकृती यथोचित, सुखी व निरोगी रहावी अशी त्यांची प्रार्थना आहे. या वर्षावासातील तीन महिने मी आपल्या सहवासात घालवावे म्हणून त्यांनी मला आपणाकडे पाठविले आहे, "तुझ्या उपाध्यायाचे नाव काय?, असे विचारल्यास 'रोहण स्थवीर, असे सांग. मात्र त्यांनी उपाध्यायाचे (त्यांचे) मूळ नावच विचारले तर भंते, आपले नाव माझ्या उपाध्यायानांच माहीत आहे असे सांग."

"ठीक आहे भंते", असे उत्तर देऊन भिक्षू नागसेनाने आदरणीय रोहण स्थवीरास प्रमाण करून प्रदक्षिणा घातली. तद्नंतर चीवर धारण केले व आपले चीवर, भिक्षापात्र. घेऊन त्याने उपाध्यायाचा निरोप घेतला. क्रमशः चारिका करीत करीत आयुष्मान नागसेन वत्तनीय विहारातील महास्थवीर अस्सगु त्ताकडे येऊन पोचले. शेवटी त्यांच्या जवळ जाऊन त्यांना पंचांग प्रणाम केला व आपल्या उपाध्यायाचा निरोप त्यांना कळविला.

तेव्हा "तुझे नाव काय?" असे अस्सगुत्ताने विचारले.

"भंते, माझे नाव नागसेन आहे."

"तुझ्या उपाध्यायाचे नाव काय आहे?"

"भंते, माझ्या उपाध्यायाचे नाव रोहण स्थवीर आहे"

"माझे नाव काय आहे."

"भंते, आपले नाव माझ्या उपाध्यायांना माहीत आहे"

"ठीक आहे नागसेन, तू माझ्याकडे राहा, जा तुझे चीवर व भिक्षापात्र बाजूस ठेव."

दुसऱ्या दिवशी सकाळी नागसेनाने विहाराचा परिसर झाडून काढला. पिण्यासाठी पाणी भरून ठेवले आणि तोंड धुण्यासाठी दंतमंजन व पाणी यथास्थानी लाऊन ठेविले. स्थवीराने झाडून काढलेले विहार व अंगण पुन्हा झाडून काढले. दंतमंजन व पाणीही दुसरेच घेतले. हे करीत असता स्थवीर एक शब्दही बोलले नाहीत. हा प्रकार सात दिवसापर्यंत असाच राहिला. सातव्या दिवशी अस्सगुत्ताने नागसेनास तेच प्रश्न विचारले, आणि नागसेनाने तीच उत्तरे दिली. ही एक प्रकारे नागसेनाची परीक्षाच होती. परंतु त्यात तो खरा ठरला होता. 'आपले काही चुकत असल्यामुळेच स्थवीरास आपले कृत्य पसंत नाही,' या विचाराने घाबरलेल्या अवस्थेत असतांना देखील नागसेनाने आपल्या मनात नैराश्य व वैफल्यास जागा दिली नाही. धैर्य खचू दिले नाही. यावर अस्सगुत्त अतिशय खुष झाले व त्यांनी नागसेनास विहारात राहण्याची सम्मती दिली आणि वर्षावासाचे अनुष्ठान केले.

## ११. महाउपासिकेला नागसेनाचा धर्मोपदेश

त्यावेळी भगवान बुद्धाच्या धम्माप्रती नितांत श्रद्धा बाळगणारी एक महाउपासिका तीस वर्षापासून महास्थवीर अस्सगुत्ताची सेवा करीत होती. तिने वर्षावासाचे शेवटी आयुष्मान अस्सगुत्ताची भेट घेतली आणि संगाती राहणारे कोणी दुसरे भिक्षू पण आहेत कां? असे विचारले. तेव्हा नागसेन नामक एक भिक्षू राहत असल्याचे समजताच तिने आयुष्मान नागसेनने सहवर्तमान अस्सगुत्तास दुसऱ्या दिवशीचे भोजनाचे आमंत्रण स्वीकारण्याची विनंती केली आणि मौन भावानेच आयुष्मान अस्सगुत्ताने तिच्या निमंत्रणाचा स्वीकार केला.

रात्र संपली, दुसरा दिवस उजाडला. अस्सगुत्ताने व नागसेनाने चीवर परिधान केले, भिक्षापात्र घेऊन भोजनास गेले. यथास्थानी बसल्यावर महाउपासिकेने दोघांनाही

स्वहस्ते तयार केलेले उत्तमोत्तम पक्वात्रांचे भोजन वाढले. भोजन संपूवन पात्रातील हात काढल्यानंतर अस्सगुत्त नागसेनास म्हणाले, 'नागसेन, या महाउपासिकेचे तुम्ही दानानुमोदन करावे.' एवढे बोलून त्यांनी आसन सोडले व सरळ विहारात निघून गेले.

त्यानंतर महाउपासिका आयुष्मान नागसेनास म्हणाली, ''भंते नागसेन, अत्यंत म्हातारपणाने माझे शरीर व मन खंगून गेले आहे. तेव्हा भगवान बुद्धाच्या धम्माचे ठायी अपरिमित श्रद्धेविषयी गंभीर असाच मला उपदेश करावा.'' आयुष्मान नागसेनाने देखील लोकोत्तर अया निर्वाणासंबंधी अभिधम्म शास्त्रात असलेली गंभीर तत्त्वे तिला सांगितली. ते ऐकून तिला दूरदृष्टी प्राप्त होऊन स्वच्छ व निर्मळ ज्ञानाची जाणीव झाली. ज्या वस्तुचा उदय आहे, तिचा शेवटही निश्चित ठरला आहे, हे सत्य तिला ठामपणे कळले. जन्म-मृत्यू हे अंगभूत असे गुणधर्म आहेत असे राग विरहित निर्मळ ज्ञान बसल्या आसनावरच तिला प्राप्त झाले.

इकडे नागसेनाने देखील बसल्या जागेवरच दिलेल्या उपदेशावर विचार करीत असता आत्यदृष्टी, शंका व कर्मकांड ही तिनही बंधने तोडून श्रोतापत्ति ही निर्मळ ज्ञानाची अवस्था प्राप्त केली. ही जीवन-मुक्त होण्याची (अर्हत्वाची) पहिली अवस्था आहे.

इकडे विहारात बसून अस्सगुत्त, आयुष्मान नागसेन संबंधाने विचार करीत बसले असता आपल्या ज्ञान शक्तिने नागसेन व महाउपासिकेला एकाच उपदेशाने निर्मळ धम्म ज्ञान झाल्याचे समजले आणि त्यांच्या मुखातून आपोआप धन्योद्गार बाहेर पडले, 'धन्य आहे. नागसेन, एकाचवेळी तू उदात्त असे दोन कार्य तडीस नेलेस ही तू उत्तम कामगिरी केलीस.' देवगणांनी सुद्धा साधुकार दिला.

यानंतर आयुष्मान नागसेन महाउपासिकेचा निरोप घेऊन आयुष्मान अस्सगुत्ताकडे गेले आणि प्रणाम करून एके बाजूस बसले.

## १२. नागसेनाचे पाटलीपुत्रास प्रयाण

त्यानंतर आयुष्मान अस्सगुत्त म्हणाले, ''नागसेन, आता तू पाटलीपुत्रास जा. पाटलीपुत्र शहरातील अशोकारामात आयुष्मान धम्मरक्षित वास्तव्य करीत आहेत.''

''भंते, येथून पाटलीपुत्र शहर किती दूर आहे?''

''शंभर योजन.''

''भंते, हे अंतर फार मोठ्या पल्लयाचे आहे आणि मध्यंतरी भिक्षा मिळणे ही कठीण आहे. तेव्हा एवढा प्रवास पार करून तेथे मला कसे जाता येईल ?''

''नागसेन, जा वाटेत तुला काळीकमोचा भात, अनेक प्रकारची कढी व व्यंजने मिळतील. तू मुळीच घाबरू नकोस.'' ''भंते ठीक आहे.'' असे म्हणून नागसेनाने पाटलीपुत्राच्या दिशेने आपला प्रवास आरंभ केला.

त्याचवेळी पाटलीपुत्र येथील रहिवाशी एक व्यापारी पाचशे गाड्यांचा तांडा घेऊन पाटलीपुत्राच्या दिशेने चालला होता. थोड्या अंतराने मागून चालत येत असलेल्या नागसेनास त्याने दुरूनच पाहले आणि गाड्या थांबवून त्यांच्या येण्याची वाट पाहू लागला व त्यांच्या जवळ जाऊन नागसेनास त्याने आदरपूर्वक प्रणाम केला आणि ''भंते आपण कोठे जात आहात ?'' अशी पृच्छा केली.

''हे गृहपती, मी पाटलीपुत्रास जात आहे.''

''भंते, ठीक आहे. आम्ही लोकही पाटलीपुत्रालाच जात आहोत. तेव्हा आपण आमच्या बरोबरच लावे. आयुष्मान आचार विचाराचा व्यापाऱ्यावर तोपर्यंत फारच प्रभाव पडला होता. त्याने नागसेनास उत्तमोत्तम पक्वान्नांचे स्वतःच्या हाताने भोजन वाढणे संपूवन हात धुतल्यानंतर व्यापारी अत्यंत अदबीने नागसेनाच्या बाजूस बसला आणि म्हणाला, ''भंते, आपले नाव काय आहे ?''

''गृहपती, माझे नाव नागसेन आहे.''

''भंते, मी भाग्यवान म्हणून आपली भेट झाली. आपल्याला अभिधम्म अवगत आहे तसा मी सुद्धा अभिधम्माचा अभ्यासक आहे. भंते, मला अभिधम्माचे तत्त्वज्ञान सांगावे.''

यानंतर आयुष्मान नागसेनाने त्याला अभिधम्माचा उपदेश केला. क्रमशः अभिधम्माचे विश्लेषण करीत असता 'ज्या वस्तुला आरंभ आहे तिलाच क्षय आहे, याची नागसेनास पुनः ओळख पटली. तद्वतच व्यापाऱ्याचेही झाले. याप्रमाणे तो व्यापारी नागसेनासह आपल्या पाचशे गाड्यांचा तांडा पुढे करून चालला असता तो पाटलीपुत्र शहराजवळ एका चौररस्त्यावर येऊन पोचला. तेथे थांबून तो आयुष्मान नागसेनास म्हणाला, ''भंते, हा आहे अशोकारामाचा मार्ग आणि सध्या मजपाशी सोळा हात लांबीच व आठ हात रूंद असे लोकरीचे किंमती वस्त्र आहे. ते मी आपणास दान देत आहे. तरी कृपा करून आपण याचा स्वीकार करावा.''

आयुष्मान नागसेनाने अत्यंत प्रेमाने त्याचा स्वीकार केला. व्यापाऱ्यास समाधान वाटले. प्रीतीयुक्त अंतःकरण प्रमुदित झाले तेव्हा, प्रणाम व प्रदक्षिणा करून त्या व्यापाऱ्याने त्यांचा निरोप घेतला,

आयुष्मान नागसेन अशोकाराम येथे धम्मरक्षिताकाकडे गेले व अभिवादन करून त्यांना आपल्या येण्याचा हेतू सांगितला.

## १३. नागसेनाचे अर्हतपदलाभ

नागसेनाने महास्थवीर धम्मरक्षितांच्या मार्गदर्शनाखाली त्रिपिटकाचा अभ्यास सुरू केला. त्रिपिटक म्हणजे भगवान बुद्धाच्या पवित्र ज्ञानोपदेशाचा तीन भागांत केलेला संग्रह. नागसेनाने पहिल्याच उजळणीत तीन महिन्याच्या आतच संपूर्ण त्रिपिटक मुखोद्गत केले आणि पुढील तीन महिन्यात त्याच्या खोल अर्थाचे परिशिलन केले.

नागसेन आता त्रिपिटकाचार्य झाला परंतु अजून महत्त्वपूर्ण शिखर त्यास गाठावयाचे होते. ज्ञान देवतेच्या मंदिरात त्याला प्रवेश मिळाला परंतु मुख्य देवता दूरच होती. तेव्हा आयुष्मान धम्मरक्षित त्यास म्हणाले, ''नागसेन, गवळी गाई पाळणारा धनी खरा परंतु त्याचे दूध-दूभते दूसरेच खातात. तद्वतच तू श्रमण असून खऱ्या श्रमणत्वाचा लाभ अजून केलेला नाहीस. तेव्हा त्रिमिटकाचार्य होऊन काय उपयोग ?'' हे वचन ऐकून नागसेन लज्जीत झाला व म्हणाला, ''भंते, पुरे करा त्यासाठी मी आपणास अधिक बोलावयास संधी देणार नाही.''

आयुष्मान धम्मरक्षिताचे बोलणे त्यास चांगलेच लागले होते. त्यामुळे अर्हतपद मिळविण्यासाठी मनाचा ठाम निश्चय केला. आणि त्याच रात्री नागसेनास अर्हतपदाचा लाभ झाला. त्याबरोबर अर्हतांना लाभणारी प्रतिसंविद ज्ञान शक्तीही त्यास प्राप्त झाली. म्हणजे इंद्रिये दमन, नैसर्गिकरीत्या निर्णय करण्याचे सामर्थ्य आणि अचूक पण तत्काळ विवरा करण्याचे सामर्थ्य लाभले. याप्रमाणे नागसेनास अर्हतपद गाठत असतानाच पृथ्वी कंपायमान झाली, ब्रह्मदेवांनी शंख ध्वनी केला व आकाशातून दिव्य चंदन चूर्ण व मंदार पुष्पांचा वर्षाव झाला.

त्यावेळी हिमालयाच्या पायथ्याशी असलेल्या रक्षितकाल येथे कोटिशत अर्हत वास करीत होते. त्यांनी नागसेनास पाहण्याच्या उत्कंठतेने नागसेनाने येथे यावे म्हणून निरोप पाठवला. आहेल्या दुताचा निरोप समजताच तत्काळ नागसेनाने धम्मरक्षितास प्रणाम करून त्यांचा निरोप घेतला आणि अशोकारामात अदृश्य होऊन हिमालयाच्या रक्षिततल प्रदेशात राहणाऱ्या कोटिशत अर्हता समोर जाऊन तो दाखल झाला.

तेव्हा ते अर्हत नागसेनास म्हणाले, ''हे नागसेन, वादविवादात कुशल असलेला मिलिंद राजा बौद्ध भिक्षूंना अनेक कुट प्रश्न विचारून हैराण करतो व त्यांना खाली पहावयास लावतो. याबाबतीत तर त्याने कहर केला आहे. तरी तू तेथे जावे व राजाचे

दमन करून समाधान करावे.''

''आदरणीय भंते, संघाने आता निर्धास्त रहावे. एकटा मिलिंद राजा तर सोडाच परंतु त्यांच्या सारखे जंबुद्धीपातील सर्व राजे एकत्र येऊन मला प्रश्न विचारतील, तरी त्यांच्या सर्व प्रश्नांना समर्पक उत्तरे देऊन मी त्या सर्वांचे समाधान करीन हे पाहण्यासाठी आता आपण सागल शहरात निश्चितपणे यावे.''

अत्यंत शिस्तबद्ध असा त्यांनी केलेला पोषाख एखाद्या दीपमालेप्रमाणे शोभून दिसत होता. श्रमणांस अनुकूल असा वायू मंडल उत्पन्न करून ते कोटिशत अर्हत भिक्षू सागल नगरास पोचले !

## १४. आयुष्मान आयुपाल व राजा मिलिन्दाची भेट

त्यावेळी आयुष्मान आयुपाल संख्येय परिवेण नामक उद्यानात वास्तव्य करीत होते. तेव्हा राजा मिलिंद आपल्या मंत्र्यांना म्हणाला, ''आज रात्रीचे वातावरण किती रमणीय व प्रसन्न वाटते ! अशा वातावरणात धर्मचर्चा व प्रश्नोत्तरे करण्यास अत्यंत मौज वाटते. पण माझ्या शंका मिटविण्याकरिता कोणत्या श्रमण-ब्राह्मणाकडे जाऊ ? माझ्याशी चर्चा करून माझे समाधान करण्याचे सामर्थ्य कोणात आहे बरे ?''

''महाराज, आयुष्मान आयुपाल, नावाचे एक स्थवीर त्रिपिटकाचार्य आहेत. ते फार विद्वान भिक्षू असून संख्येय परिवेण येथे सध्या त्यांचे वास्तव्य आहे. तेव्हा महाराज आपण त्यांच्याकडे जाऊन प्रश्न विचारावे.'' असे पाचशे यवन सैनिकांनी उत्तर दिले.

''ठीक आहे, तर मी त्यांचेकडे येत असल्याबद्दल भदंत आयुपाल यांना निरोप द्या.''

त्याप्रमाणे राजाने आपल्या भेटीस यावयाचे ठरविले आहेत असा निरोप आयुष्मान आयुपालास कळविण्यासाठी दूत पाठविण्यात आला.

''ठीक आहे, तर राजास येऊ द्या.'' असा परत संदेश आयुपालाने कळविला.

तेव्हा राजा मिलिंद स्वतः रथावर स्वार होऊन आयुष्मान आयुपाल यांचेकडे संख्येय परिवेण येथे जावयास निघाला. त्यावेळी त्यांचेबरोबर पाचशे यवन राज कर्मचारी व अधिकारी होते. तेथे पोचल्यानंतर शिष्टाचारानुसार नमस्कारादी झाल्यानंतर मिलिंद राजा अदबीने एके बाजूस बसला व म्हणाला, ''भंते आयुपाल, आपण प्रव्रजित का झाले? त्यामागे आपला उद्देश काय आहे ?''

''महाराज, धर्मानुसार आचरण करता यावे व शांतीपूर्वक जीवन घालविता यावे

म्हणून मी प्रव्रजित झालो,'' असे आयुपाल उत्तरले.

''पण भंते, अशाप्रकारे जीवन कंठणारा एखादा सामान्य नागरिक आपणास माहीत आहे काय ?''

''होय महाराज, असे सामान्य नागरिकही आहेत. भगवान बुद्धाचे धम्माचे अधिराज्य स्थापन करतांना बनारस येथील ऋषिपतन मृगदायामध्ये धर्मचक्राचे प्रवर्तन केले असता, अठरा कोटी ब्रह्मदेव तसेच इतरही कित्येक देवांना धर्मज्ञान झाले होते. ते सर्व सामान्य नागरिकच होते. त्यांपैकी ऐहिक सुखाचा त्याग केलेले प्रवर्जित कोणीही नव्हते. तसेच महासम, महामंगल, समचित्तपरियाम, राहुलोवाद आणि पराभव सुत्तांचा तथागताने उपदेश केला असता असंख्य देवांना धर्मज्ञानाचा बोध झाला होता. ते सर्व सामान्य गृहस्थ नागरिक होते, प्रव्रजित नव्हे.''

''भंते आयुपाल तुमची प्रव्रजा निरर्थक आहे. ऐहिक सुखाला वंचित होऊन प्रव्रजित झालेले आणि धुतांगाचे पालन करणारे सर्वच बौद्ध भिक्षू आपल्या पूर्व जन्मीच्या पाप कृत्यामुळेच असे करतात. भंते आयुपाल, एकासनिक धुंतांग धारण करणारे आपल्या पूर्व जन्मात निश्चयाने चोर असले पाहिजेत; दुसऱ्यांच्या भोग्य वस्तुंची चोरी करण्याच्या पापकर्माच्या फळाने ते एकासनिक व्रती झाले आहेत. ते कधी एके ठिकाणी राहू शकत नाही व इच्छेनुसार खाऊ पिऊ शकत नाही. हा बौद्धांचा सद्गुण नव्हे अगर सदाचारी संयमी जीवनही नव्हे आणि ब्रह्मचर्येचे निर्मळ जीवनही नव्हे. ज्यांनी अभ्यावकाशिक (नेहमी उघड्यावर राहणे) धुंतांग धारण केले. ते पूर्व जन्मी गावांना उध्वस्त करणारे चोर असले पाहिजेत. दुसऱ्यांच्या घरांची लूट करण्याच्या असल्याकर्मामुळेच त्यांना गृहहीन अवस्थेत राहावे लागते. त्यांना लहानशा झोपडीत देखील राहता येत नाही. येथे कसला आला सद्गुण, संयम किंवा ब्रह्मचर्येचे निर्मळ जीवन ? आणि भंते आयुपाल, ज्यांनी एकाच आसनावर बसून राहण्याचे धुतांग व्रत घेतले आहे ते पूर्वजन्मी वाटसरूंना लुटमार करून, प्रवाशांना बांधून ठेऊन निघून जाणारे असले पाहीजेत. म्हणून त्यांना नेहमी बसून रहावे लागते. झोपू शकत नाही. हा काय त्यांचा सद्गुण म्हणावयाचा काय ? हा सद्गुण नव्हे, संयम नव्हे, की ब्रह्मचर्येचे निर्मळ जीवनही नव्हे.''

राजा मिलिंदाचे हे उद्गार ऐकून आयुष्मान आयुपालांस काहीच सुचेना म्हणून ते अगदी चूप बसले तेव्हा पाचशे यवन मिलिंदराजास म्हणाले, ''महाराज, आयुष्मान आयुपाल विद्वान आहेत खरे परंतु तेवढे आत्मविश्वासी दिसत नाहीत जेणे करून आपल्या प्रश्नांची उत्तरे देऊ शकतील.''

याप्रमाणे आयुष्मान आयुपालास स्तब्ध बसलेले पाहून राजा मिलिंद मिष्कीलपणे उच्च स्वराने म्हणाला, ''अरे हे जंबुद्वीप अगदी भुश्याप्रमाणे पोकळ आहे. तुच्छ आहे. माझ्याशी चर्चा करून माझ्या शंका दूर करू शकेल. असा श्रमण, ब्राह्मण किंवा पंडित विद्वान येथे कोणीही उरला नाही.'' एवढे बोलून राजा मिलिंदाने यवनाकडे पाहिले परंतु ते अगदी निर्भय निशंकतेने उभे असलेले पाहून त्याच्या मनात विचार आला की, 'मजबरोबर चर्चा करण्याचे धाष्टर्य असलेला कोणी एखादा बौद्ध भिक्षू अवश्य असला पाहिजे. तरच हे यवन निर्भय व निःशंकतेने माझ्या डोळ्याशी डोळे भिडवून आत्मविश्वासने उभे आहेत.'

तेव्हा पुन्हा मिलिंद राजाने यवनास प्रश्न केला, ''काय मजबरोबर चर्चा करून माझे शंका निवारण करणारा दुसरा कोणी पंडित भिक्षू आहे काय ?''

''या अवधित नागसेन गावे, शहरे व राजधान्या मागे टाकून चारिक करीत सागल शहरात येऊन दाखल झाले होते. त्याचबरोबर श्रमणाचा फार मोठा समूह होता. त्यांनी नागसेनास आपला संघनायक मानले. सर्व समुहाची धूरा वहन करणारा गणनायक व गणाचार्य म्हणून त्यांची कीर्ती वाढत होती. बौद्ध तत्त्वज्ञानाचे चालक म्हणून त्यांना मान्यता मिळाली होती. भिक्षू समुहात व सामान्य जनतेस त्यांचा आदर होता. कारण नागसेन ज्ञानी, हुशार, पंडित, चतुर व सामर्थ्यशाली होते. त्यांची विवेचनशैली कौशल्यपूर्ण होती. ते कुशल अनुभवी असून अतिशय नम्र होते. त्रिपिटकावर त्यांचे परिपूर्ण प्रभुत्व असून धैर्यवान होते. स्वभावाने शांत व वेद शास्त्रातही पारंगत होते. भिक्षूंच्या अंगी असणारी दिव्य दृष्टी त्यांना प्राप्त झाली होती. ते लोक कथा जाणणारे होते. तसेच पर्याप्तीधर, पारमिता प्राप्त निरनिराळ्या विहारांतील स्थानिक अभ्यास त्यांचा दांडगा होता. बुद्धधम्माचे नऊ खंड मुखोद्गत करून त्यांनी मनुष्य जीवनात पूर्णत्व प्राप्त केले होते. त्यांच्यात प्रतिभाशाली विवेचन शक्ती होती; अपयश त्यसांना माहीत नव्हते. शब्दाशब्दातील अर्थ व त्यामधील अंगभूत गूढ अर्थाची त्यांना पूर्ण जाणकारी होती. तत्काळ व मार्मिक उत्तरे देण्याइतकी त्यांची प्रतिभा संपन्न होती. त्याची भाषा समृद्ध होती, वक्तृत्व अपूर्व होते. त्यांची बरोबरी कोणासही करता येत नव्हती. त्यांचे युक्तीवाद दुर्दमनीय होते. त्यांच्या कोणासही कोड्या पकडणे शक्य नव्हते. नागसेन महासागरासमान शांत, पर्वताहून खंबीर, दृष्ट शक्तीशी सामना करून त्यावर ते विजय मिळविणारे, अज्ञान अंधकारास पिटाळून लावून तेथे प्रकाश प्रसृत करणारे, तसेच ते वक्तृत्वाने. सामर्थ्यशाली असल्यामुळे इतर पंथांच्या अनुयायांची मती कुंठित करणारे व विरोधकाचा धुव्वा उडविणारे असे होते. भिक्षू-भिक्षूणी, उपासक-उपासिका, राजे व राजमंत्री, स्त्री-पुरुष इत्यादी सर्वांना त्यांच्या

बद्दलचा आदरभाव व पूज्यभाव वाटे. गृहस्थाकडून त्यांना नित्य नेमाने चीवर, पिंडपात शयन-आसन व औषधादी आदरपूर्वक मोठ्या प्रमाणात प्राप्त होत असे. त्यांचे प्रवचन ऐकावयास येणाऱ्या विद्वान व समंजस मनुष्यांना ते बुद्ध धम्मातील नऊ रत्नांचा प्रत्यय घडवून देत असत. नागसेन धम्माचा सदाचारी मार्ग लोकांना दाखवीत. नागसेन म्हणजे धम्म प्रकाशाचा तेजपुंज तारा. सधम्माची पताका सतत फडकवीत ठेवण्यासाठी धम्माचा मजबूत असा महान स्तंभ गाडण्याचे दिव्य कार्य केले. त्यांच्या आवाजात सिंहाचे शौर्य व विजेची चमक होती तथापि त्यांच्या वाणीतून माधुर्याचा, करूणेचा व बंधुत्व सुखाचा सतत वर्षाव होत असे. त्यांच्या वाणीत ज्ञानाचा प्रकाशमय चमकदारपणाही विजेप्रमाणे व्यक्त होत होता. ते धर्म रूपी मेघातून ज्ञानामृताचा वर्षाव करून लोकांना संतुष्ट करीत. असे अपूर्व बुद्धिमान नागसेन सागल शहरात येऊन पोचले. आणि सख्येय परिवेण विहारात त्यांनी आपला मुक्काम ठोकला. त्यावेळी त्यांचे सोबत ऐंसी हजार भिक्षूंचा फार मोठा संघ होता.''

असे सांगण्यात येते की-

अत्यंत पंडित, वक्तृत्व कुशल, विवेचनात निपुण निर्मयी व बौद्ध धम्माच्या सिद्धांताचे तळापासून बाह्य गुणापर्यंत जाणणारे चतुर, त्रिपिटकाचार्य, पाच आणि चार निकायांत नैपुण्य प्राप्त केलेल्या त्या भिक्षूंनी नागसेनास आपला संघनायक निवडले होते. नागसेन गंभीरप्रज्ञ होते, त्यांचे ज्ञान अगाध होते. सुमार्ग आणि कृमार्ग यांतील निचोड काढून सत्य प्रकाशित करणारे नागसेन कोणालाही न घाबरणारे असे होते. एवढेच नव्हे तर त्यांनी निर्वाण पदाची प्राप्ती केली होती.

त्या अग्रगण्य सत्यवाद भिक्षूसह गावे व शहरे फिरून नागसेन आता सागल शहरात येऊन पोचले होते. पर्वतीय वनात जसा सिंह तसे मनुष्यामध्ये शोभायमान दिसणारे नागसेन संख्येय परिवेण या विहारात थांबले होते.

## १५. आयुष्मान नागसेनाशी मिलिन्द राजाची पहिली भेट

देवमंत्री मिलिंद राजास म्हणाला, ''महाराज, थांबा, सध्या नागसेन नावाचे बौद्ध भिखू संख्येय परिवेण येथे मुक्कामास आहेत. ते विद्वान समर्थ, हुशार, विनयशील पण धैर्यवान असून भाषेवर त्यांचे चांगले प्रभुत्व आहे. धम्मज्ञानावर त्यांचा दांडगा अभ्यास आहे. बौद्ध तत्वज्ञान मनुष्य मात्रास पूर्णत्वाकडे घेऊन जाणारे आहे, असे त्यांचे म्हणणे आहे. त्यांच्या विरूध्द घेतलेल्या आक्षेपांचे ते समर्थपणे खंडण करणारे आहेत. महाराज, आपण त्यांचेकडे जाऊन आपल्या शंकांचे निवारण करून घ्यावे कारण ते आपल्याशी

चर्चा करावयास तयार आहेत.''

एकएकी नागसेनाचे नाव ऐकून राजाचे मन भयभीत झाले, त्याचे गात्र शिथील पडले आणि अंगावरील रोम ताठ झाले. असे का व्हावे हे राजा मिलिंदाला सुद्धा कळले नाही. तेव्हा त्याने देवमंत्र्यास पृच्छा केली, 'तो नागसेन माझ्याशी चर्चा करण्यास तयार आहे काय ?'

होय महाराज, इंद्र, यम, वरूण, कुबेर प्रजापती सूयाम, संतुषिता वगैरे देव तसेच लोकपाल आणि आपल्या बापजाद्यांसह महाब्रह्मा जरी आला तरी नागसेन त्यांच्याशी वादविवाद करावयास तयार आहेत. मग साध्या माणसाची काय कथा?

हे ऐकून राजा मिलिंद देवमंत्र्यास म्हणाला, ''देवमंत्री, असेच आहे तर राजा मिलिंद आपल्या भेटीस येत आहे, असा निरोप घेऊन जाणारा कोणी जासूस त्यांच्याकडे पाठवा.''

देवमंत्र्यांनी नागसेनाकडे जासूस पाठवून राजाची इच्छा कळविली. यावर 'राजा मिलिंदाने आनंदाने यावे, त्यांचे स्वागत आहे,' असा त्यांनी परत निरोप पाठविला.

यानंतर सुंदर सजविलेल्या रथावर स्वार होऊन पाचशे यवनासह वर्तमान राजा मिलिंद फार मोठी सेना घेऊन नागसेनाच्या निवासस्थानी संख्येय परिवेण येथे गेला.

त्यावेळी आयुष्मान नागसेन ऐंशी हजार भिक्षूंच्या मध्यभागी सम्मेलन गृहात बसले होते. नागसेनाच्या भेटीसाठी उत्सुक असलेल्या राजा मिलिंदाने दुरूनच ही परिषद पाहिली. स्वर्ण भूमिवर दिव्य रत्नांचा सडा शिंपडल्या सारखे ते काषाय वस्त्रधारी भिक्षू शोभून दिसत होते. हे पाहून राजा मिलिंद म्हणाले, ''देवमंत्री ही एवढी मोठी परिषद कोणाची आहे?''

''महाराज, ही परिषद आयुष्मान नागसेनाची आहे.''

दूरून येत असता राजाची दृष्टी परिषदेवर खिळून बसली असतानाच राजाच्या मनात भय उत्पन्न झाले, गात्र शिथील पडली व सर्वांगास थरकाप सुटला. त्याच्या मनावर विलक्षण परिणाम झाला. हत्तीस गेंड्याने घेरावे, गरूड पक्षाने सर्पास वेढा द्यावा, अजगराने कोल्ह्यास विळखा घालावा, राणम्हशीने अस्वलास कोंडीत पकडावे, सापाने बेडकाचा पाठलाग करावा, सिंहाने हरिणाची दानादान करावी, गारूड्याने सर्प पकडावा, मांजराने उंदीर पकडावा, वैद्याने भुताची बांधणी करावी, राहून चंद्र ग्रासावा, सांप पेटाऱ्यात बंद व्हावा, पक्षाने पिंजऱ्यात अडकून पडावे, मासा जाळ्यात अडकावा, हिंस्त्र पशूंच्या अरण्यात एखाद्याने वाट चुकावी, वैश्रवणाप्राप्ती यक्षाकडून अपराध

घडावा, तसेच एखाद्या देवाचे देवपण भरत यावे, तसा राजा घाबरून उदास, चिंतामग्न व खिन्न झाला. 'मला हा भिक्षू हरविणार तर नाही.' असे वाटून त्याची मुखाकृती काळवंडून गेली. परंतु एवढ्या लोकांपुढे आपली नाचक्की होऊ नये म्हणून त्याने आपल्या अंगी लटके धैर्य आणले व तो देवमंत्र्यास म्हणाला, ''देवमंत्री, तुम्ही सांगितले नाही तरी मी आयुष्मान नागसेन कोण ते अचूक ओळखेन.''

''ठीक आहे महाराज, नागसेनास आपणच ओळखा.''

त्यावेळी आयुष्मान नागसेनाचे बसण्याचे आसन मध्यभागी ठेवले होते. समोर बसलेले चाळीस हजार भिक्षू नागसेनापेक्षा वयाने मोठे आणि मागे बसलेले चाळीस हजार भिक्षू वयाने लहान होते. सर्व विनयानुकूल शिस्तीत बसले होते. सिंहासमान निर्धास्तपणे बसलेल्या नागसेनाच्या मुखमंडळावर ज्ञानाचे तेज स्पष्ट दिसून येत होते. राजा मिलिंदाने परिषदेचे यथोचित अवलोकन केले आणि नागसेनाकडे बोट दाखवून देवमंत्र्यास पृच्छा केली, देवमंत्री, हेच आहेत ना आयुष्मान नागसेन !''

''होय महाराज, हेच आयुष्मान नागसेन आहेत. त्यांना आपण बरोबर ओळखलेत.''

कोणी न सांगताही आपणास नागसेनाला बरोबर ओळखता आले याबद्दल मिलिंद राजास अत्यंत आनंद झाला. त्याची खचलेली हिंमत पुनः दृढ झाली. तथापि नागसेनाला पाहताक्षणिच राजांच्या अंतःकरणात मानसिक काहूर माजले. त्यास भीतीने पछाडले.

असे सांगतात की, त्या ज्ञानसंपन्न आणि संयमसिंधू त्या आयुष्मान नागसेनास पाहून राजा सहज उद्गारला, ''मी आजपर्यंत अनेक वक्ते आणि वादपटू पाहिले आहेत. अनेकांशी शास्त्रार्थ केले आहे, परंतु आज वाटत असलेली भीती मला कधीही शिवली नाही. हे माझ्या पराभवाचेच लक्षण म्हणावे काय? कधी नव्हे तसे आज माझे चित्त उद्विग्न व चंचल झाले आहे. निश्चितच आज माझा पराभव होईल व नागसेन जिंकेल.''

**(उपरी कथा समाप्त)**

# खण्ड २ (प्रकरण पहिले)

# (क) लक्षण-प्रश्न

## १. व्यक्तित्वातील गूढ

राजा मिलिंद आयुष्मान नागसेनाजवळ गेला आणि अभिवादन करून एके बाजूस बसला. नागसेनानेही राजाचे अभिनंदन केले. त्यामुळे राजाच्या चित्ताला सांत्वना मिळाली.

राजाने शिष्टाचारपूर्वक प्रश्न केला, ''भंते, आपणास कोणत्या नावाने ओळखले जाते? आपले शुभ नाव काय बरे?''

''महाराज, 'नागसेन' नावाने मला ओळखतात आणि माझे सब्रह्मचारी याच नावाने मला संबोधितात. आई-बाप आपल्या मुलांची नावे, सुरसेन, वीरसेन, सिंहसेन अशा प्रकारे ठेवीत असतात, ही नेहमीच्या व्यवहारातील नावे आहेत. माझेही नाव त्यापैकी एक आहे. परंतु यथार्थ दृष्टीने चिरंतन (आत्मा) स्वरूप पुरूष नावात काही नाही.''

यावर राजा मिलिंद म्हणाला, ''हे माझ्या पाचशे यवनांनो आणि ऐंशी हजार आदरणीय भिक्षूंनो, तुम्ही सुद्धा कान लावून एकचित्ताने ऐका. आपणांमध्ये चिरंतन (आत्मा) स्वरूप नाही. त्यांच्या या विधानास कोणत्या अर्थाने समजावे?''

''भंते नागसेन, जर चिरंतन असा कोणी पुरूष नाही, हे आपले म्हणणे खरे मानावे, तर आपणासा चीवर, पिण्डपात, शयनासन व औषधी इत्यादी देतो तो कोण? तसेच त्यांचा उपभोग घेतात ते कोण ? सदाचारांचे रक्षण करतात ते कोण ? पुरूषोत्तम श्रेष्ठांच्या मार्गातील दिव्य लाभ जे निर्वाण, त्याचा साक्षात्कार करतात ते कोण ? प्राणी हिंसा करतात ते कोण ? चोरी करतात ते कोण ? भोग-वासनात दुष्ट जीवन कंठणारे ते कोण? खोटे बोलतात ते कोण ? दारू पितात ते कोण ? थोडक्यात, पंचशील न पाळल्यामुळे ज्या दुष्ट कृत्यांची फळे जिवंतपणीच भोगतात, ते कोण ? आपले म्हणणे जर सत्य असेल, तर पुण्यही नाही की पापही नाही, असेच म्हणावे लागेल. मग पाप पुण्य करणाराही कोणी नाही ? आणि करविणारही कोणी नाही ? तसेच पाप व पुण्य कर्माची फळे भोगणारा देखील कोणी नाही. भंते नागसेन, कल्पना करा ही, कोण्या एखाद्या इसमाने आपणास ठार मारले तर तो खून ठरणार नाही. कारण तुमच्या मते नावाप्रमाणे चिरंतन असे काहीच स्वरूप नाही ना ! मग तुमचे आचार्य निरर्थक ठरतील, तुमचे उपाध्याय व तुमची उपसंपदा देखील निरर्थक ठरेल.''

''तथापि आपण म्हणाले की, आपले सब्रह्मचारी आपणास 'नागसेन' नावाने संबोधितात. तेव्हा ही 'नागसेन' काय भानगड आहे? भंते, अंगावरील केसांना नागसेन समजावे काय ?''

''नाही महाराज ?''

''तर मग रोम म्हणजे नागसेन असावे.''

''नाही महाराज, अंगावरील रोम म्हणजे नागसेन म्हणता येणार नाही.''

''ही नखे, दात, त्वचा, मांस, स्नायू, हाडे, मज्जा, छाती, हृदय, यकृत, प्लीहा फुफ्फुसे, आतडी, बारीक आतडे, पोट, शौचमळ, पित्त, कफ, पू, रक्त, घाम, मेद, आसवे, चर्बी, लाळ, शेंबूड, मूत्राशय व मेंदू म्हणजे नागसेन काय ?''

''नाही महाराज !''

''मग आपल्या रूपातच नागसेन असे संबोधिलेले बरे''

''नाही महाराज !''

''तुमच्या वेदना म्हणजे नागसेन काय ?''

''नाही महाराज !''

''संज्ञासच नागसेन म्हणावे वाटते ?''

''नाही महाराज !''

''तुमचे संस्कार हेच नागसेन की काय ?''

''नाही महाराज !''

''मग विज्ञान तरी नागसेन असावे ?''

''नाही महाराज !''

''भंते, तर मग रूप, वेदना, संज्ञा, संस्कार आणि विज्ञान, हे सर्व मिळून नागसेन मानावे काय ?''

''नाही महाराज !''

''भंते, नागसेन, रूपादी स्कंध व्यतिरिक्त कोणी नागसेन आहे काय?''

''नाही महाराज, तसेही काही नाही''

''भंते, मी आपणास विचारून विचारून अगदी थकून गेलो. यांमध्ये कोठेही नागसेन सापडला नाही. अखेर नागसेन निव्वळ शब्द मात्र आहे काय ? अखेर नागसेन आहे तरी कोण ? भंते, नागसेन कोणी नाही म्हणून आपण व्यर्थच खोटे बोलत आहात.''

यानंतर आयुष्मान नागसेन राजा मिलिंदास म्हणाले, ''महाराज, आपण क्षत्रिय राजे लोक अत्यंत सुकुमार आहात. कारण आपण विलास मंदिरात वाढले आहात. आणि आताच या भर दुपारच्या रखरखत्या उन्हाने तापलेल्या वाळूवरून व खड्यांनी झाकलेल्या जमिनीवरून पायी चालत आल्यामुळे आपल्या पायांस चटके बसले असावेत आणि दुखत असावेत, शरीर थकवा येऊन शिणले असावे. तुमचे मनही दुःखी झाले असावे, आणि भयंकर शारीरिक पीडा होत असाव्यात. काय आपण पायी आलात की एखाद्या वाहनावर बसून येथे आलात ?''

''भंते, मी पायी आलो नाही, तर रथातून आलो आहे.''

''काय रथातून आलो म्हणता? कोठे आहे तुमचा रथ ? हा दांडा म्हणजे रथ काय?''

''नाही भंते!''

''हा कणा रथ आहे काय?''

''नाही भंते!''

''काय ही चाके रथ आहेत?''

''नाही भंते!''

''हा सांगाडा म्हणजे रथ काय?''

''नाही भंते!''

''ह्या दोऱ्या रथ आहेत काय?''

''नाही भंते!''

''ही लगाम रथ आहे काय?''

''नाही भंते!''

''हा चाबूक म्हणजे रथ आहे काय?''

''नाही भंते!''

"महाराज, दांडा, पाळणा, दोर, जू, खीळ इत्यादी सर्व रथ काय?"

"नाही भंते!"

"मग या भागांशिवाय अजून काही भाग आहेत काय ही ज्याला रथ म्हणता येईल?"

"यावर देखील राजाने नकारार्थीच उत्तर दिले, तेव्हा आयुष्मान नागसेन म्हणाले "महाराज ! रथातून आलो असे तर आपण सांगितले. अखेर आपण ज्या रथातून आलात तो रथ तरी कोणता ? अहो, आपणास विचारून विचारून थकून गेलो परंतु आपला रथ मला पाहता आला नाही. महाराज रथ नाही म्हणून व्यर्थ खोटे तर बोलत नाही ना?" अहो, आपण समस्त जंबुद्धीपात महान राजे आहात, मग कोणाच्या भयामुळे असे खोटे बोलत आहात?"

यानंतर उपस्थित समस्त लोकांना उद्देशून नागसेन म्हणाले, "हे पाचशे राज पुरूष यवनांनो आणि माझ्या ऐंशी हजार आदरणीय भिक्षूंनो, आपण सर्व लक्षपूर्वक ऐका. राजा मिलिंदाने आताच रथातून आलो म्हणून सांगितले. परंतु रथ कोठे आहे असे मी विचारले असता ते रथ दाखवू शकत नाही. तेव्हा त्यांचे म्हणणे खरे तरी कसे मानावे?"

नागसेनाने असा खुलासा केल्यावर पाचशे यवन लोकांनी आनंदाने टाळ्या वाजविल्या व नागसेनास साधुवाद दिला आणि ते राजास म्हणाले, "महाराज, या कोड्यातून आपण निघू शकत असल्यास उत्तर द्यावे."

यावर राजा मिलिंद उत्तरले, "भंते, मी आपणास खोटे असे काहीही सांगितले नाही. दांडा, कणा इत्यादी रथाच्या विविध अवयवांच्या आधारावरच केवळ व्यवहाराकरीता 'रथ' हे नामाभिधाम दिलेले आहे."

"अगदी बरोबर, रथाचा खरा अर्थ महाराजांनी अगदी अचूकपणे ग्रहण केला आहे. तीच गोष्ट मनुष्यमात्रांच्या 'नागसेन' इत्यादी नावासंबंधाने लागू होते. केसादी शारीरिक अवयव व स्कंधादिच्या आधारावरच व्यवहारासाठी माझे नावे 'नागसेन' असे ठेवण्यात आले आहे. परंतु परमार्थात 'नागसेन' असा चिरंतन पुरूष कोठेही विद्यमान नाही. भिक्षूणी वजीरा भगवंताजवळ एकदा म्हणाली होती की, तशा अवयवांच्या आधारावर 'रथ' ही 'संज्ञा' अस्तित्वात येते. त्याचप्रमाणे स्कंधादी अवयव एकत्र आल्याने एक सत्वजीव समजला जातो."

या उत्तराने राजा मिलिंद अत्यंत खुष होऊन उद्गारला, "भंते नागसेन, किती

आश्चर्यकारक पध्दतीने आपण हे कूट व बिकट कोडे सोडविले. किती अद्‌भूत आहे हे ! भंते, यावेळी जर भगवान बुद्ध असते तर त्यांनी सुद्धा तुमच्या वचनास मान्यता दिली असती. शाब्बास नागसेन शाब्बास !''

## २. वयासंबंधाने प्रश्न

''भंते नागसेन आपण किती वर्षांचे आहात?''

''महाराज, मी सात वर्षांचा आहे.''

''भंते, हे सात काय आहे? तुम्हीच सात आहात की केवळ बेरीज सात आहे?''

त्यावेळी राजा मिलिंदाने किती तरी उच्च भरजरी वस्त्रांचा पोषाख केला होता. मुकूट किरीटादी सर्व आभूषणाने त्यांचे शरीर शोभून दिसत होते. आणि त्यांची सावली जमीनीवर पडली होती. तसेच जलपात्रात त्याचे प्रतिबिम्ब स्पष्ट दिसत होते. त्याकडे पाहून आयुष्मान नागसेनाने पृच्छा केली, ''महाराज, ही आपली सावली जमीनीवर पडली असून जलपात्रात देखील आपले प्रतिबिम्ब स्पष्ट दिसत आहे. तेव्हा महाराज आपण राजे आहात की ही सावली राजा आहे?''

''भंते, राजा मी आहे, ही सावली नाही. परंतु ही दिसत असलेली सावली माझ्यामुळेच येथे पडली आहे.''

''महाराज, तोच अर्थ माझ्या वयासंबंधी ग्राह्य समजावा. येथे मी सात नसून सर्वांची बेरीज सात आहे.''

''भंते, आपण हे गंभीर कोडे किती आश्चर्यकारक पद्धतीने समजावून सांगितले, खरोखर अद्‌भूत आहे!''

## ३. विद्वानांतील वाद व राजवाद

राजा म्हणाला, ''भंते नागसेन, आपण माझ्याशी शास्त्र चर्चा कराल काय?''

''महाराज आपण जर पंडित, विद्वान माणसासारखे शास्त्र चर्चा करणार असाल तर मी आपणाबरोबर अवश्य शास्त्र चर्चा करीन; आणि जर राजे लोकांप्रमाणे शास्त्र चर्चा करणार असाल तर नाही करणार.''

''भंते नागसेन, विद्वान लोक कशी शास्त्र चर्चा करतात?''

''महाराज, विद्वान लोक शास्त्रार्थ करीत असता परस्परांना हे युक्तिवादाच्या जाळ्यात गुंतविण्याचा प्रयत्न करतात आणि परस्पसर युक्तीने त्यातून सुटका करून घेतात.

कोणी एक कोडे उपस्थित करतो तर त्यापैकी दुसरा ते कोडे उकलतो. कोणी एखाद्या दुसऱ्या समोर तर्कांची रास उभी करतो, तर दुसरा त्याचे खंडण करतो. परंतु हे सर्व होऊन देखील कोणी कोणाचा रागाने तिरस्कार करीत नाहीत. महाराज, याप्रमाणे विद्वानात शास्त्रार्थ होतो.''

''भंते, राजे लोकांची शास्त्रार्थ करण्याची पद्धती कशी आहे? तेही सांगा.''

''महाराज, राजे लोक जेव्हा शास्त्रार्थ करतात, त्यावेही एखाद्याने विरोध केला तर तो त्यास खपत नाही. लगेच त्या विरोध करणारास 'असे शासन करा' म्हणून फर्माविले जाते. याप्रमाणे राजे लोकांची शास्त्रार्थ करण्याची पद्धती आहे.''

यावर राजा मिलिंद म्हणाला, ''भंते, मी राजवादाचे कधीच अनुकरण करणार नाही, तर मी आपणाशी विद्वानाप्रमाणेच शास्त्रार्थ करीन. भंते नागसेन आपण याबाबत विश्वास ठेवून माझ्याशी शास्त्रार्थ करावे. जसे आपण एखाद्या आपल्या भिक्षूशी, श्रामणेराशी, उपासकाशी किंवा विहारात राहणाऱ्या कोणा व्यक्तीशी निसंकोचपणे चर्चा करता अगदी तशीच चर्चा माझ्याशी करावे. भय बाळगण्याचे कारण नाही.''

''ठीक आहे.'' असे म्हणून स्थवीरांनी स्वीकार केला. तेव्हा राजा म्हणाला, ''भंते, मी आपणास प्रश्न विचारतो.''

''तर विचारावा महाराज!''

''भंते, मी तर प्रश्न विचारला''

''महाराज, मी सुद्धा त्याचे उत्तर दिलेले आहे.''

''भंते आपण काय उत्तर दिले?''

''महाराज, आपण काय विचारले?''

त्यावेळी राजा मिलिंदाच्या मनात विचार आला की, 'अरे! हा भिक्षू खरोखरच पंडित असून माझ्या बरोबर शास्त्रार्थ करू शकतो. अनेक मुद्यांचे प्रश्न मी यांचेकडून स्पष्ट करून घेऊ शकतो. परंतु आता सूर्य मावळण्याच्या बेतात आहे. तेव्हा आजची चर्चा येथेच थांबवून उद्या राजभवनातच शास्त्र चर्चा केलेली बरी.'

या विचाराने राजा देवमंत्र्यास म्हणाला, ''देवमंत्री, तुम्ही स्यविरास सांगा की, उद्याचा शास्त्रार्थ राजभवनात होईल.''

एवढे बोलून मिलिंद राजा आपल्या आसनावरून उठला आणि स्थवीराचा निरोप

घेऊन आपल्या घोड्यावर स्वार झाला. परंतु जातांना मनातून वारंवार 'नागसेन, नागसेन' एवढेच बोलत होता.

तेव्हा देवमंत्र्यांनी आयुष्मान नागसेनास सांगितले की, भंते उद्याला शास्त्रार्थ राजभवनात व्हावा, अशी महाराजांची इच्छा आहे.

''ठीक आहे,'' असे म्हणून स्थवीराने या निमंत्रणाचा स्वीकार केला.

दुसऱ्या दिवशी प्रातःकाळी देवमंत्री, अनंतकाय, मंकुर आणि सब्बदिन्न यांनी राजाकडे जाऊन विचारणा केली की, महाराज, आज आयुष्मान नागसेन येणार आहेत काय?

''होय येणार आहेत.''

''किती भिक्षूंसह ते येणार आहेत?''

''जितक्या भिक्षूंसह त्यांना यावेसे वाटेल तितक्या भिक्षूसह येऊ द्या.''

यावर सब्बदिन्न म्हणाला, ''महाराज, त्यांना दहा भिक्षूसंह येऊ द्यावे.'' दुसऱ्यांदा देखील राजा म्हणाला. ''जितक्या भिक्षूंसह त्यांना यावेसे वाटेल, तितक्या भिक्षूंसह येद्य द्या.'' पुनःसब्बदिन्न म्हणाला, ''महाराज, दहा भिक्षूंसह त्यांना येऊ द्यावे.'' तेव्हा तिसऱ्यांदाही राजा म्हणाला, ''जितक्या भिक्षूंसह त्यांना यावेसे वाटेल तितक्या भिक्षूंसह येऊ द्यावे.'' यावर राजा मिलिंद जोर देऊन म्हणाला, ''त्यांच्या स्वागताची येथोचित व्यवस्था केली आहे. मी म्हणतो, जितक्या भिक्षूंसह त्यांना यावेसे वाटेल, तितक्या भिक्षूंसह त्यांना येऊ द्यावे. सब्बदिन्न, तुम्ही दहा दहाच का म्हणता? आम्ही काय भिक्षूंना भोजन वाढू शकणार नाही?'' यावर सब्बदिन्न अगदी चूप झाला.

यानंतर देवमंत्री, अनंतकाय आणि मंकुर आयुष्मान नागसेनाकडे गेले व म्हणाले ''भंते राजांनी सांगितले की, जितक्या भिक्षूंना आपल्या बरोबर घ्यावेसे वाटेल तितके भिक्षू बरोबर घेऊन आपल्या राजवाड्यात चालावे.''

## ४. अनंतकाय उपासक बनला

नागसेनाने अंगावर चीवर घेतले. खांद्यावर दुसरे चिवर ठेऊन हातात भिक्षापात्र घेतले आणि सागल नगरात राजावाड्यात ऐंशी हजार भिक्षूंसह निघाले. रस्त्याने चालत असता स्थवीर नागसेनास अनंतकाय म्हणाला, ''भंते, मी नागसेन असे म्हणतो, तेव्हा मला समजत नाही की, ही 'नागसेन' काय भानगड आहे.''

स्थवीर म्हणाले, "तुम्ही नागसेनावरून काय बोध घेता?"

"भंते, तो प्राणवायू आत जातो आणि आतील वायू बाहेर पडतो, त्यालाच मी 'नागसेन' असे समजतो."

"समजा हा प्राण वायू आत जाऊन बाहेर आला नाही किंवा बाहेर येऊन तो पुन्हा आत गेला नाही तर मनुष्य जिवंत राहील की नाही?"

"नाही भंते!"

"मग शंख वाजविणारे शंख वाजवीत असता त्याच्या फुंकाऱ्या बरोबर बाहेर पडलेला वायू पुन्हा आत जातो काय? तसेच बासरी व तुतारी वाजवितात तेव्हा त्याची फुंकर पुन्हा परत जाते काय?"

यावर त्याने नकारात्मकच उत्तर दिले.

तेव्हा स्थवीर म्हणाले, "मग ते मरून का जात नाहीत?"

"भंते, मी आपणाबरोबर शास्त्र चर्चा करू शकत नाही. तेव्हा कृपा करून काय आहे ते आपणच समजावून सांगावे."

स्थवीर म्हणाले, "हा प्राणवायू म्हणजे काही आत्मा नव्हे, श्वास घेणे व श्वास सोडणे हा केवळ शरीरधर्म आहे."

त्यानंतर अभिधम्माच्या सिद्धांतानुसार स्थवीरांनी विवेचन करून सांगितले. तेव्हा अनंतकाय याचे मनावर बराच परिणाम झाला व तो त्या क्षणापासून त्रिरत्नाचा शरणागत उपासक बनला.

याप्रमाणे बोलत बोलत नागसेनाने आपल्या भिक्षूसंघासहवर्तमान राजवाड्यात प्रवेश केला. राजाने त्यांचे जोरदार स्वागत केले. त्यांच्या बसण्याची त्यांनी खास व्यवस्था केली होती. राजाने अती आग्रहपूर्वक आयुष्मान नागसेन व त्यांच्या समस्त भिक्षूंना उत्तमोत्तम पक्वान्नांचे स्वहस्ते भोजन जेऊ घातले. भोजन संपवून ते बसले असता राजाने प्रत्येक भिक्षूस एक-एक जोडा चीवर दान दिले आणि आयुष्मान नागसेनास तीन चीवरे दान दिली. यानंतर राजाने नागसेन स्थवीरास सांगितले की, भंते, आपल्यासह येथे दहा भिक्षू ठेऊन बाकीच्यांना पाठवून द्यावे.

नागसेनांनी तसेच केले.

आता राजाही आपले काम आटोपून स्थवीर नागसेनांचे जवळ एक लहानसे आसन टाकून बसला व म्हणाला, "भंते कोणत्या विषयावर चर्चा करावी?"

"महाराज आम्हाला धर्मार्थाचेच प्रयोजन आहे. तेव्हा 'धर्मार्थाच्या' विषयावरच चर्चा करणे मी उत्तम समजाते."

## ५. प्रवेजेसंबंधी प्रश्न

शास्त्रार्थास अनुकूल अशी सर्व व्यवस्था मिलिंद राजाने आपल्या राजभवनात केली होती. स्थवीर नागसेन आपल्या भिक्षूसंघासह यथास्थानी विराजमान झाले होते. एके बाजूस मिलिंद राजा आपल्या राज्योचित इतमामासह बसले होते. इतक्यात मिलिंद राजाने स्थवीर नागसेनास पृच्छा केली की, "भंते नागसेन, कोणत्या विषयावर चर्चा करावी?"

"महाराज, आम्हा लोकांना धर्माशी प्रयोजन आहे, तेव्हा धर्मार्थाला अनुसरूनच चर्चा करावी."

तेव्हा राजाने प्रश्न केला, "भंते नागसेन, आपण प्रव्रजित होण्याचा हेतू काय? म्हणजे बौद्ध धर्माच्या प्रव्रजेचे ध्येये कोणते?"

स्थवीरांनी उत्तर दिले, "महाराज चालू जीवनातील दुःख नष्ट व्हावे आणि भज्ञवी जीवनात दुःख निर्माण होऊ नये यासाठीच आम्ही प्रव्रजा घेतली आहे. तथापि पुनः जन्म ग्रहण करावा लागू नये, असे परमश्रेष्ठ निर्वाणपद प्राप्त करणे, हाच आमचा परम उद्देश आहे."

"भंते, नागसेन, बौद्ध संघातील समस्त लोक यासाठीच प्रव्रजित होतात काय?"

"नाही महाराज, असे ठामपणे म्हणता येणार नाही. काहीजण या उच्च ध्येयासाठी प्रव्रजित होतात. काहीजण रराजाच्या जुलमाला कंटाळून, तर काहीजण चोरांच्या त्रासाला कंटाळून, तर काहीजण कर्जाच्या ओझ्यामुळे, तर काहीजण निव्वळ उपजीविकेसाठी गृहत्याग करून प्रव्रजित होतात, परंतु जे समंजसपणाने प्रव्रजित होतात, ते याच उद्देशानने प्रव्रजित होतात."

"भंते, आपण याच ध्येय प्राप्तीसाठी प्रव्रजित झालात काय?"

"महाराज, फारच लहान वयात मी प्रव्रजित झालो आहे. मी का प्रव्रजित होत आहे, त्यावेळी मला हे सुद्धा कळत नव्हते. परंतु माझ्या मनात वारंवार विचार येई की, हे बौद्ध भिक्षू मोठे हुशार व ज्ञानी आहेत. मला देखील ते चांगली शिकवण देतील. तेव्हा त्या लोकांपासून शिक्षण घेतल्यानंतर आता मला कळून आले व अनुभवाने पहात आहे की प्रव्रजेचा खरा उद्देश हाच आहे."

''भंते, वा !, वा!, किती छान!''

## ६. जन्म-मृत्यू विषयी प्रश्न

राजा म्हणाला, ''भंते नागसेन, अशीही कोणी व्यक्ती आहे काय की जी मृत्यूनंतर पुन्हा जन्म ग्रहण करीत नाही?''

स्थवीर म्हणाले, ''महाराज, काही व्यक्ती मृत्युनंतर जन्मास येतात तर काही व्यक्ती असे आहेत की, पुन्हा जन्मास येत नाहीत.''

''भंते, कोण जन्मास येतात आणि कोण जन्मास येत नाहीत?''

''ज्यांचे चित्तमळ (क्लेश) अवशिष्ठ आहेत, अशांना पुन्हा जन्म घ्यावा लागतो तर ज्यांचे चित्तमळ नाश पावलेत त्यांना जन्म घ्यावा लागत नाही.''

''भन्ते, आपण पुन्हा जन्मास येणार की नाही?''

''महाराज, जर सांसारिक आसक्ती मनात कायम राहील, तर जन्म घ्यावा लागेल आणि जर माझे चित्त आसक्ती पासून मुक्त न झाले, तर जन्म घ्यावा लागेल आणि जर माझे चित्त आसक्ती पासून मुक्त न झाले, तर जन्म घ्यावा लागेल आणि जर माझे चित्त आसक्ती पासून मुक्त झाले, तर जन्म घ्यावा लागणार नाही.''

''भंते, फारच छान!''

## ७. विवेक आणि ज्ञानाविषयी प्रश्न

(क) राजा म्हणाला, ''भंते नागसेन, ज्यांना पुनःजन्म ग्रहण करावा लागत नाही, त्यांनी विवेकाच्या लाभामुळेच ही मुक्ती मिळविली की काय?''

''महाराज, विवेक लाभ, ज्ञान लाभ आणि दुसरे पुण्य धर्म म्हणजे सद्गुणाच्या आचरणामुळे प्राण्यांची पुनर्जन्मापासून मुक्ती मिळत असते.''

''भंते, पण विवेक आणि ज्ञान दोन्ही एकच आहेत ना?''

''नाही महाराज, विवेक ही दुसरी वस्तू असून ज्ञान ही दुसरी वस्तू आहे. अहो, मेंढ्या, बकऱ्या, गायी, बैल आणि गाढवे यांना विवेक आहे; परंतु ज्ञानापासून ते वंचित आहेत. यावरून विवेक व ज्ञान दोन्ही एक नाहीत. हे आपणांस सहज समजून येईल.''

''भंते, फारच छान.''

(ख) ''भंते, विवेक ओळखण्याचे लक्षण कोणते आणि ज्ञान ओळखण्याचे लक्षण

कोणते?''

''महाराज, बोध (आकलन) होणे विवेक ओळखण्याचे लक्षण असून खंडण करण्याची शक्ती प्राप्त होणे हे ज्ञान ओळखण्याचे लक्षण आहे.''

''हे कसे? कृपा करून एखादे उदाहरण देऊन समजावून सांगा.''

''महाराज, आपण कधी भगराची (ताटे) कापणी करीत असता पाहिले आहे काय?''

''होय भंते, ते मी पाहिले आहे.''

''लोक भगराची कापणी कसे करतात? ते सांगाल काय?''

''भंते, डाव्या हाताने भगराची (ताटे) धरून उजव्या हातातील विळ्याने ते ती ताटे कापून काढतात.''

''महाराज, अगदी त्याचप्रमाणे भिक्षू विवेकाने आपल्या मनास धरून ठेवतो आणि ज्ञान रूप विळ्याने चित्तमळ (क्लेश) कापून काढतो. याच अर्थाने विवेक ओळखण्याचे लक्षण बोध होणे व ज्ञान ओळखण्याचे लक्षण खंडण करण्याची शक्ती प्राप्त होणे'' असे मी म्हटलेले आहे.''

''भंते, अगदी उत्तम विवेचन केले.''

## ८. पुण्य धर्म कोणते?

राजा म्हणाला, ''पुण्यधर्माच्या आचरणामुळे'' असे जे आज आपण म्हणालेत तर ते पुण्यधर्म काय आहेत?

''महाराज, शील, श्रद्धा, वीर्य, स्मृती आणि समाधी हेच पुण्यधर्म आहेत?''

### (क) शीलाची ओळख

''भंते, शीलाचे लक्षण कोणते?''

''महाराज, 'आधार देणे' हे शीलांचे लक्षण आहे. इंद्रिय, बल, बोध्यंग, मार्ग, स्मृतिप्रस्थान, सम्यक प्रधान, ऋद्धिपाद, ध्यान विमोक्ष, समाधी आणि समापत्ती या सर्व चांगल्या धर्मांचा आधार शील आहे. शीलाच्या आधारावर उभारलेला कोणताही चांगला धर्म कधी डगमगू शकत नाही महाराज!''

''भंते, कृपा करून उदाहरण देऊन समजावून सांगा.''

''महाराज, पृथ्वीचा आधार असल्यामुळेच समस्त जीव आणि वनस्पती उत्पन्न होतात आणि वाढतात. तद्वतच शीलाच्या आधाराने आणि शीलावर अढळ राहूनच योगीलोक श्रद्धा, प्रयत्न, जागरूकता, चिंतन व निर्मळ ज्ञान या पांच इंद्रियांना वश करून घेतात.''

''भंते, तरी पण उदाहरणाने समजावून सांगा.''

''महाराज शक्तीच्या जोरावर होणारी सर्व कामे पृथ्वीच्या आधारावर आणि पृथ्वीवर उभे राहूनच केली जातात. तद्वतच योगीलोक शीलाच्या आधाराने व शीलावर अढळ राहून इंद्रियांना वश करून घेतात.''

''तरी पण अजून उदाहरणाने स्पष्ट करावे.''

''महाराज, एखाद्या शहराची उभारणी करणारे इंजिनीअर प्रथमतः त्या जागेस नीटनेटके करतात, काटेरी व इतर झाडे तोडून टाकतात. जमिनीला समपातळीत करतात. यानंतर सडका आणि चौकांचे नकाशे तयार करतात या उदाहरणांप्रमाणेच योगीलोक क्रमाक्रमाने शीलाच्या आधाराने आपले दोष दूर करून विवेक व ज्ञान लाभ करून घेतात आणि मग त्यांना पाच इंद्रिये अर्थात नैतिक शक्ती प्राप्त होत असतात.''

''भंते, अजून एखाद्या उपमेद्वारा समजावून सांगा.''

''जसे खेळाडूस जर आपले कौशल्य दाखवावयाचे असल्यास सर्व प्रथम मैदानावर असलेले दगड, झाडे काढून तेथील जमीन खोदून टाकतात आणि नंतर मऊ जमिनीवर आपले कौशल्य दाखवितात. तसेच योगीलोक शीलाच्या आधाराने आपले दोष दूर करून विवेक व ज्ञान लाभ करून घेतात आणि मग त्यांना पाच इंद्रिये वा शक्ती, स्वावलंबन, धम्मचिकित्सा, सहनशीलता, आनंद, शांतता, ध्यान आणि समतोलपणा ही सात संबोध्यंग अर्थात अर्हतपदाच्या कसोट्या, सद्गुणाकरीता चित्तात स्थान ठेवणे व त्याचे रक्षण करणे, क्लेशास चित्तातून कायमचे घालविणे व त्यांचे परतण्याचे मार्ग बंद करणे इत्यादी चार प्रकारचे सम्यक प्रयत्न, असामान्य सामर्थ्याचे मूळ घटक अर्थात चार सम्यक प्रधान, हर्षाच्या चार अवस्था अर्थात चार ऋद्धिपाद, जीवन मुक्तीचे आळ प्रकार म्हणजे अष्टांगिक मार्ग, अध्यात्मिक मुक्तीचे आठ प्रकार अर्थात विमोक्ष, चार प्रकारचे ध्यान अर्थात चिंतन, आठ समापत्ती इत्यादी दुसरे धर्म ते वश करून घेतात.''

''महाराज, भगवान बुद्धाने सुद्धा म्हटले आहे की, शीलावर अढळ राहून निष्ठेने आपल्या चित्ताला भावनेशी वश करून घेतो, संयमी आणि बुद्धिमान भिक्षू मायावी मोहजाळात कधी न फसता त्यातून तो सकुशल मुक्त होतो अर्थात तृष्णा रूपी जटांचे

अंतर्बाह्य सर्व पाश तोडून टाकतो.''

''पृथ्वीप्रमाणेच शील हा प्राणी मात्रांना मांगल्य आणि अभिवृद्धीचा मूळ आधार आहे. सर्वच बुद्धांच्या शिकवणुकीची सुरवात शीलात आहे. शीलावरच निर्वाण प्राप्ती अवलंबून आहे.''

''भंते नागसेन, आपले कथन अगदी योग्य आहे.''

## (ख) श्रद्धेची ओळख

राजा म्हणाला, ''भंते नागसेन श्रद्धेची लक्षणे कोणती?''

''महाराज, मनात प्रसन्नता आणि महत्वाकांक्षा उत्पन्न करणे, ही श्रद्धेची लक्षणे आहेत.''

(१) ''पण प्रसन्नता उत्पन्न करणे हे श्रद्धेचे लक्षण कसे?''

''महाराज, श्रद्धा ही सदानीरा झऱ्याप्रमाणे आहे. तिचे उगमस्थान चित्तात आहे. श्रद्धा ही चित्तावरील मोठे अडथळे म्हणजे लालसा, मत्सर बौद्धिक शिथीलता, आध्यात्मिक गर्व आणि कुशंका या पाच दोषांना पिटाळून लावते. त्यामुळे मन अगदी प्रसन्न, निर्मळ व निर्धास्त बनते. म्हणूनच 'चित्तात प्रसन्नता निर्माण करणे' हे श्रद्धेचे लक्षण आहे, असे म्हटले आहे.''

''भंते, कृपाकरून हे उदाहरणाने सांगा.''

''महाराज, कल्पना करा की, कोणी चक्रवर्ती राजा आपल्या चतुरंगीणी सेनेसह जात असता वाटेतील एखादा लहान ओढा ओलांडून पलीकडे जातो. तेव्हा गजदळ, घोडदळ,, सारथ्यदळ आणि पायदळ यांच्यामुळे त्या ओढ्याचे पाणी खराब, गढूळ व रेताड होईल. परंतु पलीकडे गेल्यानंतर राजाने आपल्या हुजऱ्यासह हुकूम सोडला की, मला पाणी प्यावयाचे आहे. पाणी आण, 'ठिक आहे महाराज,' असे म्हणून त्याने पाणी आणून त्यात राजाजवळ असलेले पाणी साफ करावयाच्या तुरटीचे तुकडे टाकले तर रेती, शेवाळ व अन्य गाळ तळाला बसून पाणी अगदी स्वच्छ, शीतल व निर्मळ होईल. तेव्हा ते पाणी प्यावे. या उदाहरणाने आपण समजले असालच की, पाणी म्हणजे चित्त होय, हुजऱ्या म्हणजे योगी भिक्षू होय, रेती, कण व शेवाळ म्हणजे मनाचे दोष असून पाणी स्वच्द करावयाची तुरटी म्हणजे 'श्रद्धा' होय, तुरटीच्या योगे पाणी स्वच्द व निर्मळ बनले. तसेच श्रद्धा उत्पन्न होतात चित्ताचे सर्व दोष नाश पावून चित्त स्वच्छ, निर्मळ व प्रसन्न बनते. म्हणून प्रसन्नता उत्पन्न करणे श्रद्धेचे लक्षण जाणावे.''

(२) ''भंते, मनात महत्वाकांक्षा उत्पन्न करणे हे श्रद्धेचे लक्षण कसे काय?''

''महाराज, एक योगी (साधक) दुसऱ्या सत्पुरूषांच्या चित्त मुक्तीची, श्रोतापत्ती, सकृदागामी, अनागामी व अर्हत अर्थात जीवनमुक्त अवस्थेची जाणीव होऊन स्वतः त्याहीपेक्षा पुढे जाण्याची आकांक्षा बाळगतो. ज्या पदाची त्याला अद्याप प्राप्ती झाली नाही आणि जे अदृश्य अद्याप पाहता आले नाही. त्यासाठी निष्ठापूर्वक प्रयत्न व परिश्रम करतो. महाराज, या उदाहरणावरून 'मनात महत्वाकांक्षा निर्माण करणे' हे श्रद्धेचे लक्षण आहे, असे समजले पाहीजे.''

''भंते, उदाहरणाने स्पष्ट करण्याची कृपा करावी.''

''महाराज, पर्वत शिखरावर जोरदार वृष्टी वर्षाव झाला असता ते पाणी खालच्या बाजूला वाहत जाते. मग गिरी, कंदर, गुंफा व लहान मोठे सर्व नाले भरून जातात. नंतर नदीलापूर येतो. ती आपली पातळी ओलांडून वाहू लागते. समजा तेवढ्यात एका मागून एक असा लोकांचा समूह पलीकडे जाण्यासाठी आला परंतु त्यांना नदीची खोली माहीत नाही म्हणून ते सर्व लोक नदीच्या तटावर विचार करीत बसण्यापलीकडे काही एक करणार नाहीत. परंतु तेवढ्या अवधीत एखादा इसम तेथे आला व आपली शक्ती ओळखून धैर्याने पाहून पैलतीरी गेला, तर त्याला पाहून इतरही लोक पलीकडे जाऊन पोहोचतील. महाराज अगदी याच उदाहरणाप्रमाणे एखादा भिक्षू दुसऱ्या सत्पुरूषांना उंच अशा निर्वाणपदास पोहोचलेले पाहून तो स्वतः देखील आपली सर्व शक्ती एकवटून त्या पदाप्रत पोहोचण्याची महत्वाकांक्षा बाळगतो. आणि त्यासाठी प्रयत्न व परिश्रम करतो. यावरून मनात 'महत्वाकांक्षा बाळगतो, आणि त्यासाठी प्रयत्न व परिश्रम करतो. यावरून मनात 'महत्वाकांक्षा निर्माण करणे' हे श्रद्धेचे लक्षण आहे. संयुक्त निकाय ग्रंथात भगवान बुद्धाच्या कथनाचा उल्लेख आहे की, श्रद्धेने मनुष्य अडचणीचा पर्वत ओलांडून जातो, तत्परतेने सागर पार करून जातो, वीर्याने दुःख शमन करतो आणि प्रज्ञेने पूर्णतः मुक्त होऊन जातो.''

''भंते, आपण फारच छान सांगितले.''

### (ग) वीर्याची ओळख

राजा म्हणाला, ''भंते, वीर्याची ओळख कशी करावी? ते आपण सांगा.''

''महाराज, 'दृढ करणे' वीर्याची ओळख आहे. वीर्याचा आधार दिला असता कोणतेही पुण्यधर्म कधीही डगमगत नाहीत.''

"भंते, उपमेने समजावल्यास बरे होईल."

"महाराज, जसे कोणी मनुष्य आपले घर ढासळत आहे असे पाहून त्यास खांबाचा आधार देऊन दृढ करतो त्यामुळे ते घर ढासळून पडू शकत नाही. याप्रमाणेच वीर्याचा आधार देऊन दृढ केलेले पुण्यधर्म कधी डगमगू शकत नाही."

"कृपा करून पुनः उदाहरणाद्वारे समजावल्यास बरे होईल."

"महाराज समजा एखाद्या मोठ्या फौजेने लहान फौजेचा पराभव केला असता हरलेल्या राजाने आघाडीला असणाऱ्या फौजा मजबूत करण्यासाठी दुसरी कुमक लढण्यासाठी पाठविली असता तुंबळ युद्ध करून त्या फौजेने विजय पावलेल्या मोठ्या फौजेचा पराभव करावा. महाराज, याप्रमाणे दृढ करणे हे वीर्याचे लक्षण आहे. महाराज, ज्या गुणांना दृढ आधार मिळतो ते गुण नाश पावत नाहीत. भगवंताने सुद्धा सांगितले आहे की, हे भिक्षूंनो, आर्यश्रावकाने पापांचा त्याग करून पुण्याची वृद्धी करावी, दुष्टत्वाचा त्याग करून चांगुलपणाचा विकास करावा आणि स्वतःला शुद्ध करावे."

"भंते, आपण अगदी योग्य कथन केले."

**(घ) स्मृतीची ओळख**

राजा म्हणाला, "भंते नागसेन, स्मृती ओळखण्याचे लक्षण काय?"

"महाराज, (अ) अचूक आठवण ठेवणे आणि (आ) स्वीकार करणे हेच स्मृती ओळखण्याचे खरे लक्षण आहे."

(अ) "भंते, अचूक आठवण स्मृती ओळखण्याचे लक्षण कसे काय हो?"

"महाराज हे चांगले, हे वाईट, हे बरोबर हे चुकीचे; हे महत्वाचे हे सामान्य; आणि हे अंधकारमय, हे प्रकाशमान यांची स्मृतीच्या योगे वारंवार आठवण होत राहते."

"महाराज, हे चार स्मृतिप्रस्थान, हे ऋद्धिपाद, हे चार सम्यक प्रधान, ही पाच इंद्रिये, हे पाच बल, हे सात संबोध्यांग, हे आर्य अष्टांगिक मार्ग, ही शमथ, ही विदर्शना, ही विद्या आणि ही विमुक्ती होय. यांच्यामुळेच योगी चांगुलपणाचे आचारण करतो, अनिष्ट कृत्यांचे आचरण करीत नाही. महाराज. स्मृतीमुळेच तो हे सर्व करीत असतो. याप्रमाणे 'अचूक आठवण ठेवणे' हे स्मृती ओळखण्याचे लक्षण आहे."

"भंते, उदाहरणाने समजावून सांगा."

"महाराज एखाद्या चक्रवर्ती राजाच्या कोषपालाचे उदाहरण घ्या. तो दररोज सकाळ

सायंकाळी राजाला आठवण करून देत राहतो की, हे महाराज, आपल्याकडे युद्धोपयोगी असे इतके हत्ती आहेत, इतके घोडे आहेत, इतके रथ आहेत, इतके तिरंदाज आहेत, आपल्या कोषात इतके सोने आणि इतकी इतर संपत्ती आहे. हे महाराजांनी ध्यानी असू द्यावे. त्याचप्रमाणे स्मृती सदैव आठवण देत राहते की, हे चांगले आहे, हे वाईट आहे, हे बरोबर आहे, हे चुकीचे आहे, हे महत्वाचे, हे सामान्य, हे अंधकारमय आहे, हे प्रकाशमान आहे. महाराज याप्रमाणे 'अचूक अशी सात आठवण देणे' हे स्मृती ओळखण्याचे लक्षण आहे.''

(आ) ''भंते, 'स्वीकार करणे' कसे काय स्मृती ओळखण्याचे लक्षण आहे?''

''महाराज, चांगले कोणते व वाईट कोणते, हे हिताचे व हे अहिताचे, हे वृद्धि करणारे व हे अधोगतीकडे घेऊन जाणारे यांचा निर्णय स्मृती उत्पन्न झाल्याशिवाय होऊ शकत नाही. स्मृती द्वारा निर्णय लागताच योगी अहिताचा त्याग करतो व हिताचे तेवढे अंगिकार करतो, वाईट त्याज्य मानतो व चांगले तेवढे जपून ठेवतो. हे सर्व स्मृतीमुळेच होऊ शकते. महाराज, याप्रमाणे 'स्वीकार करणे' स्मृती ओळखण्याचे लक्षण आहे.''

''भंते, कृपा करून उपमा देऊन स्पष्ट करावे.''

''महाराज, एखाद्या चक्रवर्तीचा खाजगी त्याला समजावून सांगतो की, महाराज, हे आपल्या अहिताचे आहे, हे कल्याणकारक आहे आणि हे वाईटाचे आहे. त्यानंतर अहिताचे तेवढे सोडून हिताचे, वाईटाचे सोडून कल्याणकारी तेवढे कर्तव्य करण्याचा तो राजाला सल्ला देतो. महाराज, त्याचप्रमाणे स्मृती उत्पन्न होऊन हितकारक तेवढे आचरण करण्याची प्रेरणा देते व वाईटापासून चित्ताचे संरक्षण करते. भगवान बुद्धाने सुध्दा म्हटले आहे की, 'हे भिक्षूहो, स्मृती ही सर्व कर्मपथाचे यथोचित परिक्षण करणारी आहे.' हेच मी सांगत आहे.''

''भंते, आपण अगदी बरोबर सांगितले.''

## (ड) समाधीची ओळख

राजाने प्रश्न केला, ''भंते, समाधीचे लक्षण कोणते?''

''महाराज 'प्रमुख होणे' हे समाधीचे लक्षण आहे. जेवढे काही चांगले गुणधर्म आहेत त्या सर्वांचे नेतृत्व समाधीस करावे लागते. समाधीकडेच त्यांचा कल असतो, तिच्याकडेच ते जातात आणि समाधीतच अंतर्धान पावतात.''

''कृपा करून उपमेद्वारा समजावून सांगावे.''

''महाराज, जसे एखाद्या बुरूजाच्या सर्व पायऱ्या त्या बुरूजाच्या सर्वात उंच अशा मनोऱ्याला घेऊन जाणाऱ्या असतात आणि तेथे गेल्यावर त्या संपून जातात. त्यानंतर तो मनोराच काय तो सर्वश्रेष्ठ समजला जातो. त्याचप्रमाणे जितके काही पुण्यधर्म म्हणून समजले जातात, ते सर्व समाधीचे प्रमुखत्व असण्यातच आहेत.''

''भंते, अजून उदाहरण देऊन समजावून सांगा.''

''महाराज, असे समजा की, कोणी एखादा राजा आपली चतुरंगिणी सेना घेऊन लढाईस गेला. स्वतः राजाच सेनापती असल्यामुळे समस्त गजदळ, घोडदल, रथदळ व तिरंदाज इत्यादी सर्व तुकड्या त्याच्या हुकमतीत राहतात. त्याच्याच इशाऱ्याने चालते व लढते. महाराज, त्याचप्रमाणे तेथे जसा राजा प्रमुख आहे तशी समाधी समजावी, जसे सर्व सैन्य राजाच्या हुकमतीत चालणारे आहे. तद्वतच चार स्मृती प्रस्थानादी सर्व पुण्यधर्म समजावे. लढाईत शत्रूसेनेचा नाश तसा मनाच्या क्लेशाचा नाश जाणावा. सेन्यातील विजयाप्रमाणे अर्हत पदाचा लाभ समजावा. याप्रमाणे 'प्रमुख होणे' हे समाधीचे लक्षण आहे. भगवंताने देखील म्हटले आहे की, हे भिक्षूहो, सात समाधीचा अभ्यास करा, समाधी साध्य होताच खरेखुरे ज्ञान प्राप्त होते.''

''भंते, आपले कथन अगदी बरोबर आहे.''

### (च) ज्ञानाची ओळख

राजाने प्रश्न केला, ''भंते, ज्ञान ओळखण्याचे लक्षण कोणते?''

''महाराज, मी आधीच सांगितले आहे की, 'खंडण करण्याची शक्ती प्राप्त होणे' हे ज्ञानाचे लक्षण आहे. तसेच 'दर्शन घडविणे' हे सुद्धा ज्ञानाचे दुसरे लक्षण आहे.''

''भंते, दर्शन घडविणे ज्ञानाचे लक्षण कसे काय आहे?''

''महाराज, ज्ञान लाभ होताच अविद्यारूपी अंधकार नाश पावतो आणि विद्यारूप प्रकाश निर्माण होतो. ज्याच्यामुळे मौल्यवान सत्य (आर्यसत्य) स्पष्ट दिसू लागतात. तेव्हा साधकास अहर्निश प्रयत्नामुळे अखेर जग हे नाशमान आहे, जगात दुःख आहे आणि आत्मा ही वस्तू मुळीच अस्तित्वात नाही, या सत्याचे स्पष्टपणे आकलन होते.''

''कृपा करून उपमेद्वारा स्पष्टीकरण करावे.''

''महाराज, समजा, एखाद्या अंधार कोठडीत कोणी मनुष्य हातात जळता दिवा घेऊन गेला असता काय घडते तेथील अंधार सर्वथा निघून जातो व प्रकाशाचे वलय पसरतात आणि त्या कोठडीतील सर्व चीजवस्तू स्पष्टपणे दिसू लागतात. तसेच हे महाराज,

ज्ञान लाभ होताच अविद्यारूपी अंधकार नाश पावून विद्यारूपी प्रकाश उत्पन्न होतो आणि मौल्यवान सत्यांचे स्पष्टपणे दर्शन घडते. तेव्हा साधकास अहर्निश प्रयत्नामुळे अखेरे जग हे नाशमान, अनित्य आहे, जगात दुःख आहे आणि आत्मा ही वस्तू मुळीच अस्तित्वात नाही. या सत्याचे स्पष्टपणे आकलन होते.''

''उत्तम, भंते नागसेन, अतीउत्तम!''

**(छ) एका कार्यात सर्व धर्मांचा सहयोग**

राजा म्हणाला, ''भंते, हे सर्व धर्म एकत्र येऊन कोणते एखादे कार्य करतात काय?''

''होय महाराज, वर सांगितलेले सर्व धर्म अगदी एकजुटीने तृष्णा समुहाचा नाश करतात.''

''भंते, ते कसे बरे? कृपा करून उदाहरणाने समजावून सांगा.''

''महाराज, हत्ती, घोडे, रथ आणि पायदळ शिपाई यांच्या अगदी वेगवेगळ्या फौजा असून देखील 'शत्रूला हरविण्याचे' हे एकच काम करतात. त्याचप्रमाणे अनेक प्रकारचे पुण्यधर्म एकजुटीने तृष्णा समुहाचा नाश करण्याचे एक कार्य पार पाडतात.''

''भंते, आपण अगदी बरोबर सांगितले.''

**(प्रकरण पहिले समाप्त)**

# प्रकरण दुसरे

# लक्षण-प्रश्न (पुढे चालू)

## ९. वस्तूच्या अस्तित्वाची प्रक्रिया

राजाने प्रश्न केला, "भंते, जन्मास आलेली व्यक्ती आणि प्रौढावस्थेतील व्यक्ती या दोन्ही व्यक्ती एकच असतात की बदलून भिन्न भिन्न असतात?"

(१) "कृपा करून उदाहरण देऊन समजावून सांगा."

"महाराज, समजा, जेव्हा आपण अगदी लहान बालक होतात, निव्वळ मासाचा गोहा, इतके अजाण की, केवळ खाटेवर उताने पडून राहत होता. परंतु आता आपण मोठे झाला आहात. चांगले प्रौढ. तेव्हा आपण लहान असताना जी व्यक्ती होतात, तीच व्यक्ती आता प्रौढावस्थेत आहात असे आपणास वाटते काय?"

"नाही भंते, आता माझ्यात भिन्नत्व आले आहे."

"महाराज, आपण जर बालपणी असलेली व्यक्ती प्रौढावस्थेत नसाल, तर मग कोणी आपले माता, पिता अगर आचार्यही नाहीत, असेच म्हणावे लागेल! तसेच असेल तर कोणी ज्ञानी किंवा शीलवान देखील होऊ शकत नाही. आपल्या भिन्न-भिन्न अवस्थांमधील म्हणजे बाल्यावस्थेतील माता वेगळ्या आणि प्रौढावस्थेतील माता वेगळ्या मानाव्या लागतील. शिल्प शिकणारा दुसरा आणि शिल्प शिकून तयार झालेला दुसरा मानावा लागेल. गुन्हा करणारा दुसरा व शिक्षा भोगणारा दुसरा असेच समजावे लागेल."

"तसे नाही भंते, पण यावरून आपण काय सिद्ध करू इच्छिता?"

स्थवीर म्हणाले, "महाराज, मी बालपणी वेगळा आणि सध्यास्थितीत वेगळा झालो आहे खरा, परंतु ह्या सर्व अवस्था या एकाच शरीरावर घडणाऱ्या असल्यामुळे एकाच व्यक्तीत समाविष्ट करण्यात आल्या आहेत."

(२) "भंते, उदाहरण देऊन सांगा."

स्थवीर म्हणाले, "महाराज, समजा, एखाद्या माणसाने दिवा लावला, तर तो रात्रभर जळत राहील की नाही?"

"होय भंते, रात्रभर जळत राहील."

"पण काय हो महाराज, रात्रीच्या पहिल्या प्रहरी दिव्याची जी ज्योती होती तीच काय दुसऱ्या व तिसऱ्या प्रहरी राहील का?"

"नाही भंते!"

"महाराज, तर काय पहिल्या प्रहरी असणारा दिवा दुसरा आणि दुसऱ्या व तिसऱ्या प्रहरी असणारा दिवा दुसरा होता की काय?"

"नाही भंते, तोच दिवा रात्रभर जळत राहील."

"महाराज, बरोबर त्याचप्रमाणे वस्तूच्या अस्तित्वाच्या प्रक्रियेत एक अवस्था उत्पन्न होत असतानाच पहिली अवस्था नष्ट होत असते व याप्रमाणे ही प्रक्रिया किंवा प्रवाह एकसारखा सुरू राहतो; या एका प्रवाहाच्या दोन अवस्थेत एका क्षणाचाही अंतर पडत नाही. कारण एका अवस्थेचा लय (नाश) होतो न होतो तोच दुसरी उत्पन्न होऊन पहिलीची रिक्त जागा भरून काढते. यामुळे व्यक्ती एकच आहे असेही म्हणता येत नाही तसेच दुसरा होतो असेही म्हणता येत नाही."

"एका जन्मातील शेवटच्या विज्ञानाचा नाश होताच दुसऱ्या जन्माचे विज्ञान उठून उभे होते."

(३) "कृपा करून एक अजून उदाहरण देऊन सांगा."

"महाराज, दूध काढल्यानंतर विरजन टाकले असता काही वेळाने त्याचे दही बनते. दही पासून लोणी व लोण्यापासून तूप बनविले जाते. तेव्हा कोणी म्हणेल की, दूध, दही, लोणी व तूप एकच आहे, तर असे म्हणणाराचे कथन मान्य करता येईल काय?"

"नाही भंते, परंतु दूधापासूनच दही, लोणी व तूप बनले आहे."

"महाराज, बरोबर त्याचप्रमाणे वस्तूंच्या अस्तित्वाच्या प्रवाहात एक अवस्था उत्पन्न होते. ती लय पावते आणि तात्काळ दुसरी अवस्था उत्पन्न होऊन तिची रिक्त जागा भरून काढते. याप्रमाणे हा अतुट प्रवाह सतत चालु राहतो. जणू काय पुनर्जन्माचे कार्य एकाचवेळी चालू आहे. मात्र एका प्रवाहावाच्या दोन अवस्थेत एका क्षणाचाही अंतर पडत नाही. कारण एकाचा लय (नाश) होताच दुसरा उत्पन्न होतो. या कारणानेच तोच जीव राहतो असेही म्हणता येत नाही आणि उत्पन्न होणारा दुसरा आहे असेही म्हणता येत नाही."

"एका जन्माच्या शेवटच्या विज्ञानाचा लय होताच दुसऱ्या जन्माचे प्रथम विज्ञान उठून उभे राहते."

''भंते, आपले कथन अगदी संयुक्तिक आहे.''

## १०. पुनर्जन्मापासून सुटका होण्याचे ज्ञान

राजा म्हणाला, ''भंते, आता माझी पुनर्जन्मापासून सुटका झाली असे ज्ञान पुनःर्जन्म ग्रहण न करणाऱ्या व्यक्तीस होते काय?''

''होय महाराज, आता माझा पुनःर्जन्म होणार नाही, या गोष्टीची त्याला जाणीव असते.''

''भंते, हे त्या व्यक्तीस कसे काय समजते?''

''महाराज, ज्या हेतू आणि प्रत्यया (कारणा)मुळे पुन्हा जन्म घ्यावा लागतो, त्यांचे अस्तित्व संपले म्हणजे त्याला ही जाणीव होते की, आपली आता पुन्हा जन्म घेण्यापासून सुटका झाली.''

''कृपाकरून उदाहरणाने समजावून सांगावे.''

''महाराज, एखाद्या शेतकऱ्याने शेतीची मशागत करून पेरणी केली व आलेल्या पिकाची मळणी करून त्याने धान्याचे कोठार भरून ठेवले. त्यानंतर काही काळ शेतीची मशागत न करता, पेरणी न करता आपला चरितार्थ साठवून ठेवलेल्या धान्यावर चालवू लागला, त्यातूनच दुसऱ्यांना देऊ लागला अगर इतर खर्च करू लागला अशा स्थितीत महाराज, आपले कोठार भरत नसून रिकामे होत आहे याची जाणीव त्या शेतकऱ्यास होणार की नाही?''

''होय भंते, निश्चितच होईल.''

''ती कशी काय होईल बरे?''

''भंते, कोठाार भरण्याचे जे हेतू किंवा प्रत्यये (कारणे) आहेत, ते बंद पडल्यामुळे त्याला त्याची जाणीव होणे स्वाभाविक आहे.''

''महाराज, याप्रमाणेच ज्या हेतू आणि कारणामुळे पुन्हा जन्म घ्यावा लागतो, त्याचे अस्तित्व संपले म्हणजे त्याला ही जाणीव होते की, आपली आता पुन्हा जन्म घेण्यापासून सुटका झाली.''

''भंते, आपले कथन संयुक्तिक आहे.''

## ११. ज्ञान व प्रज्ञेचे स्वरूप आणि उद्देश

राजा म्हणाला, ''भंतेजी, ज्ञानी असतो तो प्रज्ञावान देखील असतो काय?''

"होय महाराज, तो प्रज्ञावान सुद्धा असतो."

"भंते, असे असेल तर ज्ञान आणि प्रज्ञा एकच वस्तू मानावी लागेल?"

"होय महाराज, ज्ञान आणि प्रज्ञा दोन्ही एकच आहेत."

"भंते, अशा अवस्थेत त्याला कोणत्या विषयात मोह असू शकेल की, नाही?"

"महाराज, अशा व्यक्तीस काही विषयाबाबत मोह असू शकेल तर काही विषयाबाबत त्याला मोह असणार नाही."

"कोणत्या विषयाप्रती मोह असू शकेल आणि कोणत्या विषयाप्रती मोह असणार नाही?"

"महाराज, ज्या विषयाचे ज्ञान त्यास अवगत नाही, जे देश त्यांनी पाहिलेले नाहीत, तसेच त्या गोष्टी त्याने ऐकल्या नाहीत, त्या बाबींचा त्यास मोह होईल."

"आणि कोणत्या बाबीचा त्यास मोह होणार नाही?"

"महाराज ज्या विषयाबाबत हे अनित्य आहे, हे दुःखद आहे आणि आत्मा म्हणून काही वस्तूच नाही, असे आपल्या प्रज्ञेच्या अंतर्दृष्टीने पाहिले आहे, त्या विषयात त्याला मोह होणार नाही."

"भंते, या विषयातील त्याचा मोह कोठे जातो म्हणजे त्या मोहाचे काय होते?"

"महाराज, ज्ञान उत्पन्न होताच त्या विषयाबाबतचा मोह सर्वथा नाश पावतो."

"कृपाकरून उदाहरण देऊन समजावून सांगावे."

"महाराज, एखाद्या अंधार कोठडीत दिवा लावला असता काय घडते? तेथील अंधार जाऊन कोठडीत सर्वत्र प्रकाश पसरतो महाराज, त्याचप्रमाणे ज्ञान उत्पन्न होताच मोहाचा नाश होतो."

"भंते, आणि प्रज्ञेचे काय होते म्हणजे प्रज्ञा कोठे जाते?"

"महाराज, प्रज्ञा देखील आपले कार्य उरकून निघून जाते. कारण पुनः पुनः झालेलेच कार्य करण्याची आवश्यकता राहत नाही परंतु त्यामुळे झालेले कार्य म्हणजे अनित्य, दुःख आणि अनात्मतेचे ज्ञान तसेच राहते. यामुळे प्रज्ञा आता कायमची गेली असे मात्र समजू नये. तरी जी हुजऱ्यप्रमाणे दुसऱ्या हुकमाची वाट पाहत राहते."

(१) "हेच स्पष्ट करण्यासाठी कृपा करून उदाहरण देऊन सांगितल्यास बरे

होईल.''

''महाराज एखाद्या श्रीमंताने आपल्या कारकुनास बोलावून रात्रीच्या वेळी दिवा लावून त्या प्रकाशात पत्र लिहावयास सांगितले आणि पत्र लिहिल्यानंतर तो दिवा विझवून टाकला तरी पत्रात लिहिलेला मजकूर तसाच कायम राहील. या उदाहरणाप्रमाणेच प्रज्ञेने आपले काम करून निघून गेल्यावर देखील त्यामुळे झालेले ज्ञान कायम राहते.''

(२) ''भंते, पुन्हा उदाहरण देऊन समजावून सांगा.''

''महाराज, पूर्वेकडील लोकात अशी रूढी आहे की, ते लोक घराशेजारी पाण्याने भरलेले निदान पाच घडे तरी ठेवतात. उद्देश हा की, चुकून एखाद्या घरात आग लागली की चटकन विझवता यावी. समजा, त्याच्या शंकेप्रमाणे एखाद्या घरात आग लागली असता त्या पाचही घड्यातील पाणी ती विझविण्याच्या कामी आणून आग विझवली. तेव्हा पूर्णपणे आग विझल्यानंतरही घरातील लोक पुनः पुनः पाणी शिंपडत राहतील काय?''

''भंते नागसेन, मुळीच नाही. का की, आता काहीच उपयोग होणार नाही, तेव्हा रिकामे घडे जेथल्या तेथे ठेवलेलेच बरे.''

''महाराज, तेथील पाच घडे म्हणजे श्रद्धा, परिश्रम, जागरूकता, चिंतन व प्रज्ञा हे पंचेद्रिय किंवा पाच प्रकारचे नैतिक सद्‌गुण होत. आग विझवणारी घरातील माणसे म्हणजे साधक होत. विझवल्या गेलेली आग म्हणजे क्लेश (तृष्णा) होय. जसे पाण्याने भरलेले मडके आग विझवण्याच्या कामी आले तसेच वरील पाच नैतिक सद्‌गुण क्लेशाची आग विझवण्याचे कामी येतात असे समजावे आणि एकदा क्लेश नाश पावले की, पुन्हा त्याची उत्पत्ती संभवनीय नाही.''

''महाराज, याप्रमाणेच प्रज्ञा आपले काम आटोपून निघून जाते. परंतु तीमुळे घडलेले कार्य कायम राहते.''

(३) ''भंते, पुन्हाही उदाहरण देऊन समजावून सांगा.''

''महाराज, एखाद्या वैद्यान औषधाच्या उपयुक्त पाच प्रकारच्या वनस्पती आणून त्या बारीक कुटून त्यापासून काढा तयार केला. आणि तो कोण्या एका आजारी माणसास पाजून आजार मुक्त केले. आता तुम्हीच सांगा की, त्याचा आजार नाहीसा झाल्यानंतर देखील वैद्य त्याला औषधाचा काढा देतच राहील काय?''

''नाही भंते, आता त्या औषधाचा काय उपयोग?''

"महाराज, तेथील पाच प्रकारच्या औषधाच्या वनस्पती, तशीच पाच इंद्रिये किंवा पाच नैतिक सद्गुण समजावे. वैद्याप्रमाणे साधकास समजावे. आजाऱ्याचा आजार तसे क्लेश वा तृष्णा समजावे. जसे पाच प्रकारच्या वनस्पतीमुळे आजार मुक्त केले तद्वतच पाच नैतिक सद्गुणाने क्लेश नष्ट केले जातात."

"महाराज, याप्रमाणे प्रज्ञा आपले कार्य संपवून निघून जाते परंतु त्यापासून झालेले ज्ञान कायम राहते."

(४) "भंते, पुन्हा एखादे उदाहरण देऊन सांगावे."

"महाराज, एखाद्या सैनिकाने लढाईत गेल्यानंतर आपल्या जवळ असलेल्या पाचही प्रकारच्या बाणांपैकी काही बाण सोडून शत्रूला हरविले व पिटाळून लावले. आता शत्रू पळून गेल्यानंतर देखील तो बाण पुनःपुनः सोडतच राहील काय?"

"नाही भंते, शत्रू पळून गेल्यानंतर बाण सोडण्यात काय उपयोग?"

"महाराज, जसे पाच प्रकारचे बाण तसे तेथे पाच नैतिक सद्गुण समजावे. सैनिक तसा साधक (योगी) समजावा. जसे लढाईतील शत्रू तसे येथे क्लेश समजावेत. आणि ज्याप्रमाणे पाच प्रकारच्या बाणांचा मार करून शत्रूंना हरविले तद्वतच पाच इंद्रिये शरानी क्लेश नाश केले जातात. महाराज, पळून गेलेला शत्रू पुनः परत येत नाही तसे एकदा शमविलेले क्लेश पुन्हा उद्भवत नाहीत."

"महाराज, याप्रमाणे प्रज्ञा आपले कार्य आटोपून निघून गेल्यानंतर देखील तिच्यामुळे झालेले ज्ञान नष्ट होत नाही, हे या उदाहरणावरून सिद्ध होते."

## १२. अर्हताची सुखे व दुःखे

राजा म्हणाला, "भंते, पुनः जन्मास न येणाऱ्या अर्हतास सुखाच्या किंवा दुःखाच्या वेदना होतात काय?"

स्थवीर म्हणाले, "महाराज, काही वेदना होतात, तर काही वेदना होत नाहीत."

"कोणत्या वेदना होतात आणि कोणत्या वेदना होत नाहीत. हे सांगाल काय?"

"महाराज, शारीरिक वेदना होतात परंतु मानसिक वेदना होत नाहीत."

"भंते, हे कसे काय घडते?"

"शारीरिक वेदना होण्याची जी कारणे किंवा हेतू आहेत ती कायम असल्यामुळे

शारीरिक वेदना होतात, परंतु चित्तात उत्पन्न होणाऱ्या वेदनांची कारणे किंवा हेतू नष्ट झाल्याने मानसिक सुख-दुःखाच्या वेदना त्यास होत नाहीत. खुद्द भगवान बुद्धांनीच म्हटले आहे की, 'अशी व्यक्ती फक्त एकाच प्रकारच्या वेदना भोगते. त्या म्हणजे शारीरिक मानसिक वेदना त्यास भोगाव्या लागत नाहीत.''

''भंते, अशी अर्हत व्यक्ती सुख-दुःखाच्या वेदना भोगण्याकरीता का बरे थांबून राहतो? आपले शरीर विसर्जन का करीत नाही?''

''महाराज, अशा जीवन मुक्त शरीराबद्दल खास आकर्षण किंवा तिरस्कारही वाटत नाही. तसेच तो कच्च्या स्वरूपात असलेली जीवन फळे तोडू इच्छित नाही, तर ते पूर्ण पक्व होण्याची तो वाट पाहतो. पंडित पुरूष कधी कोणत्या गोष्टीची घाई करीत नाहीत, ती पूर्ण पक्व होईपर्यंत वाट पाहण्याइतकी त्यांच्यात सहनशिलता असते.''

''महाराज, धर्मसेनापती सारीपुत्रांनी सुद्धा म्हटले आहे की,''

मला मृत्यूची किंवा जगण्याची यांपैकी कोणतीही इच्छा राहिली नाही. जसा एखादा मजूर काम केल्यानंतर आपल्या दामाची वाट पाहतो त्याप्रमाणे मी जीवन फळाची वाट पाहत आहे. मला मरण नको की, जन्म नको. ज्ञानपूर्वक जागृतपणे मी माझ्या वेळेची प्रतीक्षा करीत आहे.

## १३. वेदनांचे कार्य

राजा म्हणाला, ''भंते, कुशल (पुण्यमय) वेदना, अकुशल (पापमय) वेदना किंवा अव्याकृत (पाप नाही की पुण्यही नाही) वेदना आहेत की काय?''

''होय महाराज, तिन्ही प्रकारच्या वेदना अस्तित्वात आहेत.''

''भंते पण जी कुशल असते दुःखदायक नसते आणि जी दुःखदायक असते ती सुखद नसते. तेव्हा तर दुःखदायक असे सुखकर कोणतेही काम असणार नाही.''

''महाराज, समजा कोणी एका माणसाने एका हातात लोखंडाचा लाल झालेला तप्त गोळा आणि दुसऱ्या हातात बर्फाचा एक तुकडा घेतला असेल, तर त्या दोन्ही गोळ्यांमुळे त्याला वेदना होतील की नाही?''

''होय भंते, त्यास दोन्ही गोळ्यांमुळे वेदना होतील.''

''नाही भंते!''

''तर दोन्ही गोळे थंड आहेत की काय?''

''नाही भंते!''

''तर तुम्ही आपला पराजय स्वीकार केला पाहिजे ! जर तप्त वस्तूच पीडा देणारी असेल, तर दोन्ही वस्तू तप्त नसल्यामुळे त्यापासून पीडा व्हायला नको आणि जर थंड वस्तूच पीडा देणारी असेल, तर दोन्ही वस्तू थंड नाहीत, तेव्हा त्यामुळे देखील पिडा व्हायला नको. महाराज, दोन्ही वस्तू तप्त नाहीत किंवा दोन्ही वस्तु थंड नाहीत. अशा स्थितीत त्या दोन्ही वस्तूंपासून पीडा वा कष्ट व्हायला नको, दोन्ही वस्तूंचे गुणधर्म वेगवेगळे म्हणजे एक थंड तर दुसरी तप्त आहे. तेव्हा दोन्ही पीडा पोचवितात. तुमच्याच म्हणण्यानुसार असे घडू शकत नाही.''

''आपणासारख्या वादपटुशी चर्चा करण्यास मी असमर्थ आहे. यातील इंगित काय आहे ते सांगण्याची कृपा करावी.''

तेव्हा स्थवीराने अभिधम्मानुसार स्पष्टीकरण करून सांगितले -

''महाराज, सांसारिक जीवनातील सहा सुखे असून त्यागमय जीवनातील सहा सुखे आहेत. सांसारिक जीवनातील सहा दुःखे असून त्यागमय जीवनातीलल सहा दुःखे आहेत. तसेच सांसारिक जीवनाती सह उपेक्षा व त्यागमय जीवनातील सहा उपेक्षा आहेत. याप्रमाणे एकूण ३६ वेदना होतात. हे महाराज, भूतकाळातील ३६ वेदना भविष्य काळातील ३६ वेदना आणि वर्तमान काळातील ३६ वेदना याप्रमाणे एकूण १०८ वेदना अस्तित्वात आहेत.''

''भंते, आपण फारच छान सांगितले.''

## १४. परिवर्तनातही व्यक्तीमत्वाचे सुरक्षित अस्तित्व

राजा म्हणाला, ''भंते, पुनर्जन्म कोणाचा होतो?''

''स्थवीर म्हणाले, महाराज, नाम (Mind-चित्त) आणि रूप (Matter-द्रव्य-समुच्चय) यांचा पुनर्जन्म होतो.''

''भंते, हेच नाम आणि रूप जन्मास येते काय?''

''महाराज हेच नाम आणि रूप जन्मास येत नाहीत. मनुष्यात समाविष्ट या नाम व रूपाकडून चांगली (पुण्यमय) अगर वाईट (पापमय) कृत्ये केली जातात. त्या कर्मफळानुसार दुसरे नाम आणि रूप जन्म ग्रहण करते.''

''भंते, असे असेल तर, पहिले नाम-रूप आपल्या कर्मफळातून मुक्त झाले,

असेच म्हणावे लागेल.''

स्थवीर म्हणाले, महाराज, ''जर पुन्हा जन्मास येणार नसेल तर मागील कर्मफळातून मुक्त झाले परंतु ते पुन्हा जन्मास येते यावरून हाच निष्कर्ष निघतो की, तो मुक्त झाला नाही.''

(१) ''भंते, उदाहरण देऊन समजावून सांगावे.''

''समजा, एखाद्याने कोणाचे आंबे चोरले. तेव्हा मालकाने त्या चोरास पकडून राजापुढे नेऊन उभे केले व म्हणाला की, 'महाराज, याने माझ्या आंब्याची चोरी केली आहे. यावर तो म्हणाला की नाही महाराज, मी या माणसाच्या आंब्याची चोरी केलीच नाही. याने लावलेले आंबे दुसरे होते आणि मी घेतलेले आंबे दुसरे आहेत. तेव्हा चोर म्हणून मला शिक्षा देऊ नये.' महाराज, आता तुम्हीच सांगा की, यावरून त्यास शिक्षा द्यावी की नाही?''

''होय भंते, शिक्षा त्याला दिलीच पाहिजे.''

''ते का म्हणून?''

''भंते, तो युक्तीवादाने काही म्हणो एक गोष्ट निश्चित आहे की, ज्याने आंबा लावून झाड वाढवले त्याच झाडाचे आंबे चोरले आहेत. म्हणून तो गुन्हेगार ठरतो.''

''महाराज, अगदी या उदाहरणासारखे एक नाम-रूप असणाऱ्या व्यक्तीकडून चांगले अगर वाईट कर्मे घडत असतात व त्यातूनच नाम रूपाचा पुनर्जन्म होतो. म्हणून हे दुसरे नाम रूप त्या कर्मफळातून मुक्त होत नाही.''

(२) ''कृपापूर्वक दुसरे उदाहरण देऊन सांगावे.''

''महाराज, कोणी एखाद्याने कोणाच्या शेतातील तांदूळ किंवा उसाची चोरी केली असता त्याला पकडून राजापुढे उभे केले असता आंबे चोरणारा सारखेच उत्तर दिले.....! किंवा-''

''महाराज, कोणी एक मनुष्य एखाद्याच्या शेतात गेला आणि थंडीचे दिवस असल्यामुळे तेथे जाळ पेटवून आपले अंग शेकत बसला. थोड्या वेळात तो जाळ तसाच पेटत ठेवून न विझवताच तो निघून गेला. इकडे त्या जाळाने पेट घेऊन त्या दुसऱ्याच्या शेतात आग लागून शेत पेटले. तेव्हा त्या शेतकऱ्याने त्याला पकडून राजाकडे नेऊन उभे केले व म्हणाला की, ''महाराज, याने माझे शेत पेटविले. यावर तो म्हणाला की, नाही महाराज, मी यांचे शेत पेटविले नाही. हे शेत, मी पेटविलेला विस्तव वेगळा

होता आणि शेतात लागलेली आग वेगळी आहे. तेव्हा मला गुन्हेगार ठरवून शिक्षा देऊ नये." महाराज, आता तुम्हीच सांगा की यावरून त्याला शिक्षा द्यावी की नाही?"

"होय भंते, शिक्षा तर दिलीच पाहिजे."

"ते का बरे ?"

"भंते, तो काही म्हणो परंतु पेटविलेल्या पाचोळ्यापासूनच शेत पेटले. हे खरे आहे."

"महाराज, अगदी या उदाहरणाप्रमाणेच मनुष्यात समाविष्ट नाम-रूपद्वारा चांगले अगर वाईट कामे करतो आणि त्याच कर्मफळाच्या योगाने दुसरे नाम-रूप समाविष्ट असलेला मनुष्य जन्म घेतो. म्हणून त्या कर्मफळापासून मुक्त होत नाही."

(३) "कृपा करून आणखी उदाहरणाने समजवावे."

"महाराज, कोणी एक मनुष्य आपल्या घराच्या वरच्या मजल्यावर दिवा लावून त्या प्रकाशात भोजन करीत बसला. त्या दिव्यामुळे शेजारच्या गवताला आग लागून शेवटी घर पेटले, नंतर गावास आग लागली. आता गावकऱ्यांनी त्या मनुष्यावर गाव पेटविल्याबद्दल आरोपी म्हणून आपल्याकडे आणले. तर आपण त्याला कशा प्रकारे निर्णय द्याल? यात आरोपीचे म्हणणे असे आहे की, 'मी दिवा पेटविला होता. गाव नव्हे- हे प्रकरण जर तुमच्या न्यायालयात आणले तर तुम्ही कोणाच्या बाजूने न्याय द्याल?"

"भंते, गावकऱ्यांच्या बाजूने."

"ते का बरे?"

"भंते, तो काहीही म्हणो परंतु त्याने पेटविलेल्या दिव्यामुळेच गाव बेचिराख झाला हे खरे म्हणून दोष त्याच्याकडेच येतो."

"महाराज, याप्रमाणे जरी मृत्यू बरोबर एक नाम-रूप लय (नष्ट) पावत असले तरी त्याची पूर्ती करणारे यापासूनच दुसऱ्या नाम रूपाचा पुनर्जन्म होतो. म्हणून पहिल्या नाम रूपाच्या वाईट कर्मफळापासून दुसऱ्या नाम रूपाची सुटका होत नाही."

(४) "तरीपण दुसऱ्या उपमेने माझी समजूत घालावी."

"महाराज, कोणा एका तरुणाचे एका अल्पवयीन मुलीशी लग्न झाले. त्याने याबद्दल तिच्या बापास काही रुपयेही दिले आणि तो कोठे तरी दूर निघून गेला. चार सहा वर्षे असेच निघून गेले. या अवधीत ती मुलगी वाढून अगदी तरुण झाली. तिचे

अंग बरेच बदलले होते. तेव्हा दुसऱ्या कोणी मनुष्याने तिच्या बापास काहीरूपये हुंडी देऊन तिच्याशी लग्न लावले व तिला घेवून गेला होता ही, बातमी तिच्या पहिल्यापतीस समजली व तो त्याच्याकडे जाऊन त्याला म्हणाला की, 'तू माझ्या पत्नीस का म्हणून पळविलेस?' यावर तो म्हणाला की, 'मी तुझ्या पत्नीला मुळीच पळविले नाही. तू जिच्यासाठी रूपये देऊन लग्न केलेस ती एक लहान अल्पवयीन मुलगी होती व मी जिच्यासह लग्न केले ती एक उपवर तरुण स्त्री आहे.' यावर दोघांचे भांडण होऊन निर्णयासाठी आपणाकडे आले असता आपण कोणाच्या बाजूने निर्णय द्याल?''

''भंते, पहिल्या मनुष्याच्याच बाजूने.''

''ते का बरे?''

''भंते, तो दुसरा मनुष्य काही सांगत असला तरी तीच अल्पवयीन लहान मुलगी वाढून आता उपवर नवतरूणी झाली आहे.''

''महाराज, याचप्रमाणे जरी मृत्यू बरोबर एक नाम-रूप लय पावत असले तरी जन्माबरोबर त्यातूनच दुसरे नाम रूप जन्मास येते म्हणून दुसरे नाम रूप पहिल्या कर्मफळापासून मुक्त होत नाही.''

(५) ''भंते, अजून उदाहरणाने समजावून सांगा.''

''महाराज, कोणा एका मनुष्याने गवळ्याकडून घडाभर दूध घेतले आणि ते तेथेच सुरक्षित ठेऊन 'उद्याला परत येतांना घेऊन जाईन,' असे बोलून निघून गेला. इकडे त्या दूधाचे रात्रभरात दही बनले. दुसरे दिवशी परत आल्यानंतर त्याने गवळ्याला दूधाने भरलेला आपला घडा मागितला, गवळ्याने त्याचे मडके आणून दिले. परंतु मडक्यातील दही पाहून तो म्हणाला, ''मला दही नाही तर दूधाचा घडा दे.'' यावर गवळी म्हणाला, ''त्याच दुधाचे हे दही बनले आहे.''

''महाराज, याप्रमाणे दोघेही भांडण करीत निर्णयासाठी तुमच्याकडे आले असता तुम्ही कोणाच्या बाजूने निर्णय द्याल?''

''भंते, गवळ्याच्या बाजूने.''

''ते कां बरे?''

''भंते, तो काहीही म्हणत असला तरी त्याच दुधाचे दही झाले आहे.''

''महाराज, याचप्रमाणे एका नाम-रूपाचा लय होऊन त्यातूनच दुसऱ्या नाम रूपाचा पुनर्जन्म होतो. म्हणजे दुसरे नाम-रूप हे पहिल्या नाम रूपाच्या परिणामापासून

उत्पन्न होते. म्हणून पहिल्या नाम रूपाच्या कर्मफळापासून दुसऱ्या नाम रूपाची मुक्तता होत नाही.''

''भंते, आपण उत्तम रीतीने पटवून दिले.''

## १५. नागसेनाच्या पुनर्जन्मासंबंधी प्रश्न

राजा म्हणाला, ''भंते, तुम्ही स्वतः पुन्हा जन्मास याल की नाही?''

''महाराज, पुरे करा. असे विचारण्याचे काय कारण? मी तर आधीच सांगितले आहे की, माझ्या मनात लालसा शिल्लक राहून मला मृत्यू आला तर पुन्हा जन्मास येईन; परंतु जर का लालसा (तृष्णा) शिल्लक न राहता मृत्यू आला तर मी पुन्हा जन्मास येणार नाही.''

''भंते, एखादे उदाहरण देऊन स्पष्ट करा.''

''महाराज, एखाद्याने अगदी विश्वासपूर्वक व इमानेइतबारे राजाची नोकरी केली. यावर खुष होऊन त्यास राजाने मोठे पद दिले. त्याचा पगार वाढवून इतर सुखसोयी प्रदान केल्या. त्यामुळे तो ऐशआरामात व चैनीत राहून लागला, परंतु तो मात्र जाहीररीत्या लोकांना सांगू लागला की, राजाने माझ्यासाठी काहीच केले नाही. तर त्याचे असे बोलणे संयुक्तिक ठरेल काय?''

''मुळीच नाही भंते!''

''महाराज याचप्रमपणे तोच तो प्रश्न पुन्हा विचारण्यात काय स्वारस्य? याबाबत मी आधीच सांगितले ना की, माझ्या मनात लालसा शिल्लक असतांना मृत्यू आला तर जन्मास येईन आणि मनातील लालसा सर्वस्वी नष्ट होऊन मृत्यू आला तर पुन्हा जन्मास येणार नाही.''

''भंते, फारच छान.''

## १६. नाम आणि रूप व त्यांचा संबंध

राजा म्हणाला, ''भंते, आपण आताच – 'नाम-रूपा' संबंधी बोलत होता. तेव्हा नाम म्हणजे काय आणि रूप म्हणजे काय हो?''

''महाराज, जेवढ्या स्थूल म्हणजे सहज दिसणाऱ्या वस्तू आहेत त्या सर्व रूप असून जे सूक्ष्म मानसिक धर्म आहेत, ते सर्व नाम आहेत.''

''भंते, पण निव्वळ नामाचाच किंवा निव्वळ रूपाचाच पुनर्जन्म का होत नाही?''

''महाराज, नाम आणि रूप एक दुसऱ्याशी निगडित आहेत. ते एक दुसऱ्या शिवाय राहू शकत नाहीत. दोन्ही परस्परांच्या आश्रयाने एकत्रच राहतात.''

''भंते, कृपा करून उदाहरण देऊन समजावून सांगावे.''

''महाराज, कोंबडीच्या पोटात अंडे नसेल तर पिल्लू नाही हेच सिद्ध होते. कारण अंडे व पिल्लू दोन्ही परस्परांवर आश्रित आहेत. दोन्ही एकत्रच राहणारे आहेत. तसेच जर नाम नसेल तर रूप असू शकणार नाही. नाम व रूप याचे असे अविभाज्य स्वरूप अनंत कालापासून चालत आलेले आहे.''

''भंते, आपले कथन अगदी बरोबर आहे.''

## १७. काळा संबंधाने

राजा म्हणाला, ''भंते नागसेन, आताच आपण 'अनंत काळापासून' असे म्हणालात. तर का 'काळ' म्हणजे काय वस्तू आहे?''

''महाराज, भूतकाळ, भविष्यकाळ आणि वर्तमानकाळ असे तीन काळ आहेत.''

''भंते, परंतु काळ म्हणजे एखादी खरीखुरी वस्तू आहे की काय?''

''महाराज, काळ म्हणजे एक वस्तू आहे आणि नाही सुद्धा.''

''कोणता काळ आहे आणि कोणता काळ नाही?''

''महाराज, पुनर्जन्माच्या दृष्टीने-विचार केला असता जीवमात्रांचे असे काही संस्कार आहेत की, होऊन गेले, संपून गेले, संपून गेले, आता त्यांचे काहीच अस्तित्व उरले नाही, विलयास गेले, एकदम परिवर्तन झालेले आहेत. त्याच्या उल्लेखासाठी 'काळाचे' काही अस्तित्व नाही. काही जीवमात्रांचे घटक असे आहेत की, त्याच्या संस्कारानुसार (कर्मफळानुसार) काही बरे वाईट परिणाम घडत असतात. म्हणजे जे संस्कार आपले फळ दाखवितात. कोठे ना कोठे प्रतिसंधी धारण करतात त्यांच्या उल्लेखासाठी 'काळांचे' अस्तित्व आहे. पुनर्जन्मापासून मुक्त अर्हत, ज्यांनी येथेच परम निर्वाणपदाचा साक्षात्कार करून घेतला आहे. अशांच्यासाठी काळाचे अस्तित्व नाही. निर्वाण प्राप्ती नंतर काळ राहील तरी कसा?''

''भंते नागसेन, आपण उत्तम प्रकारे समजावून सांगितले.''

**(प्रकरण द्वितीय समाप्त)**

# प्रकरण तिसरे

# लक्षण–प्रश्न (पुढे चालू)

## १८. तिन्ही काळांचे मूळ अविद्या

राजा म्हणाला, ''भंते, भूतकाळ, भविष्यकाळ व वर्तमानकाळ. या प्रत्येकाचे मूळ कोणते?''

''महाराज, याचे मूळ अविद्या आहे.''

''अविद्येमुळे प्राणीमात्रांचे संस्कार अस्तित्वात आले. संस्कारामुळे विज्ञान (जाणीव) जन्मास आले. विज्ञानामुळे नाम व रूप आकारास आले. नाम रूपामुळे सहा आयतने किंवा इंद्रिये. आयतनामुळे स्पर्श आला. स्पर्शामुळे वेदना (संवेदना), वेदनांमुळे जन्म. जन्मामुळे वृद्धत्व मृत्यू, शोक, रडणे, ओरडणे, दुःख, यातना व निराशा आली. असा हा कालौघ आहे. याप्रमाणे या काळप्रवाहातील दुःखाच्या आरंभाची गुंतागुंत कोठून सुरू होते, हे स्पष्ट करू होऊ शकत नाही.''

## १९. काळाचा आरंभ अज्ञात

राजा म्हणाला (१), ''भंते, आपण जे म्हणता की, काळाचा आरंभ कोठून होतो ते कळत नाही. तेव्हा कृपाकरून ते एखाद्या उपमेद्वारा स्पष्ट केले तर बरे होईल.''

''महाराज, कोणा मनुष्याने जमिनीत एक लहानसे बीज पेरले. त्याला अंकुर आले. हळूहळू रोपटे वाढून त्याचा वृक्ष झाला. नंतर त्याला फळे आली व त्या फळांतील बीज पुन्हा पेरले. पुन्हा त्याला अंकुर येऊन त्याचा वृक्ष झाला. पुन्हा त्याला फळे आली. महाराज, आता तुम्ही सांगा की, या गुंतागुंतीचा शेवट होऊ शकेल काय?''

''मुळीच नाही भंते.''

''महाराज, याप्रमाणे भूतकाळाचे अंतीम टोक स्पष्ट होऊ शकत नाही.''

(२) ''कृपा करून पुन्हा उदाहरण देऊन समजावून सांगा.''

स्थवीर जमिनीवर एक वर्तुळ काढून म्हणाले. ''या वर्तुळाचा शेवट आहे काय?''

''नाही भंते!''

''महाराज, भगवंतांनी अशाच जीवन चक्राचा उल्लेख केला आहे. चक्षू व त्याचे

दृष्य रूप यापासून चक्षु विज्ञान उत्पन्न होते. हे तिन्ही एकत्र येतात, तेव्हा स्पर्श उत्पन्न होतो. स्पर्शापासून वेदना आणि वेदनांपासून तृष्णा उत्पन्न होते. ह्याच (पाहण्याच्या) तृष्णेपासून पुन्हा चक्षू उत्पन्न होतात. आता या चक्राचा अंत आहे काय? जे चक्षू पासून घडते तेच श्रोत्र (कान) नाक, जीभ, शरीर व मनाबद्दल लागू आहे. याप्रमाणे हे महाराज, भूतकाळाचे अंतीम टोक स्पष्ट होत नाही.''

''भंते, तुम्ही अगदी बरोबर समजावून सांगितले.''

## २०. आरंभाचा शोध

राजा म्हणाला, ''भंते, आपण म्हणता की, 'आरंभ कोठे होतो याचा पत्ता नाही.' तर हा आरंभ म्हणजे काय?''

''महाराज, कोणत्याही वेळेचा भूतकाळ असो! तो भूतकाळाचा आरंभ आहे.''

''भंते, तर कोणत्याच आरंभाचा पत्ता लागत नाही काय?''

''महाराज, काहींचा लागतो, काहींचा लागत नाही.''

''भंते, कोणाचा पत्ता लागतो व कोणाचा पत्ता लागत नाही? ते सांगा.''

''महाराज, पूर्वी जेथे कधीही अविद्या नव्हती. अशा आरंभाचा पत्ता लागत नाही. कोणत्याही स्वरूपातील व प्रकारातील वस्तू म्हणजे अविद्या किंवा अज्ञान. जी वस्तू पूर्वी कधी नसतांना अस्तित्वात येते आणि कोणती वस्तू असतांना नष्ट होते अशाच आरंभाचा पत्ता लावता येतो. एकंदरीने आपल्या दृष्टीने पहाता कालप्रवाहाव्या सुरवातीची अविद्या असल्याने माहिती मिळत नाही. परंतु जन्मापासूनच्या काळखंडातील माहिती उपलब्ध होते. म्हणजे जन्म सुरू झाला की मृत्यूही आलाच, यादृष्टीने माहीती उपलब्ध होते.''

''भंते, जी वस्तू पूर्वी कधी नसताना जन्मरूपाने अस्तित्वात येते आणि अस्तित्वात असलेल्याचा नाश होतो. म्हणजे काळाची दोन्ही टोके कापलेली आहेत, तेव्हा सर्व काळप्रवाहाचे काय होईल? वाढेल का?''

''महाराज, जर दोन्ही टोकांस कापले तर वाढीस लागेल.''

''भंते, मी असे विचारीत नाही. तर ज्या टोकपासून काळप्रवाह तुटलेला आहे, तेथून त्याची वाढ होईल काय? असे मी विचारीत आहे.''

''होय महाराज वाढू शकते.''

''भंते, उपमा देऊन समजावून सांगा.''

''स्थवीराने 'बीज व झाड' याचे पुन्हा उदाहरण देऊन पुढे सांगितले की, रूप, वेदना, संज्ञा, संस्कार आणि विज्ञाने हे पाच स्कंध काळप्रवाहाचे मूळ बीज होत.''

''भंते, आपण बरोबर समजावून सांगितले.''

## २१. संस्काराची उत्पत्ती व त्यापासून सुटका

राजा म्हणाला, ''भंते, उत्पन्न होणारे असेही संस्कार आहेत काय?''

''होय, महाराज!''

''ते कोणते बरे?''

''महाराज चक्षू व रूप यांपासून चक्षूविज्ञान उत्पन्न होते, चक्षूविज्ञानापासून स्पर्श होतो. स्पर्शामुळे वेदना होतात. वेदना आहेत तेथे तृष्णा आलीच. तृष्णेपासूनच उपादान होते. उपादानापासून भव. भवापासून जन्म होतो. जन्म झाला तेथे म्हातारपण, मृत्यू, शोक, रडणे भुंकणे, नैराश्य आणि यातना होतात. याप्रमाणे केवळ दुःखच वाढीस लागते.''

''महाराज, जेथे चक्षू व रूप नाही जेथे चक्षूविज्ञान नाही. चक्षूविज्ञान नसल्यामुळे चक्षू स्पर्श नाश पावतो. याप्रमाणे वेदना....., तृष्णा.....उपादान.....भव....., जन्म....., व जन्म चुकल्याने म्हातारपण, मृत्यू, शोक, रडणे ओरडणे, दुःख, नैराश्य व यातना नाश पावतात. याप्रमाणे समस्त दुःख प्रवाहाचा शेवट होतो.''

''भंते, बरोबर सांगितले.''

## २२. ज्यांचे अस्तित्व पूर्वापार चालत आलेले आहे, त्याच वस्तू उत्पन्न होतात

राजा म्हणाला, ''भंते, ज्यांचे पूर्वी कधी अस्तित्व नसतानाही निर्माण होणारे संस्कार आहेत काय?''

''नाही महाराज, ज्यांचे पूर्वी अस्तित्व नाही. असे कोणतेही संस्कार निर्माण होत नाहीत ज्यांच्या अस्तित्वाचा प्रवाह पूर्वीपासून चालत आला आहे, तेच संस्कार जन्मास येतात.''

(१) ''कृपाकरून उदाहरण देऊन समजावून सांगावे.''

''महाराज, आपण ज्या राजवाड्यात बसता, तो एकाएकीच तयार झाला आहे

काय?''

''भंते, कोणतीही वस्तू अशी आकस्मिकपणे तयार होत नाही. राजवाड्याला लावलेल्या लाकडी खिडक्या, दरवाजे, स्तंभ इत्यादींची वाढ जंगलात झाली. विटा व कौले मातीच्या रूपाने जमिनीत होते आणि असंख्य स्त्री-पुरूष मजुरांनी कष्ट केले व घाम गाळला तेव्हा क्रमाक्रमाने हा राजवाडा उभारण्यात आला. यावरून हेच सिद्ध होते की, ज्याच्या अस्तित्वाचा प्रवाह पूर्वापार चालत आलेला आहे, त्याच वस्तू परिवर्तन स्वरूपात जन्मास येतात. हेच खरे आहे.''

''महाराज, याचप्रमाणे कोणत्याही संस्काराची निर्मिती त्यांच्या पूर्वापार चालत आलेल्या अस्तित्वाच्या प्रवाहावरच अवलंबून आहे. जे संस्कार जन्मास येतात, त्याच्या अस्तित्वाचा प्रवाह पूर्वी पासूनच चालत येणारा आहे.''

(२) ''कृपाकरून दुसरे उदाहरण देऊन समजावून सांगावे.''

''महाराज, जमिनीत अंकुर येऊन सर्वच झाडाची क्रमाक्रमाने वाढ होऊन ती मोठी होतात आणि फुलतात व फळतात. याप्रमाणे ज्याच्या अस्तित्वाचा प्रवाह पूर्वापार चालत आला आहे त्याच वस्तू उत्पन्न होऊन विकसित होतात.''

(३) ''कृपाकरून पुन्हा उदाहरणाने समजावून सांगावे.''

''महाराज, एक कुंभार जमिनीतून माती खोदून तीवन अनेक संस्कार घडवितो तेव्हा कुठे मडके आकारास येते. त्याच्या स्थितीचा प्रवाह मातीपासून चालत आलेला आहे.''

''महाराज, याप्रमाणे शून्यातून उत्पन्न होणारे कोणतेही संस्कार नाहीत. ज्याच्या अस्तित्वाचा प्रवाह पूर्वापार चालत आला आहे. त्याच वस्तूची उत्पत्ती होऊन उत्क्रांतीची सीमा गाठतात.''

(४) ''भंते, पुन्हा उदाहरण देऊन समजावून सांगावे.''

''महाराज, विण्याला जर पत्र, चामडे, पोकळी, काठ, दांडा, गळा, तर किंवा खुंट्या यापैकी एकसुद्धा नसेल आणि कोणी वादकही नसेल, तर त्यातून संगीत निर्माण होईल काय?''

''भंते, मुळीच नाही.''

''आणि जर या सर्व वस्तू असतील तर?''

"भंते, मग तर संगीत अवश्य निर्माण होईल."

"महाराज, याप्रमाणे शुन्यातून उत्पन्न होणारे कोणतेही संस्कार नाहीत. ज्यांच्या अस्तित्वाचा प्रवाह पूर्वापार चालत आला आहे. त्याच संस्कार वस्तूची उत्पत्ती होऊन उत्क्रांतीची सीमा गाठतात."

(५) "कृपाकरून आणखी उदाहरण द्यावे."

"महाराज, बासाची छिद्रे केलेली कांब, रूळाखाली काठी, ओढण्याची दोरी, कापूस, कापडाचा लहान तुकडा आणि अग्नी उत्पन्न करणारा कोणी मनुष्य नसेल तर अग्नी उत्पन्न होऊ शकेल काय?"

"नाही भंते."

"आणि जर ह्या सर्व वस्तू असतील तर?"

"भंते, तेव्हा तर अवश्य अग्नी उत्पन्न होईल."

"महाराज, याचप्रमाणे शून्यातून उत्पन्न होणारे कोणतेही संस्कार नाहीत. ज्यांच्या अस्तित्वाचा प्रवाह पूर्वापार चालत आला आहे. त्याच वस्तू उत्पन्न होऊन विकास पावतात."

(६) "भंते, आणखी एखादे उदाहरण देऊन समजावून सांगा."

"महाराज, अग्नी उत्पन्न करणारा सूर्यकाच नसेल, सूर्यप्रकाश असेल आणि वाळलेली जळाऊ कांडी नसेल तर अग्नी उत्पन्न होईल काय?"

"नाही भंते!"

"आणि सर्व वस्तू उपलब्ध असल्यास?"

"भंते, तेव्हा बरोबर अग्नी उत्पन्न होईल."

"महाराज, अगदी याप्रमाणेच शून्यातून उत्पन्न होणारे कोणतेही संस्कार नाहीत. ज्यांच्या अस्तित्वाचा प्रवाह पूर्वापार चालत आला आहे, त्याच संस्कार वस्तूची उत्पत्ती होऊन विकसित होतात."

(७) "भंते, कृपाकरून पुन्हा उदाहरणाने समजवावे."

"महाराज, जर आरसा नसेल, प्रकाश नसेल आणि त्यापुढे मुख नसेल तर प्रतिबिंब दिसेल काय?"

''नाही भंते!''

''आणि जर या सर्व वस्तू असल्यास?''

''भंते, तेव्हा निश्चित प्रतिबिंब दिसून येईल.''

''महाराज, बरोबर याच उदारहणाप्रमाणे शून्यातून उत्पन्न होणारे असे कोणतेही संस्कार नाहीत, ज्यांच्या अस्तित्वाचा प्रवाह पूर्वापार चालत आला आहे. त्याच संस्कार वस्तूची निर्मिती होते.''

''भंते, आपण माझ्या मनातील शंका एकदमच मिटवून टाकल्यात.''

**२३. आमच्यात आत्मा नाही.**

राजा म्हणाला, ''भंते, 'आत्मा' जाणणारा असा कोणी आहे काय?''

''महाराज, हा जाणणारा कोण?''

''भंते, ज्याप्रमाणे आम्ही येथे राजवाड्यात बसून इच्छेनुसार पूर्व, पश्चिम, उत्तर किंवा दक्षिण इत्यादी बाजूच्या खिडक्या मधून बाहेरचे दृश्य पाहू शकतो, त्याच प्रमाणे मनुष्याच्या शरीरात राहून डोळ्याद्वारे रूप पाहतो, कानाद्वारे शब्द ऐकतो, नाकाद्वारे सुगंधाचा उपभोग घेतो. जीभेद्वारा आस्वाद घेतो, कातडीद्वारे स्पर्शाचा उपयोग घेतो आणि मनाद्वारे अनुभव करतो, असा जाणणारा (ज्ञाता) तो आत्मा.''

स्थवीर म्हणाले, ''महाराज पाच दरवाजे कोणते ते मी सांगेन, तेव्हा आपण शांत चित्ताने ऐका.''

''महाराज, आपण या राजवाड्यात बसून पूर्व, पश्चिम, उत्तर व दक्षिण कोणत्याही खिडकीतून बाहेरील दृश्य पाहू शकतो. त्याचप्रमाणे आमच्या शरीरात वास्तव्य करून बसलेला जीव, (आत्मा) डोळे, कान इत्यादी सर्व इंद्रियांद्वारे रूप पाहण्याची, शब्द ऐकण्याची, सुगंध घेण्याची, रसांचा आस्वाद घेण्याची, स्पर्श करण्याची म्हणजे डोळ्याने पाहण्याची किंवा कानाने ऐकण्याची एकूण कोणत्याही इंद्रियाने कोणतेही कार्य करण्याची शिकस्त करीत असला पाहिजे, एवढे सामर्थ्य तर त्यास असावेच.''

''नाही भंते, असे कोणतेच सामर्थ्य त्यात नाही.''

''महाराज, यावरून आपल्या प्रथम बोलण्याचा नंतरच्या बोलण्याशी व नंतरच्या बोलण्याचा प्रथम बोललेल्या वाक्याशी मुळीच तारतम्य जुळत नाही.''

''महाराज, या सर्व खिडक्या उघडल्या असता येथे बसल्या बसल्याच बाहेरील

सर्व दृष्य म्हणजे ती झाडे, ती घरे, ते महाल पाहू शकतो. त्याचप्रमाणे आमच्या शरीरात बसणारा आत्मा डोळेरूपी खिडकी उघडली असता म्हणजे डोळे एकदम काढून टाकले असता बाहेरील आकाश अधिक चांगल्या प्रकारे पाहू शकतो काय? कान, नाक, जीभ आणि त्वचारूपी सर्व खिडक्या एकदम उघडल्या असता आवाज ऐकण्याचे, सुगंध घेण्याचे, रसांचा आस्वाद घेण्याचे आणि स्पर्श करण्याचे कार्य शरीराबाहेर येऊन अधिक चांगल्याप्रकारे करीत असेल. कारण या राजवाड्याबाहेर अगदी खुल्या जागेत उभे राहून आपण बाहेरील सर्व दृष्य अधिक स्पष्टपणे पाहतोच की नाही?''

''नाही भंते, जीवा (आत्म्या) कडून हे होणे शक्य नाही.''

''महाराज, तर मग आपल्या प्रथम बोललेल्या कथनाचा नंतरच्या कथनाशी किंवा नंतर केलेल्या कथनाचा पहिल्या कथनाशी तिळमात्र संदर्भ जुळत नाही.''

''महाराज, समजा, आपला हा दिन्न नामक सेनापती बाहेर जाऊन दरवाज्यापाशी जर उभा राहिला तर याची जाणीव आपणास होणार नाही काय?''

''होय भंते, अवश्य जाणीव होईल.''

''महाराज, याप्रमाणे जीभेवर ठेवलेल्या बाहेरील वस्तूचा स्वाद म्हणजे खारटपणा, आंबटपणा, तिखटपणा, कडूपणा व गोडपणा इत्यादींची जाणीव आपल्यामधील आत्म्यास होईल की, नाही?''

''होय भंते, अवश्य होईल.''

''तद्वतच त्या रसाची चव तोंडातून पोटात आत गेली, तर त्या वस्तूचा स्वाद म्हणजे खारटपणा, आंबटपणा, कडूपणा व गोडपणा इत्यादींची जाणीव आपल्या मधील आत्म्यास होईल की नाही?''

''नाही भंते, या चवीची जाणीव त्यास मुळीच होणार नाही.''

''महाराज, तर मग आपण प्रथम बोललेल्या कथनाचा नंतरच्या कथनाशी किंवा नंतर केलेल्या कथनाचा प्रथम केलेल्या कथनाशी मुळीच मेळ बसत नाही.''

''महाराज, समजा एखाद्या माणसाने शंभर घागरी मध मागवून एका रांजणात भरून ठेवला, यानंतर दुसऱ्या एका मनुष्याचे तोंड चांगले घट्ट बांधून त्यास त्या रांजणात सोडले, तर तो मनुष्य आपणास ज्या पदार्थाने भरलेल्या रांजणात सोडले त्या पदार्थाची चव, गोड, आहे की नाही, हे तो सांगू शकेल काय?''

''नाही भंते, याची त्यास जाणीव होणार नाही.''

"ते कां बरे?"

"कारण मध त्या माणसाच्या तोंडात गेलाच नाही तेव्हा त्यास जाणीव व्हावी ती कशी!"

"महाराज, तर मग आपण प्रथम केलेल्या कथनाचा नंतरच्या कथनाशी व नंतर केलेल्या कथनाचा प्रथम केलेल्या कथनाशी मुळीच मेळ बसत नाही."

"भंते, आपणासारख्या वादपटू पंडिताशी वादविवाद करावयास मी असमर्थ आहे. तेव्हा यातील खरी बाब काय आहे हे आपणच कृपाकरून सांगावे."

यावर स्थवीर म्हणाले, "महाराज, चक्षू व रूप यांच्या संयोगाने चक्षू विज्ञान (दृष्टी) उत्पन्न होते. यानंतर स्पर्श, संवेदना, संज्ञा, चेतना आणि एकाग्रता (ठाक निश्चय) एका मागे एक उत्पन्न होतात. दुसऱ्या इंद्रियासंबंधाने सुद्धा असेच घडते. एक उद्‌भवले की, त्यामागोमाग दुसरे अशी कारण व परिणामांची साखळी चालूच असते. यात ज्ञाता असलेला आत्मा असण्याचे काहीच कारण नाही."

"भंते, आपण उत्तरे देण्यात अत्यंत पटाईत आहात. एवढा गुंतागुंतीचा प्रश्न आपण उत्तम रीतीने समजावून सांगितला."

## २४. चक्षू-विज्ञान व मनो-विज्ञान यांचे संबंध

राजा म्हणाला, "भंते, जेथे-जेथे चक्षू-विज्ञान (दृष्टी) उत्पन्न होते, तेथे-तेथे मनो-विज्ञान (विचार) चाही आविष्कार होतो काय?"

"हो महाराज, मनो-विज्ञानाचा तोच गुणधर्म आहे."

"भंते, प्रथम कोण उत्पन्न होतो, चक्षू-विज्ञान की मनो-विज्ञान?"

"महाराज, प्रथम चक्षू-विज्ञान, नंतर मनो-विज्ञान उत्पन्न होतो."

"भंते, म्हणजे चक्षू-विज्ञान मनो-विज्ञानास हुकूम सोडते की, जेथे जेथे मी असेन, तेथे तू उभा रहा किंवा मनो-विज्ञान चक्षू-विज्ञानास म्हणतो की, जेथे-जेथे तू राहशील तेथे-तेथे मी सुद्धा राहीन, असा याचा अर्थ समजावा की काय?"

"नाही महाराज, त्याच्यात असे आपसातील कोणतेही देण्याघेण्याचे व्यवहार नाहीत."

"भंते, मग कोणत्या गोष्टीवरून जेथे-जेथे चक्षू-विज्ञान प्रादुर्भूत होतो तेथे-तेथे मनो-विज्ञानाचा सुद्धा प्रादुर्भाव होतो?"

"महाराज, असे घडण्याचे चार कारणे आहेत - (१) त्या परस्परात उतार आहे, (२) त्याच्यात एकच सामायिक दरवाजा आहे, (३) त्याच्यामध्ये एक संबंध आहे आणि (४) त्यांची संगत आहे."

"भंते परस्परात उतार असल्यामुळे जेथे जेथे चक्षू-विज्ञान उद्‌भवते होते तेथे-तेथे मनो-विज्ञान देखील उद्‌भवते. हे कसे? कृपाकरून उदाहरण देऊन सांगावे."

"महाराज, पाऊस पडला असता ते पाणी कोठे जाईल?"

"भंते जिकडे जमिनीचा उतार असेल, तिकडेच ते पाणी वाहून जाईल."

"आणि पुन्हा दुसऱ्या दिवशी पाऊस पडला तर ते पाणी कोठे जाईल?"

"भंते, त्याच बाजूने."

"महाराज, म्हणजे प्रथम वाहून गेलेले पाणी दुसऱ्या पाण्यास असा हुकूम सोडतो काय की, जिकडे मी वाहून जाईन तिकडे तू सुद्धा वाहत ये की, दुसऱ्या पाण्याने पहिल्या पाण्यास हुकूम केला की, जिकडे तू वाहू लागशील तिकडेच मी सुद्धा वाहत येईन."

"नाही भंते, त्याच्या आपसातील अशा कोणत्याही गोष्टींनी होत नाहीत. जमीन उतार असल्यामुळे केवळ दोन्ही प्रकारचे पाणी असे वाहू लागते."

"महाराज, आता आपण सांगितल्याप्रमाणेच त्या परस्परात उताराचा संबंध असल्यामुळे जेथे-जेथे चक्षू-विज्ञान उद्‌भवते, तेथे-तेथे मनो-विज्ञान सुद्धा आविष्कृत होते."

"भंते, त्याच्या सामायिक दरवाजा असल्यामुळे जेथे-जेथे चक्षू-विज्ञान उद्‌भवते. तेथे-तेथे मनो-विज्ञान सुद्धा उद्‌भवते हे कसे? कृपाकरून उदाहरण देऊन समजावून सांगा."

"महाराज, एखाद्या राज्याच्या सरहद्दीवर असलेल्या शहराचे संरक्षण करण्याचे दृष्टीने त्या शहराभोवती एक मोठा किल्ला बांधलेला असून त्यास मजबूत असा एकच दरवाजा आहे. आता कोणत्या मनुष्याला शहराबाहेर पडावयाचे असल्यास कोठून जाईल?"

"भंते, त्याच दरवाजातून बाहेर जाईल."

"यानंतर दुसरा मनुष्य बाहेर जाऊ इच्छित असेल तर तो कोठून जाईल?"

"भंते, त्याच दरवाजातून."

''महाराज, येथे पहिला माणूस दुसऱ्यास हुकूम करतो काय की, ज्या दरवाजाने मी बाहेर निघेन त्याच दरवाजाने तू पण बाहेर निघावे किंवा दुसऱ्याने आज्ञा दिले असते काय की, ज्या दरवाजाने तू बाहेर पडशील, त्याच दरवाजाने मी पण बाहेर निघेन.''

''नाही भंते, त्याच्यात अशा कोणत्याही गोष्टी होत नसतात. परंतु शहराबाहेर जाण्यासाठी किंवा शहरात येण्यासाठी केवळ एकच दरवाजा असल्यामुळे दोघेही एकाच मार्गाने बाहेर पडतात.''

''महाराज, चक्षू-विज्ञान व मनो-विज्ञान दोघांनाही एकच दरवाजा असल्यामुळे जेथे-जेथे चक्षू-विज्ञान आविष्कृत होते तेथे-तेथे मनो-विज्ञानाचा सुद्धा आविष्कार होतो.''

''भंते, सवय असल्यामुळे जेथे जेथे चक्षू-विज्ञान आविष्कृत होते तेथे तेथे मनो-विज्ञान देखील आविष्कृत होते. हे कसे? कृपाकरून उदाहरण देऊन सांगावे.''

''महाराज, कोण्या एका गावाला जाण्याकरीता एकच बैलगाडीचा मार्ग आहे. आणि त्या मार्गाने एक बैलगाडी गेली असल्यास दुसरी बैलगाडी कोणत्या मार्गाने जाईल?''

''भंते, ज्यामार्गाने पहिली बैलगाडी गेली असेल त्याच मार्गाने जाईल.''

''महाराज, तर काय पहिल्या गाडीवाल्याने दुसऱ्या गाडीवाल्यास आज्ञा दिली होती की, या मार्गाने माझी बैलगाडी जाईल, त्याच मार्गाने तुझी बैलगाडी तू घेऊन ये किंवा दुसऱ्या गाडीवाल्याने पहिल्या गाडीवाल्यास आज्ञा दिली की ज्या मार्गाने तुझी बैलगाडी जाईल त्याच मार्गाने मी सुद्धा माझी बैलगाडी आणेन?''

''नाही भंते, त्याच्यात अशा कोणत्याही गोष्टी झालेल्या नसतात. बैलांना जशी त्याच मार्गाने जाण्याची सवय असल्यामुळे ते एक दुसऱ्याचे अनुकरण करतात.''

''महाराज, या उदाहरणाप्रमाणेच केवळ सवयीमुळे जेथे-जेथे चक्षू-विज्ञान उद्भवते तेथे तेथे मनो-विज्ञानही उद्भवते.''

''भंते, संगतीमुळे कसे काय जेथे जेथे चक्षू-विज्ञान उद्भवते तेथे तेथे मनोविज्ञानही उद्भवते.''

''याप्रमाणे दुसऱ्या इंद्रियांच्या विज्ञानासह मनो-विज्ञान उत्पन्न होते हे सांगणे न लागे.''

"भंते, आपण उत्तमरीतीने पटवून दिले आहे."

## २५. मनोविज्ञानामुळेच वेदना होतात.

राजा म्हणाला, "भंते, जेथे मनोविज्ञान उद्‌भवते तेथे वेदना सुद्धा उद्‌भवते काय?"

"होय महाराज, जेथे मनोविज्ञान उद्‌भवते तेथे स्पर्श, वेदना, संज्ञा, चेतना, वितर्क, विचार देखील असतात. म्हणजे स्पर्शामुळे होणारे सर्वच धर्म असतात."

### (क) स्पर्शांचे लक्षण

"भंते स्पर्शाचे लक्षण कोणते?"

महाराज, 'शिवणे' हे स्पर्शाचे लक्षण आहे.

१) "भंते, उदाहरण देऊन समजावून सांगावे."

"महाराज दोन मेंढे टक्कर घेतात. त्यापैकी एका मेंढ्यास 'चक्षू' व दुसऱ्या मेंढ्यास 'रूप' असे समजू या आणि त्यांच्यात झालेल्या टकरीस स्पर्श समजावे."

२) "भंते पुन्हा उदाहरण देऊन समजावून सांगावे."

"महाराज, कोणी मनुष्य टाळी वाजवितो. तेव्हा त्याच्या एका हातास चक्षू तर दुसऱ्या हातास रूप समजावे. दोन्ही हाताच्या मिलापास स्पर्श समजावा."

३) "भंते कृपा करून पुन्हा उदाहरण द्यावे."

"महाराज, कोणी एक मनुष्य झांज वाजवित आहे. त्यापैकी एका झांजेला चक्षु तर दुसऱ्या झांजेला रूप समजावे आणि या दोन्ही झांजांतील परस्परांच्या टकरावास स्पर्श समजावा."

"भंते, तुमचे कथन अगदी योग्य आहे."

### (ख) वेदनेचे लक्षण

"भंते, नागसेन, वेदनेचे लक्षण काय बरे?"

"महाराज, 'अनुभव करणे' हेच वेदनेचे लक्षण आहे."

"भंते, कृपाकरून उदाहरण देऊन समजावून सांगा."

"महाराज, एखाद्याने राजाची सेवा केली असता खूप होऊन राजाने त्याला एखादे मोठे पद दिले. हे पद मिळाल्यामुळे तो आता ऐशआरामात आपले जीवन घालवित

आहे. तेव्हा त्या मनुष्याच्या मनात आले की, प्रथम मी राजाची सेवा केल्यामुळेच राजाने मला एवढे इनाम दिले आणि मी एवढे ऐशआरामाचे जीवन भोगत आहे.''

''त्याचप्रमाणे एखाद्या मनुष्याने आपल्या पुण्य कर्माच्या प्रतापाने मृत्यूनंतर स्वर्ग गतीचा लाभ करून घेतला आहे. तो तेथे पाचही कामगुणांचा उत्तम रितीने उपभोग करीत आहे. तेव्हा त्याच्या मनात असा विचार आला की, मी पूर्वी पुण्य कार्य केले म्हणूनच या दिव्य अशा पाचही काम गुणांचा उपभोग घेत आहे असा तो अनुभव करतो.''

''महाराज, या प्रमाणे 'अनुभव करणे' हे वेदनेचे लक्षण आहे.''

''भंते आपण उत्तम प्रकारे समजावून सांगितले.''

### (ग) संज्ञेचे लक्षण

''भंते, संज्ञेचे लक्षण कोणते, ते सांगाल काय?''

महाराज, 'ओळखणे' हे संज्ञेचे लक्षण आहे, जसे, ''हे निळे, हे पिवळे, हे लाल, हे शुभ्र आणि हे केसरी रंगाचे आहे. असे 'ओळखणे' संज्ञेचे लक्षण आहे.''

''भंते, उदाहरण देऊन समजावून सांगा.''

''महाराज, एखाद्या राजाचा खजीनदार कोठारात जाऊन निळ्या, पिवळ्या, लाल, शुभ्र व केशरी अशा ज्या रंगाच्या राजोपयोगी ज्या-ज्या वस्तू त्याच्या नजरेस पडतील त्या ओळखतो व यावर राजमान्य चिन्ह आहे. अशी त्याला जाणीव होते. म्हणून त्यास राजरंगाची संज्ञा मिळत असते. याप्रमाणे 'ओळखणे' हे संज्ञेचे लक्षण आहे महाराज!''

''भंते, आपण अगदी बरोबर सांगितले.''

### (घ) चेतनेचे लक्षण

''भंते नागसेन, चेतनेचे काय लक्षण आहे?''

''महाराज, समजणे व तयारी करणे ही चेतनेची लक्षणे होत.''

''भंते एखादे उदाहरण देऊन सांगावे.''

''महाराज, एखाद्याने विष तयार करून स्वतःप्याला व दुसऱ्यास देखील पाजतो. त्यामुळे स्वतःही दुःख भोगतो व दुसऱ्यासही दुःख भोगावयास भाग पाडतो. याप्रमाणे स्वतः असले वाईट कृत्य करतो व दुसऱ्यांना देखील वाईट कृत्य करण्यासाठी चेतना देतो. त्यामुळे स्वतः मृत्यूनंतर नरकात दुर्गतीला जातो व दुसरा देखील त्याच्या

शिकवणूकीमुळे दुष्कृत्य केल्यामुळे मृत्युनंतर नरकात दुर्गतीला जातो.''

''कोणी मनुष्य, महाराज, तूप, लोणी, तेल, मध व साखरयुक्त पेय पदार्थ तयार करून स्वतः पितो व दुसऱ्यास देखील पिण्यासाठी चेतना देतो. त्यामुळे स्वतः सुखी होतो पण दुसऱ्यासही सुखी बनवितो. महाराज, याप्रमाणे पुण्य कृत्य करून स्वतः मृत्यूनंतर सुगती प्राप्त करतो व दुसऱ्यास देखील त्याच्यापासून चेतना होऊन पुण्य कृत्य करून सुगती पद गाठतो.''

''याप्रमाणे हे महाराज, पाप कृत्यामुळे दुर्गती व पुण्य कृत्यामुळे सुगती लाभते, असे 'समजणे' त्यासाठी 'तयारी करणे' हिच चेतनेची लक्षणे होत.''

''भंते, आपण उत्तमरितीने समजावून सांगितले.''

### (ङ) विज्ञानाची ओळख

''भंते, विज्ञानाचे लक्षण कोणते ते सांगाल काय?''

''महाराज, 'जाणून घेणे' विज्ञानाचे लक्षण आहे.''

''भंते, कृपाकरून समजावून सांगावे.''

''महाराज, कोणी शहराचा रक्षण अशा चौकात बसतो की, चारही दिशांनी येणाऱ्या जाणाऱ्या लोकांवर तो नजर ठेवू शकेल, जी गोष्ट चहूबाजूंनी देखरेख करण्याची तीच गोष्ट महाराज, डोळ्यांनी पाहण्याची, विज्ञानाने जाणून घेण्याची, कानाने ऐकण्याची व ते विज्ञानाने जाणून घेण्याची, जिभेने आस्वाद घेण्याची, नाकाने सुगंध घेण्याची व ते विज्ञानाने जाणून घेण्याची, जिभेने आस्वाद घेण्याची व ते विज्ञानाने जाणून घेण्याची, शरीराने स्पर्श करण्याची व ते सुद्धा विज्ञानाने जाणून घेण्याची, जे धर्म मनाने अनुभव करतो ते देखील विज्ञानाने जाणून घेण्याची आहे. याप्रमाणे हे महाराज, 'जाणून घेणे' हे विज्ञानाचे लक्षण आहे.''

### (च) वितर्काचे लक्षण

''भंते, नागसेन, वितर्काचे लक्षण कोणते?''

''महाराज, हेतुसिद्धि हे वितर्काचे लक्षण आहे.''

''भंते, कृपा करून उदाहरणाने सांगावे.''

''महाराज, एखाद्या सुताराने लाकडावर चांगले नक्षी काम केले, त्यावर जोडपट्टी देण्यासाठी वितर्क करतो. कारण कौशल्यपूर्वक जोडपट्टी देण्याचा त्याचा निर्धार असतो

म्हणून 'हेतुसिद्धी' हे वितर्काचे लक्षण आहे.''

''भंते, आपण संयुक्तिक असेच कथन केले आहे.''

### (छ) विचाराचे लक्षण

''भंते नागसेन, विचाराचे लक्षण कोणते?''

''महाराज, 'अनुमार्जन' हे विचाराचे लक्षण होय.''

''भंते, कृपाकरून उदाहरण देऊन स्पष्ट करावे.''

महाराज, काशाच्या भांड्यास ठोका दिला असता आवाज बाहेर निघतो. येथे जसे ठोका देणे आहे, तसा 'वितर्क' आणि 'आवाज निघणे' आहे. तसा विचार समजावा.

**(प्रकरण तिसरे समाप्त)**

# (प्रकरण चवथे)

# लक्षण-प्रश्न (पुढे चालू)

## २६. एकदा एकत्र आलेले स्पर्शादिक धर्म वेगळे होत नाहीत

राजा म्हणाला, ''भंते, स्पर्शादिक धर्म एकत्र मिळून गेल्यानंतर त्यांना वेगवेगळे करून दाखविता येईल काय? जसे, हा स्पर्श, ही वेदना, ही संज्ञा, ही चेतना, हे विज्ञान, हा वितर्क आणि हा विचार असे सांगता येईल काय?''

''नाही महाराज, असे करणे शक्य नाही.''

''भंते, कृपा करून उपमेद्वारा समजावून सांगा.''

''महाराज, एखाद्या राजाच्या आचाऱ्यास शरबत किंवा पातळ सार तयार करावयाचा असल्यास त्याने दही, मीठ, आले, जिरे, मिरची इत्यादी एकत्र मिळवून सार तयार केला, तेव्हा राजा त्यास म्हणाला की, आरे ! मला दहीचा स्वाद वेगळा, मिठाचा वेगळा, आल्याचा वेगळा, जिऱ्याचा वेगळा व मिरची इत्यादी प्रत्येक पदार्थाचा वेगवेगळा स्वाद करून दे, महाराज तेव्हा तुम्हीच सांगा की, असे करणे शक्य आहे काय?''

''मुळीच नाही भंते! तथापि प्रत्येक वस्तूंचा स्वाद आपापल्या गुणधर्मानुसार तेथे अवश्य राहील.''

''महाराज, याप्रमाणेच ते सर्व पदार्थ एकत्र मिळून गेल्यानंतर ते वेगवेगळे करून दाखविले जाऊ शकत नाही.''

''छान, भंते! फारच छान.''

''खारेपणा आणि भारीपन.''

''स्थवीर म्हणाले, ''डोळ्यांनी पाहून मीठ ओळखणे शक्य आहे काय महाराज?''

''होय भंते, ओळखणे शक्य आहे.''

''महाराज, जरा विचार करून उत्तर द्यावे.''

''भंते, तर काय मीठ जिभेने ओळखले जाते?''

“होय महाराज! जिभेनेच ओळखले जाते.”

“भंते, सर्व तऱ्हेचे मीठ जिभेनेच ओळखले जातात.”

“भंते, जर असे आहे तर ते बैलगाडीत भरून कां बरे आणले जाते? केवळ मीठच आणावयास पाहिजे. पण त्याबरोबर गाडीभर मिठाची चव न घेता कां बरे ती चव आणावी?”

“महाराज, केवळ मीठ आणणे शक्य नाही. कारण खारेपणा व वजन दोन्ही एकत्र मिळालेला असतो आणि ते अशारीतीने की, त्यास वेगवेगळे करता येणे शक्य नाही. महाराज, आता तुम्हीच सांगा की, मिठाचे मोजमाप तराजूमध्ये करणे शक्य आहे काय?”

“होय महाराज, तसे करणे शक्य आहे.”

“नाही महाराज, मिठाचे मोजमाप तराजूमध्ये करीत नाहीत तर त्याचे भारीपण तराजूने मोजून काढल्या जाते.”

“होय भंते, आपण बरोबर सांगितले.”

**(नागसेन आणि मिलिन्द राजाचे महाप्रश्न समाप्त)**

# खण्ड ३ (प्रकरण पहिले)

# (ख) विमतिच्छेदन प्रश्न

## १. पाच आयतने निरनिराळ्या कर्मांच्या फळाने अस्तित्वात आले आहेत, एकाच्या नाही

राजा म्हणाला, ‘‘भंते, डोळे, कान, नाक, जीभ व त्वचा ही पाच आयतने निरनिराळ्या कर्म फळामुळे उत्पन्न झालीत की, एकाच कर्मफळामुळे उत्पन्न झालीत?’’

‘‘महाराज, अनेक कर्मफळामुळे झालीत, एका कर्मफळामुळेच नव्हे.’’

‘‘भंते, कृपाकरून उदाहरण देऊन सांगावे.’’

‘‘महाराज, समजा एखाद्या शेतामध्ये पाच प्रकारचे बीज पेरले, तर त्या विविध बीजांची फळे देखील विविध प्रकारची नाही का होणार?’’

‘‘महाराज, याप्रमाणेच या पाच आयतनांची उत्पत्ती म्हणजे वेगवेगळ्या कर्मांची फळे आहेत, एकाचीच नाहीत.’’

‘‘भंते, आपण बरोबर सांगितले.’’

## २. कर्माची प्रधानता

राजा म्हणाला, ‘‘भंते, सर्व मनुष्य सारखेच कां होत नाहीत? कोणी अल्पायुषी तर कोणी दीर्घायुषी; कोणी आजारी आहेत तर कोणी एकदम आरोग्यसंपन्न; कोणी कुरूप तर कोणी फारच सुंदर; कोणी एकदम प्रभावहीन तर कोणी अत्यंत प्रभावशाली; कोणी दरिद्री तर कोणी खूप श्रीमंत; कोणी हलक्या जातीत जन्मले तर कोणी उच्च कुळात जन्मलेले; कोणी मूर्ख तर कोणी अतिशय हुशार, असे कां व्हावे?’’

स्थवीर म्हणाले, ‘‘सर्वच वनस्पती एकसारख्या नाहीत, असे कां? काही आंबट, काही खारट, काही कडू, काही तुरट आणि काही तर अत्यंत गोड असतात, असे कां बर व्हावे?’’

‘‘भंते, बीजात भिन्नत्व असल्यामुळेच या वनस्पतींच्या चवीत भिन्नत्व दिसून येत असले पाहिजे, असा माझा अंदाज आहे.’’

‘‘महाराज, बरोबर तुम्ही सांगितल्याप्रमाणे मनुष्यमात्राचे आपापले कर्म वेगवेगळे

असल्याकारणानेच ते सर्व एकसारखे नाहीत. कोणी अल्पायुषी तर कोणी दीर्घायुषी.... जीव सर्वच आपल्या कर्माचीच फळे भोगत असतात. सर्व जीव आपल्या कर्मफळाचे स्वतः मालक आहेत. आपल्या कर्मफळानुसारच भिन्न-भिन्न योनीत जन्मास येतात. कर्म हेच खरे नातेवाईक व कर्म हेच आश्रयस्थान आहेत. कर्मामुळेच मनुष्य मात्राची अशी विभागणी झाली आहे."

"भंते, आपण बरोबर सांगितले."

## ३. मनुष्याने सदैव प्रयत्नशील असावे

राजा म्हणाला, "भंते, आपण म्हणाले होते की, सद्यस्थितीत दुःखाचा नाश करण्यासाठी आणि भविष्यात येणाऱ्या दुःखास पायबंद घालण्यासाठी म्हणून अगदी प्रव्रजित होतो."

"होय महाराज, असे सांगितले आहे."

"भंते, परंतु आपण प्रव्रजित होऊन भिक्षू बनता ते पूर्वजन्मीच्या कर्मफळामुळे की, याजन्मी त्यासाठी प्रयत्न करण्यासाठी?"

"स्थवीर म्हणाले, "महाराज, जे काही पूर्वजन्मीचे कर्मफळ लाभावयाचे ते तर आपोआपचं लाभणार, परंतु जे काही दुःख निवारण्याच्या दृष्टीने करणे शिल्लक आहे, त्यासाठी येथून पुढचे प्रयत्न करावे लागणार आहेत."

(१) "कृपाकरून उपमा देऊन स्पष्ट करावे."

महाराज, तहान लागल्यानंतर आपण एखादी विहीर किंवा तळे खोदावयास सुरू करता की काय जेणेकरून पाणी प्यावयास मिळावे?"

"नाही भंते!"

"महाराज, याप्रमाणेच पूर्वजन्मीचे कर्मफळ तर आपोआपच लाभणार परंतु जे काही दुःख निवारणाच्या दृष्टीने करणे शिल्लक आहे, त्यासाठी येथून पुढेच करावे लागणार आहेत."

(२) "कृपाकरून दुसरे उदाहरण देऊन सांगावे."

महाराज भूक लागल्यानंतर आपण शेतीची मशागत, धानाची पेरणी, कापणी करावयास सुरवात करता की काय जेणेकरून भात खाण्याकरीता मिळावा?

"नाही भंते!"

महाराज, याप्रमाणेच पूर्वजन्मीची फळे तर आपोआपच मिळतात, परंतु दुःख निवारणाच्या दृष्टीने करणे शिल्लक आहे त्यासाठी या जन्मात प्रयत्न करावयाचे असतात.

(३) ''कृपाकरून पुन्हा उदाहरण देऊन समजावून सांगावे.''

''महाराज, आपल्या विरूद्ध युध्द सुरू झाल्यानंतर आपण खंदक खोदणे, तटबंदी उभारणे, दीपस्तंभ उभारणे, बुरूज बांधणे, सैन्यासाठी धान्याची जमवाजमव करणे, हत्ती-घोड्यांना शिकवण देणे, रथ, धनुष्य, तलवारी तयार करणे इत्यादी कामे करण्यास आपण सुरवात करता की काय?''

''नाही भंते!''

''महाराज, याप्रमाणेच पूर्व जन्मीची फळें तर आपोआपच मिळतात परंतु जे काही शिल्लक आहे त्याच्या पूर्तीसाठी खरे प्रयत्न याच जन्मा करावयाचे असतात.''

भगवान बुद्धाने देखील म्हटले आहे की, 'प्रसन्न राहून बुद्धिमान माणसाने असेच कार्य करावे की जेणे करून त्यामुळे आपले हित होईल. जो मूर्ख गाडीवान विस्तीर्ण व सरळ मार्ग सोडून आडमार्गाने, खाच खडग्याच्या मार्गाने आपली गाडी हाकून त्यामुळे गाडीचा कणा मोडून तो संकटात सापडतो. तद्वत हे मूर्ख व दुबळ्या मनाचे लोक सद्धर्माकडे दुर्लक्ष करतात आणि अधर्माच्या नादी लागनू मृत्यूच्या जबड्यात जाऊन पडल्यावर आपला नाश पाहून पराभव पत्करून अंतःकरणात दुःखी होतात. ह्याची जाणी ठेऊन शहाण्या माणसाने दृढतापूर्वक कार्यसिद्धिकरीता सतत प्रयत्नशील रहावे.'

## ४. स्वाभाविक अग्नी आणि नरकीय अग्नी

राजा म्हणाला, ''भंते, तुम्ही लोक सांगत असता की, स्वाभाविक अग्निपेक्षा नरकीय (नरकाचा) अग्नी अधिक प्रखर आहे, स्वाभाविक अग्निमध्ये एखादा लहान दगड टाकला असता तो दिवसभर फुंकल्या जाऊन देखील नष्ट होणार नाही. परंतु नरकीय अग्नित पडून मोठमोठे दगड ही त्याचक्षणी भष्म होऊन जातात. यावर माझा मुळीच विश्वास बसत नाही. शिवाय तुम्ही लोक असेही म्हणता की, ज्यांच्या तेथे पुनर्जन्म होतो ते त्या नरकीय अग्नित हजारो वर्षेपर्यंत पकत राहून देखील नाश पावत नाहीत. याही विधानावर माझा मुळीच विश्वास बसत नाही.''

(१) स्थवीर म्हणाले, ''महाराज, सुसर, कासव, कुंभीर, मोर व कबुतर यांच्या माद्या लहान-लहान खडे खात नाही काय?''

''होय भंते, खातात.''

"ते खडे त्यांच्या पोटात जाऊन पचत नाहीत काय?"

"होय भंते, पचून त्याचे पाणी पाणी होते."

"मग त्याच्या गर्भातील पिलेसुद्धा पचतात काय? कारण ते देखील त्याच्या पोटातच असतात."

"नाही भंते, पिले पचू शकत नाही."

"ते कां?"

"भंते, मला असे वाटते की, आपल्या कर्माच्या परिणामामुळे त्या गर्भस्त पिलांचा नाश न होता ते नाशापासून आपली सोयिस्कर सुटका करून घेतात."

"महाराज, याप्रमाणेच त्यांचे कर्मफळ तसे असल्याकारणाने नरकीय अग्नीत उत्पन्न होणारे जीव तेथे हजारो वर्षापर्यंत पकत राहतात. परन्तु नाश पावत नाहीत. तेथेच त्यांचा पुनर्जन्म होतो, तेथेच त्यांची वाढ होते व ते मृत्यूही पावतात."

"भगवान बुद्धांनी सुद्धा म्हटले आहे की, जोपर्यंत त्याचे पापकर्म संपत नाही तोपर्यंत त्यातून सुटका होत नाही."

(२) "कृपाकरून पुनः उदाहरण देऊन स्पष्ट करा."

"महाराज, सिंह, वाघ, चित्ता आणि कुत्रा यांच्यामाद्या अत्यंत कठीण हाडे व कठीण असे मास खातात की नाही?"

"होय भंते, खातात."

"मग अशी कठीण हाडे त्यांच्या पोटात व जठरात गेल्यावर पचून नष्ट होतात की नाही?"

"होय भंते, पचून नष्ट होतात."

"मग त्यांच्या पोटांतील गर्भस्थ पिल्ली सुद्धा नष्ट होतात काय?"

"नाही भंते!"

"ते कां?"

"भंते, मला असे वाटते की, आपल्या कर्माच्या परिणामामुळे त्या गर्भस्थ पिलांचा नाश न होता ते त्या नाशापासून आपली सोयिस्कर सुटका करून घेतात."

"महाराज, बरोबर याप्रमाणेच त्याचे कर्मफळ तसे असल्या कारणाने नरकीय

अग्नीत जन्मास येणारे जीव तेथे हजारो वर्षे पर्यंत पकत राहतात परंतु नाश पावत नाहीत, तेथेच त्यांचा पुनर्जन्म होतो, तेथेच त्याची वाढ होते व ते मृत्यूही पावतात.''

(३) ''भंते, कृपाकरून पुनः उदाहरण देऊन सांगा.''

''महाराज, सुकुमार क्षत्रिय स्त्रिया, सुकुमार ब्राह्मण स्त्रिया आणि सुकुमार अमीर-उमराव स्त्रिया करडे पदार्थ किंवा करडे मास खातात की नाही?''

''होय भंते, खातात.''

''महाराज, मग असे कठीण पदार्थ त्यांच्या उदरात जाऊन पचतात की नाही?''

''होय भंते, पचतात.''

''मग त्यांच्या उदरातील गर्भस्थ मुले सुद्धा पचतात काय?''

''नाही भंते, हे शक्य नाही.''

''ते कां म्हणून?''

''भंते, मला वाटते की, आपल्या कर्माच्या परिणामामुळे त्या बालकांचा पचून नाश न होता त्या नाशापासून त्यांचे अस्तित्व कायम राहते.''

''महाराज, बरोबर. या उदाहरणाप्रमाणेच नरकीय प्राण्यांचे कर्मफळ तसे असल्याकारणानेच नरकीय अग्नीत जन्मास येणारे जीव हजारो वर्षे पर्यंत तेथे पकत राहतात परंतु त्याचा नाश होत नाही आणि तेथेच त्याचा पुनः पुनः पुनर्जन्म होतो, तेथेच त्यांची वाढ होते व तेथेच त्यांना मृत्यू येते. जोपर्यंत त्याचे तसे कर्मफळ नाश होत नाही तोपर्यंत त्यांचे हे जीवन चक्र सतत चालू राहते.''

''भंते, आपण उत्तम रीतीने समजावून सांगितले.''

## ५. जगाचा आधार कोणता?

राजा म्हणाला, ''भंते, तुम्ही लोक म्हणता की, पृथ्वी पाण्यावर थांबली आहे, पाणी हवेवर थांबले आहे आणि हवा अंतराळावर थांबली आहे. या विधानावर सुद्धा माझा विश्वास बसत नाही.''

स्थवीराने धम्मकरणात (भिक्षा पात्रात) पाणी घेऊन मिलिंद राजास समजावून सांगितले – ''महाराज, जसे या पाण्यास हवेचा आधार आहे तसेच त्या पाण्याला सुद्धा हवेचा आधार आहे.''

''भंते, फारच छान.''

## ६. निरोध आणि निर्वाण

राजा म्हणाला, "भंते, निरोध होणे (विराम) म्हणजे निर्वाण आहे काय?"

"होय महाराज, निरोध *(Comation)* म्हणजेच निर्वाण होय."

"भंते, निरोध होणे म्हणजे निर्वाण, हे कसे काय?"

"महाराज, सर्वच मूर्ख माणसे सांसारिक इंद्रिये व विषय सुखाच्या उपभोगात मग्न राहतात. त्यातच आनंद मानतात, त्यातच गर्क राहतात, त्यास एकदम चिकटून राहतात. मानवाची लालसा म्हणजे एखाद्या महापुरासारखी दुथडी भरून येते आणि अशा महापुरात व्यक्ती वाहून जातात. त्यामुळे वारंवार जन्म, वृद्धत्व, मृत्यू, शोक, वेदना, खेद, निराशा यांमधून त्याची सुटका होत नाही. थोडक्यात दुःखातून त्याची मुक्तता होत नाही."

परंतु महाराज, शहाणे लोक भगवंताचे अनुयायी अशा इंद्रिये व विषय सुखाच्या मोहजाळात फसत नाहीत. त्यात ते आनंद मानीत नाही की, त्यात गर्क होऊन चिकटून राहत नाहीत. त्यामुळे त्यांची लालसा (तृष्णा) निरोध पावते. लोभ निरोध पावल्या-मुळे जीव-इच्छा निरोध पावते. जीवेच्छा निरोध पावल्याने पुनर्जन्म थांबतो. पुनर्जन्मच नसल्यामुळे, जन्म, वृद्धत्व, मरण, शोक, वेदना व निराशा इत्यादी सर्व दुःख समूह जागच्या जागी थांबतो. असा दुःखाचा अंत घडतो यालाच म्हणतात निर्वाण. याप्रमाणे महाराज, निरोध होणे म्हणजे निर्वाण होय.

## ७. निर्वाण लाभ कोण करतो?

राजा म्हणाला, "भंते, निर्वाणपदाचा लाभ सर्वच व्यक्तींना होतो काय?"

"नाही महाराज, निर्वाणपदाचा लाभ सर्वच व्यक्तींना होत नाही. जे कोणी सदाचारी पुण्यकर्म करतील, विश्वासनीय व मान्य करण्यास योग्य अशा गोष्टींची जाणीव करतील, त्याज्य गोष्टींचा त्याग करतील, आचरण करण्यालायक गोष्टी आचरणात आणतील, साक्षात्कार करण्याजोग्या गोष्टीचा साक्षात्कार करून घेतील, तेच निर्वाणपदाचा लाभ करून घेऊ शकतील."

"भंते, फार छान."

## ८. निर्वाण सुख निर्वाण न मिळवताही कळते

राजा म्हणाला, "भंते ज्याला निर्वाणपद लाभले नाही, त्यास निर्वाणपद किती

सुखदायक आहे, याची जाणीव असते काय?''

''होय महाराज, ज्याला निर्वाणपद लाभले नाही, त्या व्यक्तींस देखील निर्वाण सुखाची जाणीव असते.''

''भंते, स्वतः निर्वाणपदाचा लाभ न करता त्या सुखाची कशी काय त्यास जाणीव होते?''

''महाराज, ज्याचे हात-पाय तोडले नाहीत अशा व्यक्तीस हात-पाय तोडल्या मुळे होणारे दुःख माहित नसते काय?''

''होय भंते, माहित असते.''

''ते कसे काय?''

''भंते, ज्याचे हात-पाय तोडलेले असतात त्याचे रडणे व तळपणे पाहून यात दुःख आहे याची जाणीव त्यास होते.''

''महाराज, याप्रमाणेच निर्वाण प्राप्त केलेल्या लोकांच्या शब्दातून ओसंडणारा संतोष व प्रीतीयुक्त आनंद पाहून ज्यांना निर्वाण लाभ झाला नाही त्यांना सुद्धा निर्वाण सुखाची जाणीव होते.''

''भंते, उत्तमरीतीने समजावून सांगितले.''

**(प्रकरण पहिले समाप्त)**

## (प्रकरण दुसरे)

# विमतिच्छेदन-प्रश्न (पुढे चालू)

### ९. भगवान बुद्धाच्या अस्तित्वासंबंधी शंका

राजा म्हणाला, ''भंते नागसेन, आपण भगवान बुद्धांना पाहिले काय?''

''नाही महाराज!''

''निदान तुमच्या आचार्यांनी तरी भगवान बुद्धांना पाहिले आहे काय?''

''नाही महाराज!''

''भंते, असे आहे, तर भगवान बुद्ध झालेच नाही, असे म्हणावे लागेल?''

''महाराज, हिमालय पर्वतावरील 'ऊ हा' नावाची नदी तुम्ही पाहिली आहे काय?''

''नाही भंते!''

''तर मग, अशी नदीच नाही असे म्हणावे लागेल?''

''अशी नदी आहेच, मी किंवा माझ्या वडिलांनी जरी ती नदी पाहिली नसली, तरी ती नदी आहे, हे खरे.''

''महाराज, याप्रमाणेच जरी मी किंवा माझ्या आचार्यांनी भगवान बुद्धांना पाहिले नाही, तरी पण ते निश्चित झालेले आहेत.''

''भंते, फार छान समजावून सांगितले.''

### १०. भगवान बुद्ध सर्वज्ञ आहेत.

राजा म्हणाला, ''भंते, भगवान बुद्ध सर्वज्ञ (सर्व काही जाणणारे परमश्रेष्ठ) आहेत काय?''

''होय महाराज, भगवान बुद्ध सर्वज्ञ आहेत. त्यांची तुलना कोणाशीही करता येणार नाही.''

''भंते, ज्या भगवान बुद्धांना तुम्ही स्वतः कधी पाहिले नाही. ते सर्वज्ञ होते असे कसे म्हणता?''

"महाराज, ज्यांनी महासागर कधी पाहिला नाही त्यांना महासागर खोल, अथांग व गंभीर आहे आणि गंगा, यमूना, अचिरवती, सरयू (सरभू) आणि मही (गंडक) या पाचही मोठमोठ्या नद्या त्यास जाऊन मिळतात. तरी पण त्याचे पाणी कमी किंवा जास्त झालेले कधी दिसून येत नाही. हे त्यांना कळते काय?"

"होय भंते, याची त्यांना जाणीव आहे."

"महाराज, त्याप्रमाणेच निर्वाणपदाचा लाभ करून घेतलेले भगवान बुद्धाचे श्रावक (शिष्य) महान आहेत! हे श्रावक जर असे आहेत, तर त्यांचे गुर-भगवान बुद्ध किती महान असले पाहिजेत! असे आम्ही निश्चितच सांगत असतो."

"भंते नागसेन, आपण अगदी बरोबर सांगितले."

## ११. बुद्धाच्या सर्वज्ञत्वाची जाणीव

राजा म्हणाला, "भंते, काय हो, भगवान बुद्धाचे परमश्रेष्ठत्व दुसऱ्यांना कळू शकते काय?"

"होय महाराज, कळू शकते."

"भंते, ते कसे कळू शकते बरे."

"महाराज, फार वर्षापूर्वी तिस्स स्थवीर नावाचे एक प्रसिद्ध लेखक होऊन गेले. ते होऊन गेल्यास आता बरीच वर्षे लोटली. तेव्हा लोकांना त्यांच्या विषयी कसे काय समजले?"

"भंते त्यांनी लिहून ठेवलेल्या साहित्यावरून."

"महाराज, ज्यांना धर्माची जाणीव आहे त्यांना भगवान बुद्ध सर्वज्ञ होते, हे समजलेच पाहिजे, कारण (बुद्ध) धर्माची शिकवण भगवान बुद्धानेच दिली आहे."

"भंते, आपण अगदी अचूक सांगितले."

## १२. धर्माची जाणीव

राजा म्हणाला, "भंते, आपणांस धर्माची जाणीव झाली काय?"

"महाराज, भगवान बुद्धाच्या उपदेशानुसार बुद्ध श्रावकाने धर्म समजून घेण्याचा प्रयत्न करावयास पाहिजे. तरच ते त्यानुसार आचरण करू शकतील."

"भंते, आपले कथन संयुक्तिक आहे."

## १३. संक्रमण न होता पुनर्जन्म

राजा म्हणाला, ''भंते, व्यक्तीचे (आत्म्याचे) संक्रमण होत नाही, मग पुनर्जन्म कसा होतो?''

''महाराज, एका शरीरातून दुसऱ्या शरीरात जीव संक्रमण करीत नसला, तरी पुनर्जन्म होतो. हे खरे आहे.''

(१) ''भंते, हे कसे घडते? कृपाकरून उदाहरण देऊन स्पष्ट करावे.''

''महाराज, एका दिव्याने दुसरा दिवा पेटविला, तर तो दिवा दुसऱ्या दिव्यात प्रवेश करून संक्रमण घडवितो असे म्हणता येईल काय?''

''नाही भंते, असे कसे म्हणता येईल !''

''महाराज, याप्रमाणेच संक्रमण न घडता पुनर्जन्म होतो.''

(२) ''कृपाकरून अजून एखादे उदाहरण देऊन सांगावे.''

''महाराज, तुमच्या गुरूंनी शिकविलेली एखादी कविता तुम्हास आठवते काय?''

''होय भंते! आठवते.''

''महाराज, ती कविता आपल्या गुरूच्या मुखातून कायमची निघून तुमच्यात संक्रमण करून आली की काय?''

''नाही भंते!''

''महाराज, याप्रमाणेच संक्रमण न घडता पुनर्जन्म होतो.''

''भंते, आपण उत्तम प्रकारे समजावून सांगितले.''

## १४. परमार्थाने ज्ञात्याचे (आत्म्याचे) अस्तित्वच नाही

राजा म्हणाला, ''भंते, ज्ञाता (आत्मा) नावाची एखादी वस्तू आहे किंवा नाही?''

स्थवीर म्हणाले, ''महाराज, ज्ञात्याच्या (सर्व जाणून घेणाऱ्या आत्म्याच्या) रूपात अशी कोणतीही वस्तू अस्तित्वात नाही.''

''भंते, आपण बरोबर सांगितले.''

## १५. पुनर्जन्मासंबंधी

राजा म्हणाला, ''भंते, एका शरीरातून दुसऱ्या शरीरात प्रवेश करणारा असा कोणी

जीव (आत्मा) आहे काय?''

''नाही महाराज, असा कोणी जीव नाही.''

''भंते, एका शरीरातून दुसऱ्या शरीरात प्रवेश करणारा कोणी जीव नाही. तर मग तो आपल्या वाईट कर्मफळापासून मुक्त झाला, असेच म्हणावे लागेल.''

''महाराज, जर त्याचा पुनर्जन्म झाला नाही, तर तो आपल्या वाईट कर्मफळातून निश्चितच मुक्त होईल. परंतु पुनर्जन्म झाला तर मग तो मुळीच मुक्त होऊन शकणार नाही.''

''कृपाकरून उदाहरण देऊन स्पष्ट करावे.''

''महाराज, जे आंबे चोरले ते झाडाचे होत. त्यांनी पेरलेले आंबे नव्हते. पेरलेल्या आंब्याची त्यांनी चोरीच केली नाही तेव्हा शिक्षेस पात्र कसा?''

''भंते, परंतु त्यांनी पेरलेल्या आंब्यापासूनच हे आंबे उत्पन्न झालेत. म्हणून तो शिक्षेस पात्र ठरतो.''

''महाराज, याप्रमाणेच एक मनुष्य या नाम-रूपाकडून चांगले किंवा वाईट कर्मे केली जातात. त्या कर्माच्या प्रभावाने दुसरे नाम-रूप जन्मास येते. म्हणून तो आपल्या वाईट कर्मफळापासून मुक्त होत नाही.''

''भंते, आपण चांगल्या प्रकारे समजावून सांगितले.''

## १६. कर्म-फळा विषयी

राजा म्हणाला, ''भंते, एका नाम-रूपाने केलेल्या चांगल्या किंवा वाईट कर्मफळाचे काय होते? ते कोठे थांबतात?''

''महाराज, ती कर्मे फळरूपाने त्या नामरूपाचा पाठलाग करीत असतात. अगदी ज्यांचा त्यांचा पिच्छा न सोडणाऱ्या सावलीसमान.''

''भंते, ही कर्मे येथे थांबली आहेत. अशा तऱ्हेने दाखविता येतात काय?''

''महाराज, अशा प्रकारे ती दाखविता येत नाही.''

''कृपाकरून उदाहरण देऊन समजावून सांगावे.''

''महाराज, अद्याप ज्या झाडाला फळे आलेली नाहीत ती 'ही पहा येथे आहेत' असे म्हणून ती कोणास दाखविता येतील काय?''

''नाही भंते!''

''महाराज, प्राणिमात्राचे जीवन प्रवाहाप्रमाणे आहे तेव्हा जीवन प्रवाहाची धार तुटल्याशिवाय हे येथे आहेत, असे म्हणून कसे दाखविता येतील ?''

''भंते, आपण उत्तम प्रकारे समजावून सांगितले.''

## १७. पुनर्जन्माचे ज्ञान

राजा म्हणाला, ''भंते, आपण पुन्हा जन्मास येणार आहोत, अशी पूर्व जाणीव, जो पुनर्जन्मास येतो, त्यास असते काय?''

''होय महाराज, याची त्यास जाणीव असते.''

''कृपा करून उदाहरणाने समजावून सांगावे.''

''महाराज, एखाद्या शेतकऱ्याने शेतीची पेरणी केली असून पाणी पाऊस चांगला झाला व उभे असलेले पिक चांगले आले आहे. तेव्हा धान्य भरपूर पिकेल याची जाणीव त्यास असणार नाही काय?''

''होय भंते, याची जाणीव त्यास असलीच पाहिजे.''

''महाराज, याप्रमाणेच पुन्हा जन्म घेणाऱ्या व्यक्तीस आपण पुन्हा जन्मास येणार आहोत, अशी त्यास जाणीव असते.''

''भंते, आपण उत्तमरीतीने पटवून दिले.''

## १८. निर्वाणानंतर व्यक्तिमत्वाचा लोप

राजा म्हणाला, ''भंते, खरोखर बुद्ध होऊन गेले काय?''

''होय महाराज, निश्चितच होऊन गेले.''

''भंते, आता ते कोठे आहेत, ते तुम्ही दाखवू शकता काय?''

''महाराज, भगवान बुद्धांनी महापरिनिर्वाण प्राप्त झाले अशा स्थितीत भगवंत दुसऱ्या व्यक्तीच्या रूपात व्यक्त होण्यासारख्या अवस्थेत ते आता राहिलेले नाही. यामुळे त्यांना आता दाखविता येणे शक्य नाही.''

''भंते, एखादे उदाहरण देऊन सांगावे.''

''महाराज, जळून विझलेल्या अग्नीच्या ज्वाळा 'ह्या येथे आहेत' असे म्हणून दाखविता येईल काय?''

''नाही भंते, त्या ज्वाळा आता पूर्णपणे विझून गेलेल्या आहेत.''

"महाराज, याप्रमाणेच भगवान बुद्ध महापरिनिर्वाणास गेले आहेत. आता दुसऱ्या व्यक्तीच्या रूपात व्यक्त होण्यासारखे त्यांचे अस्तित्व शिल्लक राहिलेले नाही, त्यामुळे त्यांना दाखविता येणे शक्य नाही. परंतु त्यांनी सांगितलेल्या धर्मास दाखविता येईल. त्यांनी सांगितलेला धर्मच त्यांच्या विषयी हे सांगत आहे ना!"

"भंते, आपण योग्य असेच कथन केले आहे"

**(प्रकरण दुसरे समाप्त)**

# प्रकरण तिसरे

# विमतिच्छेदन-प्रश्न (पुढे चालू)

## १. शरीर हे फोड्याप्रमाणे आहे

राजा म्हणाला, ''भंते, बौद्ध भिक्षूंना आपले शरीर (देह) प्रिय असते की नाही?''

''नाही महाराज, ते शरीरावर प्रेम करीत नाही.''

''भंते, तर मग आपण लोक शरीराची इतकी काळजी कां घेता? शरीराप्रती इतका आदर कां बाळगता?''

''महाराज, आपण लढाईवर गेले असता आपणास एकदा तीर लागतो की नाही?''

''होय भंते, लागतो.''

''महाराज, अशावेळी आपण त्या जखमेस तेल व मलम लावून चांगल्या प्रकारे पातळ पट्टीने बांधता की नाही?''

''होय भंते, आम्ही तसे निश्चितच करतो.''

''महाराज, तुमची जखम तुम्हाला प्रिय असते कीय काय, जेणेकरून त्यावर मलम तेल लावून काळजीपूर्वक पातळ पट्टी त्यावर बांधता?''

''भंते, त्यावेळी मला माझी जखम प्रिय नसतेच परंतु जखम बरी होऊन तेथे नवीन मांस वाढावे म्हणून हे उपचार करावे लागतात.''

''महाराज, याप्रमाणेच आम्ही भिक्षूंना आमचे शरीर प्रिय नसे परंतु शरीराप्रती आसक्ती न ठेवता शुद्ध ब्रह्मचर्याचे पालन करण्यासाठी एवढी त्याची काळजी वाहावी लागते. भगवंतांनी तर शरीरास एका फोड्याची उपमा दिली की -''

''ओल्या त्वचेने झाकलेले हे शरीर म्हणजे एक नऊ मुखांचा फोडा आहे, त्यातून सर्व दुर्गंधाचाच (घाणीचा) उत्सर्ग होत असतो.''

''भंते, आपण उत्तमरीतीने पटवून दिले.''

## २. भगवान बुद्ध सर्वज्ञ होते.

राजा म्हणाला, ''भंते, भगवान बुद्ध सर्वज्ञ आणि सर्व काही पाहणारे होते काय?''

''होय महाराज, ते सर्वज्ञ आणि दूरदृष्टीवाले होते.''

''भंते, असे असताना देखील त्यांनी आवश्यकतेनुसार, निरनिराळ्या प्रसंगी विनय

तयार करण्याची रीत कशी काय अवलंबिली? एकाचवेळी सर्व विनय का बरे केले नाहीत?''

''महाराज, सर्व प्रकारच्या औषधीची माहिती असलेला आपला कोणी वैद्य आहे काय?''

''होय भंते, आहे.''

''महाराज, तो आजारी पडल्यानंतर कोणाला औषध देतो की आजारापूर्वीही देत राहतो?''

''भंते, आजारी पडल्यानंतरच कोणाला औषध देतो, त्यापूर्वी नाही.''

''महाराज, याप्रमाणे भगवान बुद्ध जरी सर्वज्ञ आणि सर्वद्रष्टे होते तरी देखील योग्यवेळी आल्याशिवाय त्यांनी कधीही आपल्या श्रावकांसाठी कोणताही विनय तयार केला नाही अगर त्यांचा उपदेशही ते देत नव्हते. प्रसंग उद्‌भवल्यावरच भगवंतानी असे नियम तयार केले आणि ते आजीवन आचरणात आणण्याचा उपदेश दिला.''

''भंते, आपण बरोबर सांगितले.''

## २१. भगवंताच्या शरीरावरील महापुरूषांची ३२ लक्षणे ?

राजा म्हणाला, ''भंते, भगवान बुद्धाच्या शरीरावर महापुरूषांच्या ३२ सुलक्षणी खुणा होत्या, ८० उपलक्षणे होती. त्यांची अंगकांती सोन्यासारखी पिवळी व देखणी होती आणि त्यांच्या सभोवार एक व्याम आकाराचा तेजस्वी प्रकाश फाकत होता. असे जे सांगितले जाते, ते खरे आहे काय?''

''होय महाराज, तथागत खरोखरच तसे होते.''

''भंते, त्यांचे माता व पिता देखील तसेच होते काय?''

''नाही महाराज, ते तसे नव्हते.''

''भंते, मुलगा हा एकतर आईच्या वंशावर जातो किंवा वडिलाच्या वंशावर जातो आणि भगवान बुद्ध या दोहोपैकी कोणाहीसारखे नाहीत. तेव्हा ते तसे होऊच शकत नाही.''

''महाराज, आपण कमळाचे फुल पाहिले आहे काय?''

''होय भंते, पाहिले आहे.''

''ते कोठे उत्पन्न होते?''

१) पहा दीघ निकाय लक्षण सूत्रः-

''चिखलात ते उत्पन्न होते आणि पाण्यात त्याची वाढ होऊन पूर्णावस्थेत पोहोचते.''

''महाराज, मग कमळाची फुल, रंगात, गंधात किंवा चवीत चिखलाशी साम्य असलेले दिसते काय?''

''मुळीच नाही भंते!''

''तर काय पाण्याशी त्याचे साम्य आहे?''

''नाही भंते!''

''महाराज, याप्रमाणेच त्यांचे माता व पिता तसे नसले, तरी भगवान बुद्ध सुलक्षणाने संपन्न होते.''

''भंते, उत्तम प्रकारे स्पष्टीकरण करून सांगितले.''

## २२. भगवान बुद्ध व ब्रम्ह

''राजा म्हणाला, भंते, भगवान बुद्ध ब्रह्मचारी होते काय?''

''होय महाराज, ते ब्रह्मचारी होते.''

''भंते, तर मग ते ब्रह्माचे अनुयायी होते असेच म्हटले पाहिजे?''

''महाराज, आपल्या जवळ एखादा हत्ती आहे काय?''

''होय भंते, मला फार प्रिय असलेला हत्ती आहे.''

''महाराज, तो हत्ती कधी तरी क्रौच नाद करतो काय?''

''होय भंते, कधी-कधी, क्रौच नाद करतो.''

''महाराज, तर मग तो क्रौच पक्षाचा अनुयायी झाला असला पाहिजे?''

''नाही भंते, हे कसे शक्य आहे!''

''महाराज, आता तुम्हीच सांगा की ब्रह्माला प्रज्ञा बुद्धी आहे की नाही?''

''होय भंते बुद्धी आहे.''

''महाराज, तर मग ब्रह्मा भगवान बुद्धाचा अनुयायी झाला, असेच म्हणावे लागेल.''

''भंते हे तर आपण खूप सांगितले.''

## २३. भगवान बुद्धीची उपसंपदा

राजा म्हणाला, ''भंते, उपसंपदा (भिक्षूंचा दीक्षाविधी) चांगली बाब आहे काय?''

''होय महाराज, उपसंपदा ही चांगली बाब आहे.''

''भंते, भगवान बुद्धाची उपसंपदा झाली होती की नाही?''

''महाराज, बोधिवृक्षाखाली भगवंतास जे धम्मज्ञान झाले, तीच त्यांची उपसंपदा होय. कोणा दुसऱ्या गुरूकडून त्यांनी उपसंपदा घेतली नाही, जसे की त्यांची श्रावक लोक घेतात. भगवंतानीच आम्हा लोकांना जीवनभर पाळण्यासाठी हा उपसंपदेचा नियम केला आहे. जो आम्हा लोकांकरीता जीवनभर अनुलंघनीय असा आहे.''

''भंते, आपण आगदी संयुक्तिक कथन करता.''

## २४. अश्रू-थंड आणि गरम

राजा म्हणाला, ''भंते, आपली माता मरण पावली असता रडून-रडून ढाळलेले अश्रू आणि धर्म प्रेमाने ओघळणारे अश्रू यांपैकी कोणते अश्रू उपकारक ठरतात. म्हणजे कोणते योग्य आणि अयोग्य मानावे?''

''महाराज, पहिल्या प्रकारचे अश्रू, राग, द्वेश व मोह यांतून उद्भवल्यामुळे गरम व मलीन आहेत, तर दुसऱ्या प्रकारचे अश्रू निर्मळ व थंड आहेत, कारण या अवस्थेत मन अत्यंत पवित्र आहे.''

''महाराज थंड व निर्मळ अश्रू उपकारक व योग्य आहेत, तर गरम व भावनायुक्त अश्रू निरूपयोगी व वाईट आहेत.''

''भंते, आपण उत्तम प्रकारे समजावून सांगितले.''

## २५. रागयुक्त व रागमुक्त यांतील फरक

राजा म्हणाला, ''भंते, रागाने भरलेले व रागरहित चित्त यातील भेद कोणता?''

''महाराज, यातील एक तृष्णेत बुडून गेला असतो, तर दुसरा नसतो.''

''भंते, म्हणजे याचा अर्थ काय समजावा?''

''महाराज, एक अत्यंत लोभी व स्वार्थी असतो तर दुसरा निर्लोभी व शांत असतो.''

''भंते परंतु मी या प्रश्नाकडे पाहतो, तेव्हा असे दिसून येते की, की रागयुक्त

अससो की रागरहित, हे दोघेही खाण्याकरीता चांगल्याच पक्वांन्नाची इच्छा धरतात, वाईट पक्वांन्नाची तर कोणी इच्छा धरीत नाहीत.''

''महाराज, हे जरी खरे असले तरी रागयुक्त व्यक्ती उत्तम भोजनाचा आस्वादही घेतात आणि त्यात रागही व्यक्त करतात. परंतु रागरहित व्यक्ती आस्वाद घेतात खरे पण त्याग राग मुळीच मानत नाही.''

''भंते आपण फारच छान समजावून सांगितले.''

## २६. प्रज्ञेचा निवास

राजा म्हणाला, ''भंते, प्रज्ञेचे निवासस्थान कोणते?''

''महाराज, तशी ती कोठेही घरटे करून राहत नाही.''

''भंते, तर मग प्रज्ञेला अस्तित्वच नाही. असे म्हणावे काय?''

''महाराज, आता तुम्हीच सांगा की, हवा कोठे राहते?''

''भंते, आपण छान उत्तर दिले.''

## २७. संसार (संक्रमण) म्हणजे काय?

राजा म्हणाला, ''भंते, तुम्ही लोक 'संसार-संसार' म्हणून उल्लेख करता, तर तो संसार (संक्रमण) काय आहे? ''

''महाराज, जीवप्राणी येथे जन्म घेतो व येथेच मृत्यू पावतो. येथे मृत्यू पावल्यानंतर दुसऱ्या ठिकाणी जन्म घेतो, तेथे जन्म घेऊन तेथेच मृत्यू पावतो. तेथे मृत्यू पावल्यानंतर पुन्हा तिसऱ्या अवस्थेत जन्म घेतो. संसाराचा हाच अर्थ आहे.''

''कृपा करून उदाहरणाने स्पष्ट करावे.''

''महाराज, कोणी मनुष्य पिकलेला आंबा खातो व त्याची कोय जमिनीत पुरतो. त्याला अंकुर फुटून त्यापासून एका मोठा वृक्ष तयार होतो, आणि त्याला आंबे लागतात. ते पिकल्यानंतर तो मनुष्य पुनः ते आंबे खाऊन त्याची कोय जमिनीत पुरतो. यापासून अजून एक मोठ वृक्ष तयार होतो आणि त्याला सुद्धा फळे येतात. याप्रमाणे झाडापासून आंबे, आंब्यापासून झाड असे हे कोडे कोणीही उकलू शकत नाही अर्थात याचा शेवट कोठेच होत नाही.''

''महाराज, याप्रमाणेच जन्मास येणे व मरणे आहे, हाच संसार होय.''

''भंते, आपण छान समजावून सांगितले.''

## २८. स्मृतीने स्मरण होते.

राजा म्हणाला, ''पूर्वी केलेल्या कृत्यांचे किंवा घडलेल्या गोष्टींचे स्मरण कसे होते?''

''स्मृतीने स्मरण होते महाराज!''

''भंते, स्मृतीने कसे, चित्तामुळे स्मरण होत असते ना?''

''महाराज, आपण केलेले एखादे कार्य आता विसरलेत काय?''

''होय भंते!''

''महाराज, त्यावेळी आपल्याला चित्त नव्हते काय?''

''भंते, चित्त होते, स्मृती नव्हती.''

''महाराज, मग आपण कसे म्हणाले की, चित्ताने (मनाने) स्मरण केले जाते, स्मृतीने नव्हे?''

''भंते, आता मला बरोबर समजले.''

## २९. स्मृतीचे उगमस्थान

राजा म्हणाला, ''भंते, स्मृती नेहमी चित्तूनच (मनातूनच) उत्पन्न होते काय की दुसऱ्या बाहेरील वस्तूपासून देखील उत्पन्न होते?''

''महाराज, चित्तातून (मनातून) ही उत्पन्न होते आणि दुसऱ्या बाहेरील वस्तू पासून देखील उत्पन्न होते.''

''भंते, परंतु सर्वच स्मृत्या चित्तातून (मनातूनच) उत्पन्न होतात, दुसऱ्या बाह्य वस्तू पासून नव्हे.''

''महाराज, जर बाह्य गोष्टींमुळे स्मृत्यांचा उगम झाला नसता तर शिल्प कला ही दुसऱ्या कडून शिकण्याची, अभ्यास करण्याची आवश्यकताच मुळीच राहिली नसती आणि मग गुरूसुद्धा निरर्थक ठरतील. परंतु अशी स्थिती नाही.''

''छान भंते, फार छान.''

**(प्रकरण तिसरे समाप्त)**

# (प्रकरण चवथे)

# विमतिच्छेदन-प्रश्न (पुढे चालू)

## ३०. स्मृतीच्या उत्पत्तीचे सोळा प्रकार

राजा म्हणाला, ''भंते, किती प्रकाराने स्मृती उत्पन्न होते?''

''महाराज, सोळा प्रकारांनी स्मृतीचा उगम होतो. ते सोळा प्रकार असे :-
''

१. **अभिज्ञेमुळे (पूर्वज्ञानामुळे) स्मृती उत्पन्न होते :-** आयुष्मान आनंद, उपासिक खजुत्तरा अगर ज्यांना अशी अभिज्ञा शक्ती प्राप्त झाली होती, असे लोक आपल्या पूर्वजन्मातील गोष्टीचेसुद्धा स्मरण करीत होते.

२. **बाह्य गोष्टीमुळे स्मृती उत्पन्न होते :-** जे विसराळू असतात, त्यांना वेळोवेळी सांगत असल्यामुळे त्यास स्मरण होते.

३. **एखादा मोठा प्रसंग घडला असता स्मृती उत्पन्न होते :-** जसे, राजांच्या अभिषेकाची व्यवस्था चालली असता त्यांना स्मरण होते, किंवा स्वतःच्या श्रोतापत्ती फळाच्या प्रसंगामुळे स्मरण होते.

४. **आनंदाच्या प्रसंगानेसुद्धा स्मृती उत्पन्न होते :-** अमक्यावेळी त्या गोष्टीने अतिशय आनंद झाला अशा स्मरणाने स्मृती उत्पन्न होते.

५. **दुःखद प्रसंगामुळे स्मृती उत्पन्न होते :-** अमक्या ठिकाणी त्याप्रसंगाने फार दुःख भोगावे लागले होते. अशी आठवण होताच स्मरण होते.

६. **साम्य आढळून आल्यामुळे स्मृती उत्पन्न होते :-** जसे आपल्या आई, वडील, भाऊ, बहीण इत्यादी समान दुसऱ्या व्यक्तीस पाहून स्मरण होते किंवा एखाद्या उंट, बैल, गाढव वगैरे समान दुसऱ्या उंट, बैल किंवा गाढव दृष्टीस पडले असता स्मरण होते.

७. **असमानतेमुळे स्मृती उत्पन्न होते :-** जसे अमक्याचे रूप असे आहे, शब्द असा आहे, सुगंध असा आहे, स्वाद असा व स्पर्श असा आहे व नाही असे दोन वस्तूंच्या असमानतेसंबंधी विचार करीत असता स्मरण होते.

८. **दुसऱ्यांनी सांगितल्यामुळे स्मृती उत्पन्न होते :-** अमक्या ठिकाणी असे घडले होते, असे सांगताच आपणास स्मरण होते.

९. **एखादी खूण पाहून स्मृती उत्पन्न होते :–** एखादी खूण पाहून एखाद्या बैलासंबंधी स्मरण होते.

१०. **प्रयत्न केल्याने स्मृती उत्पन्न होते :–** एखाद्या विसराळू मनुष्यास दुसऱ्याने 'आठवण करा, आठवण करा' असे म्हटल्यानंतर तो प्रयत्न करतो आणि त्या गोष्टीचे त्याला स्मरण होते.

११. **विचार करीत असता स्मृती उत्पन्न होते :–** अमक्या वाक्यानंतर अमके वाक्य लिहावयास पाहिजे असे उत्तम लेखकाला चटकन समजून येते.

१२. **मोजणी करीत असल्यामुळे स्मृती उत्पन्न होते :–** हिशेबात प्रवीण असलेले मुनीम मोठमोठे गणित आणि बेरजा चटकन करून घेतात.

१३. **मुखोद्गत असल्यामुळे स्मृती उत्पन्न होते :–** पुन्हा पुन्हा घोकून पाठ करणाऱ्या लोकांना त्या गोष्टी चटकन आठवतात.

१४. **चिंतनामुळे स्मृती उत्पन्न होते :–** भिक्षू लोक चिंतनाच्या (समाधीच्या) बळाने आपल्या पूर्वजन्मीच्या अनेक गोष्टीचे स्मरण करतात. एका जन्मीच्या असोत की अनेक जन्मीच्या परंतु स्थळ, काळ, योनी व आकार इत्यादी सर्व प्रकारच्या स्थितींचे त्यांना स्मरण होते.

१५. **संदर्भामुळेही स्मृती उत्पन्न होते :–** कोणी वकील आपल्या सहायकास म्हणतो की 'ते पुस्तक आण' त्यानंतर पुस्तक पाहतो व त्याला त्या कायद्याचे स्मरण होते.

**१६. कोणाकडे ठेवलेल्या वस्तूत पाहून यासाठी केलेल्या कराराची आठवण होते.**

१७. **पूर्वानुभवामुळे स्मृती उत्पन्न होते :–** पाहिलेल्या रूपाचे, ऐकलेल्या शब्दांचे, उपभोगलेल्या सुगंधाचे, चाखलेल्या स्वादाचे, केलेल्या स्पर्शाचे व झालेल्या अनुभूतीचे स्मरण होते.

"महाराज याच सोळा (शब्द प्रयोगात १६ स्मृत्या आल्या असल्या तरी त्या अनुक्रमाने १७ आहेत) प्रकारांनी स्मृतीचा उगम होतो."

## ३१. मृत्यू समयी बुद्धाचे स्मरण केले असता देवत्वलाभ?

राजा म्हणाला, "भंते एखाद्याने जरी शंभर वर्षेपर्यंत पापकर्म (दुष्टकर्म) केले असले, तरी केवळ मृत्यूसमयी त्याने बुद्धाचे स्मरण केले तर त्यास देवलोकी जन्म

मिळतो, असे आपण म्हणता यावर माझा मुळीच विश्वास बसत नाही. तसेच एखाद्याने एक जरी हत्या केली असेल, तरी त्याला नरक लोकी दुःखस्थितीत पुन्हा जन्म घ्यावा लागतो असेही आपण सांगता. परंतु यावरसुद्धा माझा विश्वास बसत नाही.''

''महाराज, अगदी लहान दगडाचा एखादा तुकडा पाण्यावर ठेवला तर तो तरंगू शकेल काय?''

''नाही भंते!''

''आणि महाराज, शंभर गाड्या दगड एखाद्या नावेत भरून पाण्यात सोडले तर नावेच्या सहाय्याने ते तरंगू शकतील की नाही?''

''होय भंते, सहज तरंगू शकतील.''

''महाराज, जे काही पुण्यकर्म आहेत त्यांना नावेसमान समजले पाहिजे.''

''भंते, आपण उत्तम प्रकारे पटवून दिले.''

## ३२. दुःख नाशाचे प्रयत्न

राजा म्हणाला, ''भंते, तुम्ही भिक्षू लोक भूतकाळातील दुःखांचा नाश करण्यासाठी प्रयत्नशील असता की काय?''

''नाही महाराज!''

''तर मग भविष्यकाळातील दुःखांचा नाश करण्यासाठी एवढे प्रयत्न करीत असता की काय?''

''तसेही नाही महाराज!''

''म्हणजे वर्तमानकाळातील दुःखांचा नाश करण्यासाठी निश्चितच हे सारे प्रयत्न करीत असला पाहिजे.''

''नाही महाराज, तसेही नाही.''

''जर तुम्ही भिक्षू लोक भूतकाळातील, भविष्य काळातील किंवा वर्तमान काळातील दुःखांचा नाश करण्यासाठी प्रयत्न करीत नाही, तर मग कशासाठी प्रयत्न करीत असता, ते तरी सांगा.''

''स्थवीर म्हणाले, ज्यांच्या योगाने या दुःखांचा निरोध व्हावा आणि कसल्याही प्रकारचे नवीन दुःख उद्भवू नये यासाठी आम्हा बौद्ध भिक्षूंचे प्रयत्न चालले आहेत.''

''भंते, आजच्या स्थितीत अनागत दुःख आहे काय? म्हणजे जे अजून आलेच नाहीत ते दुःख आहे काय?''

''नाही महाराज!''

''भंते, जे दुःख मुळी अस्तित्वात नाही, ते स्पष्ट करावयास निघालेले तुम्ही बौद्ध भिक्षू मोठे विचित्र पंडित म्हटले पाहिजे.''

(१) ''महाराज, आपले शत्रू किंवा वैरी राजे आपल्याविरूद्ध कधी युद्धाकरीता उभे राहिलेत काय?''

''होय भंते!''

''महाराज, मग जेव्हा आपले शत्रू राजे आपल्याविरूद्ध दंड थोपटून युद्धाकरीता सज्ज होतात. तेव्हा का आपण खंदक खोदावयास, तटबंदी करावयास, दीपस्तंसभ उभारण्यास, बुरूज बांधण्यास आणि सैन्याकरीता धान्याची कोठारे भरावयास सुरवात करता की काय?''

''भंते, असे नाही तर या सर्व गोष्टींची आधीच तयारी करून ठेवावी लागते.''

''महाराज, शत्रू जेव्हा युद्धासाठी उभा राहतो आणि आपण हत्ती स्वार, घोडेस्वार, रथस्वार व तीरंदाज इत्यादींचे शिक्षण द्यावयास सुरवात करता की काय?''

''नाही भंते, ते सर्व पूर्वीच प्रतिक्षित करून ठेवलेले असतात.''

''पूर्वीच कां बरे प्रशिक्षित आणि तयार करून ठेवले असतात?''

''भंते, पुढे कधी येणाऱ्या धोक्यापासून स्वतःचे व राज्याचे संरक्षण करण्यासाठी हे सर्व आधीच करावे लागते.''

''महाराज, सध्या जे भय अस्तित्वाच नाही, भविष्यातील असेही काही भय असते काय?''

''नाही भंते? असे काहीच नसते.''

''महाराज, जे भय अस्तित्वातच नाही, अशाही भयापासून स्वतःचे व राज्याचे संरक्षण करण्याकरीता आधीच तयारी करणारे आपण विचित्रत पंडित आहात, असेच म्हणावे लागेल.''

(२) ''अजून एखादे उदाहरण देऊन समजावून सांगावे.''

''महाराज, आपल्याला तहान लागल्यानंतर विहीर किंवा तलाव खोदावयास सुरवात करता की काय?''

''नाही भंते, त्याची आधीपासूनच तयारी केली असते.''

''आधीपासूनच कशी काय तयारी केलेली असते?''

''भविष्यातील तहान लागल्यास ती वेळीच शमवावी म्हणून.''

''तुम्ही असे कसे विचित्र कथन करता, महाराज, भविष्यकालीन तहान सुद्धा काही वस्तू असते काय?''

''नाही भंते! तशी तर काहीच वस्तू नाही.''

''महाराज, जी तहान अस्तित्वातच नाही अशीही तहान शमविण्याची शिकस्त करणारे तुम्ही राजे म्हणजे अजब पंडित समजले पाहिजेत.''

(३) ''कृपा करून पुन्हा उदाहरणाने समजावून सांगावे.''

''त्यावर स्थवीराने भूकेचा उल्लेख करून या प्रश्नातील गुंतागुंत वरील उल्लेखाप्रमाणेच उकलून दाखविल्यामुळे राजा मिलिंदास फार आनंद झाला व तो म्हणाला, ''साधु! साधु!! साधु!!!'' भंते, आपण अशारीतीने समजावून सांगितले की, ज्यांच्यायोगे माझ्या प्रश्नाच्या पकडीत मीच सापडलो. खरोखर आपण फार कुशल व्याख्याते आहात.''

### ३३. ब्रह्मलोकाचे येथून अंतर

राजा म्हणाला, ''भंते, ब्रह्मलोक येथून किती दूर आहे?''

''महाराज, फार दूर आहे, समजा, आपल्या राजवाड्याएवढा विशाल खडक तेथून सोडला असता रात्रंदिवस, अठ्ठेचाळीस योजना (एक योजन = ७ मैल) च्या वेगाने तो खाली येत असता पृथ्वीवर पोहोचण्याकरीता त्याला चार महिने तरी लागतील.''

''भंते, तर मग एखादा पूर्णपणे शांत असलेला भिक्षू वाकविलेले हात लांब करण्याकरीता किंवा लांब केलेले हात वाकविण्याकरीता जितका वेळ एखाद्या शक्तिशाली पुरूषास लागतो, तितक्याच वेळात आपल्या ऋद्धिशक्तीच्या बळाने येथे जंबुद्धीपात अंतर्धान पावून ब्रह्मलोकात उपस्थित होतो. हे तरी कसे घडणे शक्य आहे? या विधानावर माझा मुळीच विश्वास बसत नाही, इतक्या कमी वेळात हे शेकडो योजनाचे अंतर कसे काय तोडता येईल?''

''महाराज, आपले जन्मस्थान कोठे आहे? अशी स्थवीराने पृच्छा केली.''

''भंते, अलसंद नावाच्या बेटावर माझा जन्म झाला. तीच माझी जन्मभूमी आहे.''

''भंते, दोनशे योजन तरी असावे.''

''महाराज तुम्ही तेथे केलेली एखादी गोष्ट आठवते काय?''

"होय भंते, आठवते."

"महाराज, मग तुम्ही इतक्या कमी वेळात एवढे दोनशे योजन लांबीचे अंतर पार करून गेलात, हे कसे?"

"भंते, आता मला समजून आले."

## ३४. मृत्युनंतर दुसरीकडे पुनः जन्म घेण्यासाठी वेळेचे बंधन नाही

राजा म्हणाला, "भंते, असे समजा की, एक मनुष्य येथे मरण पावला, ब्रह्मलोकात पुनःजन्मास आला आणि दुसरा मनुष्य येथे मरण पावला व काश्मीरात पुन्हा जन्मास आला, तर दोघांपैकी आधी कोण बरे जन्मास येईल?"

"महाराज, दोघेही एकच वेळी जन्मास येतील."

(१) "कृपाकरून उदाहरणांने स्पष्ट करुन सांगावे."

"महाराज, तुमचा जन्म कोणत्या गावी झाला?"

"भंते, अलसंद द्वीपात कलसी नावाचे एक शहर आहे, तेथे माझा जन्म झाला."

"येथून कलसी शहर किती दूर आहे?"

"अंदाजे दोनशे योजन भंते!"

"ठीक आहे, आता काश्मीर येथून किती दूर आहे हे सोगा?"

"केवळ बारा योजन."

"महाराज, आता तुम्ही कलसी शहरासंबंधी स्मरण करावे."

"भंते, स्मरण केले."

"आणि आता काश्मीरचेसुद्धा स्मरण करावे."

"भंते, स्मरण केले."

"महाराज, मग आता सांगा की, या दोन स्थळांपैकी कोणत्या स्थळाचा विचार आधी आला."

"भंते, दोन्ही स्थळाचे स्मरण करावयास सारखाच अवधी लागला. यांत कमी-जास्त असे काही नाही."

"महाराज, या उदाहरणावरून समजून घ्यावयास पाहिजे की, येथे मृत्यू पावल्यानंतर ब्रह्मलोकात पुन्हा जन्म घ्यावा लागला काय किंवा काश्मीर अगर कोठेही जन्म घ्यावा लागला काय, कोठेही पुनः जन्म घ्यावा लागला, तरी सारखाच वेळ

लागतो.''

(२) कृपाकरून पुनः उदाहरण देऊन सांगावे.

''महाराज, समजा दोन पक्षी आकाशात उडत आहेत. त्यांपैकी एक पक्षी उंच झाडावर बसला आणि दुसरा पक्षी लहान झुडूपावर बसला तर या दोहापैकी कोणत्या पक्षाउची सावली जमिनीवर आधी पडेल?''

''भंते, दोन्ही पक्ष्यांची सावली सारख्याच वेळाने जमिनीवर पडेल.''

''महाराज, याप्रमाणे जर कोणी येथे मृत्यू पावला व ब्रह्मलोकात पुनः जन्मास आला आणि कोणी दुसरा येथे मृत्यू पावला व काश्मीरात पुनः जन्मास आला, आणि या दोघांचीही मृत्यू वेळ सारखीच असेल.''

''भंते, आपण फारच योग्य पद्धतीने समजावून सांगितले.''

## ३५. बोध्यांगा संबंधी

राजा म्हणाला, ''भंते, बोध्यंग किती आहेत?''

''महाराज, सात आहेत.''

''भंते, किती बोध्यंगाने धर्मज्ञानाचा लाभ होतो.''

''भंते, तर मग तथागतांनी ही सात बोध्यंग कशाकरीता सांगितली?''

''महाराज, एखादी तलवार म्यानातून बाहेर काढून हातात घेतलीच नाही तर म्यान बंद तलवारीने तुम्ही इच्छा असेल त्यास कापू शकाल काय?''

''नाही भंते!''

''महाराज, याचप्रमाणे धर्मविचय संबोधांग असल्याशिवाय इतर संबोधांगाचा, धर्मज्ञानाचा लाभ करून घेण्याच्या दृष्टीने काही एक उपयोग होणार नाही. तथापि धर्मविचय संबोधांगास तलवार मानले, तर इतर दुसऱ्या संबोधांगास म्यान समजावे लागेल. आणि तलवार जरी कापण्याचे काम करीत असली तरी म्यान तिला सुरक्षित ठेवण्याचे महत्वपूर्ण काम करीत असते म्हणून इतर संबोधांगासही कमी लेखता येणार नाही.''

''छान भंते, फारच छान.''

## ३६. पाप आणि पुण्यासंबंधी

राजा म्हणाला, ''भंते, पाप आणि पुण्य या दोहोत अधिक चांगले कोणते आहे?''

''महाराज, पुण्य (चांगले) हे अधिक आहे.''

''ते कसे काय बरे?''

''महाराज, पाप (वाईट) कर्म करणारास अतिशय पश्चाताप होतो आणि ते आपल्या हातून दुष्ट कृत्य घडते असे कबूल करतात, म्हणून पापांची वाढ होत नाही. परंतु पुण्य कर्म करणारास पश्चाताप करण्याची पाळी येत नाही. कसल्याही प्रकारे त्यास प्रश्चाताप करावा लागत नसल्यामुळे ते प्रमोदित होतात, प्रमोदित झाल्यामुळे प्रीती उत्पन्न होते. प्रीतीचा लाभ झालेल्या मनुष्यास एक प्रकारची शांती मिळते. शांतीमुळे निष्पाप मनाचे सुख प्राप्त होते. सुख लाभाने चित्त स्थीर होऊन समाधीत (चिंतनत) मग्न होते. समाधीने स्थिर चित्ताची एकाग्रता साधून यथार्थ ज्ञानाचा लाभ होतो. याप्रमाणे महाराज, पुण्याचीच वृद्धी होते. महाराज, एखाद्या लंगड्या किंवा पांगळ्या माणसाने भगवान बुद्धाला श्रद्धापूर्वक जर एक मूठभर कमळपुष्पे अर्पण केली तर तो निदान ९२ कल्पेपर्यंत तरी दुर्गतीस (दुरावस्थेस) जाणार नाही, महाराज, म्हणूनच म्हटले आहे की, पापापेक्षा पुण्य हेच अधिक आहे.''

''भंते, आपण सांगितले, तेच बरोबर आहे.''

### ३७. अधिक पाप कोणते–सहेतुक की अहेतुक ?

राजा म्हणाला, ''भंते, जो जाणूनबुजून दुष्कर्म करतो आणि जो चुकून दुष्कर्म करतो या दोघापैकी अधिक पाप कोणाचे आहे?''

स्थवीर म्हणाले, ''महाराज, चुकून दुष्कृत्य करतो त्याचेच पाप अधिक आहे.''

''भंते, असे आहे तर जे काही माझे राजपुत्र किंवा मंत्री लोक चुकून वाईट कृत्य करतात, त्यांना दुप्पट दंड दिला पाहिजे.''

''महाराज, एखादा मनुष्य उष्णतेने लालबुंद झालेला लोखंडाचा एक तत्प गोळा जाणून बुजून हातात पकडतो आणि दुसरा एखादा मनुष्य त्या तत्प गोळ्याबद्दल काहीही माहिती नसताना चुकून हातात पकडतो. तेव्हा ज्याला त्या गोळ्याची माहिती असूनही हातात पकडतो व दुसऱ्यास काहीच माहिती नसल्यामुळे चुकून पकडतो, तेव्हा या दोहोपैकी अधिक कोण भाजून निघेल?''

''भंते, जो अजाणपणे हातात पकडतो तोच अधिक भाजून निघेल.''

''महाराज, अगदी याच उदाहरणाप्रमाणे जो चुकून दुष्कर्म करतो, त्याला अधिक पाप लागते.''

''भंते, आपण छान सांगितले.''

## ३८. सशरीर देवलोकाचे भ्रमण

राजा म्हणाला, ''भंते, आपल्या याच शरीराने उत्तरकुरु, ब्रह्मलोक किंवा चारही खंडांत कोठेही जाऊ शकेल, असा कोणी समर्थ आहे काय?''

''होय महाराज, असे लोक आहेत.''

''भंते, ते कसे जातात ?''

''महाराज, जमिनीवर एक वित किंवा एक हात उडी मारू शकेल काय ?''

''होय भंते, मी एकच हात काय, पण आठ हात देखील उडी मारू शकतो.''

''महाराज, आपण आठ हात उडी कशी काय मारू शकता?''

''भंते, जेथे मला उडी मारावयाची आहे, ज्या जागेवर मी माझे मन निश्चयपूर्वक आधीच पोचवितो की, येथेच माझी उडी निश्चित पडेल. अशा निश्चयामुळे माझे शरीर हलके झालेले वाटते आणि मग मी उडी मारतो.''

''महाराज याचप्रमाणे ज्याचे आपल्या मनावर चांगले प्रभुत्व आहे, असा ऋद्धी शक्ती संपन्न भिक्षू मला आकाशात उडान करावयाची आहे, असा मनानेच संकल्प करतो. त्यामुळे तो आकाशात सहजपणे उडू शकतो.''

''भंते, फारच छान.''

## ३९. लांब हाडे

राजा म्हणाला, ''भंते, शंभर योजन लांब हाडे आहेत, असे तुम्ही लोक म्हणता, परंतु एवढे लांब तर वृक्ष देखील नसतात, तेव्हा हाडे कशी बरे असू शकतील?''

''महाराज, महासागरात पाचशे योजन लांबीचे मासे असतात, हे आपण ऐकले आहे काय?''

''होय भंते, मी असे ऐकले आहे.''

''महाराज, जर असे आहे, तर शंभर योजन लांबीची हाडे त्या माशांची असणार नाही काय?''

''भंते, निश्चितच असू शकतील.''

## ४०. श्वासोच्छवासाचा निरोध

''भंते, श्वास घेणे आणि श्वास सोडणे याचा देखील निरोध करून ठेवता येते. असेही तुमचे म्हणणे आहे. तर हे कसे घडू शकते?''

''होय महाराज, हे खरे आहे की, श्वास घेणे व श्वास सोडणे निरोध करता

येते.''

''भंते, पण ते कसे शक्य आहे?''

''महाराज, कधी आपण कोणाला घोरत असतांना ऐकले आहे काय?''

''होय भंते ऐकले आहे!''

''महाराज, समजा जर त्याने आपले शरीर इकडे तिकडे हलविले, तर काही वेळासाठी त्याचा घोरण्याचा आवाज थांबणार नाही का?''

''होय भंते, थांबू शकेल.''

''महाराज, ज्याअर्थी ज्याच्या कायेवर, चित्तावर, शीलावर आणि प्रज्ञेवर ताबा नाही, असा मनुष्य घोरत असता. हात-पाय आखूड करीत असता, मोडत असता त्याचे घोरणे थांबू शकते तर ज्यांच्या कायेवर चित्तावर, शीलावर आणि प्रज्ञेवर परिपूर्ण ताबा आहे अशा भिक्षूचा चौथ्या ध्यानात पोचल्यानंतर श्वासोच्छवासाचा निरोध झाला, तर यात आश्चर्य मानण्यासारखे काय आहे?''

''भंते, आपण अगदी संयुक्तिक असेच कथन केले.''

## ४१. समुद्र हे नाव का पडले?

राजा म्हणाला, ''भंते, सर्वच लोक 'समुद्र' असे म्हणतात. तेव्हा त्या पाण्याच्या साठ्याचे नाव 'समुद्र' असे कां पडले?''

''महाराज, यात अर्धे उदक म्हणजे पाणी व अर्धे मीठ असे साम्य असल्यामुळे त्याचे नाव समुद्र असे पडले.''

''भंते, आपण बरोबर सांगितले.''

## ४२. संपूर्ण समुद्राचे पाणी खारट का?

राजा म्हणाला, ''भंते, सर्वच समुद्राचे पाणी अगदी एकरस म्हणजे खारट असते. ते असे कां आहे?''

''महाराज, समुद्राचे पाणी कितीतरी काळापासून एकाच ठिकाणी जमलेले आहे. त्यामुळे ते एकरस खारट आहे.''

''भंते, ठीक आहे.''

## ४३. सूक्ष्म धर्म

राजा म्हणाला, ''भंते, अतिसूक्ष्म वस्तूचेसुद्धा तुकडे करात येतील काय?''

''होय महाराज, करता येतील.''

''भंते, सर्व वस्तूंमध्ये अतिसूक्ष्म अशी वस्तू तरी कोणती?''

''महाराज, धर्म हीच सर्वात अतिसूक्ष्म वस्तू आहे. तथापि सर्व धर्मासंबंधाने असे म्हणता येणार नाही. कारण सूक्ष्मत्व आणि स्थूलत्व ही दोन्ही अंगे धर्मातर्गत विशेष रूपाने आढळूनयेणारी आहेत. परंतु जे काही विभागले जाते ते प्रज्ञेनेच विभागले जाऊ शकते, आणि प्रज्ञेचे विभाजन करील, असे मात्र काही एक अस्तित्वात नाही.''

''भंते, फार छान.''

## ४४. क) विज्ञान, प्रज्ञा आणि जीव (आत्मा)

(क) राजा म्हणाला, ''भंते, विज्ञान, प्रज्ञा आणि जीव (आत्मा) हे तीन शब्द, अक्षर आणि अर्थ या दोन्ही दृष्टीने वेगवेगळे आहेत की एकाच अर्थाची ही वेगवेगळी नावे आहेत?''

''महाराज, 'जाणीव करून घेणे' ही विज्ञानाची ओळख आहे, त्यातील 'गुडार्थ व भाव यासह समजून घेणे' ही प्रज्ञेची ओळख आहे. आणि आत्मा नावाची तर कोणतीच वस्तू अस्तित्वात नाही.''

''भंते, जीव म्हणून काही एक अस्तित्वात नाही असे आपण म्हणता तर डोळ्याद्वारे रूपाला पाहण्याचे, कानाद्वारे शब्द ऐकण्याचे, नाकाद्वारे वास घेण्याचे, जिभेद्वारे स्वाद घेण्याचे, शरीराद्वारे स्पर्शानुभव करण्याचे आणि मनाद्वारे विषय (धर्म) समजून घेण्याचे कार्य कोण करतो?''

''महाराज, आपल्या म्हणण्याप्रमाणे शरीरात वास्तव्य करीत असूनही शरीरापासून अगदी वेगळा असा डोळ्याच्या साह्याने रूप पाहणारा, नाकाच्या साह्याने सुगंध घेणारा, जिभेच्या साहाय्याने स्वाद घेणारा, शरीराच्या साहाय्याने स्पर्शानुभव करणारा आणि मनाच्या साहाय्याने विषय धर्माची जाणीव करून घेणारा असा जीव (आत्मा) आहे. तर डोळे काढल्यानंतर त्या मोठ्या छिद्रातून त्याला चांगले स्पष्ट रूप दिसत असावे, कानात गरम लोखंडी सळाक टाकून कानाची छिद्रे मोठी केल्यानंतर त्याला अधिक स्पष्ट ऐकू येत असावे, नाक कापून काढल्यानंतर नाकाची भोके मोठी झाल्याने चांगला सुगंध घेता येत असावा, जीभ जर ओढून बाहेर काढली तर अधिक चांगला स्वाद घेत येत असावा, शरीराचे कापून तुकडे केले असता निःशरीर उघड्यावर तो आल्याने चांगल्याप्रकारे स्पर्श करता येत असावा, कारण या सर्व इंद्रियांचा तो खिडक्याप्रमाणे उपयोग करीत आहे ना जर खिडकी अधिक उघडली तर बाहेरील दृष्य अधिकच स्पष्ट दिसू लागते आणि एकदमच खिडकी काढली तर बाहेरील दृष्य एकदमच साफ दिसू लागते. असेच तुमच्या जीवाचे सुद्धा होत असावे.''

''नाही भंते, असे काही घडत नाही.''

''महाराज, असे जर घडत नाही तर आमच्या आत बसणारा असा कोणीही जीव (आत्मा) नाही, हेच यावरून सिद्ध होते.''

''भंते, फार छान.''

## (ख) अरूप धर्मासंबंधी

स्थवीर म्हणाले, ''महाराज, भगवंताने एक अतिशय अवघड कार्य केले आहे.''

''भंते, ते कोणते बरे?''

''महाराज, ते म्हणजे एकाच वस्तूच्या आलंबनावर (विषयावर) अवलंबून असलेले चित्त आणि रूप-रहित धर्माचे (विषयाचे) विश्लेषण त्यांनी केले आहे आणि असेही त्यांनी सांगितले की, याला स्पर्श म्हणतात, याला वेदना म्हणतात, याला संज्ञा म्हणतात, याला चेतना म्हणतात आणि याला चित्त असे म्हणतात.''

''कृपाकरून उदाहरणाने स्पष्ट करावे.''

''महाराज, समजा कोणी एक मनुष्य नावेवर बसून समुद्राच्या मध्यभागी जाऊन समुद्राचे ओंजळभर पाणी हातावर घेऊन त्याची चव घेऊ लागला की, हे गंगा नदीचे पाणी आहे, हे यमुना नदीचे पाणी आहे, हे अचिरवतीचे, हे सरयूचे आणि हे मही नदीचे पाणी आहे, तर असे त्या पाण्याच्या चवीवरून त्या त्या नद्याचे पाणी सांगू शकेल काय?''

''भंते असे सांगणे तर एकदमच अवघड आहे.''

''महाराज, एकाच वस्तूच्या अवलंबनावर अवलंबून असणारे रूप-रहित चित्त (मन) आणि चैतसिक धर्म यांचे विश्लेषण करणे हे त्याहीपेक्षा अवघड कार्य आहे. पण ते भगवान बुद्धाने केले आहे.''

''भंते, ठीक आहे.''

**(प्रकरण चौथे समाप्त)**

## (प्रकरण पाचवे)

# प्रश्नोत्तरांचा आढावा

स्थवीर म्हणाले, ‘‘महाराज, आता किती वेळ झाला आहे ते आपण सांगू शकाल काय?’’

‘‘होय भंते, सांगू शकेन. रात्रीचा पहिला प्रहर निघून गेला आहे आणि मधला प्रहर सुरू झाला आहे. मशाली लावण्यात आल्या आहेत, चारही ध्वज (पताका) वर उंचावण्याची आज्ञा दिली आहे आणि आता थोड्याच वेळानंतर दान देण्याच्या सर्व वस्तू कोठाराबाहेर काढण्यात येऊन दान शाळेत पोचविण्यात येतील.’’

तेव्हा राजाचे अंगरक्षक यवन म्हणाले, ‘‘महाराज, हे भिक्षू तर फार मोठे पंडित आहेत.’’

‘‘होय, स्थवीर फार मोठे पंडित आहेत. गुरू असावा तर यांच्यासारखा आणि माझ्या सारखा शिष्य, तर पंडित लोकांना धर्मज्ञानाचे आकलन होण्यास फारसा अवधी लागणार नाही.’’

‘‘स्थवीर नागसेनाच्या उत्तराने संतुष्ट होऊन राजाने त्यांना एक मौल्यवान चीवर दान दिले व म्हणाला, ‘‘भंते, कृपाकरून आठशे दिवसपर्यंत माझ्याकडे भोजन घेण्याचे निमंत्रण आपण स्वीकार करा. शिवाय माझ्या राजवाड्यात ज्या काही वस्तू आपणायोग्य आहेत, त्या सर्व आपणास दान द्याव्यास, असे मला अंतःकरणपूर्वक वाटते.’’

‘‘असू द्या महाराज ! माझे जीवन तर अतिशय आनंदाने चालले आहे.’’

‘‘भंते, आपले जीवन आनंदपूर्वक चालत आहे, याची मला जाणीव आहे. परंतु कृपाकरून लोकापवादापासून तुमचे स्वतःचे व माझे असे उभयतांचे संरक्षण करावे. कारण जनतेमध्ये असा गैरसमज पसरण्याचा संभव आहे की, ‘राजाला युक्तिवादाने अनेक विषय पटवून दिले व राजाला संतुष्ट केले तरीपण स्थवीरास मात्र काहीच मिळाले नाही.’ या गैरसमजापासून स्वतःचे संरक्षण करावे आणि ‘स्थवीरांच्या कौशल्यपूर्ण उत्तरांनी संतुष्ट होऊनही नित्याच्यासाठी भेटी दाखल काहीही न देणारा असा कंजुष राजा आहे.’ असाही जनतेत गैरसमज पसरू शकतो तेव्हा या अडचणीपासून माझे संरक्षण करावे.’’

‘‘ठीक आहे महाराज, जशी आपली इच्छा.’’

‘‘भंते, सिंह हा वन्य प्राण्यांचा राजा आहे. त्याला सुन्दर अशा सोन्याच्या

पिंजऱ्यात ठेवले तरी तो बाहेरील जगाकडेच तोंड करून उभा राहतो. त्याचप्रमाणे मी या सुन्दर उपकरणांनी सजविलेल्या राजभवनात राहत असलो तरीही माझी दृष्टी सतत बाहेरच खिळती असते. परंतु भंते, मी जर आताच गृहत्याग करून प्रव्रजा घेतली व भिक्षू झालो तर फार काळ जगू शकणार नाही. कारण सद्यःस्थितीत मला अनेक शत्रू आहेत, कदाचित ते संधी पाहून मला ठार मारतील.''

याप्रमाणे राजा मिलिंदाने विचारलेल्या सर्व प्रश्नांनी समर्पक उत्तरे देऊन आयुष्मान नागसेन आपल्या आसनाहून उठले व आपल्या विहारात निघून गेले.

**प्रश्नोत्तरांचा आढावा**

इकडे स्थवीर नागसेन निघून गेल्यानंतर आपण बरोबर प्रश्न विचारले की नाही आणि स्थवीर नागसेनांनी दिलेली उत्तरे बरोबर होती की नाही. यावर राजा मिलिंद विचार करून लागला. खूप विचार केल्यानंतर मात्र त्याला कळून आले की, आपण विचारलेले सर्व प्रश्न अत्यंत मार्मिक होते आणि स्थवीरांनी दिलेली उत्तरे देखील तशीच समर्पक होती.

दुसरे दिवशी सकाळी नागसेनाने चीवर धारण केले, हातात भिक्षापात्र घेतले आणि राजवाड्यात येऊन दाखल झाले व त्यांच्यासाठी तयार केलेल्या आसनावर विराजमान झाले.

राजा मिलिंदानेही यथायोग्य स्वागत करून स्थवीरास आदरपूर्वक प्रणाम केला व ऐके बाजूस नम्रतापूर्वक बसला आणि म्हणाला, ''भंते, मी आयुष्मान नागसेनास अतिशय कुट प्रश्न विचारले, या खुशीत मी सारी रात्र जागून काढली असे मात्र आपण समजू नका. तर याउलट मी विचारलेले प्रश्न योग्य होते की नाही व आपण दिलेली उत्तरे समर्पक होती की नाही, याच गोष्टीचा विचार करीत असता रात्र कशी गेली ते सुद्धा मला कळले नाही. अखेर खूप विचारांनी मला तसेच आढळून आले.''

यावर स्थवीर म्हणाले, ''महाराज, राजाच्या प्रश्नांची उत्तरे किती संतोषजनक दिली, अशा विचारात मी सुद्धा सारी रात्र जागा असेन. असे मात्र आपण समजू नये. तर मी सुद्धा आपल्या सारखाच विचार करीत होतो आणि तुमच्याप्रमाणेच मी सुद्धा निर्णयाला पोचलो.''

याप्रमाणे त्या दोन्ही महापुरूषांनी परस्परांचे अभिनंदन केले.

**(मिलिंद राज्याच्या प्रश्नांची उत्तरे समाप्त)**

# खण्ड ४ (प्रकरण पहिले)

# मेण्डक प्रश्न

## (क) महावर्ग

### १. *मेण्डकारंभ कथा

वक्तृत्वात राजा मिलिंदाचा हातखंडा होता. तसा तो तर्कप्रिय, हुशार आणि बुद्धिमान होता. नागसेन किती ज्ञानी आहे, याची परीक्षा पाहण्याचा त्यांनी मनाशीच निश्चय केला.

स्थवीरांच्या जवळ बसून राजाने प्रश्न विचारण्यात आपली सर्व बुद्धी कौशल्य पणास लावले. पुन्हा-पुन्हा प्रश्न, प्रतिप्रश्न विचारून आपली हार मानली व अखेरीस. त्रिपिटकाचे सिद्धांत त्याला प्रमाण वाटू लागले.

रात्रीचा समय होता. जिकडे-तिकडे निरव शांतता पसरली होती. सर्व प्राणी जगत निद्रादेवीच्या कुशीत झोपी गेले होते. कोणीही जागे असण्याचे लक्षण दिसत नव्हते. अशा शांत-शांत. वातावरणात एकांत स्थळी राजा मिलिंद धर्माच्या विषय संबंधाने विचार करीत बसला होता. तेव्हा त्याला मेंडक नामक अत्यंत गुंतागुंतीचे अतिशय कठीण असे प्रश्न आठवले. तेव्हा त्याने विचार केला की, धर्मराज (बुद्धाच्या) शासनात (उपदेशात) काही गोष्टी पर्यायाने सांगण्यात आल्या आहेत. तर काही प्रसंगानुसार कोणते दृश्य समोर होऊन सांगण्यात आल्या आहेत आणि काही केवळ साधारण गोष्टी समजावून देण्यासाठीच सांगण्यात आल्या आहेत. परंतु त्यांचा तंतोतंत अर्थ न समजल्यामुळे भविष्यात मतभेद निर्माण होण्याची शक्यता आहे. कारण भगवान बुद्धाने निरनिराळ्या वेळी अतिसूक्ष्म व वेगवेगळे कथन केले आहे. ते न समजल्यामुळे प्रत्येक वेळी अज्ञानतावश झगडे झालेत. म्हणून हे गुंतागुंतीचे व दुर्बोध प्रश्न आयुष्मान नागसेनाकडून सोडवून घेणेच योग्य ठरेल. कारण यांतील काही गोष्टी चमत्कारिक आहेत तर काही गोष्टी एकदम विसंगत आहेत, तेव्हा भविष्यात भगवान बुद्धाच्या

---

** मेंडकाचा अर्थ आहे बकरा. बकऱ्याला टोकदार व पिळलेले दोन शिंगे असतात. त्याच प्रमाणे मेंडक प्रश्नातही दोन विकल्प-अडचणी ठेवण्यात येतात, ते दोन्ही विकल्प अतिशय आपत्तीजनक असतात. इंग्रजीत याला The Two Horns of a Dilemma असे म्हणतात. मराठीत याचा अर्थ गुंतागुंत किंवा अडचण असा होतो.*

धर्मसंबंधाने मार्गदर्शक ठरावे म्हणून नागसेनांनी दिलेली उत्तरे फार मोठा आधार ठरतील.

दुसरे दिवशी सकाळी सूर्योदय होताच मिलिंद राजाने स्नान केले आणि भूतकाळातील, भविष्य काळातील आणि वर्तमान काळातील सर्व बुद्धांना अंजलीबद्ध प्रणाम केला. त्यानंतर अष्टशील उपोसथ व्रताचे पालन करण्याचा त्यांनी संकल्प केला तो असा –

''मी आजपासून सात दिवस पर्यंत या आठ शीलांचे पालन करण्याचे व्रत ग्रहण करतो. व्रताचरणाने मी माझ्या गुरूस प्रसन्न करून त्यांची मर्जी संपादन करेन व त्यानंतर त्यांना हे अत्यंत कठीण असे मेंडक नामक प्रश्न विचारेन.''

त्याप्रमाणे मिलिंद राजाने आपल्या अंगावरील नेहमीची राजवस्त्रे व आभूषणे काढून ठेवली. लहान आकाराची फिक्कट काषाय वस्त्र अंगावर धारण केले, मुकूटाऐवजी एक लहानसा रूमाल डोक्यास बांधला. तेव्हा तो एखाद्या तपस्व्यासारखा दिसू लागला व तपस्व्यासारखाच राहू लागला.

या आठवड्यात त्याने कोणते राज्य केले नाही. न्यायालयात देखील कोणत्याही बाबींचा निर्णय घेतला नाही. कोणत्याही प्रकारची लालसा, द्वेशजनक विचार किंवा भ्रामक कल्पनांना तर आपल्या मनात मुळीच थारा दिली नाही. नोकर – चाकराप्रती नम्र व प्रसन्न असेच आचरण ठेवले. आपल्या शरीर व वचनावर पूर्णपणे संयम ठेवून सहा आयतनांचे दक्षतेने रक्षण केले. आपल्या मनास मैत्री भावनेत परोपरीने गुंतवून ठेवले. पूर्ण आठवडाभर कोठेही न जाता केवळ अष्टशीलाचेच तो चिंतन करीत राहिला.

अशा तऱ्हेने सात दिवस लोटले आणि आठव्या दिवशी प्रातःकाळी स्नान करून त्याने जलापान आटोपले. विचारात मग्न, अंतःकरणात आनंद व प्रफुल्ल अशा अवस्थेत स्थिरदृष्टीने केवळ पायापासून दोन गजावर दृष्टी ठेवून चालत असता राजा मिलिंद स्थवीर नागसेनाकडे गेला आणि त्यांच्या पायावर डोके ठेवून श्रद्धापूर्वक प्रणाम करून हात जोडून एके बाजूस उभा राहीला व म्हणाला –

''भंते, मी आपणाशी एकांतात काही बोलू इच्छितो. तेथे कोणीही तिसरा मनुष्य असता कामा नये. बौद्ध भिक्षूंना राहाण्यास योग्य अशा आठही अंगांनी युक्त निर्मनुष्य, जंगलातील निवांत स्थळी मी माझे विचार आपणास सांगावे असे मला वाटते. आपण उभयतात कोणतीही गोष्ट गुप्त अगर रहस्यमय असू नये. भंते, गंभीर स्वरूपाची सल्लामसलत चालता असता जे रहस्य उघड केले जाते; ते ऐकण्याइतका मी पात्र झालो आहे, असे मला वाटते. आपल्या मनातील भाव उपमेच्या आधाराने देखील स्पष्ट करता येतात.

भंते, ज्याप्रमाणे या धरणीवर विश्वास ठेवून मौल्यवान धनदौलत त्यामध्ये पुरून सुरक्षित ठेवली जाते. तद्वतच मी सुद्धा आपणाकडून अत्यंत गंभीर स्वरूपाचे रहस्य ऐकून ते सुरक्षित ठेवण्यास पात्र आहे, यात मुळीच शंका नसावी.''

राजा मिलिंद आणि त्यांचे गुरू नागसेन हे दोघेही ठरल्याप्रमाणे अशाच एका शांत ठिकाणी पोचले. तेव्हा राजा म्हणाला, ''भंते, धर्माच्या गूढ अशा रहस्यमय तत्वावर चर्चा करणारांनी आठ प्रकारच्या स्थळांना टाळणेच बरे. या आठ ठिकाणी कोणताही बुद्धिमान मनुष्य अशा धर्मचर्चा करणार नाही. कारण चर्चा करून सुद्धा काहीच निर्णय लागत नाही आणि मुद्दा तसाच पडून राहतो.''

## (क) धर्म चर्चेस अयोग्य अशी आठ स्थाने

''ही आठ स्थाने अशी आहेत''

''१) चढउताराचे स्थान, २) असुरक्षित भयावह असे स्थान, ३) वादळी वारे वाहत असलेले स्थान, ४) अत्यंत गुप्त असे स्थान, ५) पवित्र असे देवस्थान, ६) जेथे अधिक रहदारी आहे असे स्थान, ७) पूल आणि ८) घाट''

स्थवीर म्हणाले, ''महाराज, या स्थळांमधील दोष कोणते की, जेणेकरून ही स्थाने त्याज्य मानावी?''

राजा म्हणाला, ''भंते चढउतार असलेल्या स्थानावर मन लागत नाही. त्यामुळे चर्चा विस्कटल्या जाऊन कोणताच निष्कर्ष निघत नाही. असुरक्षित भयावह ठिकाणी काळजीने चित्ताची तारांबळ उडत असते. त्यामुळे चर्चेत मन लागत नाही. अधिक वादळी वारे वाहत असलेल्या ठिकाणी परस्परांचे शब्द नीट ऐकू येत नाहीत. अत्यंत गुप्त अशा स्थानी चर्चा करीत असता कोणी दुसरा ती लपून ऐकण्याची शक्यता असते. पवित्र देवस्थानी चर्चेचा विषय विनाकारण गंभीर होण्याची शक्यता असते. अधिक रहदारी असलेल्या रस्त्यावर चर्चेचे स्वरूप उद्धटपणाचे होण्याची शक्यता असते. पुलावर बसून चर्चा करीत असता त्यात चंचलता येऊन संभाषण उथळ होण्याची शक्यता असते. आणि सार्वजनिक घाटावरील चर्चा सर्वस्वी जाहीर होतात. यासाठीच असे म्हटले आहे की, धार्मिक विषयावर सल्लामसलत करण्याकरीताही आठ स्थाने त्याजय मानली पाहिजेत.''

## (ख) धार्मिक चर्चा करण्यास अयोग्य अशा आठ व्यक्ती

''भंते नागसेन, चर्चेचा विषय बिघडवून अर्थाचा अनर्थ करणारे आठ प्रकारचे लोक असतात म्हणून महत्वपूर्ण चर्चा करीत असता त्यांचा संग टाळला पाहिजे.'' ते आठ प्रकारचे लोक असे -

''१) लालसी २) द्वेषी म्हणजे दुष्ट, ३) भ्रमिष्ट, ४) गर्विष्ट, ५) लोभी, ६) आळशी, ७) एकच कल्पना धरून ठेवणारे हट्टी आणि ८) मूर्ख.''

स्थवीर म्हणाले, ''महाराज, या आठ प्रकारच्या लोकांत कोणते दोष आहेत की, जेणेकरून त्यांचा संग त्याज्य मानला आहे?''

''भंते, लालसी व्यक्ती लालसेपायी, दुष्ट व्यक्ती आपल्या दुष्टपणाने, भ्रमिष्ट व्यक्ती अभिभूत स्वभावामुळे म्हणजे भ्रामक कल्पनामुळे, गर्विष्ट व्यक्ती गर्वाभिमानाने, लोभी व्यक्ती लोभाच्या कारणाने, आळशी मनुष्य आळसामुळे, एकच कल्पना धरून ठेवणारा हट्टी मनुष्य संकुचितपणाने आणि मूर्ख व्यक्ती मूर्खपणामुळे एकदमच अर्थाचा विचका करून टाकतो.''

याच कारणाने तथागताने म्हटले आहे -

**रत्तो दुट्ठो च मूळहो च मानी लुद्धो तथा' लसो।**

**एक चिन्ती च बालो च एते अत्थविनासका' ति।।**

## (ग) गोपनीयता न राखणारे नऊप्रकारचे व्यक्ती

''भंते, गुप्त गोष्टी सुद्धा न पचविता त्या जिकडे तिकडे सांगत सुटणारे नऊ प्रकारच्या व्यक्ती विद्यमान आहेत. कोणतीही सांगितलेली गोष्ट ते हृदयात ठेऊ शकत नाही.''

''ते नऊ प्रकारचे लोक कोणते आणि त्यांच्यातील दोष कोणता?''

''ते नऊ प्रकारचे लोक असे -''

''१) लालसी मनुष्य लालसेच्या आहारी जाऊन गुप्त गोष्ट प्रसृत करतो, २) द्वेषी मनुष्य विध्वंसक विचारसरणीमुळे कटाळा बळी पडून गुप्त गोष्ट प्रसृत करतो, ३) भ्रमिष्ट मनुष्य मोहाला बळी पडून गुप्त गोष्ट प्रसृत करतो, ४) भित्रा मनुष्य भेकड स्वभावामुळे गुप्त गोष्ट प्रसृत करतो, ५) घुसखोर मनुष्य स्वार्थापायी गुप्त गोष्ट प्रसृत करतो, ६) स्त्री ही आपल्या दुर्बलतेमुळे गुप्त गोष्टी प्रसृत करते, ७) दारूड्या मनुष्य दारूच्या नशेत सर्व गुप्त गोष्टी प्रसृत करतो, ८) नपुंसक मनुष्य आपल्या अपूर्णत्वामुळे सर्व गुप्त गोष्टी प्रसृत करतो आणि ९) बालक आपल्या मनमोकळेपणामुळे गुप्त गोष्टी न पचविता उघड करून टाकतो.''

यामुळेच भगवान बुद्धाने म्हटले आहे की -

**रत्तो दुट्ठो च मूळहो च भीरू अमिसचक्खुमो।**

**इत्थी सोण्डो पण्डको च नवमो भवति दारको।।**
**नवेते पुग्गला लोके इत्तरा चलिताचला।**
**एतेहि मन्तितं गुह्यं खिप्पं भवति पाकटन्ति।।**

### (घ) आठ कारणाने बुद्धीत प्रौढता येते

''भंते, आढ कारणाने मनुष्याची बुद्धी परिपक्क होते आणि ज्ञानवृद्धी होते. ती आठ कारणे अशी -

''१) वयवृद्धीमुळे २) यश प्राप्तीमुळे, ३) वारंवार प्रश्न विचारल्यामुळे, ४) गुरूच्या संगतीत राहिल्यामुळे, ५) स्वतःच चांगल्याप्रकारे विचार करीत असल्यामुळे ६) चांगल्या लोकांशी वार्तालाप करीत असल्यामुळे, ७) मनाला प्रेम भावनेचे संवय जडल्यामुळे, आणि ८) अनुकूल स्थळी वास्तव्य करीत असल्यामुळे मनुष्याची बुद्धी परिपक्व अर्थात प्रौढ बनते.''

यामुळेच तर भगवंताने म्हटले आहे की-

**वयेन यसपुच्छाहि तित्यवासेन योनिसो।**
**साकच्छा पीती-संसेवा पतिरूप वसेन च।।**
**एतानि अट्ठुट्ठानानि बुद्धिविसद-कारका।**
**येसं एतानि सम्भोन्ति तेसं बुद्धि पभिज्जती' ति।।**

### (ङ) शिष्याप्रती आवार्यांचे पंचवीस कर्तव्य

''भंते, नागसेन, हे ठिकाण वैचारिक चर्चेसाठी बाधक ठरणाऱ्या आठही दोषापासून मुक्त आहे आणि त्यासाठी मी सुद्धा गुरूबद्दल नितांत आदर बाळगणारा, अतिशय योग्य असा शिष्य आहे. गुरूशिष्यातील जे काही रहस्य गुप्त राखावयास पाहिजे ते मी, आजीवन गुप्त ठेऊ शकतो. कधी उघड करून दाखवणार नाही. इतकी माझी वैचारिक पातळी उंचावली आहे. कारण वर सांगितलेल्या आठही कारणाने माझी बुद्धी परिपक्व अर्थात प्रौढ झाली आहे. मला वाटते आपणास माझ्या सारखा सदाचारी व विद्वान शिष्य मिळणे कठीणच नव्हे तर अशक्य आहे.''

''अशा चोख वर्तन ठेवणाऱ्या शिष्याचा गुरू २५ सद्गुणांनी युक्त असावयास पाहिजे. गुरूच्या अंगी असलेले २५ सद्गुण कोणते?''

''भंते, १) आपल्या शिष्यावर गुरूने सदैव देखरेख ठेवली पाहिजे, २) कोणते नियम पाळावे व कोणते कर्तव्य त्याज्य मानावे यासंबंधी सदैव उपदेश करीत राहिले

पाहिजे, ३) कोणत्या गोष्टीत दक्षता बाळगावी व कोणत्या गोष्टीकडे दुर्लक्ष करावे यासबंधी उपदेश देत राहिले पाहिजे. ४) त्याचे खान-पान व झोपणे इत्यादी बाबीकडे लक्ष ठेवले पाहिजे. ५) आजारात लक्ष घातले पाहिजे, ६) आतापर्यंत त्याने काय मिळविले आणि काय नाही, याबीबींकडे लक्ष ठेवले पाहिजे, ७) त्याच्या चारित्र्याकडे लक्ष ठेवले पाहिजे, ८) भिक्षा पात्रात जे काही मिळाले असेल, ते वाटून खाल्ले पाहिजे, ९) 'घाबरू नकोस हेही तुला समजेल' असे म्हणून त्यास प्रोत्साहित केले पाहिजे, १०) त्यांनी कोणाची संगत करावी याविषयी वारंवार सांगत राहिले पाहिजे. ११) शिष्याने कोणत्या गावी जावे हेही सांगितले पाहिजे, १२) त्याने कोणत्या विहारात जावे हे ही सांगितले पाहिजे, १३) त्याच्याशी गप्पा ठोकत व्यर्थ वेळ घालवू नये, १४) त्याचे दोष दिसून आल्यास सहसा त्याला गुरूने क्षमा केली पाहिजे, १५) त्याला मन लावून दिले पहिजे, १६) अनाठाई त्याला सुटी न देता शिकविले पाहिजे, १७) शिष्या-पासून ज्ञान लपवून ठेऊ नये, १८) आपल्या जवळील सर्व ज्ञान उत्साहपूर्वक शिष्यास शिकविले पाहिजे, १९) शिष्यास आपला ज्ञान-पुत्र समजून गुरूने त्यावर पुत्रवत प्रेम ठेवले पाहिजे, २०) तो आपल्या उद्दीष्टांपासून वळणार नाही, याची खबरदारी गुरूनी घेतली पाहीजे. २१) ज्ञानकण खाऊ घालुन याला वाढवित आहे, असा विचार गुरूने सतत आपल्या मनात ठेवला पाहीजे. २२) गुरूने शिष्याप्रती मैत्रीभावनेने प्रेमळ वर्तन ठेवले पाहिजे, २३) त्यावर आपत्ती आली असता, त्याला सोडून न देता त्याचे रक्षण केले पाहिजे, २४) त्याला शिकविण्यासारख्या गोष्टीकडे दुर्लक्ष करू नये आणि २५) धर्मापासून शिष्य ढळत असल्यास त्याला सावरून धरले पाहिजे.''

''भंते, योग्य आचार्यांच्या अंगी हेच २५ सद्गुण असले पाहिजेत, जेणेकरून ते आपल्या योग्य शिष्याप्रती व्यवहार करतील. आपण याच सद्गुणाप्रमाणे मला वागणूक द्यावी, भंते, मला काही शंका येत नाहीत. म्हणजे भगवान बुद्धाने ज्या मेंडक प्रश्नासंबंधाने उपदेश केला आहे, त्यात काही काही ठिकाणी उघड-उघड विसंगती दिसून येते, त्याबद्दल भविष्यात लोकांमध्ये मतभेद निर्माण होण्याची शक्यता नाकारता येत नाही. या सबबीवर धर्मांचे शत्रू फायदा घेण्यास चुकतील, असेही वाटत नाही, तेव्हा त्यांना मुळी वावच मिळू नये म्हणून या विषयावर आपण प्रकाश टाकावा आणि माझ्या शंका दूर कराव्यात. कारण भविष्यात आपल्यासारखा विद्वान दुरदर्शी गुरूचा लाभ होणे दुर्मिळ आहे.''

## (च) उपासकांचे दहा गुण

स्थवीरांनी मिलिंद राजाची विनंती मान्य करून योग्य शिष्याच्या अंगी दहा गुण असले पाहिजेत म्हणून ते पुढे म्हणाले, ''महाराज उपासकाच्या अंगी देखील हे दहा

सद्गुण असले पाहिजेत, तरच तो योग्य उपासक बनू शकतो. ते दहा गुण असे -
''

''१) उपासकाने आपल्या भिक्षूविषयी पूर्णपणे सहानुभूती बाळगावी, २) धर्माला सर्वश्रेष्ठ मानावे, ३) भिक्षूस यथाशक्ती दान देण्यास चुकू नये, ४) धर्माचा लोप पावत आहे असे दिसून आल्यास धर्माच्या पुनरूज्जीवनासाठी पराकाष्ठेचे प्रयत्न केले पाहिजेत, ५) तो त्रिरत्नाप्रती योग्य विचारसरणी ठेवीत असतो. ६) असा उपासक केवळ जिज्ञासेपायी सर्वत्र प्रसिद्धी मिळेल म्हणून इतरांच्या मतात न जाता धर्माप्रती व गुरूप्रती एकनिष्ठ राहतो, ७) असा उपासक सतत आपल्या विचारावर व कृतीवर लक्ष ठेवतो, ८) तो शांतता प्रिय असतो, ९) एकतेचा प्रशंसक असतो, आणि १०) असा शिष्य केवळ धर्माचे दिखाऊ अवडंबर माजवीत नाही, तर तो यथार्थाने बुद्ध, धर्म व संघाचे ठाई त्याची नितांत श्रद्धा व निष्ठा असते. महाराज योग्य उपासकाच्या अंगी असणारे हे सर्व १० सद्गुण आपल्या अंगी विद्यमान आहेत. येणाऱ्या गंडातरापासून धर्माला वाचविण्याचा व धर्माची पुनश्च भरभराट व्हावी म्हणून आपण योग्य दिशेने पावले टाकीत असून त्यासाठी आपली सर्व शक्ती पणास लावीत आहात. हे आपल्या करीता उचित, योग्य आणि खरोखरच शोभण्यासारखे आहे. महाराज, मी आपणास हवे ते प्रश्न विचारण्याची मान्यता देत आहे. आपण कोणतेही प्रश्न विचारा.''

## २. बुद्ध पूजा

आयुष्मान नागसेनाने मिलिंद राजाला प्रश्न विचारण्याची संमती दिली तेव्हा राजाने अंजलीबद्ध प्रमाण केला व म्हणाला -

''भंते, निरनिराळ्या मतांच्या लोकांचे म्हणणे आहे की - भगवान बुद्धांच्या मानसन्मानार्थ केलेली पूजा जर भगवान बुद्ध स्वीकारतात. तर त्यांना निर्वाणपदाचा लाभ झाला असे म्हणता येणार नाही आणि ते या संसारात कोठे निश्चितच भटकत असतील. त्यांचे सद्यस्थितीत संसारातील अस्तित्व मुळीच नाकारता येणार नाही. जर हे खरे असेल तर भगवान बुद्ध अगदीच साधारण व्यक्ती झालेत, मग त्यांची पूजा करण्यात अर्थ तो काय?''

''आणि समजा, त्यांना जर निर्वाणपद लाभले असेल, संसाराशी आता त्यांचा मुळी संबंधच राहिलेला नसेल आणि ते समस्त स्थितीतून मुक्त झाले असतील, तर त्यांची पूजा करण्यात काय स्वारस्य? कारण ते जर आहेतच नाहीत, तर पूजा करावी कोणाची? त्याचप्रमाणे भगवान बुद्धाला निर्वाणपद मिळाले असे म्हटले तरी प्रश्न सुटत

नाही व निर्वाणपद नाही मिळाले म्हटले तरी प्रश्न सुटत नाही. त्यामुळे दोन्ही बाजूंनी विवादात सापडलेल्या भगवान बुद्धाची पूजा करण्यात काहीच अर्थ उरत नाही.''

''हा प्रश्न सामान्य बुद्धी असलेल्या माणसाच्या शक्तीच्या पलीकडला आहे. सामान्य लोकांसाठी हा विषय नाही. महान लोकच हा प्रश्न सोडवू शकतात. आता आपणच कृपाकरून या प्रश्नोच सडेतोड उत्तर देऊन मिथ्या तर्काचे खंडन करावे. यासाठीच हा प्रश्न आपल्यापुढे ठेवण्यात आला आहे. या प्रश्नामुळे उत्पन्न होणाऱ्या स्थितीचा विरोधकांना फायदा घेता येणार नाही, तेव्हा भावी बौद्धांच्या सोयीसाठी या कोड्याची सोडवणूक करून प्रकाश पाडावे. जेणे करून ते दुसऱ्या मताच्या लोकांच्या कुतर्कास झणझणीत उत्तर देऊ शकतील.''

यावर स्थवीर म्हणाले, ''महाराज, भगवान बुद्धांना महापरिनिर्वाणाचा लाभ झाला हे सूर्यप्रकाशा इतकेच खरे आहे. ते आता कोणत्याही पूजेचा स्वीकार किंवा अस्वीकार मुळीच करीत नाहीत. बोधिवृक्षाखाली बुद्धत्वाची प्राप्ती करून ते या प्रश्नाच्या पलीकडे गेले होते. तेव्हा आता संसारातून पूर्णतः मुक्त होऊन निर्वाण प्राप्त केल्यानंतर प्रश्न उरतोच कुठे?''

''महाराज, धर्म सेनापती सारिपुत्रांनी सुद्धा म्हटले आहे की, ज्यांची बरोबरी करू शकणारा आजपर्यंत कोणी झाला नाही, ते भगवान बुद्ध देवता व मनुष्य या उभयतांनी केलेल्या पूजेचा स्वीकारही करीत नाही की, अस्वीकारही करीत नाहीत. युगानुयुगापासून सर्व बुद्धांचा हाच सिद्धांत चालत आला आहे.''

राजा म्हणाला, ''भंते, पुत्र आपल्या पित्याची किंवा पिता आपल्या पुत्राची स्तुती करीत असेल तर त्याला प्रशंसा म्हणता येणार नाही. त्या तर आपापल्या मनातील भावना आहेत. परंतु खोट्या सिद्धांताची पाठराखण करणाऱ्या लोकांचा भ्रम दूर करण्याकरीता आणि आपल्या सद्धधर्माचा प्रकाश पसरविण्याकरिता आपण योग्य तऱ्हेने समजावून सांगावे.''

स्थवीर म्हणाले, ''महाराज, भगवान बुद्ध तर पूर्णतः मुक्त झाले आहेत. तेव्हा ते आता कोणत्या पूजेचा स्वीकार किंवा अस्वीकार कसे करतील? परंतु देवता आणि मनुष्य लोक त्यांची विहारे व स्तूप बांधून त्यात त्यांच्या अस्थी, कोश, दात इत्यादी शरीर धातूंची स्थापना करून ठेवतात, ज्यांच्या पुण्य फळाने अर्हतपद किंवा बोधिसत्व पद प्राप्त करता यावे. याशिवाय त्या धातूची पूजा करून त्यांनी सांगितलेल्या ज्ञान रत्नानुसार आचरण करून तिन्ही समापत्तीचा लाभ करून घेतात. यासाठीच विहारादी उभारणे किंवा पूजा करणे आवश्यक आहे.''

## (१) अग्नीची उपमा

''महाराज, समजा एखाद्याने फार मोठी अग्नी पेटवून नंतर ती विझवून टाकली. तर ती निर्जीव अग्नी पुनः त्यात टाकलेल्या गवताच्या लाकडाचा किंवा अशाच दुसऱ्या प्रकारच्या इंधनाचा स्वीकार करील काय?''

नाही भंते, जवळ असलेला अग्नीच जर स्वतः होऊन इंधनाचा स्वीकार करीत नाही तर तो एकदम विझून शांत झालेला अग्नी कसा काय लाकडाच्या इंधनाचा स्वीकार करील?

''महाराज, तर काय हा मोठी अग्नी विझून शांत झाल्यानंतर जगातील सर्वच अग्नी नष्ट झाली काय?''

''मुळीच नाही भंते, अग्नी तर वाळलेल्या लाकडातून उत्पन्न होते, ज्या कोणाला अग्नीची आवश्यकता असेल, तो आपल्या सामर्थ्याचे अरणीचे (दोन लाकडांचे) घर्षण करून अग्नी उत्पन्न करू शकेल आणि त्यापासून आपले कार्येही त्याला करता येईल.''

महाराज, तर मग त्या खोट्या सिद्धांताची पाठराखण करणाऱ्या दुसऱ्या मतांच्या लोकांनी भगवान बुद्धाबद्दल घेतलेला आक्षेप घेतले आहे ते सर्व खोटे ठरतात की 'पूजेचा स्वीकार न करणारांची पूजा करणे व्यर्थ आहे.'

''महाराज, जसा तो मोठा अग्नी पेटविण्यात आला तसेच भगवान बुद्ध सुद्धा आपल्या ज्ञान तेजाने या समस्त दहार जार लोक विश्वात अग्नीपुंजासारखे प्रकाशमान झालेत आणि जसा तो अग्नी विझून शांत झाला, तसेच भगवंताने निर्वाणपदाची प्राप्ती करून त्यांची संसारातून एकदम आपली आवागमनापासून सुटका करून घेतली. ज्याप्रमाणे पूर्णपणे पेटविलेला अग्नी विझून थंड झाल्यानंतर तो कोणत्याही लाकडादी इंधनास जाळू शकत नाही तसेच संसारावर महान उपकार करणारे भगवान बुद्ध स्वीकार व अस्वीकार या प्रश्नापासून अगदी मुक्त झालेत आणि ज्याप्रमाणे अग्नी विझून गेल्यानंतर सुद्धा अग्नीची आवश्यकता भासल्यास कोणी अरणीचे घर्षण करून अग्नी उत्पन्न करू शकतो तद्वतच देवता आणि मनुष्य भगवंताच्या अष्टधातूची पूजा करून किंवा विहार, स्तूपादी उभारून आणि तथागतांनी सांगितलेल्या सद्धर्मानुसार आचरण करून ते बुद्ध तेज निर्माण करू शकतात आणि तिन्ही समापत्तीचा लाभ करून घेऊ शकतात.'' —

''महाराज, यामुळेच भगवान बुद्धाने जरी महापरिनिर्वाण प्राप्त केले असले तरी त्यांच्या प्रती केली जाणारी पूजा अचूक फळ देणारी ठरते आणि ध्येय साध्य करून देणारी ठरते.''

## (२) वादळाची उपमा

''महाराज, भगवान बुद्धाने महापरिनिर्वाणाचा लाभ करून घेतला असला तरी त्यांची प्राप्ती केली जाणारी पूजा अचूक फळ देणारी व सत्कारणी ठरते याविषयी अजून एक कारण ऐकावे.''

''महाराज, समजा, एकदा खूप मोठे वादळ आले आणि हळूहळू ते शांत झाले तर ते एकदा शांत पावल्यानंतर पुनः फिरून येईल काय?''

''नाही भंते, शांत पावलेले वादळ पुनः कसे काय फिरून येऊ शकेल?''

''असे कां होऊ नये?''

''कारण की, वादळ म्हणजे अगदीच उचेतन वस्तू आहे. त्याला इच्छा ती कशी नसतेच.''

''महाराज, ते शांत पावल्यानंतरही त्यास वादळ नावानेच ओळखले जाते काय?''

''नाही भंते, परंतु पंखा हेही एक वारा निर्माण करण्याचे साधन आहे. ज्या कोणाला उकाडा जावणत असेल किंवा ताप आल्यामुळे वाऱ्याची गरज भासत असेल तर पंख्याच्या साहाय्याने वारा निर्माण करता येतो. काही प्रमाणात का होईना पण त्या वाऱ्यापासून उकाडा किंवा ताप या अवस्थेत आराम मिळविता येते.''

''महाराज, तर मग त्या खोट्या सिद्धांताची पाठराखण करणाऱ्या दुसऱ्या मतांच्या लोकांनी भगवान बुद्धाबद्दल घेतलेला आक्षेप खोटा ठरतो की, 'पूजेचा स्वीकार न करणारांची पूजा करणे व्यर्थ आहे.''

''महाराज, जसे ते वादळ आले, त्याचप्रमाणे भगवान बुद्ध सुद्धा आपल्या शीतल, मधुर, शांत, सुखदायक, आणि मैत्रीरूपी वायू लहरींनी या दहा हजार लोक धातूंवर वाहत राहिले. ज्याप्रमाणे ते वादळ येऊन शांत झाले तद्वतच भगवान बुद्धाने निर्वाणाचा लाभ करून संसारातून मुक्ती प्राप्त करून घेतली. जसे शांत झालेले वादळ पुनः परत येण्याची इच्छा करीत नाही, तसेच या जगतावर महान उपकार करणारे तथागत स्वीकार किंवा अस्वीकाराच्या कामनेतून पूर्णतः मुक्त झाले. जसे ते मनुष्य गर्मीमुळे किंवा तापामुळे तळमळत होते, तसेच देवता आणि मनुष्य लोक लालसा, दुष्टपणा व भ्रमरूपी तापाने तळमळत आहेत. ज्याप्रमाणे पंखा हा वायू उत्पन्न करण्याचे साधन आहे तद्वतच भगवान बुद्धाचे शरीर-धातू-रत्न हे तिन्ही समापती आणण्याकरीता साधन आहेत. ज्याप्रमाणे गर्मी व तापाने तळमळणारे लोक पंखा लावून वारा उत्पन्न करतात आणि ताप दूर

करतात त्याचप्रमाणे देवता आणि मनुष्य लोक शरीर धातूंची पूजा करून व भगवान बुद्धाने सांगितलेल्या ज्ञान रत्न-मार्गाचे आचरण करून पुण्य लाभ करतात आणि लालसा, दुष्टपणा व भ्रमरूपी अग्नीच्या तापास दूर करतात.''

''महाराज, याच कारणाने जरी भगवान बुद्धाने महापरिनिर्वाण प्राप्त केले असले तरी त्यांच्या प्रती केली जाणारी पूजा ही तत्काळ फळ देणारी आणि ध्येय साध्य करून देणारी ठरते.''

### (३) ढोलाची उपमा

''महाराज, एक आणखी कारण ऐका ज्यांच्यामुळे भगवान बुद्धाने परिनिर्वाण लाभ केला असला तरी त्यांच्या प्रती केली जाणारीपूजा अचूक फळ देणारी आणि ध्येय साध्य करून देणारी ठरते.''

''महाराज, कोणी एका मनुष्याने ढोलावर थाप मारली असता आवाज निघून नंतर बंद झाला, तर काय तो बंद झालेला आवाज पुनः फिरून येण्याची इच्छा करील काय?''

''नाही भंते, शिवाय आवाजास विचार नाही की, कल्पना नाहीत. एकदा आवाज निर्माण होऊन बंद पडला म्हणजे पुनः निर्माण होण्याची त्याला इच्छा ती कशी व्हावी? ढोलाचा आवाज निर्माण होऊन बंद पडला म्हणजे पुनः निर्माण होण्याची त्याला इच्छा ती कशी व्हावी? ढोलाचा आवाज निर्माण होऊन बंद पडला की, तो कायमचाच बंद होतो. परंतु आवाज काढण्याकरीता ढोल हे एक साधन आहे. तेव्हा जर तसा प्रसंग आलाच तर कोणीही मनुष्य ढोलावर थाप मारून आवाज उत्पन्न करू शकतो.''

''महाराज, याच उदाहरणाप्रमाणे भगवान बुद्ध शील, समाधी, प्रज्ञा, विमुक्ती, विमुक्तिजान आणि दर्शनाने परिभावीत शरीर धातूरूपी रत्ने, धर्म आणि विनय इत्यादी देवून स्वतः निर्वाण लाभ करून संसारातून स्वतःची सुटका करून घेतली परंतु भगवान जरी मुक्त झाले असले तर तिन्ही समापत्तींचा लाभ काही थांबत नाही. सांसारिक दुःखाने त्रस्त झाल्यामुळे जे कोणी या तिन्ही समापत्तीचा लाभ करू इच्छितात, ते भगवान बुद्धाच्या विहारांची निर्मिती करून त्यात यांच्या शरीर धातूंची स्थापना करतात आणि श्रद्धाभावे त्या धातूंची पूजा करून त्यांनी सांगितलेले ज्ञानमार्गाचे आचरण करूनच ते तिन्ही समापत्तींचा लाभ करून घेऊ शकतात.''

''महाराज, याच कारणाने जरी भगवान बुद्धाने परिनिर्वाणाचा लाभ करून घेतला असला तरी त्यांच्या प्रती केली जाणारी पूजा अचूक फळ देणारी आणि ध्येय साध्य

करून देणारी आहे.''

''महाराज, भगवंताने भविष्यात घडून येणारा हा प्रसंग तेव्हाच आपल्या दूरदृष्टीने जाणून घेतला होता. म्हणूनच त्यांनी समजावून सांगितले होत की-''

''आनंद, तुमच्यापैकी कोणाच्या तरी मनात असे विचार येऊ शकतात की, आम्हाला मार्गदर्शन करणारे शास्ता (भगवान बुद्ध) तर निघून गेले. आता आम्हाला सद्धर्माची वाट दाखविणारा गुरू कोणी उरला नाही. परंतु तुम्ही असे समजून घेऊ नये. आनंद, असे पश्चाताप करण्यासारखे काहीही कारण नाही. मी ज्या सद्धर्मांचा आजपर्यंत उपदेश केला. संघासाठी पालन करावयाचे जे नियम सांगितले. माझ्यानंतर तेच तुम्हाला मार्ग दाखवतील म्हणून त्यांनाच तुम्ही माझ्यास्थानी मानले पाहिजे.''

''याही कारणाने जरी आता भगवान बुद्ध राहिले नाही व त्यांनी परिनिर्वाण प्राप्त केले असले तरी त्यांच्या प्रती केली जाणारी पूजा निरर्थक होऊ शकत नाही. इतर पंथांच्या लोकांनी घेतलेले आक्षेप अगदी खोटे, अन्यायी, वस्तुस्थितीस सोडून आणि केवळ विरोधाभास निर्माण करणारे आहेत, हे आता सिद्ध झाले. हे दुःखाचे कारण आहे, कारण दुःख हे खोटेपणाचे फळ आहे व अधःपाताच्या (नरकाच्या) मार्गाने नेणारे आहे.''

## (४) पृथ्वीची उपमा

''महाराज, एक अजून कारण ऐका. भगवान बुद्धाने परिनिर्वाण प्राप्त केले असले तरी त्यांचे प्रती केली जाणारी पूजा अचूक फळ देणारी व श्रेयस्कर का ठरते, याविषयी मी सांगत आहे.''

''महाराज, पृथ्वीला अशी इच्छा असते का की आपणास सर्वच प्रकारचे बीज पेरले जावे?''

''नाही भंते, ती अशी इच्छा कशी करील?''

''मग पृथ्वीची इच्छा किंवा मान्यता नसताही बीज फुटून रोपटे वाढून मोठमोठ्या खोडांचे, विस्तीर्ण शाखांचे वृक्ष होऊन जमिनीत आपली मुळे रूतवून ताठ उभे राहतात, फुलतात, फळतात. ते पृथ्वीच्याच आधाराने हे कसे घडते? त्यात बीज का पेरले जाते?''

''भंते, पृथ्वीकडून जरी मान्यता मिळाली नाही, हे खरे असले, तरीपण बीज फुटून रोपटे तयार होण्यासाठी व त्याच्या विकासासाठी पृथ्वीच आश्रय देते. पृथ्वीतच पेरलेले बीज उगवून ते विकसित होऊन शेवटी खोड तयार झाल्यानंतर फुले, फळे व

पहा दीघनिकाय ''महापरिनिर्वाण सूत्र'' बुद्धचर्या पृ. ५४१

विस्तीर्ण असा शाखासंभार धारण करणारे मोठे वृक्ष होतात.''

''महाराज, तर मग त्या खोट्या सिद्धांताची पाठराखण करणाऱ्या दुसऱ्या मताच्या लोकांनी भगवान बुद्धाबद्दल घेतलेला आक्षेप म्हणजे स्वीकार न करण्याप्रती केल्या जाणाऱ्या व्यवहारात काहीच अर्थ नाही. हा एकदम अशिष्ट, निरर्थक आणि खोटा ठरतो.''

''महाराज, भगवान अर्हत सम्यक सम्बुद्धांना या महान पृथ्वी समान समजले पाहिजे. या महान पृथ्वीप्रमाणेच ते कशाचाही स्वीकार किंवा अस्वीकार करीत नाहीत. ज्याप्रमाणे पृथ्वीच्या आश्रयाने बीज उगवून त्यांचेच मोठमोठे वृक्ष होतात, त्याचप्रमाणे भगवान बुद्धाच्या शरीर धातूंच्या सुरक्षिततेसाठी विहार व स्तूपांची उभारणी करून त्या अवशेषांची पूजा व भगवंताच्या आदेशाचे पालन इत्यादींचा आश्रय घेऊन देवता आणि मनुष्यलोक पुण्य फळरूपी मुळांनी मजबूत पकडून समाधि स्कंध, धर्मसार आणि शीला (सदाचार) चा शाखा संभार धारण केलेले मोठ मोठे वृक्ष तयार होतात आणि त्या वृक्षांना श्रामण्यरूपी फुले व विमुक्तिरूपी फळे येतात.''

''महाराज, याच कारणाने जरी भगवान बुद्धाने परिनिर्वाण प्राप्त केले असले, तरी त्यांचेप्रती केली जाणारी पूजा ही अचूक फळ देणारी ध्येयसिद्धीस कारण होणारी आहे.''

## (५) पोटातील कृमींची उपमा

''महाराज, एक अजून कारण ऐका.....''

''उंट, बैल, गाढवे, बकरे तसेच इतर जनावरे आणि मनुष्यप्राणी आपल्या उदरात कृमींनी उत्पन्न व्हावे म्हणून सम्मती देतात काय?''

''नाही भंते, तशी सम्मती ते कशी काय देणार?''

''तर मग महाराज, हे कृमी त्यांची मान्यता न घेताच त्यांच्या उदरात जन्मास येतात आणि असे ठाण मांडून बसतात की, जणू त्यांचीच हक्काची भूमी आहे. तेवढ्या-वरच ते थांबत नाही तर संतती देखील इतकी जन्मास घालतात की, विचारच करीत रहावे लागते.''

''भंते, असे त्या प्राण्यांच्या वाईट कर्माने घडते.''

''महाराज अगदी याच उदाहरणाप्रमाणे जरी भगवान बुद्धाने परिनिर्वाण प्राप्त केले असले आणि संसारातून एकदम आपली सुटका करून घेतली असली तरी पण

त्यांचेप्रती केली जाणारी पूजा अचूक फळ देणारी आणि ध्येयसिद्धीस कारण होणारी ठरते.''

## (६) आजाराची उपमा

''महाराज, अजून एक कारण ऐका.....''

''महाराज, आपल्या शरीरात १८ प्रकारच्या रोगांनी येऊन ठाण मांडून बसावे अशी अनुमती का मनुष्यप्रमाणी त्या रोगांनी देत असतो?''

''नाही भंते,''

''तर मग त्यांच्या शरीरात रोग कां बरे येतात?''

''त्यांनी केलेल्या पूर्वजन्मीच्या वाईट (पाप) कर्मांचा तो परिपाक आहे.''

''महाराज, जर मागील जन्मी केलेल्या वाईट पाप कर्मांची फळे या जन्मी भोगावी लागत असली, तर मागील जन्मी किंवा या जन्मी केल्या जाणाऱ्या चांगल्या (पुण्य) आणि वाईट पण कर्मांचीही फळे निश्चितच भोगावी लागणार. त्यामुळेच भगवान बुद्धाप्रती केली जाणारी पूजा निश्चितच अचूक फळ देणारी आणि ध्येय सिद्धीचे कारण होणारी ठरते. यावरून हेच सिद्ध होते. मग त्यांनी महापरिनिर्वाणाचा लाभ केला असला आणि या संसारातून आपली सुटका करून घेतली असली तरी त्यामुळे काहीच फरक पडणारी नाही.''

## (७) नंदक यक्षाची उपमा

''महाराज, अजून एक कारण ऐका.....''

''महाराज, आपण नंदक यक्षाबद्दल ऐकले आहे काय? त्याने स्थवीर सारपुित्रावर हात उचलला आणि त्याबरोबर जमिनीने त्यास आत सामावून घेतले (गिळंकृत केले.)''

''होय भंते, लोक असे सांगतात.''

''महाराज, मग काय स्थवीर सारिपुत्रानी तशी प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष इच्छा व्यक्त केली होती?''

''भंते, समस्त देवतांसह हे जग जरी उलटून पडले, चंद्र व सूर्य पृथ्वीवर कोसळले आणि पर्वतांचा राजा सुमेरू तुकडे-तुकडे होऊ न छिन्न-छिन्न झाला, तरी देखील स्थवीर सारिपुत्र कोणाला दुःखात लोटण्याचे विचार चुकून सुद्धा मनात आणू शकत नव्हते.''

''असे कां?''

''भंते का की, ज्या कारणाने राग किंवा द्वेष उत्पन्न होते त कारणच सर्वथा त्यांचे शांत पावले होते आणि मूळरहित झाले होते. म्हणूनच त्यांनी हत्या करण्यासाठी चालून आलेल्या व्यक्तिवर देखील त्यांनी कधी क्रोध केला नाही.''

''महाराज, तर मग स्थवीर सारिपुत्रांनी आदेश न देताही नंद नावांचा यक्ष जमिनीत कसा गडप झाला?''

''भंते, आपल्या पाप कर्माच्या फळामुळे त्याची ही गती झाली.'' असे राजा म्हणाला.

''महाराज, आता तुम्हीच पहा, कोणत्याही प्रकारचा शाप त्याला दिला नसला तरी पण स्थवीर सारिपुत्रांच्या प्रती केलेल्या पाप कर्माची फळे नंद यक्षास अशा तऱ्हेने भोगावी लागली. जर पाप कर्माची ही स्थिती आहे, तर पुण्य कर्माची कशी असेल? याचा आपणच विचार करा. यामुळेच महाराज, भगवान बुद्धाने जरी निर्वाण लाभ करून संसारातून आपली कायमची सुटका करून घेतली असली तरी त्यांचे प्रती केली जाणारी पूजा अचूक फळ प्रदान करणारी आणि ध्येय साध्य करण्याचे कारण होणारी आहे.''

''याशिवाय अशाच तऱ्हेने जमिनीत गडप होणार असे किती लोक आहेत, यासंबंधी हे महाराज, आपण कधी ऐकले आहे काय?''

''होय भंते, ऐकले आहे.''

''ठीक, तर सांगा बरे त्यांची नावे.''

''भंते, (१) चिंचा नावाची ब्राह्मण कन्या, (२) सुप्रबुद्ध नावाचा शाक्य, (३) देवदत्त, (४) नंदक नावाचा यक्ष आणि (५) नंद नावाचा ब्राह्मण, हे पाच लोक जिवंत असतांनाच जमिनीत गडप झाले.''

''महाराज, कोणते वाईट (पाप) कर्म यांनी केले होते आणि कोणाच्या प्रती ते सांगा बरे?''

''भंते, भगवान बुद्ध आणि त्यांच्या भिक्षू संघाप्रती अत्यंत तिरस्कारणीय पाप कर्मे त्यांनी केली होती.''

''मग काय भगवान बुद्धांनी आणि त्यांच्या भिक्षूंनी त्यांना जमीनीत जिवंतपणीच गडप होण्याचा किंवा जमिनीला त्यांना समावून घेण्याचा आदेश दिला होता काय?''

''नाही भंते, असा कुणीही आदेश दिला नाही.''

''महाराज, यावरून हेच सिद्ध होते की, भगवान बुद्धांनी परीनिर्वाण प्राप्त करून

संसारापासून आपली एकदम सुटका करून घेतली आणि ते कशाचाही आता स्वीकार करीत नसले तरी त्यांचे प्रती केले जाणारे शुभ व्यवहार अचूक आणि निश्चितच फळ देणारे आहेत.''

''भंते, नागसेन आपण या अत्यंत गुंतागुंतीच्या प्रश्नांचा अत्यंत सफाईने पूर्णतः उलगडा करून दिला. त्यांतील गाठी पूर्णपणे सोडवून दिल्यात, ढिल्या करून दिल्यात. अज्ञानाच्या जंगलाची चांगली ज्ञानाचे पिक देणारी भूमी बनविली. गुप्त असलेले धर्माचे धन बाहेर काढून दिले. अगदीच स्वच्छ करून दिले. धर्म विरोधकांच्या तोंडावर चांगलीच चपकार मारली. चुकीने सांगितली जाणारी मते खोटी असल्याचे सिद्ध झाले. कारण त्यातील खोटेपणा स्पष्टपणे दिसून आला. दुसऱ्या पंथांच्या लोकांच्या मुखावरील सारे तेज पावले. खरोखरच भंते आपण गणाचार्यात सर्वश्रेष्ठट आहात.''

**(पूजा प्रतिग्रहण प्रश्न समाप्त)**

## ३. सर्वज्ञ बुद्ध

''भंते, नागसेन, भगवान बुद्ध सर्वज्ञ होते हे खरे आहे काय?''

''होय महाराज, भगवान बुद्ध सर्वज्ञ होते परंतु याचा अर्थ समजून घेऊ नये की, सदासर्वकाळ, कोणत्याही अवस्थेत त्यांना संसारातील समस्त बाबींची जाणीव राहत असे. तथापि ते थोडे चिंतन (ध्यान) करून कोणत्याही गोष्टीला तत्काळ समजून घेत होते. यातच त्यांची सर्वज्ञता होती.''

''भंते, भगवान बुद्धांना जर चिंतनाद्वारे शोध घेऊन त्यानंतरच कोणत्याही गोष्टीचे ज्ञान होत असेल, तर त्यांना सर्वज्ञ म्हणता येणार नाही.''

''महाराज, समजा आपल्या गोदामात असलेल्या तांदळापैकी शंभर गाड्या, अर्धी चूक, सात अर्म्मन आणि दोन तुंबे तांदळाचे दाने किती? ते भगवान अगदी क्षणात चिंता (ध्यान) करून सांगू शकत होते की, ते इतके इतके लाख करोड तांदळाचे दाणे आहेत. हे सर्वज्ञते शिवाय कोणी सांगू शकेल काय?''

''मुळीच नाही भंते!''

### सात प्रकारचे चित्त

''महाराज, मनुष्यात वसणारे सात प्रकारचे चित्त पाहण्यात येतात ते असे – १) सक्लेश म्हणजे चिकटलेले आहे असे, २) श्रोतापन्न व्यक्तींचे चित्त, ३) सकृदागामी व्यक्तींचे चित्त, ४) अनागामी व्यक्तींचे चित्त, ५) अर्हत व्यक्तींचे चित्त, ६) प्रत्येक

बुद्धाचे चित्त, आणि ७) सम्यक संबुद्धांचे चित्त."

**१) सक्लेश चित्त**

"महाराज, लालसेच्या आहारी गेलेले (रागयुक्त), दुष्ट (द्वेषी), मोहात बुडालेले, क्लेशांचा भोवऱ्यात सापडलेले, तसेच शरीररचनेची व्यवस्था न पाहणारे, सदाचाराच्या नियमात गाफील असलेले, चित्त (मन) कृत्याची व प्रज्ञेची जाणीव नसलेले अशा लोकांचे चित्त (मन) अतिशय जड, विकृत आणि मंद असते."

"ते कां बरे?"

"कारण की, त्यांच्या चित्ताला शिक्षण मिळालेले नसते. म्हणजे त्यावर सुसंस्कार जडलेले नसतात."

"महाराज, समजा एखादा वेळू त्यांच्या रांजीतून काढावयाचा असल्यास तो कधीही सहजपणे काढता येणार नाही. हे काम अत्यंत युक्ती, प्रयुक्ती व हळूहळू करावे लागते. कारण अवाढव्य वेळू आपल्या अनंत व विशाल शाखा संपूर्ण रांजीत पसरविल्यामुळे त्याची परस्परात चांगलीच गुंतागुंत झालेली असते. अशारीतीने फसलेला वेळू कापून काढणे अत्यंत कठीण आहे."

"महाराज, याच उदाहरणाप्रमाणे लालसेच्या आहारी गेलेले...... जे लोक असतात त्यांचे चित्त अतिशय जड, विकृत आणि मंद असते."

"ते कां बरे?"

"तर लालसादी क्लेशांच्या रांजीत पूर्णतः त्याची गुंतागुंत होऊन फसल्यामुळे."

"त्या सात प्रकारच्या चित्तांपैकी हा पहिला प्रकार आहे."

**२) श्रोतापन्न व्यक्तीचे चित्त**

"दुसऱ्या प्रकारचे चित्त याहून वेगळे असते. महाराज, ज्यांनी श्रोतापन्नपदाचा लाभ करून घेतला आहे, जे कधी वाईट मार्गाने जात नाहीत, ज्यांनी सत्य ओळखले आहे आणि ज्यांना भगवान बुद्धाच्या धर्माची जाणीव झाली आहे. अशा लोकांचे चित्त, आत्मभाव, कर्मकांड आणि शंका या तीन भ्रममूलक विषयापासून एकदम मुक्त, हलके व गतीमान होत असते. तथापि वरच्या (आर्य मार्ग) विषयात त्याला विचारशक्तिच्या कार्यात अडचणी येतात. कारण त्याबाबतीत ते जड, विकृत आणि मंदच असते. म्हणून त्यांची कार्ये ही मंदगतीनेच चालतात."

"ते कां बरे?"

"तर तीन विषयात चित्त एकदम परिपूर्ण परिशुद्ध झालेले असले तथापि बाकीच्या अवस्थांचे बाबतीत चित्ताचे क्लेश (मळ) मात्र कायम असतात."

"महाराज ज्याप्रमाणे वेळूंच्या रांजीतील वेळू कापून काढतांना तीन पेरांपर्यंत शाखा तोडून साफ केल्यामुळे आणि बाकी वरच्या शाखा तशाच त्या रांजीत गुंतलेल्या अवस्थेत तोडू न दिल्यामुळे वेळू ओढताना तीन पेरापर्यंत पकडावयास किंवा ओढावयास कठीण जाणार नाही. परंतु बाकी वरचा भाग ओढून अशक्य व कठीणच होते."

"ते कां बरे ?"

"खालचा भाग कापून साफ केला असला तरी वरचा भाग तसाच सोडून दिला आहे."

"महाराज, याप्रमाणेच ज्यांनी श्रोतापन्नपदाचा लाभ केला आहे..... अशा लोकांचे चित्त, आत्मभाव, कर्मकांड आणि शंका या तीन भ्रममूलक विषयांपासून एकदम मुक्त, हल्के व गतीमान होत असते. तरीपण वरच्या विषयाबाबतीत त्याला विचार शक्तिच्या कार्यात अडचणी येतात. कारण त्याबाबतीत ते जड, विकृत आणि मंदच राहते. ते कां म्हणून? तर ह्या तीन भ्रममूलक बाबी दूर झाल्या असल्या तरी बाकीचे क्लेश अवशिष्ट असल्यामुळेच असे घडते. दुसऱ्या प्रकारचे चित्त हे असे आहे."

### ३) सकृदागामी व्यक्तीचे चित्त

"तिसऱ्या प्रकारचे चित्त या दोन्ही प्रकाराहूनही वेगळे असते."

"महाराज, लालसा, द्वेष आणि मोह हे केवळ नाममात्र राहिले आहेत. अशा सकृदागामी व्यक्तीचे चित्त पाच अवस्थांत एकदम हलके व गतिमान असते. परंतु यापेक्षा उंच अवस्थांत जड, विकृत आणि मंद असते. कारण जीवनातील खालच्या दर्जाच्या पाच अवस्थांपर्यंत चित्त परिशुद्ध झालेले असले तरी वरच्या अवस्थांत क्लेश अजून शिल्लक आहेत. हे असे घडते."

"महाराज, वेळूच्या रांजीमधून कापून काढत असता वेळ पाच पेरांपर्यंत एकदम गुंतलेल्या शाखा प्रशाखा साफ केल्यामुळे तिथपर्यंत ओढून काढावयास मुळीच कठीण जाणार नाही. परंतु वरच्या शाखा प्रशाखा अजून रांजीत परस्परांत गुंतून असल्यामुळे तो भाग केलेला असला तरी उरलेला वरचा भाग साफ न करता असाच सोडून देण्यात आला आहे."

"महाराज, याप्रमाणेच ज्यांनी सकृदागामी पदाचा लाभ करून घेतला आहे. त्यांचे चित्त जीवनातील पाच कनिष्ठ अवस्थांपर्यंत एकदम द्रुतगतीने विचार कार्य करीत असते का, की येथे ते हलके आणि गतिमान असते. तरीपण यापेक्षा वरच्या अवस्थांत

जड आणि मंदच असते. हे तिसऱ्या प्रकारचे चित्त समजावे.''

४) **अनागामी व्यक्तीचे चित्त**

''चौथ्या प्रकारचे चित्त याहून वेगळे असते.''

''महाराज, ज्यांनी अनागामी नावाची वरची अवस्था गाठली. त्यांचे पाच बंधन-आपोआप गळून पडतात आणि जीवनाच्या दहा अवस्थांपर्यंत त्यांचे चित्त एकदम साफ झालेले असते. म्हणून येथपर्यंत विचारशक्ती सुलभतेने व तत्परतेने कार्य करीत असेल असे का धरू नयेत. चित्त हलके आणि गतिमान असते ना? परंतु याहीपेक्षा, वरच्या भूमित चित्तास कार्ये करावयास बऱ्याच अडचणी येतात. कारण येथे चित्तजड आणि मंद असते. का की, दहा स्थानांपर्यंत चित्त एकदम परिशुद्ध झाले असेल तरीपण वरच्या अवस्थेतील क्लेश (चित्त मळ) अजून अवशिष्ट असतात.''

''महाराज, वेळूच्या रांजीतून वेळू कापून काढत असता दहा पेरांपर्यंत समस्त शाखा प्रशाखा तोडून काढल्यामुळे तिथपर्यंत ओढून काढणे कठीण नाही.....''

''महाराज, असेच आहे अनागामी अवस्था प्राप्त करणाऱ्या व्यक्तीचे चैतसिक दहा स्थानांपर्यंत चित्त द्रुतगतीने कार्य करण्यास त्यास कठीण जात नाही, परंतु यापेक्षा वरच्या भूमित अत्यंत कठीण व मंद गतीने कार्य करणे भाग पडते. कां की, दहा स्थानांपर्यंत चित्त एकदमच परिशुद्ध झालेले असले तरी बाकीच्या वरच्या अवस्थांत अजून क्लेश शिल्लक राहिलेले आहेत असे अनागामीपदाचा लाभ करणारे व्यक्ती पुनः मानवी जगात कधीही येत नाही. यांचे चित्त चौथ्या प्रकारचे चित्त होय.''

५) **अर्हतपद प्राप्त व्यक्तीचे चित्त**

''पाचव्या प्रकारचे चित्त वरील चार चित्तांहून एकदम वेगळे असते.''

''महाराज, ज्यांनी अर्हतपदाचा लाभ करून घेतला आहे. ज्यांचे चारही आश्रव तुटून पडले, ज्यांचे क्लेश-मळ सर्वस्वी नाहीसे झाले, चित्त निर्मळ व स्वच्छ झाले, ज्यांचे ब्रह्मचर्य जीवन सफल झाले, अडचणीचे ओझे उतरले, कार्यसिद्धी पूर्ण झाली. ज्यांना सत्यज्ञानाचा साक्षात्कार झाला, ज्यांचे समस्त भवबंधने नष्ट होऊन चित्त पूर्णतः विशुद्ध झाले. त्यामुळे आता पुनर्जन्माची बेडी कायमची तुटली. श्रावकांनी मानवी जीवनात करावयाच्या किंवा समजून घ्यावयाच्या बाबतीत ज्यांच्या चित्ताने सफलता प्राप्त केली आहे. म्हणजे यांत ते हलके व तत्पर आहे. परंतु प्रत्येक बुद्धाच्या भूमी संबंधाने ते अजूनही जड व मंदच असते. ते कां बरे? श्रावकाच्या भूमिकेत त्याचे चित्त एकदम परिशुद्ध झाले असते, तरी प्रत्येक बुद्धाच्या भूमिकेसंबंधाने अजून शुद्ध

झालेले नाही.''

''महाराज, वेळूची संपूर्ण रांज तोडून एकदम साफ केल असता त्यातील कोणताही वेळू सहजपणे ओढून काढता येतो. महाराज, त्याचप्रमाणे अर्हतपद प्राप्त केलेल्या व्यक्तीचे असते. श्रावकाने मानवी जीवनांत करावयाच्या किंवा समजून घ्यावयाच्या बाबतीत त्यांचे चित्त एकदम हलके व द्रुतगतीने कार्य करणारे असले तरी प्रत्येक बुद्धाच्या भूमिकेत जड व मंद गतीनेच त्याला कार्ये करावी लागतात हेच आहे पाचव्या प्रकारचे चित्त.''

### ६) प्रत्येक बुद्धाचे चित्त

''सहाव्या प्रकारचे चित्त पाचही चित्ताहून वेगळे असते.''

''महाराज, ते म्हणज प्रत्येक बुद्ध. ते स्वतःचा आधार स्वयंमच असतात, त्यांना दुसऱ्यावर अवलंबून राहण्याची आवश्यकता नसते, त्यांचा कोणी गुरू किंवा आचार्य नसतो, त्यांचे वास्तव्य गेंड्याच्या शिंगाप्रमाणे एकट्याचेच असते. ते आपल्या जीवनात एकदम निर्मळ व परिशुद्ध झालेले असतात. त्यांच्यात कसल्याही प्रकारचा दोष नसतो. त्यांचे चित्त स्वतः संबंधाने अतिशय हलके व गतिमान असते. परंतु सम्यकसंबुद्धाच्या क्षेत्राच्या बाबतीत जड आणि मंदच असते. का की, जरी ते प्रत्येक बुद्धाच्या विषयी बिलकुल, परिशुध्द व निर्मळ असले तरीपण सर्वज्ञ बुद्धाचे क्षेत्र विशाल आहे. ते स्वतः प्रज्ञावंत असून दुसऱ्यांना देखील प्रज्ञेच्या मार्गाने नेतात ते सर्वज्ञ बुद्ध होत. असे तरी कां व्हावे, तर प्रत्येक बुद्ध स्वतःच्या क्षेत्रामध्ये एकदम निष्कलंक असले तरी सम्यक संबुद्धाचे क्षेत्र इतके विस्तृत असते की सामान्य बुद्ध तेथे पोहोचूच शकत नाही. त्याच्या चित्ताच्या कार्य शक्तीला तोड नाही.''

''महाराज, समजा एखादा माणूस आपल्या परिसरातील लहान ओढे किंवा लहान नदी तो स्वतःच्या इच्छेनुसार कधीही पार करतो. मग तो दिवस असो की रात्र असतो. त्याला कशाची भीती वाटत नाही; परंतु अत्यंत खोल, विशाल, अथांग आणि ज्यांचा किनारा दृष्टीस पडत नाही असा महान समुद्र जर त्याने पाहिला तर त्यास काय वाटेल? तो भयभीत होईल, आणि पलीकडे जाण्याची हिम्मत सुद्धा चुकूनही करणार नाही. असेच प्रत्येक बुद्धाचे. ते कां बरे? तर का की, आपल्या क्षेत्रातील नदीशी तो पूर्णपणे परिचित आहे. परंतु महान समुद्र विशाल आहे. हाच चित्ताचा सहावा प्रकार होय.''

### ७) सम्यक सम्बुद्धाचे चित्त

''सातव्या प्रकारचे चित्त या सहाही चित्तांहून पूर्णतः वेगळे असते.''

"महाराज, ज्यांनी सम्यक सबुद्धत्व प्राप्त केले. त्यांना जगातील सर्वच प्रकारचे ज्ञान असते, अर्थात ते सर्वज्ञ असतात. त्यांना दहा प्रकारची शक्ती लाभली असते. म्हणूनच ते दशबल या नावाने संबोधिले जातात. चार प्रकारच्या विशेष ज्ञानावर त्यांचा आत्मविश्वास असतो. बुद्ध धर्माची १८ लक्षणे त्यांचे अंगी असतात. त्यांचे इंद्रिये पूर्णतः ताब्यात असतात. त्यांच्या आकलन शक्तिपासून काहीही लपून राहू शकत नाही. अर्थात त्यांचे ज्ञान सर्वत्रगामी असते. समस्त क्षेत्रांत त्यांचे चित्त तेजस्वी आणि दृतगामी असते, का की, ते सर्वच प्रकारचे एकदम परिपूर्ण व परिशुद्ध झालेले असते."

"महाराज, एखादा तीक्ष्ण धार लावलेला, कोठेही गंज न लागलेला, अगदी सरळ, गाठरहित, नोकदार आणि कोठेही वळसा नसलेला बाण आहे. तो जर जबरदस्त धनुष्यास जोडून शक्तिशाली तिरंदाजाने एखाद्या पातळ रेशमी किंवा मलमल किंवा पातळ ऊनी कापडाच्या आडव्या पट्टीवर सोडला तर त्या कापडाने त्यास प्रतिबंध होईल काय? त्याच्या कार्यास मंदपणा येईल काय?"

"नाही भंते, धनुष्यामधून अत्यंत वेगाने सुटलेल्या तीक्ष्ण बाणास कसा काय मंदपणा तेवढ्याशा पातळ कापडाने येऊ शकेल?"

"ते कां बरे?"

"का की, कापड इतके पातळ आणि मऊ आहे आणि बाण तिक्ष्ण असून तीर सोडणारा शक्तिशाली आहे?"

"महाराज, त्याचप्रमाणे बुद्धत्व प्राप्त केलेल्या लोकांचे चित्त सर्वच विषयात अत्यंत तिक्ष्ण व दृतगती असते. असे कां घडते? का की, ते सर्व प्रकारे परिपूर्ण व परिशुद्ध झालेले असतात. हाच चित्ताचा सातवा प्रकार होय."

"महाराज, हे ज्या सातव्या प्रकारचे सम्यक संबुद्धाचे चित्त आहे, ते बाकी सर्व चितांपेक्षा सर्वच प्रकारे श्रेष्ठ असते. ते आपल्या परिमित गुणामध्ये हलके व शुद्ध असे असते. महाराज, त्यांचे चित्त इतके हलके आणि शुद्ध असल्या कारणानेच भगवान सम्यक संबुद्ध दोन्ही प्रकारच्या ऋद्धीशक्ती, दाखवू शकतात. यावरूनच त्यांच्या चित्ताची शुद्धता व हलकेपणा दिसून येते, याशिवाय तयाऋध्दि-शक्तींचे दुसरे कोणते कारण दिसत नाही. या ऋध्दि-शक्तींची सुद्धा भगवान बुद्धाच्या चिंताशी तुलना केली तर त्याही अत्यल्प वाटतात. तरीपण भगवान बुद्धाची सर्वज्ञाता 'आवर्जून' प्रतिबद्ध (इच्छा करताच सिद्ध होणारी) अशी होती. ज्या गोष्टी जाणून घ्यावयाच्या आहेत त्या क्षणात चिंतन (ध्यान) करून भगवान बुद्ध जाणून घेत असत, यातच त्यांची सर्वज्ञता होती."

''महाराज, जसा कोणी मनुष्याने अगदी सुलभतेने एखादी वस्तू आपल्या हातातून दुसऱ्याच हातात द्यावी, तोंड उघडताच आवाज केला जावा; तोंडात पडलेला घास गिळून टाकावा, डोळे मिटल्यावर ते उघडता यावे, हात मागे-पुढे करावे. याप्रमाणे किंवा याहिपेक्षा अधिक सुलभतेने भगवान बुद्ध आपल्या सर्वज्ञतेच्या बळावर जी गोष्ट जाणून घेण्याची इच्छा असेल ती जाणून घेत असत. तथापि ते ध्यानावस्थेत जरी नसले तरी त्यांना सर्वज्ञ या संबोधाशिवाय दुसरे संबोधन त्याच्याकरीता लावता येणार नाही.''

''भंते, पण ज्या गोष्टीचे ज्ञान बरोबर नसते तीच गोष्ट जाणून घेण्यासाठी ते ध्याणन (चिंतन) करीत होते ना? तर मला तीच गोष्ट समजावून सांगावी.''

''महाराज, कोणी एक मनुष्य खुप श्रीमंत आहे. सोने, चांदी व मौल्यवान रत्नांनी त्याचा खजाना भरलेला आहे. त्याचप्रमाणे तांदूळ, गहू, धान, जौ व इतर धान्य तसेच तीळ, मूंग, उडीद, तेल, तूप, लोणी, दही, मध, साखर, गुळ इत्यादी सर्व वस्तूंचा त्याच्या कोठारात भरपूर साठा ठेवलेला आहे. तसेच अनेक प्रकारच्या भांड्यांनी त्याची कोठारे भरलेली आहेत. आता समजा की, कोणी एक पाहुणा तेवढ्यातच आला. त्याला आता शोभेसा पाहुणचार करावयाचा आहे. परंतु पाहुणा आला त्यावेळी घरातील सर्व शिजविलेले अन्न संपले आहे तेव्हा त्याच्या पाहुणचारासाठी तांदळाच्या गोनीतून तांदूळ काढले किंवा इतर वस्तूंच्या कोठारातून त्या वस्तू काढल्या. म्हणून काय एवढ्यावरून त्या श्रीमंतास दरिद्री आणि निर्धन म्हणावे काय?''

''नाही भंते, जो चक्रवर्ती राजा असतो त्याच्या राजवाड्यात सुद्धा कधी अवेळी शिजवून तयार ठेवलेले अन्न नसले तर मग सामान्य माणसाच्या घरचे काय?''

''महाराज, या उदाहरणाप्रमाणेच बुद्धाची सर्वज्ञता आवर्जून प्रतिबद्ध असते. ज्या गोष्टीस ते जाणून घेऊ इच्छितात, ध्यान करून तत्काळ ते जाणून घेतात. परंतु केवळ त्यांनी ध्यान केले म्हणून त्यांच्यापाशी ज्ञानाचा तुटवडा होत असे समजू नये.''

''महाराज, एखादे झाड फळांनी खूप गजबजले असून त्याच्या फांद्या फळांच्या वजनाने वाकून गेल्या आहेत. परंतु त्याचे एकही फळ मात्र जमिनीवर खाली पडलेले नाही. महाराज तर काय एवढ्या कारणावरून ते झाड वांझोटे आणि फळरहित आहे, असे म्हणावे काय?''

''नाही भंते, तसे मुळीच म्हणता येणार नाही. यावेळी जरी एकही फळ खाली पडलेले नसले तरी झाडावर असलेली फळे कधीना कधी खाली पडणारच आहेत. तेव्हा कोणीही त्या फळांच्या उपभोग घेऊ शकेल अर्थात ती फळे पोटभर खाऊन मन शांत

करू शकेल.''

''महाराज, याप्रमाणेच बुद्धाची सर्वज्ञता आवर्जून प्रतिबद्ध म्हणजे ऐच्छिक असते.''

''भंते नागसेन, ज्या गोष्टी जाणून घेण्याची इच्छा केली, त्या न करताच भगवान बुद्ध जाणून घेतात काय?''

''होय महाराज, ज्याप्रमाणे चक्रवर्ती राजा केवळ आपल्या स्मरणाने हवे तेथे चक्ररत्न उपस्थित करतो. त्याचप्रमाणे भगवान बुद्ध ध्यान करून तत्काळ हव्या त्या त्या गोष्टीचे ज्ञान मिळवितात.''

''भंते, भगवान बुद्धाची सर्वज्ञता सिद्ध करण्याकरीता आपण जे युक्तिवाद केले ते फारच मजबूत आहेत. मी हे मान्य करतो की, भगवान बुद्ध यथार्थाने सर्वज्ञ आहेत, याबद्दल मला आता काहीही शंका राहीली नाही.''

## ४. देवदत्ताची प्रव्रजा

''भंते, देवदत्ताला प्रव्रजा कोणी दिली होती?''

''महाराज, १) भद्रीय, २) अनुरूद्ध, ३) आनंद, ४) भृगू, ५) किंबील, ६) देवदत्त. हे सहा शाक्य क्षत्रियकुमार आणि सातवा ७) उपाल न्हावी. या सर्वांना, भगवान बुद्धांना बुद्धत्वाचा लाभ झालेला आहे, असे समजताच अतिशय आनंद झाला आणि त्यांनी आपल्या अंतप्रेरणेनेच बुद्धाच्या प्रती श्रद्धा व्यक्त करण्याकरीता गृहत्याग करून भगवान बुद्धाचा मार्ग अनुसरला. त्या सर्वांना स्वतः भगवान बुद्धांनीच प्रव्रजा दिली होती.''

''भंते, संघात प्रवेश मिळाल्यानंतर देवदत्ताने संघात भेदनीती सुरू केली होती हे खरे आहे काय?''

''होय महाराज, दुसरे कोणीही साधारण उपासिका, भिक्षूणी किंवा श्रामणेर-श्रामणेरी असे संघात कलह माजविण्यात पाप करू शकत नाही. समान-संवासाचा आणि समान सीमेत राहणारा कोणी प्रकृतात्म भिक्षूच संघात कलह माजवून संघ फोडण्याचे पापकर्म करू शकतो.''

''भंते, संघात फूट पाडणाऱ्या माणसाला कोणते कर्म प्राप्त होते?''

''महाराज, एक कल्प काळाचे कर्म त्यास मिळते.''

''भंते नागसेन, देवदत्त हा संघात भेद नीतीचा प्रसार करून संघात फूट पाडेल

*पहा, दीघनिकाय 'चक्रवर्ती-सुत्त.'*

आणि त्या कर्म फळाच्या अनुषंगाने त्यास एक कल्पपर्यंत नरकवास भोगावा लागेल, असे भगवान बुद्धास देवदत्ताने प्रव्रजित होण्यापूर्वी माहीत होते काय?''

''होय महाराज, भगवान बुद्धास हे आधीच समजले होते.''

''भंते नागसेन, तर मग भगवान बुद्ध महान, दयाळू व कृपाळू होते, समस्त प्राणीमात्रांचे कल्याण करणारे होते, त्यांच्या जीवनातील दुःखाचे निर्दालन करून त्यांच्या हिताची तरतूद करणारे असे होते. अशी जी त्यांची जनतेत ख्याती आहे ते साफ खोटे ठरते आणि जर त्यांनी देवदत्ताबद्दल काहीही न जातणा त्यास प्रव्रजा दिली असेल तर त्यावरून सुद्धा बुद्ध सर्वज्ञ होते, असे म्हणता येणार नाही. भंते हे ही एक आपल्या पुढे ठेवण्यात आलेले कोडेच आहे. आपण याचे निराकरण करून धर्मविरोधकांच्या तर्कांचे खंडन करा. आपल्या सारखे विद्वान भविष्यात होतील, असे सांगता येत नाही. या कोंड्याच्या निराकरणात आपले चातुर्य व कौशल्य दाखवा.''

''महाराज, भगवान बुद्ध महान दयाळू आणि सर्वज्ञ दोन्ही होते हे खरे आहे. शिवाय आपल्या करूणेने व सर्वज्ञता शक्तीने देवदत्ताची गती काय होणार याची सुद्धा त्यांना जाणीव होती. आपल्या अनेक जन्मात एका मागून एक असे कित्येकदा वाईट कर्म केल्यामुळे त्या कर्म फळाच्या योगाने त्यास हजारो, करोडो कल्पपर्यंत एका नरकातून (दुर्गतीतून) दुसऱ्या नरकात पडून यातना भोगाव्या लागणार, हे भगवान बुद्धास त्याच्या कित्येक जन्माच्या जीवन इतिहास पाहिल्यावर दिसून आले आहे. परंतु भगवंताने आपल्या करूणेने आणि सर्वज्ञता शक्तीने हे ही पाहिले होते की, जर देवदत्त माझ्या धर्म शासनात प्रव्रजित झाला तर निदान थोडेस तरी पुण्य संपादन करील जेणे करून, त्याच्या नरकवासाच्या यातनांचा अवधी कमी होऊ शकेल. असा विचार करूनच त्यांनी देवदत्तास प्रव्रजित केले होते.''

''भंते नागसेन, यावरून असेच दिसून येते की, भगवान बुद्ध प्रथम जखमी करून नंतर त्यावर मलमपट्टी बांधतात, प्रथम पहाडावरून लोटतात व नंतर सहाय्यासाठी हात पुढे करतात, प्रथम हत्या करतात व नंतर वाचविण्याचे प्रयत्नही करतात, प्रथम यातना देतात आणि नंतर आनंद देण्यासाठी धावून येतात. हा त्यांच्या स्वभाव विचित्रच म्हणावा लागेल.''

''महाराज, भगवान बुद्धाने कोणाला चपत दिली, ढकलून दिले किंवा मारले असते तरी ते त्यांच्यात हितासाठी, महाराज, मुलांचे आई-बाप नाही कां मुलांच्या कल्याणासाठी त्यांना मारतात व दूर लोटतात. त्याचप्रमाणे भगवान बुद्ध सुद्धा प्राणीमात्रांच्या पुण्यवृद्धीकरीता प्रसंगानुरूप असे सर्व काही करतात. महाराज, देवदत्ताने,

प्रव्रजा न घेता गृहस्थ चर्चेतच जीवन घालविले असते तर याहून अधिक पापाचरण केले असते; ज्यांच्यायोगे त्यास हजारो आणि करोडो वर्षेपर्यंत एकामागून एक अशा कित्येक नरक वासाच्या यातना भोगाव्या लागल्या असत्या. भगवान बुद्धाने आपल्या सर्वज्ञता शक्तीने हे आधीच ओळखले होते. माझ्या धर्माचरणात जर प्रव्रजित झाला तर देवदत्ताचे दुःख पुष्कळ प्रमाणात कमी होईल, असा विचार करून त्यांच्या कल्याणाकरीता देवदत्तावर दया करून त्यांस प्रवर्जित केले.''

१. ''महाराज, ज्याप्रमाणे कोणी गर्भश्रीमंत आपल्या धनसंपत्तीमुळे, कीर्तीमुळे, समाजातील व राजदरबारी असलेल्या वजनामुळे राजाला विश्वासात घेऊन शिक्षा झालेल्या आपल्या एखाद्या मित्राची किंवा नातलगाची शिक्षा कमी करवितो. तद्वतच भगवान बुद्धाचे देवदत्ताला प्रव्रजित करून घेतल्याने आपल्या धर्म शासनातील सदाचार चिंतन, ज्ञान आणि विमुक्तीच्या प्रभावाने त्याचे दुःख बरेच कमी होईल. असा विचार केला होता, म्हणून त्यास प्रव्रजा दिली. त्यांनी जर असे केले नसते तर देवदत्तास हजारो आणि करोडो वर्षेपर्यंत एकामागून एक अशा कित्येक नरकात पडून यातना भोगत रहावे लागले असते. महाराज, एखाद्या वैद्याने आपल्या तेज औषधाच्या प्रभावाने एखाद्या रोग्याला असाध्य रोगाच्या व्याधीतून आराम द्यावा, तसे भगवान बुद्धाने आपल्या करूणा-बळ या तेज औषधाने देवदत्ताच्या गंभीर वेदना कमी केल्या. महाराज भगवान बुद्धाने देवदत्ताची एवढी मोठी दुःखाची रास कमी केली, तरी ही काय चूक केली असे म्हणावे?''

''नाही भंते, मुळीच नाही? यात काही चूक नाही.''

''महाराज, भगवान बुद्धाने देवदत्तास प्रव्रजित कां केले, या प्रश्नाच्या उत्तरादाखल मी केलेले विवेचन आपण नीट समजून घ्यावे.''

''महाराज, भगवान बुद्धाने देवदत्तास प्रव्रजित कां केले याचे एक कारण अजून ऐका.''

''महाराज, कोणी एका दरोडेखोर चोरास लोकांनी पकडून आणले व राजापुढे उभे केले, आणि म्हणाले की, 'महाराज, हा महाभयंकर दुष्ट, दरोडेखोर, चोर आहे. याने आपलीही चोरी केली आहे. तेव्हा आपल्या इच्छेनुसार आपण यास शिक्षा करावी.''

''यावर गुन्ह्याचा निकाल देताना राजा म्हणाला की, 'याला गावाबाहेर वध्यभूमीवर घेऊन जा आणि याचा शिरच्छेद करा.' राजाचा हुकूम होताच लोकांनी त्यास वध्यभूमीवर घेऊन गेले. तेवढ्यात रस्त्यामध्ये कोणी एका राजाच्या अधिकाऱ्याने

राजाकडून नेतांना पाहिले. तो राज्यातीलच उच्च पदावर असल्यामुळे राजाकडून त्याला बरीच धनसंपत्ती आणि सुखसोयी लाभल्या असून कीर्तीमान आहे. राजाच्या विश्वासतला असल्यामुळे राजा देखील त्याचा सल्ला मान्य करतो. तो राजाकडून अनेक काही करू शकतो, असा त्याचा मान आहे. त्याने दरोडेखोर चोरास पाहताच त्याची दया येऊन तो लोकास म्हणाला की, 'थांबा! याचे डोके कापल्यावर आपणास काय मिळणार आहे? याचा जीव घेऊ नका. केवळ हात व पाय कापून याला सोडून द्या. याबाबत मी राजाशी बोलेन.' लोकांनी त्याप्रमाणे ऐकले व तसेच केले. महाराज, आता तुम्हीच सांगा की, असे करणारा तो अधिकारी त्या दरोडेखोर चोरांचा हितचिंतक ठरेल की नाही?''

''भंते, जेव्हा त्याने दरोडेखोरास जीवदान दिले. हे त्याच्या हिताचे केले नाही असे कोण म्हणेल?''

''पण महाराज, त्या दरोडेखोर चोराचे हात व पाय कापले त्यामुळे त्यास ज्या यातना व दुःख भोगावे लागणार त्याचे पाप त्या अधिकाऱ्यास लागेल की नाही?''

''भंते, त्या चोरास त्याचीच करणी भोवली आहे, त्यामुळे त्याला अशा यातना व दुःख भोगावे लागत आहेत. याबद्दल त्या जीवदान देणाऱ्या अधिकाऱ्याने त्याचे काहीही वाईट केले नाही, उलट त्याचे हितच केले?''

''महाराज, त्याचप्रमाणे भगवान बुद्धाचे देवदत्तास प्रव्रजा दिली. ते त्याचे दुःख कमी करण्याच्या उद्देशांनेच, खरोखर महाराज; देवदत्ताचे दुःख पुष्कळ कमी झाले. कारण मृत्यूसमयी 'मी आपल्या पुढील सर्व जन्मांमध्ये सर्वश्रेष्ठ, देवाधिदेव, देवता आणि मनुष्य सर्वांना सन्मार्ग दाखविणारे सर्वव्यापी दृष्टी असलेले आणि ज्यांच्या शरीरावर चांगुलपणाची शंभर लक्षणे विराजमान आहेत, अशा त्या भगवान बुद्धास प्राणपूर्वक मी शरण जातो.' अशा शब्दात त्याने भगवान बुद्धाचे व त्यांच्या निर्वाणदायक धर्माचे शरण ग्रहण केले.''

''महाराज, एका कल्पाचे सहा विभाग केले तर पहिल्या विभागाच्या शेवटी शेवटी देवदत्ताने भिक्षूसंघात फूट पाडली. बाकीच्या पुढील पाच भागापर्यंत तो नरकवासातील अत्यंत दुःख व यातना भोगत राहील. त्यानंतर तेथून मुक्त होताच अट्ठिास्सर नामक प्रत्येक बुद्ध होईल. महाराज, आता तुम्हीच सांगा की, प्रत्येक बुद्धाच्या अवस्थेपर्यंत एवढ्या पापी देवदत्तास घेऊन जाणारे भगवान बुद्ध देवदत्ताचे हितचिंतक ठरतात की नाही?''

''भंते, भगवान बुद्धाने सर्व प्रकारे देवदत्ताचे कल्याणच केले. त्यांनी त्यास प्रत्येक

बुद्धाच्या अवस्थेपर्यंत नेऊन पोचविले. त्याच्या हितासाठी भगवान बुद्धाने काही नाही केले, असे कोण म्हणेल?''

''महाराज, संघात फूट पाडण्याचे महान पातक करून देवदत्त नरकवासाच्या यातना व दुःख भोगत आहे; तेव्हा त्याबद्दल भगवान बुद्धावर दोष दिल्या जाऊ शकतो की नाही?''

''मुळीच नाही भंते, देवदत्त तर आपल्याच करणीने नरकवासाच्या यातना भोगत आहे. भगवान बुद्धाने तर त्याच्या दुःखाचा अवधी कमी केला, यावरून त्यांना मुळीच दोषी ठरविता येणार नाही.''

''महाराज, भगवान बुद्धाने देवदत्ताला प्रव्रजा कां दिली, या प्रश्नाच्या खुलासासाठी केलेले हे विवेचन चांगल्या प्रकारे आपण समजून घ्यावे.''

३– ''महाराज, भगवान बुद्धाने देवदत्तास प्रव्रजित कां केले होते. याबद्दल अजून एक कारण ऐका–''

''महाराज, समजा एखाद्या मनुष्यास फार मोठा फोडा झाला आहे. रक्त आणि पू त्यात भरलेला आहे. त्यातील मास कुजलेले आहे. त्यामुळे फार दुर्गंधी सुटलेली आणि तीव्र वेदना होत आहेत. वास, पित्त व कफ आणि सन्निपात इत्यादी आजाराची देखील त्यात भर पडली असून आता दुःख व यातना शिगेला पोचल्या आहेत. त्यामुळे तयाची अवस्था दिवसेंदिवस वाईट होत चालली आहे. इतक्यात कोणी एखादा निष्णात वैद्य तेथे आला व त्यान तो फोडा पाहून त्यावर एखादे झणझणीत औषध लावले. त्यामुळे फोडा पिकून एकदम तयार झाला. त्यानंतर पुन्हा नाजूक झणझणीत औषध लावले. त्यामुळे फोडा पिकून एकदम तयार झाला. त्यानंतर एका नाजूक शस्त्राने त्या फोड्यावर चीरा मारून त्यातील सर्व रक्त–पू पिळून काढला. जखमेत वात टाकली आणि जखमेतील सर्व रक्त–पू बाहेर निघाल्यामुळे सुजही कमी झाली. तेव्हा त्यावर बारीक मिठाची पूड सोडून चांगल्या मलमाची पट्टी बांधून दिली. याप्रमाणे उपाय केल्यामुळे ती जखम आता हळूहळू भरून निघाली व पूर्णतः बरी झाली आणि तो मनुष्य आता एकदम चांगला निरोगी झाला. महाराज, आता तुम्हीच सांगा की झणझणीत औषधाचा लेप लावून, फोडा पिळून काढून नाजूक शस्त्राने फोड्याला चीरे देणारा, जखमेत वात लावून रक्त–पू काढणारा व त्यावर मिठाची पूड सोडणारा वैद्य त्याचे अहीत करणारा समजावा की काय?''

''नाही भंते, उलट त्यांच्या हितासाठीच त्या वैद्याने हे सर्व उपाय केले आहेत.''

"महाराज उपचार करतांना त्या मनुष्यास जे दुःख व यातना भोगाव्या लागल्या त्याबद्दल त्या वैद्यास दोषी ठरविता येईल काय?"

"मुळीच नाही भंते, त्याला त्याच्या त्या आजारातून मुक्त करण्यासाठीच वैद्याने हे सर्व उपचार केले आहेत. त्यासाठी त्यास दोषी कसे काय बरे ठरविता येईल? त्यांनी तर फार मोठे पुण्याचे कार्य केले आहे."

"महाराज, याप्रमाणेच भगवान बुद्धाने देवदत्ताला प्रव्रजा देऊ न त्याचे दुःख कमी केले. याबद्दल त्यांनी देवदत्तावर महान उपकार केले. हे कोणीही कबूल करील."

४- "महाराज, भगवान बुद्धाने देवदत्तास प्रव्रजित कां केले होते. याबद्दल अजून एक कारण ऐका-"

"महाराज, समजा की, एखाद्या मनुष्याच्या पायात काटा मोडला तेव्हा त्याच्या कोणी हितचिंतकाने पायात मोडलेला काटा काढण्यासाठी दुसऱ्या एखाद्या काट्याने किंवा सुईने, काटा रूतलेल्या जागेच्या सभोवारचे मास रक्त वाहू लागते असतांना देखील काढू लागला. मात्र यामुळे रूतलेला काटा उपटल्या गेला. महाराज, आता आपणच सांगा की, पायास रक्त लागेपर्यंत मास काढणारा तो मनुष्य त्याचे वाईट करणार क्रूर समजला जाईल काय?"

"नाही भंते, तो तर त्याचा फार मोठा हितचिंतक होता. जर त्याने त्याचा काटा काढून दिला नसता तर त्यामुळे वेदनांनी तळमळत त्याला मरणाला कवटाळावे लागले असते किंवा मरणप्राय वेदना सोसाव्या लागल्या असत्या."

"महाराज, बरोबर. या उदारहणाप्रमाणेच भगवान बुद्धाने सुद्धा दयाळू बुद्धीनेच देवदत्ताचे दुःख कमी करण्याकरीता त्याला प्रव्रजित केले. याप्रमाणे जर त्यांनी प्रव्रजित केले नसते तर देवदत्तास हजारो करोडो कल्पापर्यंत एकामागून एक अशा किती तरी नरकवासात पडून त्याला सतत शिजत राहावे लागले असते."

"होय भंते! भगवान बुद्धाने महापुरात सापडलेल्या देवदत्तास पैलतीरी पोहोचविले. पापकर्माच्या जंगलात तो भटकला असतात. भगवंताने त्यास योग्य मार्ग दाखविला आणि त्याच्या जीवनक्रमास योग्य वळण दिले. उंच पहाडावरून कोसळून पडणाऱ्या देवदत्तास आधार देऊन त्याचे प्राण वाचविले, खड्यात पडून नाश होत असता भगवान बुद्धाने त्यास बाहेर काढून शांतता दिली. भंते, आपणासारख्या बुद्धिवंतास वगळले तर, दुसरा कोण बरे या प्रश्नाचे स्पष्टीकरण करून लोकांना ज्ञानप्रकाश दाखवू शकेल!"

## ५. भूकंप होण्याची कारणे

''भंते नागसेन, भगवान बुद्धाने असे सांगितले आहे की, 'हे भिक्षूहो, एखादा मोठा भूकंप होण्याची कारणे किंवा प्रत्येय आठ आहेत.' सर्व ठिकाणी लागू पडणारे हे भगवंताचे विधान सर्वथा परिपूर्ण आहे. कोणत्याही ठिकाणी का असेना पण हे विधान कधीच खोटे ठरविता येणार नाही. यात काही पूरवणी जोडता यावयाची नाही की, भक्कम करण्याकरीता या विधानात काही नवीन बाबींचा समोवश करून घेता येणार नाही. याप्रमाणे अशा मोठ्या भूकंपाचा आठ कारणांशिवाय किंवा प्रत्ययांशिवाय दुसरे कारण असूच शकत नाही. भंते, याशिवाय जर एखादे नववे कारण असते तर त्या सर्वज्ञ बुद्धाने अवश्य सांगितले असते. नववे कारण नसल्यामुळेच त्यांनी काही सांगितले नाही.''

''परंतु नववेही एक कारण आहे. मला वाटते ते म्हणजे वेस्संतर राजाने जेव्हा सर्व काही दानात अर्पण केले तेव्हा सात वेळा पृथ्वी कंप पावली असे ऐकण्यात येते. भंते, जर कोणत्या मोठ्या भूकंपाचे आठच कारणे आहेत, हे सत्य मानले तर वेस्संतर राजाने सर्व काही दानात अर्पण केले, तेव्हा पृथ्वी सात वेळा कंप पावली. ही माहिती खोटी ठरते. आणि जर वेस्सतर राजा संबंधीची माहिती सत्य मानली तर पृथ्वी कंप पावण्याची आठच कारणे आहेत, असे म्हणणे खोटे ठरते.''

''भंते, दुहेरी फसवणूक करणारा हा प्रश्न अत्यंत सुक्ष्म, दिशाभूल करणारा, प्रदीर्घ खोलीचा आणि सोडविण्यात बिकट असा आहे. आपल्या सारख्या बुद्धिमान व्यक्तीच्याच कक्षेतील ही बाब आहे. इतर कमी बुद्धीच्या व्यक्तीकडून याची उकल होईल असे वाटत नाही. तरी मी विचारलेल्या या प्रश्नावर आपण प्रकाश टाकावा.''

''महाराज, 'कोणत्याही मोठ्या भूकंपाची आठ कारणे आहेत, प्रत्येय आहेत.' असे भगवान बुद्धाने भिक्षूंना सांगितले हे खरे आहे. तसेच वेस्तंतर राजाने सर्वस्वाचे दान करताच पृथ्वी सात वेळा कंप पावली हे ही खरे आहे. परंतु वेस्संतराच्या दानाने धरणी कंप पावल्याची घटना ऋतुमानातील नियमाप्रमाणे नव्हती. तर ती घटना नियमबाह्य, संयोगवश घडली होती. त्यामुळे ऋतुमानाच्या नियमात या घटनेच्या समावेश होऊ शकत नाही व भूकंपाच्या आठ कारणांत त्या घटनेची गणती करण्यात आली नाही. अपवादात्मक घटनेचा नियमबद्ध घटनेत समावेश कसा?''

१- ''महाराज, साधारणतः लोक तीन हंगामातील पर्जन्यवृष्टी मान्य करतात. याशिवाय कधी पर्जन्यवृष्टी झाल्यास त्यास 'अकाली वृष्टी' असे म्हणतात आणि त्या वृष्टीची गणती ऋतुमानानुसार होणाऱ्या हंगामातील वृष्टीत केली जात नाही. हंगामातील

तीन पर्जन्यवृष्टी म्हणजे १) वर्षाकालीन वृष्टी, २) हिवाळ्यातील वृष्टी आणि ३) आषाढ श्रावणातील वृष्टी.''

''महाराज, हिमालय पर्वतावरून उगम पावणाऱ्या तशा लहान मोठ्या पाचशे नद्या आहेत. परंतु गणती करण्यात येते की केवळ दहा नद्यांचीच. त्या म्हणजे १) गंगा,

२) यमुना, ३) अचिरवती, ४) शरयू, ५) मही, ६) सिंधू, ७) सरस्वती, ८) वेत्रवती, ९) वितमसा म्हणजे व्यास आणि १०) चंद्रभागा. बाकीच्या नद्यांचा गणतीत समावेश करण्यात येत नाही. असे कां ? तर त्या लहान व अरूंद आहेत.''

''महाराज, राजाच्या दरबारात सुमारे दोनशे अधिकारी असतात. परंतु त्यापैकी फक्त सहा अधिकाऱ्यांचीच नोंद घेण्यात येते. १) सरसेनापती, २) पंतप्रधान,

३) सरन्यायाधीश, ४) कोषाध्यक्ष (खजांची), ५) वेधशाळा प्रमुख (धत्रधारक) आणि ६) शरीर रक्षक, या सहा अधिकाऱ्यांचीच नोंद कां करण्यात येते? का की, त्यांना राजसत्तेचे विशेष हक्क आहेत. म्हणून बाकीच्यांचा यात समावेश केला जात नाही. त्यांना केवळ अधिकारी म्हणून नाव देण्यात येते.''

''महाराज, याचप्रमाणे, वेस्संतर राजाने सर्वस्वाचे दान करताच सात वेळा धरणी कंप पावली होती. ते ऋतुमानाच्या नियमानुसार नव्हे तर संयोगवश ही घटना घडली होती. तसेच सांगितलेल्या प्रमुख आठ कारणांस सोडून आवादात्मक ही घटना घडल्यामुळे या घटनेचा समावेश आठ कारणांत करण्यात आला नाही.''

२- ''महाराज, बुद्ध धर्मातील नियमानुसार आचरण केले असता, त्या कुशल कृत्याचे फळ याच जीवनात लाभले आणि त्यामुळे ज्यांची कीर्ती देवलोकापर्यंत पोचली, असे कधी आपण ऐकले आहे काय?''

''होय भंते, अशा सात लोकांविषयी मी ऐकले आहे -''

''१) सुमन नावाचा माळी, २) एक साटक नावाचा ब्राह्मण, ३) पुराण नावाचा मजूर, ४) मल्लिका नावाची राणी, ५) गोपाळची आई या नावाचे सुपरिचित असलेली राणी, ६) सुप्रिया नावाची उपासिका आणि ७) पूर्णा नावाची मोलकरीण. या सात लोकांनी असे काही धर्मकार्य केले की, त्या फळाचा लाभ त्याच जीवनात प्रत्यक्ष उपभोगावयास मिळाला आणि त्यांच्या कीर्तीचे यशोगान देवलोकी होऊ लागले.''

''महाराज, जे पाच मानवी शरीरासह स्वर्गलोकात निघून गेले अशा काही लोकांबद्दल आपण कधी ऐकले आहे काय?''

''होय भंते, त्यांच्याबद्दल मी ऐकले आहे.''

''महाराज, ते कोण होते बरे?''

''१) गुत्तिल नावाचा गंधर्व, २) साधीन नावाचा राजा, ३) राजा निमी आणि ४) राजा मान्धाता या चार लोकांनी फार वर्षापूर्वी हे अत्यंत बिकट आणि वैभवशाली असे कार्य केले.''

''महाराज, सध्याच्या काळात किंवा प्राचीन काळी कोणी महान दान दिले असता एक, दोन किंवा तीन वेळा धरणी कंप पावली होती, असे आपण कधी ऐकले आहे काय?''

''नाही भंते, मी हे ऐकले नाही.''

''महाराज, मी सुद्धा, महान पुण्यवान त्या वेस्संतर राजासा सोडून कोणी दुसऱ्याने दान दिले असता धरणी कंप पावल्याचे ऐकले नाही. मी जरी सर्व पुराणे वाचलेली आहेत, सर्व विद्यांचा अभ्यास केला आहे, सर्व धर्माचे श्रवण केले आहे, धर्म तर अगदी तोंड पाठ केला आहे, नवीन गोष्टीचे ज्ञान शिकवण्यासाठी मी पुष्कळ शोधाशोध केली आहे. प्रश्न विचारण्यात आणि उत्तरे देण्यात मी बरीच तत्परता दाखविली आहे. तसेच आचार्याकडून अजूनही शिकण्याची इच्छा कायम आहे, तरी पण राजा वेस्संतराशिवायण इतरांनी दान दिले असता धरणी कंप झाल्याचे मी कधीही ऐकले नाही.''

३- ''भगवान काश्यप आणि शाक्य मुनी यांच्या काळाच्या दरम्यान हजारो वर्षाचा प्रदीर्घ काळ लोटला असेल परंतु यांच्या दरम्यानच्या काळखंडात वेस्संतर राजाचा अपवाद सोडला तर अशी काही दुसरी घटना घडल्याचे मला तरी ऐकीवत नाही.''

''महाराज, पृथ्वी कंप पावणे ही काही गोष्ट नव्हे अगर थट्टाही नव्हे. महाराज, जेव्हा पुण्यकर्मांचा प्रभाव अधिक वाढतो, जेव्हा शुद्ध धर्माचरणाचे वजन इतके वाढते की त्याला आधार देता येत नाही. तेव्हा ही महापृथ्वी हलू लागते आणि थरथर कापू लागते. महाराज, ज्याप्रमाणे बैल गाडीत फार मोठे सामान भरले असता गाडीच्या चाकांच्या फण्या (आरे) अगर कणा किंवा चाके मोडून पडतात आणि धुरा तुटून पडतात. तशीच ही घटना आहे.''

''महाराज, ज्याप्रमाणे वादळी वारे सुटल्यानंतर पावसाळी ढगांनी आकाश भरून जाते. हवेच्या अतिशय वेगामुळे ढगांमध्ये परस्परांत घर्षण होऊन गर्जना व कडकडाट होतो आणि जोरदार वृष्टी होते. त्याचप्रमाणे वेस्संतर राजाच्या चांगुलपणाच्या प्रतापाचा आणि पुण्याचा भार इतका झाला की, पृथ्वीला तो सांभाळता न आल्याने पृथ्वी हलू

लागली आणि थरथर कापू लागली, का की, वेस्संतर राजाचे अंतःकरण (चित्त) त्यावेळी लालसेने, दुष्टपणाने, आळसाने, गर्वाने, अभिमानाने, पापाने, अविद्येने, वैरत्वाने, असंतुष्टपणाने प्रभावित झालेले नव्हते. तर या उलट उदारतेने लबालब भरलेले होते. त्यांनी असा विचार केला होता की, 'ज्या-ज्या लोकांना जी काही आवश्यकता असेल, त्यांनी माझ्याकडे यावे आणि इच्छेनुसार वस्तू घेऊन जाव्यात व समाधानाचा लाभ करून घ्यावा.' याप्रमाणे कोणताही हेतू न बाळगता त्यांची बुद्धी उदारतापूर्वक दान कार्याकडे वळली होती."

४- "महाराज, त्याने वेस्संतर राजाचे चित्त या दहा सद्गुणांवर केंद्रित झालेले होते- १) आत्मसंयम, २) चित्तशांती, ३) क्षमाशीलता, ४) संवर, ५) सहनशिलता (यम), ६) सदाचार (नियम), ७) अक्रोध, ८) अहिंसा, ९) प्रामाणिकपणा (सत्य) आणि १०) शुद्धत्व ! महाराज, विषय वासनांचा त्यांनी एकदमच त्याग केला होता. भव तृष्णेवर त्यांनी मात केली होती. त्यांचे पराकाष्ठेचे प्रयत्न फक्त उच्च दर्जाच्या जीवनासाठी होते. महाराज, त्यांच्या अंतःकरणात स्वार्थाचा लवलेशाही राहिला नव्हता. दुसऱ्यांच्या कल्याणासाठी त्यांचे सर्व प्रयत्न होते. त्यांचे मन एकाच गोष्टीच्या विचारात खंबीरपणे लागले होते की, 'सर्व प्राणीमात्रास सुख शांती, स्वास्थ्य, भरभराट मिळवून देण्यासाठी आणि त्यांच्या आयुष्य वृद्धिसाठी मला काय करता येईल.' महाराज, ते यासाठी दान करीत नव्हते की, या पुण्याईने आपणास पुनर्जन्मातील भावी जन्मात चांगले वैभव, धनसंपत्तीसारखे सुखरूपी चांगले फळ मिळते, या दानकृत्याच्या बदल्यात आपणास दुसरे काही चांगले बक्षिस मिळावे अगर खुशामत करून इतरांकडून आपली खूप स्तूती करून घ्यावी, असेही कधी वाटले नाही. स्वतःस चांगले आयुष्य लाभावे, सुख लाभावे, सत्ता मिळावी, दीर्घायुषी कन्या-पुत्रांचा लाभ व्हावा. शक्तिशाली व्हावे, असे कधीही त्यांना दान देतांना वाटले नाही. या उलट जेव्हा त्यांना सत्य ज्ञानाचा लाभ झाला तेव्हा त्यांनी स्वयंप्रेरणेने एवढे मोठे, अगणित आणि अपूर्व दान केले होते. जेव्हा त्यांना सत्य ज्ञानाचे दर्शन झाले तेव्हा त्यांनी अत्यंत उल्हासित होऊन उद्गार काढले होते की"

"बुद्धत्वाच्या लाभासाठी मी माझा मुलगा जातीकुमार, मुलगी कृष्णाजिना कुमारी, माझी राणी माद्री इत्यादी सर्वांचे मी माझ्या मनात कोणत्याही प्रकारचा लोभस विचार न आणता दान केले."

५- "महाराज वेस्संतर राजा क्रोधी माणसाला सौम्यपणाने, वाईट करणाऱ्या दुष्ट माणसास चांगुलपणाने, लोभी माणसास उदारतेने, खोट्या माणसास सत्याने आणि पापी माणसास पुण्याचरणाने जिंकून घेत असे."

''महाराज, वेस्संतर राजा धर्मज्ञानाच्या संशोधनात पुर्णतः रमून गेला होता. धर्म हेच त्याचे उद्दीष्ट होते. जेव्हा तो महादान करीत होता, तेव्हा या त्याच्या दानशीलतेच्या प्रभावामुळे वायू प्रज्वलित झाला. वायूवरच पृथ्वी आधारली आहे. नंतर हळू हळू वादळ सुरू झाले. कधी इकडे तर कधी तिकडे तर कधी वर-खाली अशी पृथ्वी सर्व दिशांना डोलू लागली. मोठमोठे मजबूत वृक्षही उन्मळून पडतील की काय, असे वाटू लागले. एवढ्या जोरजोराने ते हलू लागले. आकाशात प्रचंड ढगांचे थवे गर्दी करू लागले. वादळ उफाळले धुळीचे लोट उठले. आता चक्रीवादळात त्याचे रूपांतर होऊन त्याचे तडाखे बसू लागले. सर्व दिशा परस्परांना टकरू लागल्या. त्यातून प्रचंड कडकडाट झाला. वादळी वाऱ्यामुळे समुद्र खवळला; समुद्रातील सर्व प्राणी भयभीत झाले. प्रचंड लाटा किनाऱ्यामुळे उसळू लागल्या; तशाच किनाऱ्याकडूनही उसळू लागल्या. समुद्र गरजू लागल्या. समुद्राच्या पाण्यावर सर्वत्र फेसांच्या लहान लाटा उसळू लागल्या, समुद्राची खोली विस्तृत होऊ लागली. त्यामुळे इकडून तिकडे असे समुद्राचे पाणी घुसू लागले. एकंदरीत सर्वनिसर्गात भीषण कोलाहल सुरू झाला. हवेच्या त्या लाटांनी पाणी आटू लागले. त्यामुळे, मासे, कासवे, मगरे व दुसरे जलचर प्राणी व्याकुळ झाले. सर्व जलचर प्राण्यात भीतीचे वातावरण निर्माण झाले. लाटांचे थैमान सुरू झाले. असुर, नाग, यक्ष, गरूड भयभीत झाले. ते आता स्वतःशीच विचार करू लागले की, अरे, आता काय करावे! कसे करावे! समुद्र उलटतो काय!!! आणि ते भयभीत अंतःकरणाने समुद्रामधून पलायन करून स्वतःला वाचविण्यासाठी सुरक्षित स्थळाचा शोध घेऊ लागले. पाण्यात विक्षोभ निर्माण झाल्यामुळे पृथ्वी थरथरू लागली का की, ती पायावरच थांबली आहे. पर्वताची मोठमोठी शिखरे तसेच पर्वतराज सुमेरू हेलकावे खाऊ लागले. समुद्राच्या तळास देखील हादरे बसू लागले. पृथवी कंप पावल्यामुळे सर्प, मुंगुस, मांजरे, कोल्हे, अस्वले, हरीण आणि पक्षी सर्व भांबावून गेले. कनिष्ठ वर्णाचे यक्ष अश्रू ढाळू लागले; परंतु उच्च दर्जाचे यक्ष अतिशय आनंदात होते.''

''महाराज, एखादी मोठी कढई पाण्याने भरून चुलीवर ठेवली आहे. तिच्यात भरपूर तांदूळ टाकले आहेत. कढई खाली अग्नी जळत आहे. त्यामुळे प्रथम कढईचे बुड (कढई) तापेल, नंतर पाणी तापून उकळू लागेल. आता पाणी उकळल्यामुळे कढईतील तांदूळ वर खाली होऊ लागतील. नंतर बुडबुडे वर येऊ लागतील व वर फेसाचे थर बसू लागतील.''

''महाराज, त्याचप्रमाणे वेस्संतर राजाने अत्यंत प्रिय वस्तूंचाही लोभ न धरता दान देण्याचे अती अवघड असे कार्य पूर्ण केले. त्यांच्या अशा उदारतेच्या प्रभावाने वायूत

विक्षोभ उत्पन्न होणे अटळ होते. त्यामुळे वादळ उठले व पाण्यात लाटाच लाटा उसळू लागल्या, त्यामुळे पृथ्वी थरथरू लागली. जणू काही त्या महान उदारतेच्या प्रभावाने वायू, जल आणि पृथ्वी हे तिन्ही ऐकमेकांपासून वेगळे झाले असे वाटत होते. हे महाराज! त्या महान पुण्यशाली वेस्संतर राजाच्या महादानासारखे दान दुसऱ्या कोणीही आजपर्यंत दिले नाही. म्हणून वातावरणात देखील वेस्संतराचे दान वगळता असा प्रकार कधी घडून आला नाही.''

६- ''महाराज, या पृथ्वीतलावावर विविध प्रकारची अनेक रत्ने आहेत- जसे - इंद्रनील, महानील, जोतिरस, वैदूर्य, ऊर्मापुष्प, सिरीर पुष्प, मनोहर, सूर्यकांत, चंद्रकांत, वज्र कज्जोपक्रमक, स्पर्शराग, लोहितांग मसारगदर इत्यादी नानाप्रकारची रत्ने आहेत. परंतु चक्रवर्ती रत्न यांत सर्वश्रेष्ठ मानले जाते. महाराज, चक्रवर्ती रत्नाच्या सभोवार चारही दिशेला एक योजन पर्यंत दैदिप्यमान प्रकाश पसरतो. हे तेज चक्रवर्ती रत्नातचस असू शकते.''

''महाराज, याप्रमाणेच या पृथ्वीतलावर आजपर्यंत जी काही मोठमोठी दाने दिल्या गेली आहेत, या सर्व दानांत त्या महान वेस्संतर राजाने दान म्हणजे महादान होय. महाराज, म्हणूनच वेस्संतर राजा महादान देत असता पृथ्वी सात वेळा कंपायमान झाली.''

''भंते नागसेन, बुद्धासंबंधीच्या सर्वच गोष्टी आश्चर्यकारक आहेत, अद्भूत मनोहर आहेत. शांतीच्या शोधात, स्वचित्तावर अधिकार मिळविण्याच्या प्रयत्नात, अधिमुक्तीच्या गवेषणेत व निर्णयाची वाट पाहत भगवंत केवळ बोधिसत्व होते. परंतु किती अतुलनीय, केवढे करूणामय ! किती उच्च ध्येयवादी !! आणि किती महान प्रयत्नवादी होत! भंते, तथागतांचा (बुद्धाच्या) प्रभावी शक्तीचे आपण दर्शन घडवून दिले आणि त्या जितेंद्रिय भगवंताच्या पारमिता आपण प्रकाशात आणून दिल्यात भगवान तथागताच्या अथक प्रयत्नातील श्रेष्ठत्व की, जे दवे-मनुष्यांना दुर्लभ व अशकय आहे, आपण पटवून दिले. भंते, खरोखरच आपण उत्तमरीतीने समजावून सांगितले. भगवान बुद्धाच्या धर्म श्रेष्ठत्वाच्या व उन्नतीच्या उंच शिखरावर नेऊन पोचविला. भगवान बुद्धांच्या पूर्णत्वाची यश व कीर्ती सर्वत्र पसरविली. धर्म विरोधकांच्या कुतर्काच्या गाठी सोडवून त्यांचा धुव्वा उडविला. विरोधकांच्या सिद्धांताचा भंडाफोड केला. एवढी बिकट, दुहेरी समस्या एकदम साफ करून दिली. रान कापून ती पिकावून जमीन करून दिली. बुद्धपुत्रांना हवी असलेली वस्तू सहज गवसली. भंते, आपण सर्व गणप्रमुखांत सर्वश्रेष्ठ असे गणाचार्य शोभून दिसता.''

**(महारभूती चाल प्रादुर्भाव प्रश्न समाप्त)**

## ६. शिवी राजानी केलेले डोळ्यांचे दान

"भंते नागसेन, आपल्या लोकांचे म्हणणे आहे की, 'याचकाने डोळ्यांची याचना केली असता शिवीराजाने आपले डोळेही दानात देऊन टाकले. अशाप्रकारे तो आंधळा झाला. परंतु त्याच्या दिव्य प्रभावाने पुनः त्याला डोळ्यांचा लाभ झाला.' असे कथन पटण्यासारखे नाही. उलट असे विधान करणाराच बुचकळ्यात पडू शकतो. हे विधान एकदम खोटे वाटते. कारण सुतामध्ये म्हटले आहे की, 'संपूर्णतः हेतू नष्ट झाला आणि कोणत्याही प्रकारे हेतू किंवा कारण शिल्लक राहत नाही, अशा स्थितीत महापुरूषांची दिव्यदृष्टी उत्पन्न होऊ शकत नाही."

"भंते, शिवी राजाने जर आपले डोळे खरोखरच दिले असतील तर त्याच्या दिव्य प्रभावाने त्याचे डोळे पुनः परत मिळाले हे विधान खोटे ठरते. आणि खरोखरच त्यांच्या दिव्य प्रभावाने त्यांना दिव्य दृष्टी लाभली होती, हे विधान खरे मानले तर त्यांनी याचकारस आपल्या डोळ्यांचे दान केले होते असे म्हणणे चुकीचे ठरते. भंते, या कोड्याची गाठ साधारण गाठीपेक्षाही घट्ट बसली आहे. तिरापेक्षाही अधिक तीक्ष्ण आहे, आणि घनदाट जंगलापेक्षाही गहन आहे. असे हे कोडे मी आपणास विचारीत आहे. तेव्हा हेही कोडे उकलून द्यावे. जेणेकरून धर्म विरोधकांची तोंडे बंद होतील."

"महाराज, याचकाला शिवीराजाने आपले डोळे दान दिले होते, यात सुद्धा शंका बाळगण्याचे काही कारण नाही. तसेच त्याच्या सदाचाराच्या प्रभावाने त्याला पुनः दिव्य दृष्टी प्राप्त झाली होती, यातसुद्धा शंका घेण्याचे काही कारण नाही."

"भंते, संपूर्णतः कारण हेतुनष्ट झाले असता आणि आता थोडेसुद्धा कारण किंवा प्रत्येय राहिले नसता दिव्य चक्षू कसे काय उत्पन्न होऊ शकतील?"

"नाही महाराज, कारणाशिवाय कधी उत्पन्न होणार नाही."

"भंते, तेव्हा सर्वथा कारण नष्ट झाले आणि आता थोडेसुद्धा कारण किंवा प्रत्येय राहिले नाही, तर मग शिवी राजास पुनः डोळ्यांचा लाभ कसा काय झाला? हं, तर आता हा प्रश्न आपण समजावून सांगावे."

"महाराज, जगात सत्य नावाची वस्तू असून त्यानुसार सत्य बोलणारे लोक त्यावर विश्वास ठेऊन सत्कर्म करतात, असे तुम्ही ऐकले आहे काय ?"

"होय भंते, जगात सत्य नावाची वस्तू अस्तित्वात आहे. याच सत्याच्या प्रभावाने सत्यवादी लोक वृष्टी वर्षाव सुद्धा करू शकतात, धगधगता अग्नी विझवू शकतात,

विषाचा प्रभाव कमी करून एकदम शांत करू शकतात, याशिवाय अशाच प्रकारे इच्छेनुसार अनेक कर्म करू शकतात.''

''महाराज, हीच बाब शिवीराजाच्या बाबतीतसुद्धा लागू पडते. शिवीराजाने दिलेले डोळे पुनः त्यास परत मिळाले, हा सर्व सत्याचाच प्रताप होता. जरी त्यात दृष्टी प्राप्तीकरीता आवश्यक कोणतेही कारण राहिले नसले, तरी पण सत्याच्याच प्रतापाने ही घटना घडली होती. याबाबतीत सत्य हेच पुनः दृष्टी प्राप्तीसाठी कारण समजले पाहिजे.''

''महाराज, जे फार मोठे सिद्ध पुरूष असतात त्यांनी जर 'वृष्टी वर्षाव होवो' असे म्हटले की वृष्टीचा वर्षाव होऊ लागतो. हे सर्व त्यांच्या सत्याच्या प्रभावानेच घडते. त्यावेळी आकाशात वृष्टी वर्षाव होण्याची सर्व लक्षणे म्हणजे ढग आणि ढगांचा गडगडाट तयार असतात काय, ज्यांच्यामुळे वृष्टी वर्षाव होत असतो?''

''नाही भंते, तेथे तर वृष्टी वर्षाव करावयास त्याचे सत्य बल हेच एक कारण होते.''

''महाराज, येथे शिवी राजासंबंधी कोणतेही साधारण नैसर्गिक कारण नव्हते तर तेथे कारण केवळ शिवी राजाच्या सत्याचा प्रताप होता. एखाद्या मोठ्या अभिज्ञाशक्ती प्राप्त केलेल्या सिद्ध पुरूषाने म्हटले की, 'हा धगधगता अग्नी शांत होवो' आणि त्याबरोबर धगधगता अग्नी ज्यांच्या ज्वाला आकाशाला भिडू पाहत होत्या, परंतु क्षणात एकदम थंड होऊ शकतात, तर काय महाराज, अग्नी थंड होण्याची जी कारणे असतात, का ती आधीपासूनच तेथे उपस्थित असतात ?''

''नाही भंते, तेथे केवळ त्याचे सत्य बळच अग्नी विझविण्याचे कारण आहे?''

''महाराज, या उदाहरणाप्रमाणेच शिवीराजाचे डोळे दान दिल्यानंतर पुनः त्यांची प्राप्ती होण्यासाठी केवळ त्याचे सत्य बळ हेच कारण होते.''

''महाराज, काही असेही अभिज्ञा प्राप्त सिद्ध पुरूष असतात की, ज्यांनी हे विष शांत होवो, असे म्हणताच त्या विषाची प्रखरता तत्काळ कमी होते. तेव्हा विषाची प्रखरता कमी होण्याची कारणे तेथे आधीपासूनच उपस्थित असतात काय?''

''नाही भंते, तेथे फक्त सत्याचा प्रताप हेच एक कारण असते.''

''महाराज, याप्रमाणेच शिवी राजाच्या डोळ्यासंबंधी देखील, त्यांच्या सत्याचा

*पहा, शिवी जातक.*

प्रताप हेच एक मात्र कारण होते.''

''महाराज, चार आर्यसत्यांचे ज्ञान अवगत करण्यामध्ये सुद्धा दुसरे कोणतेही कारण असू शकत नाही. तर प्रत्यक्ष सत्य आचरणानेच त्याचे ज्ञान अवगत होते.''

## १. चीनी राजा

''महाराज, ची देशात एक राजा आहे. जेव्हा त्याला समुद्रात एक भिंत बांधावयाची असते, तेव्हा तो आधी चार महिनेपर्यंत एका सत्यव्रताचे पालन करतो. त्यानंतर तो आपल्या रथाला सिंह जोडून समुद्रात सात मैलपर्यंत फिरावयास जातो. तेव्हा त्याच्या रथापुढे असणाऱ्या समुद्राच्या लाटा आपोआप मागे सरून त्यास रस्ता मोकळा करून देतात. आणि राजाचा रथ पुढे गेल्यानंतर आपल्या पूर्व स्थितीत येतात. महाराज, चीनचा राजा सत्य आचारणाच्या शक्तीनेच हे करू शकतो. अन्यथा देवलोक आणि मनुष्यलोक आपल्या साधारण शक्तीने समुद्रावर भिंत बांधू शकतील काय?''

''भंते, समुद्र तर सोडाच परंतु एखाद्या लहानशा तलावावर देखील आपला हुकूम चालवू शकत नाही.''

''महाराज, यावरूनच आपण सत्यक्रियेच्या शक्तीचा अंदाज लावू शकता. सत्याची शक्ती जेथे पोहोचू शकत नाही, असे स्थळ जगात कोठेही सापडणार नाही.''

## २. बिंदूमती गणिकेचे सत्य बळ

''महाराज, एके दिवशी पाटलीपुत्र शहरात मगध सम्राट धर्माशोक काही खेड्यांतील, काही शहरांतील प्रतिष्ठित नागरिक तसेच काही अधिकारी, नोकर आणि मंत्रीगण इत्यादी सर्वांना घेऊन गंगा नदीला आलेला पूर पहावयास गेला. त्यावेळी गंगा नदीला फार मोठा पूर आला असल्यामुळे ती दोन्ही थडी तुटूंब भरून वाहत होती. आपसात चर्चा चालू होत्या. तशातच सम्राट अशोकाने सर्वांना विचार करावयास लावणारा प्रश्न केला की, येथे असलेल्या लोकांमध्ये गंगा नदीचे पाणी उगमाकडे वाहावयास लावू शकेल असा कोणी आहे काय?''

''तेव्हा अधिकारी उत्तरले की महाराज हे कसे शक्य आहे, एवढे सामर्थ्य कोणाच्या अंगी आहे?''

''त्याचवेळी बिंदूमती नामक एक वेश्या नदीवर आली होती. तिनेही राजाने केलेला प्रश्न ऐकला होता आणि अधिकारी वर्गाने दिलेले उत्तर देखील ऐकले होते. तेथे असलेल्या सर्वांच्याच मुद्रेवरील पाणी पळाले होते. काही लोक आपापसात कुजबुजत

होते. तेव्हा बिंदूमती वेश्येने मनातच विचार केला की, 'येथे असलेले सर्व लोक उच्च कोटीचे जीवन जगणारे सन्माननीय आहेत आणि मी काय स्वतःचा देह विक्रय करून कसेबसे जीवनयापन करणारी, हलकटपणाचा धंदा करून जीवनयापण करणारीएक गणिका. परंतु माझ्या या सत्याचा प्रभाव राजाला अवश्य दाखवीन.' तेव्हा तिने आपल्यातील सत्य प्रत्यक्ष कृतीत उतरविले. त्याबरोबर तिच्यातील सत्याच्या प्रतापाने गंगा नदी गर्जत व खवळत उगमाकडे उलटी वाहू लागली. तेव्हा सर्व लोक एक दुसऱ्यांच्या तोंडाकडे पाहातच राहिले आणि विचार करू लागले, – आतापर्यंत एकडे वाहणारी नदी उलट्या दिशेने कशी काय वाहू लागली आहे? हे कसे घडले?''

''सरळ वाहत असलेल्या नदीने एकदम आपला वेग उगमाकडे वळविल्यामुळे आपसात लाटांचा टकराव होऊन मोठमोठ्याने आवाज येऊ लागला. तो आवाज व तो मागे फिरलेला प्रवाह पाहून राजाने आश्चर्यचकित होऊन अधिकारी वर्गास विचारले, ''अरे, ही गंगा नदी आताच्या आताच उलट्या दिशेने वाहू लागली आहे हे कसे काय घडले?''

''तेव्हा अधिकारी म्हणाले की, 'महाराज, आपल्या पाटलीपुत्र नगरात बिंदूमती नावाची एक वेश्या राहते. आपला प्रश्न ऐकून बिंदूमतीने तिच्या अंगी असलेली सत्यशक्ती गंगा नदीच्या पाण्यावर चालविली. त्यामुळेच ही नदी आता उलट्या प्रवाहाने वाहू लागली, हे ऐकून तिच्यात असलेल्या शक्तीबद्दल राजास आश्चर्य वाटले आणि तात्काळ तो बिंदूमती वेश्येकडे स्वतः गेला आणि म्हणाला काय ग, तुझ्या अंगी असलेल्या सत्याच्या प्रभावाने ही गंगा नदी उगमाकडे म्हणजे उलट्या प्रवाहाने वाहत आहे असे लोक सांगतात, ते सत्य आहे काय?''

''होय महाराज !''

''पण तुझ्या अंगी हे सत्यबळ कसे आले ? की, तू दुसऱ्या कोणाकडून ऐकून असे खोटे तर सांगत नाहीत ना ? तू प्रत्यक्ष अगदी हलक्या दर्जाने म्हणजे स्वतःचा देह विक्री करून पोट भरतेस, मग तुझ्यात ही शक्ती आली कशी? असे राजाने विचारले.''

''महाराज, हा सर्व माझ्या अंगी असलेल्या सत्याचा प्रभाव आहे.'' तिने उत्तर दिले. यावर राजा म्हणाला– ''अग पण तू भोळ्याभाबड्या लोकांच्या खिशात हात घालणारी, त्याना ठकवून कंगाल करणारी, वाईट चालीची, हलकट, अव्वल दर्जाची पाप कर्मे करणारी, सद्‌गुण, संयम आणि मर्यादा सोडून सदोदित वाईट कामे करणारी, सदाचाराची पायमल्ली करणारी, विषय वासनेने अंध बनलेल्या मूर्ख लोकांना लुटून जीवनयापन करणाऱ्या स्त्रीच्या अंगीसुद्धा सत्य असू शकते, हे कसे बरे शक्य आहे?''

"महाराज, आपण म्हणालात ते अगदी खरे आहे. आपण वर्णन केलेली कामे करूनच जीवन यापन करणारी मी स्त्री आहे. परंतु तसे असूनही माझ्यात असे एक सत्य-शक्तीचे तेज आहे की, त्या शक्तीच्या जोरावर मी देवता आणि मनुष्यासह संपूर्ण जगाला उलटून पालथे करू शकते." तिने उत्तर दिले.

"ते सत्यबळ काय आहे. ते मला तरी कळू दे." राजा म्हणाला.

"महाराज, माझी फी ठरलेली असून तेवढी फी देणारा तो मग क्षत्रिय असो की ब्राह्मण, व्यापारी सेठ असो की कोणी गरीब, नोकर किंवा आणखी कोणी असो. त्याची मी बरोबर सेवा करते. मी कोणालाही उच किंवा नीच समजत नाही. उच-नीचतेचे बंधन तोडून माझी फी देणाराची मी इमानदारीने सेवा करते. महाराज, हीच माझी सत्याची शक्ती आहे. याच सत्य-बळाच्या शक्तीने मी गंगा नदीचा प्रवाह उलट्या दिशेने वळविला आहे."

ही गोष्ट सांगितल्यानंतर आयुष्मान नागसेन पुढे म्हणाले- "महाराज, याप्रमाणेच सत्यावर दृढ विश्वास ठेऊन कामे करणारास कोणतीही कामे करणे अशक्य नाहीत. महाराज, शिवी राजाने याचकास आपले डोळे देऊन टाकले आणि पुनः त्याला दृष्टी प्राप्त झाली, त्यात त्याच्या सत्याचाच प्रभाव होता, सत्याचेच यात सामर्थ्य होते."

"महाराज, सुत्तामध्ये जे म्हटले आहे की, ही भौतिकदृष्टी एकदा नष्ट झाली आणि त्याचे कारण किंवा आधार पूर्णतः नष्ट झाल्यामुळे कोणत्याही दिव्य दृष्टीचा लाभ होऊ शकत नाही. हे भावनामय दृष्टीसंबंधी केलेले कथन आहे. महाराज, आपण ही गोष्ट अशारीतीने समजून घेतली पाहिजे."

"भंते नागसेन, आपण हा दुर्धर खरोखरच कौतुकास्पद रीतीने सोडविला आहे. भयंकर गुंतागुंतीची गाठ पण आपण फार हुशारीने ती उकलून दिली. विरूद्ध बाजूने बोलणाराच्या तोंडावर चांगलीच चपकार मारली. याविषयी केलेला युक्तिवाद मी सहर्ष मान्य करतो."

## ७. गर्भाशयात जन्म घेण्यासंबंधी

"भंते नागसेन, भगवान बुद्धाने सांगितले की, "हे भिक्षूहो तीन गोष्टींचा संयोग झाला असता गर्भधारणा होते. जसे - १) आई-वडिलांचे मिलन, २) आई ऋतुमती असणे आणि ३) गंधर्व. या तिन्ही गोष्टी एके ठिकाणी आल्या असता गर्भ धारणा होते" सर्व ठिकाणी ही बाब लागू पडणारी आहे. कोठेही याबाबतीत कोणी व्यंग काढू शकणार नाही, हे विधान स्वयं परिपूर्ण आहे. समजण्याच्या दृष्टीने यातील काही भाग गाळण्याची

किंवा यात आणखी काही नवीन भाग जोडण्याची काही आवश्यकता नाही. हे विधान अर्हतांनी देवता आणि मनुष्य यांच्या संयुक्त बैठकीस मार्गदर्शन करतांना केलेले आहे की, ''स्त्री-पुरूष उभयतांच्या संयोगानेच गर्भ धारण होते.''

''दुकूल नावाच्या तापसाने पारिका नावाच्या तापसीच्या नाभीला ती ऋतुमती असताना आपल्या उजव्या हाताच्या आंगठ्यांनी स्पर्श केला होता. त्यामुळे ती गर्भवती होऊन तिला साम नावाचा मुलगा झाला.''

''मातंग ऋषिंनी सुद्धा एका ब्राह्मणाच्या मुलीच्या नाभीला ती ऋतुमती असता असाच स्पर्श केला आणि त्या स्पर्शामुळे तिला गर्भधारणा झाली व तिने मांडव्य नावाच्या मुलास जन्म दिला.''

''भंते नागसेन, भगवंतांनी वर सांगितलेली गोष्ट खरी मानली तर सामव मांडव्य यांच्या जन्माची कथा काल्पनिक वाटते, आणि जर साम आणि मांडव्य यांचा जन्म केवळ याप्रकारे नाभीला स्पर्श केल्यामुळे झाला होता, असे जर भगवान बुद्धांनी यथार्थ सत्य सांगितले असेल, तर त्या तीन गोष्टींच्या संयोगामुळेच गर्भधारण होऊ शकते, असे भगवान बुद्धाचे वचन खोटे ठरते. भंते, ही तर अधिकच गंभीर आणि सुक्ष्म अशी गुंतागुंत आहे. केवळ बुद्धिमान लोकांनाच समजून येण्यासारखी ही बाब आहे. तेव्हा ही दुविधा आपल्यापुढे सोडवणुकीसाठी ठेवीत आहे. तिचे निरसन करून प्रतिपक्षाच्या मताचे आपण खंडण करावे आणि ज्ञानाचा विशुद्ध प्रकाश पसरवावा.''

''महाराज, भगवान बुद्धांनी सांगितले होते की, 'हे भिक्षूंनो, तीन गोष्टी एकत्र मिळाल्यानंतरच गर्भधारणा होत असते- १) माता-पित्याचा संयोग, २) माता ऋतुमती असली पाहिजे आणि ३) गंधर्व या तीन गोष्टींचा एकत्र संयोग घडून आल्यानंतरच गर्भ धारणा होत असते,' हे अगदी सत्य आहे. महाराज, भगवान बुद्धांनी साम व मांडव्य यांचा जन्म केवळ नाभीला स्पर्श केल्यामुळे घडून आला. हे सुद्धा सांगितले होते, हेही यथार्थ सत्य आहे.''

''भंते, हे कसे सत्य आहे ते स्पष्टपणे विश्लेषण करून मला समजावून सांगावे.''

१- ''महाराज, यापूर्वी कधी तुम्ही ऐकले आहे काय की, सांकृत्य (संकिच्च) कुमार, सिंग (ऋष्यश्रृंग) तापस आणि स्थवीर कुमार काश्यप यांचा जन्म कसा काय झाला होता ?''

''होय भंते, ऐकले आहे. त्यांच्या जन्मासंबंधी कोणास माहीत नाही ? दोन

*पहा अंगुत्तर निकाय, तिक निपात.*

हरीणी ऋतुमती असतांना तपसव्यांच्या मूत्रीघरात जाऊन मूत्राबरोबरच त्या ऋषीचे शुक्र सुद्धा पिऊन टाकले. त्यामुळे त्यांना गर्भ धारणा होऊन सांकृत्य कुमाार व ऋष्यश्रृंग तापसाचा जन्म झाला.''

असेच एकदा उदायी स्थवीर भिक्षूणीच्या विहारात गेले होते. त्यावेळी त्यांच्या चित्तात काम विकार उत्पन्न झाला आणि तत्काळ त्यांचे शुक्र मोचन झाले. तेव्हा त्यांनी त्या भिक्षूणीस सांगितले की, 'हे भगिणी अंतरवासक धुण्याकरिता थोडे पाणी मला आणून दे.'

तेव्हा भिक्षूनी म्हणाली की, ''ते अंतरवासक माझ्याकडे द्या. मीच ते धुऊन देते.'' तेव्हा भिक्षूंनी आपले वस्त्र तिच्याकडे धुण्यासाठी दिले. ती भिक्षूणी ऋतुमती होती. अशावेळी तिने त्या वस्त्रावरील थोडे शुक्र गिळून टाकले व काही आपल्या योनीत सोडले. परिणामतः तिला गर्भधारणा झाली आणि स्थवीर कुमार काश्यपाचा जन्म झाला. अशाप्रकारे लोक ही कथा सांगतात. महाराज, तुम्ही हे सत्य मानता की नाही?''

''होय भंते, या घटनेसंबंधी एक फार मोठा पुरावा असल्यामुळे मला ते सत्य मानावे लागत आहे.''

''तो पुरावा कोणता ?''

''भंते, जेव्हा शेत पाण्याने भिजून अगदी चिखल होते आणि अशावेळी जर त्यात कोणे बीज पेरले जाते, तेव्हा त्यास लवकरच अंकूर ते वाढीस लागलेली नाही?''

''होय, महाराज !''

''भंते, याप्रमाणेच त्या ऋतूमी भिक्षूणीने कललाची संस्थती होताच, खून थांबून धातू स्थिर झाले त्यावेळी ते वस्त्रावरील शुक्र धेऊन कललात सोडले होते. परिणामतः तिला गर्भ राहिला. हेच एक याचे कारण आहे.''

''महाराज, हे तर मीही मानतो. तर मग तुम्ही सुद्धा; कुमारकाश्यपाच्यावेळी त्यांच्या आईस गर्भधारणा झाली होती. ही घटना सत्य आहे, असे स्वीकार करता की नाही?''

''होय भंते, मी स्वीकार करतो.''

ठीक आहे, महाराज, आता तुम्ही अगदी माझ्याच वाटेवर आलात. तुम्ही एक प्रकारे गर्भधारणेची शक्यता स्वीकार केली त्यामुळे मला फार मोठे समर्थन लाभले. बरे, पण आता हे सांगा की, त्या दोन हरिनींनी मुत्रासोबत शुक्र पिऊन टाकल्याकारणाने

त्यांना गर्भ राहिला होता. यावर तुमचा विश्वास आहे की नाही ?

"होय भंते, कां की जे काही खाल्ले, प्याले किंवा चाटले जाते, ते सर्व कललातच जात असते आणि आपल्या स्थानावर पोहोचताच ते वाढू लागते. भंते, ज्याप्रमाणे सर्वच नद्या शेवटी सागरालाच जाऊन मिळतात. त्याचप्रमाणे जे काही खाल्ले, प्याले किंवा चाटले जाते ते सर्व कललांमध्येच जाऊन स्थिर होत असते. याच कारणाने ती तोंडावाटे गिळून घेतल्यामुळे गर्भधारणा होऊ शकते, हे मी मान्य करतो."

"ठीक आहे. महाराज, आता तुम्ही पूर्णतः माझ्याच मताचे झाले आहात, तर आता तुम्ही हे सांगा की सांकृत्य कुमार आणि ऋष्यश्रृंग तापस यांच्या जन्मासंबंधी घटना स्वीकार करता की नाही?"

"होय भंते, मी स्वीकार करतो."

२- "महाराज, सामकुमार आणि मांडव्य श्रावककाच्या जन्मासंबंधाने सुद्धा तीन गोष्टी घडून येतात. त्याच्या जन्माची घटनाही वरील घटनेशी मिळतीजुळतीच आहे. यासंबंधी एक कारण ऐका -"

दुकूल नावाचा तापस आणि पारिका नावाची तापसी हे दोघेही जंगलात राहत होते. दोघांचीही दृष्टी आणि विचार उत्तम अर्थाच्या शोधात लागली होती. त्या लोकांच्या तपश्चर्येच्या तेजाने ब्रह्मलोकी सुद्धा अस्थिरता निर्माण झाली होती. त्यावेळी स्वतः इंद्र सकाळ, संध्याकाळ दोन्ही वेळी उभयतांची सेवा करण्यासाठी येत असे. तेव्हा इंद्राने त्या दोघांविषयी मैत्री भावना करीत असता विचार केला की, 'भविष्यात हे दोघेही आंधळे होतील' हे पाहून इंद्र त्या दोघांना म्हणाला, "कृपाकरून तुम्ही माझी विनंती मान्य करावी. माझी अशी इच्छा आहे की, तुम्हाला जर एखादा मुलगा झाला तर तो तुम्हा लोकांची सेवा करील आणि म्हातारपणी मोठा आधार ठरेल." अशी इंद्राने त्रीवार प्रार्थना केली.

"हे इंद्रा, राहू देत. आम्हाला तू अशारीतीने अनर्थ करावयास सांगून पुत्राचे प्रलोभनात फसवू नकोस. अखेर हे शरीर तरी किती दिवस टिकणार आहे ! नष्ट होणे याचा स्वभावधर्म आहे. ते आज जरी नाश पावले तरी त्यांची आम्हाला मुळीच पर्वा नाही. पृथ्वी कापून तुकडे तुकडे झाले, पर्वत घसरून पडले, शून्य आकाश तुटून खाली आहे आणि चंद्र-सूर्याचे तुकडे गळून पडू लागले, तरी पण आम्ही सांसारिक कामभोगात फसू शकणार नाही. यात सांगितले ते पुरे झाले पण यापुढे मात्र तु आमच्या दृष्टीस पडू नको. पहिल्यांदा आला असता तुझ्यावर आमचा थोडा फार विश्वास बसत चालला होता. पण आता आम्हाला कळून आले की, तू आमचे वाईट कसे होईल, याचाच

विचार करीत आहे.''

यांप्रमाणे त्या दोघांची समजूत घालण्यास इंद्र असमर्थ ठरला. तथापि तो अत्यंत विनयाने हात जोडून म्हणाला, ''हे महान तपस्यांनो जसे माझे म्हणणे तुम्हाला मान्य नाही, तर तुम्ही एवढेच करा की, जेव्हा तापसी ऋतुमती आणि पुष्पवती असेल तेव्हा तुम्ही फक्त आपल्या उजव्या हाताच्या आंगठ्यांनी तिच्या नाभीला स्पर्श करावा. एवढ्यावरूनच तिला गर्भधारणा होईल. त्यासाठी एवढेच पुरे आहे.''

''होय इंद्रा, एवढे आम्ही करू शकतो. एवढ्यावरून आमचा तपोभंग होऊ शकत नाही.'' असे म्हणून करावयास ते दोघेही तयार झाले.

**देवपुत्र**

त्यावेळी देवलोकी एक पुण्यवान देवपुत्र राहत होता. त्याचे पुण्य संपल्यामुळे तेथील त्याचे आयुष्यही समाप्त होत चालले होते. आता तो आपल्या इच्छेनुसार कोठेही जन्म ग्रहण करावयास समर्थ होता. त्यांनी जर इच्छा केली असती तर तो चक्रवर्ती राजाच्या कुळात देखील जन्म घेऊ शकत होता.

तेव्हा देवेंद्र त्याजकडे जाऊन म्हणाला, ''हे मारिस, ऐका आपले भाग्य जागे झाले आहे. तुम्ही फार मोठी सिद्धी केली आहे. अशावेळी मी आज तुम्हाला एका बाबतीत मदत करू इच्छितो. तुमचा जन्म अत्यंत रमणीय अशा स्थही आणि अत्यंत अनुकूल अशाच कुळात होणार आहे. माता-पिता तुमचे उत्तमरीतीने पालन पोषण करतील. तेव्हा माझी गोष्ट तुम्ही स्वीकार करा.'' अशी त्रिवार प्रार्थना केली.

तेव्हा देवपुत्र म्हणाला, ''हे मारिस (आदरणीय), ज्या कुळाची तुम्ही एवढी स्तुती करीत आहात ते कुळ तरी कोणते आहे?''

''दुकूल नावाचा तपस्पी आणि पारिका नावाची तपस्वीनी यांच्याच कुळाची मी स्तुती करीत आहे.''

देवेंद्राचे वचन ऐकून देवपुत्र संतुष्ट झाला व त्यांच्या विनंतीचा त्याने स्वीकार केला. तेव्हा अंडज, जरायुज, स्वेदज आणि औपपातिक या चार योनी आहेत. त्यापैकी कोणत्या योनीत मी जन्म घ्यावा ते आपण सांगावे.

''मारिस, तुम्ही जरायुज योनीमध्येच जन्म घ्यावा.''

''तेव्हा देवपुत्राच्या जन्मासंबंधाने दिवसाची गणती करून तसे दुकूल तापसास अमक्या दिवशी तापसी ऋतुमती व पुष्पवती होईल, तेव्हा तुम्ही आपल्या उजव्या

हाताच्या आंगठ्यांनी तिच्या नाभीला स्पर्श करावा.'' देवेंद्राने सांगितले.

''महाराज, देवेंद्राने सांगितल्याप्रमाणे त्या दिवशी तापसी ऋतुमती झाली. इकडे देवपुत्र सुद्धा तिच्या गर्भात प्रतिसंधी ग्रहण करावयाच्या तयारीत होता. वेळ पाहून तापसाने तापसीच्या नाभीला आपल्या उजव्या हाताच्या आंगठ्याने स्पर्श केला. त्याबरोबर तिन्ही गोष्टी घडून आल्या. नाभीला स्पर्श होताच तापसीच्या मनात काम राग उत्पन्न झाला. तथापि असा स्पर्श करणे म्हणजे मैथुन कर्म नव्हते मौजमस्ती करणे, चर्चा करणे, परस्परांच्या डोळ्यांशी डोळे भिडविणे, आणि आपसात परस्परांना स्पर्श करणे इत्यादी सर्व गोष्टी केल्या असता गर्भाचा संचार होत असतो. महाराज, मैथुन कर्म न करता याप्रकाराने गर्भधारणा होत असते. महाराज ज्याप्रमाणे अग्नी दूर असला आणि त्याचा जरी स्पर्श होत नसला. तरी पण एखाद्या थंड वस्तूला तो उष्ण करतो. त्याचप्रमाणे मैथुन कर्म न करताही केवळ स्पर्श मात्राने गर्भ स्थापन होऊ शकते.''

३) – ''महाराज, याशिवाय या चार घटनांमुळे गर्भधारणा होत असते. जसे- अ) कर्मवश, ब) योनीवश, क) कुळवश आणि ड) प्रार्थनावश. तथापि समस्त प्राणी कर्मफळाच्याच प्रभावाने जन्मग्रहण करीत असतात.''

### अ) कर्मवश गर्भधारणा

''महाराज, कोणी सदाचरणी क्षत्रिय, ब्राह्मण, व्यापारी, गृहपती देवता किंवा अन्य लोक, अंडज, जरायुज, सस्वदेज किंवा औपपातिक या चार योनीपैकी ज्या योनीत जन्म घेण्याची त्यांची इच्छा असेल त्या योनीत ते जन्म घेऊ शकतात. महाराज, समजा कोणाच्याजवळ पुष्कळ संपत्ती आहे सोने, रूपे, रत्ने इत्यादींची कोठारे भरली आहेत, अशी खूप श्रीमंत व्यक्ती जर दास, नोकर, शेत, गाव, प्रगणे किंवा एखादा जिल्हा विकत धेण्याची इच्छा करीत असल्यास दुप्पट किंवा तिप्पट किंमत देऊन विकत घेऊ शकेल की नाही ?''

''होय भंते, तो अवश्य घेऊ शकेल.''

''त्याचप्रमाणे महाराज, सदाचरणी पुण्यवान माणसे ज्या योनीत किंवा कुळात त्यांची जन्म घेण्याची इच्छा असेल, त्याच योनीत किंवा कुळात ते जन्म घेण्याची इच्छा असेल, त्याच योनीत किंवा कुळात ते जन्म घेऊ शकतात. येथे त्यांचे कर्म हेच जन्मास कारण होणारे आहे. याप्रमाणे कर्माच्या कारणाने प्राणी गर्भात येऊन जन्म घेतात.''

### ब) योनीवश गर्भ धारणा

''महाराज, कोंबडीला हवेमुळे आणि बगळ्याच्या मादीला ढगांच्या गर्जनाने

गर्भधारणा होते. उच्च कोटीचे देवता लोक गर्भाशयात जन्म ग्रहण करीत नाही. जीवमात्राचा जन्म नानाप्रकारांनी होतो, ज्याप्रमाणे महाराज, वेगवेगळ्या मनुष्यांचे आचरण व राहणी सुद्धा वेगवगळी असते. वस्त्रभूषणही वेगवेगळे असते. वस्त्रभूषणही वेगवेगळे असते. कोणी पुढील बाजूने आपले अंग वस्त्राने झाकून घेतात तर कोणी मागील बाजूने. कोणी अंगावर वस्त्र न घालता नग्न राहतात, कोणी डोक्याचे मुंडण करतात आणि कोणी एकदम शुभ्र वस्त्रेच घालतात, कोणी डोक्यावर पगडी बांधतात आणि कोणी काषाय वस्त्रेच घालतात. कोणी डोक्याचे केश वाढवितात आणि कोणी वल्कलेच अंगाभोवती गुंडाळतात तर कोणी फार जाड वस्त्रेच धारण करतात, हे तुम्ही पाहिले काय?''

''होय भंते, असे लोक मी पाहिले आहेत.''

''त्याचप्रमाणे महाराज, वेगवेगळे प्राणी वेगवेगळ्या प्रकाराने जन्मास येतात. हे सर्व वेगवेगळ्या योनींच्या कारणाने घडून येते.''

### क) कुळाच्या पूर्वापार संबंधाने गर्भधारणा

''महाराज, अंडज, जरायुज आणि औपपातिक असे प्राणी जगण्याचे चार प्रकाराने योनीभेद किंवा कुळभेद आहेत. आपापल्या कर्मफळानुसार प्राणी त्या त्या योनीत जन्मास येतो. त्याच योनीत अगदी त्यांच्याच प्रमाणे इतर प्राणी देखील जन्मास येतात. जसे जेवढे पशू किंवा पक्षी हिमालयाच्या सुमेरू पर्वतावर जातात ते सर्व आपला मूळचा रंग सोडून सोन्याच्या रंगाचे बनतात, असे आपण ऐकले आहे काय?''

''होय भंते, असे मी ऐकले आहे.''

''त्याचप्रमाणे महाराज, कोणत्याही वेगवेगळ्या योनीतून पुनः ज्या दुसऱ्या योनीस जन्मास येतात. त्याच योनीतील प्राण्याप्रमपणे आपले रूप धारण करतात. याप्रमाणे कुळाच्या पूर्वापार चालत आलेल्या प्रभावाने जीवमात्र जन्मास येतात.''

### ड) प्रार्थनेच्या प्रभावाने गर्भधारणा

''महाराज, कोणकोणत्या कुळात फार श्रीमंती असते. परंतु असते ते निःसंतान, त्या कुळातील लोक देखील फार श्रद्धावान असतात, सदाचरणी, धर्मपराजय आणि अष्टशील उपोसथ व्रताचे पालन करणारे असतात. अशावेळी ज्या पुण्याच्या प्रतापाने देवलोकी स्थान मिळालेला कोणी देवपुत्र, त्यांचे पुण्य समाप्त झाल्यामुळे त्यावर देवलोक सोडण्याची पाळी येते. तेव्हा त्या सदाचरणी संतानहीन कुळाविषयी दयाळू असणारा देवराजा शुक्र त्या देवपुत्रास विनंती करतो की, 'हे मारीस, आता तुम्हाला पुनः जन्म घ्यावयाचा आहे, तेव्हा त्या सदाचरणी कुळात तुम्ही जन्म घ्यावा.' त्याप्रमाणे त्या

देवराजाच्या विनंतीवरून तो त्याच कुळात जन्मास येतो.''

''महाराज, ज्याप्रमाणे शीलवान, पुण्यकार्यात रममाण झालेला मनुष्य पुण्यवृद्धीकरिता आपल्या कल्याणाच्या कामनेने एखाद्या भिक्षूस विनंती करून आपल्या घरी घेऊन जातो, तद्वतच देवराज इंद्र त्या देवपुत्रास विनंती करून त्या शीलवान, सदाचरणी, कुळात न्यावयास कारण होतो. याप्रमाणे प्रार्थनेच्या प्रभावाने जीवप्राणी गर्भाशयात येऊन जन्म ग्रहण करतात.''

''महाराज, देवराज इंद्रांनी प्रार्थना केल्यामुळे सामकुमार याने पारिका नामक तपस्वीनीच्या उदरी जन्म ग्रहण केला. महाराज, कल्याणमय धर्माचरणाने आचरण करणाऱ्या शीलवान माता-पित्याच्या उदरी जन्म ग्रहण करणारा सामकुमार अत्यंत पुण्यवान होता. याशिवाय असा प्रसंग घडवून आणणाऱ्या देवेंद्रासारखी योग्य अशी व्यक्ती होती. या तिघांचेही चित्त एकाच उद्देशावर स्थिरावल्यामुळे साम कुमाराचा जन्म झाला.''

''महाराज, कोणी एका कसलेल्या शेतकऱ्याने उत्तम रीतीने नांगरून-वखरून कचरा साफ केल्याने सुपीक जमिनीत चांगल्या बीजाची पेरणी केली असता त्या बीजास अंकूर फुटून त्याची अभिवृद्धी व्हावयास बाधा येऊ शकेल काय?''

''मुळीच नाही, भंते, यात कोणत्याच प्रकारची बाधा नसल्यास बीजाची अभिवृद्धी व्हावयास मुळीच वेळ लागणार नाही.''

''महाराज याप्रमाणेच कोणत्याही प्रकारची बाधा नसल्या कारणाने तसेच तिघांचेही चित्त एकाच विषयावर केंद्रित झाल्याकारणाने साम कुमाराने जन्म ग्रहण केला. महाराज, शीलवान ऋषी लोकांच्या अभिशापाने भरभराटीस पोचलेला संपन्न देश सुद्धा विराण होत असतो, असे कधी तरी यापूर्वी ऐकले आहे काय?''

''होय भंते, दंडकारण्य, मेघारण्य, कालिंगारण्य तसेच मातंगारण्य इत्यादी ठिकाणी कधी काळी मनुष्यांनी गजबजलेली संपन्न अशी नगरे होती, परंतु ऋषी लोकांच्या अभिशापाने त्या ठिकाणी आता जंगले वाढली आहेत.''

''महाराज, ऋषी लोकांच्या क्रोधास बळी पडलेल्या रमणीय नगराची राख रांगोळी होऊन तेथे असे जंगल वाढून येते तर ते प्रसन्न झाले असता एखादी चांगली गोष्ट घडून येणार नाही कशावरून?''

''होय भंते, अवश्य घडून येऊ शकते.''

''महाराज, हेच कारण आहे की, अत्यंत धर्माचरणी तिन्ही व्यक्तींचे चित्त एकाच

उद्देशावर केंद्रिय झाल्यामुळे साम कुमाराचा जन्म झाला. ऋषी, देव आणि पुण्याच्या प्रभावामुळेच सामकुमार जन्मास आला. महाराज ही घटना अशीच समजली पाहिजे.''

''महाराज, १) साम कुमार, २) महापनाद आणि ३) कुस राजा हे तिन्ही बोधिसत्व ठरलेले देवपुत्र देवेंद्राच्याच प्रार्थनेमुळे कुळात जन्माला आले होते.''

''भंते नागसेन, मला आता गर्भधारणा कशी होते. हे चांगले समजून आले आहे. गर्भधारणेच्या कारणांचा उत्तम रीतीने आपण उलगडा करून दिला. अज्ञान अंधकाराचा नाश करून तेथे ज्ञानाची मशाल उजळली. परस्परांत गुंतलेले धागे अगदी न तोडताही वेगवेगळे करून दिले. धर्म विरोधकाचे तोंड काळे पडले. आपण जे सांगितले, ते मी मनू:पूर्वक मान्य करतो.''

**(गर्भाव क्रांती प्रश्न समाप्त)**

## ८. बुध्द धर्माचा काळ

''भंते नागसेन, भगवान बुद्धांनी सांगितले आहे की, 'आनंद' माझा धर्म पाचशे वर्षेपर्यंत चांगल्या अवस्थेत राहील. तसेच सुभद्राने विचारलेल्या प्रश्नांना उत्तर देतांना महापरिनिर्वाणापूर्वी असेही सांगितले की, 'सुभद्र, भिक्षू लोक जर धर्मनियमानुसार आचरण करीत राहिले, तर या जगात अर्हतांची कमी कधी पडणार नाही.' हे विधान सर्व ठिकाणी लागू पडणारे आहे. हे विधान खोटे ठरविल्यास कोठेही पुरावा असा सापडत नाही, यावर कोणत्याच प्रकारे आक्षेप घेता येण्यासारखे नाही. तथापि, 'हे आनंद, माझा धर्म पाचशे वर्षेपर्यंत सुस्थितीत राहील', भगवान बुद्धाचे हे वचन जर खरे मानावे तर, 'हा संसार अर्हताशिवाय कधी खाली राहणार नाही', हे वचन एकदम खोटे ठरते, आणि हा संसार अर्हतावाचून कधी खाली राहणार नाही, हे वचन खरे मानावे तर हे आनंद, माझा धर्म पाचशे वर्षेपर्यंतच सुस्थितीत राहील', असे भगवान बुद्धाने केलेले कथन खोटे पडते.''

''भंते, हाही प्रश्न अत्यंत कोड्यात टाकणारा आहे. अत्यंत गूढ, अवघड आणि किचकट आहे. म्हणूनच मी आपल्या कानावर घातला आहे. जसे सागरातील मगर दाखवावा तद्वतच येथे आपण आपल्या ज्ञानशक्तीचा प्रताप दाखवावा.''

''महाराज भगवान बुद्धांनी वर सांगितलेली दोन्ही विधाने यथार्थ आहेत. परंतु भगवान बुद्धाने वेगवेगळ्या प्रसंगी केलेले कथन त्यातील भाव आणि अर्थाच्या दृष्टीने वेगवेगळे असतात. त्यातील एक बुद्ध धर्माचे शासन किती दिवसपर्यंत राहील, याकडे निर्देश करतो, तर दुसरे धर्माचे फळ नेहमी एकसारखे कसे मिळते; म्हणजे आचरणासंबंधीचा

निर्देश करतो. ज्याप्रमाणे जमीन व आकाश यातील फरक, स्वर्ग व नरक यातील फरक, पाप व पुण्य यातील फरक आणि सुख व दुख यांतील फरक आहे, त्याप्रमाणे या दोन्ही विधानांतील फरक आहे. वरील दोन्ही विधानांचे स्वरूप एक दुसऱ्यापासून अगदीच भिन्न आहे. तरी पण आपण विचारलेला प्रश्न व्यर्थ जाऊ नये म्हणून मी यामधील मूलभूत संबंध कशाप्रकारचा आहे, यावर विशेष विवेचन करणार आहे.''

''महाराज, 'माझा धर्म पाचशे वर्षेपर्यंतच सुस्थितीत राहील', असे जे भगवान बुद्धांनी सांगितले, ते केवळ धर्म शासन टिकून राहण्याच्या काळाबद्दल होते. जसे- इतक्या वर्षानंतर धर्माचा लोप होईल असा त्याचा अर्थ होता. कारण त्यांनी स्पष्टपणे म्हटले होते की, 'आनंद, भिक्षू संघात जर स्त्रियांना प्रव्रजित केले नाही, तर माझा धर्म एक हजार वर्षेपर्यंत सुस्थितीत राहील; परंतु त्या प्रव्रजित झाल्याने केवळ पाचशे वर्षेपर्यंत राहण्याची शक्यता आहे.''

''महाराज, आता तुम्हीच सांगा की, अशाप्रकारे भगवान बुद्धाला धर्मशासन टिकून राहण्याचा काळ दर्शविण्याचे होते की, धर्म वाईट म्हणून त्याची निंदा करावयाची होती?''

''नाही भंते, त्यांना धर्माची निंदा करावयाची नव्हती.''

''महाराज, धर्म लोप पावण्याचा तो एक इशारा मात्र होता. म्हणजे धर्म-शासनास कोणत्या गोष्टींचे भय आहे, ते त्यांनी सांगितले आहे. जर सावध राहिले नाही तर जे आहे ते आणखी किती काळ टिकू शकेल, हेच त्यांना सांगावयाचे होते. ज्याप्रमाणे एखाद्या माणसाचे उत्पन्न अधिक प्रमाणात घटले असता, आपल्या जवळ आता किती शिल्लक आहे व तो आणखी किती दिवस चालेल हे जसे त्यांनील इतर लोकांना सांगावे, तसेच केवळ धर्म शासन एवढ्याच प्रयत्नावर किती काळ टिकून राहू शकेल, याप्रमाणे धर्माची मर्यादा भगवान बुद्धास सांगावयाची होती, जेणेकरून ते पुढे सावध राहतील. तथापि आपल्या महापरिनिर्वाणापूर्वी सुभद्र नामक परिव्राजकास आपल्या श्रमणांची (भिक्षूंची) प्रशंसा करीत असता भगवान बुद्ध म्हणाले होते की-''

''हे सुभद्र, भिक्षू लोक जर धर्मानुसार आचरण करीत राहिले, तर हा संसार अर्हतावाचून कधी खाली राहणार नाही.'' यात धर्मचरणाच्या प्रत्यक्ष फळासंबंधी सांगितले आहे. म्हणजे धर्म कशावर अवलंबून आहे, हे या दुसऱ्या विधानात सांगितले आहे.

*काही पुस्तकांत १००० वर्षाचा काळ सांगितला आहे.*

''महाराज, एखादी वस्तू टिकण्याचा काळ आणि तिच्या स्वरूपाचे वर्णन, या दोन्ही बाबींची भेसळ करून तुम्ही अधिक प्रश्नाला गंभीर करून टाकले, परंतु आपण विचारीतच आहात, त्याअर्थी या दोन्हीबाबींचा काय संबंध आहे ते मी अधिक विस्ताराने सांगणार आहे आपण लक्षपूर्वक व विश्वासाने नीट ऐकावे.''

१- ''महाराज, समजा स्वच्छ व शीतल पाण्याने भरलेला एक तलाव आहे. त्याच्या सभोवार सुंदर घाट, वज्र तटबंदी आहे. त्याचे क्षेत्र मर्यादित असून सतत धार पाऊस येतच आहे, आता तुम्हीच सांगा अशा स्थितीत त्या तलावाचे पाणी कमी होईल किंवा संपेल काय?''

''नाही भंते, हे कसे शक्य आहे.''

''ते कां बरे?''

''का की, सतंत मुसळधार पाऊस पडत आहे.''

''त्याचप्रमाणे महाराज, भगवान बुद्धाने उपदेश केलेला सद्धर्म हा सुध्दा एका तलावाप्रमाणेच आहे. शुद्ध जीवनाच्या विनय, सदाचार आणि नीतीच्या पाण्याने तो तुडूंब भरलेला आहे. याचे पाणी सतत स्वर्गापेक्षा उंच अशा लाटांनी ओसंडून वाहत असते. यात जर बुद्धानुयायी कर्तव्य (विनय) पालन, सदाचार (शील), पुण्य आणि पावित्र्य यांची संततधार वृष्टी करीत राहिले, तर हा सद्धधर्मरूपी तलाव प्रदीर्घ काळ टिकून राहील. तेव्हा संसार अर्हतावाचून कधीही ओस पडणार नाही. 'हे सुभद्र, भिक्षू लोक जर चांगल्याप्रकारे धर्माचे आचरण करीत राहिले तर संसारात अर्हतांचा कधीच तुटवडा पडणार नाही.' याप्रमाणे भगवान बुद्धाने सुभद्रास सांगितलेल्या विधानाचा हाच अर्थ आहे.''

२- ''महाराज, लोक जर एखाद्या जळत्या अग्नीत गोवऱ्या, वाळलेली लाकडे आणि वाळलेली पाने टाकू लागले तर अशाने तो अग्नी विझेल काय?''

''नाही भंते, अशाने तो आणखी उग्रतेने पेटू लागेल व त्याच्या ज्वाला अधिकच भडकतील.''

''महाराज, बरोबर. त्याचप्रमाणे शुद्ध जीवनाचे नियम आणि सदाचाराने पालन सदोदित करीत राहिल्यास या दहा हजार लोकधातू पेक्षाही उंच भगवान बुद्धाच्या सद्धर्माच्या ज्वाला सतत उठत राहतील. महाराज, याशिवाय जर भगवान बुद्धाचे बुद्धपुत्र (अनुयायी) दृढनिश्चयाने, शौर्याने, चिंतनात तत्पर होऊन ध्यान सुखाचा प्रत्यक्ष अनुभव

घेत. अधिशील शिकवण, अधिचित शिकवण आणि अधिप्रज्ञा शिकवण या तिन्ही प्रकारच्या शिकवणींचे पालन करीत असता स्वतःवर पूर्णतः संयम ठेवत राहिले तर बुद्ध यासन अधिक काळपर्यंत चिरस्थायी होऊन प्रभावी बनल्यावाचून राहणार नाही. तेव्हा या संसारात कधीच अर्हतांचा तुटवडा पडणार नाही. महाराज, भगवान बुद्धाने सुभद्रास सांगितलेल्या बिधागाचा हाच अर्थ आहे."

३- "महाराज, समजा एखाद्या स्वच्छ, सुंदर, चांगल्यारीतीने साफ गळगुळीत आणि चमकदार आरशाला जर कोणी एकदम बारीक वस्त्रगाळ गेरूच्या चुर्णाने वेळोवेळी पुसून- चोळून साफ करीत राहले तर त्यावर धुळीचे डाग पडून घाण पसरेल काय?"

"नाही भंते, असे केल्याने तो तर अधिकच चमकदार होईल."

"महाराज, याप्रमाणेचस भगवान बुद्धाचा धर्म स्वतः क्लेशरूपी समस्त मळ नाश पावल्याने अगदी निर्मळ आहे. तरीपण बुद्धपुत्र (अनुयायी) त्याला आपल्या जीवनाच्या पावित्र्याचे विनय, शील इत्यादी सद्गुण चुर्णाने आणखी स्वच्छ करीत राहिले, तर तो अनेक वर्षेपर्यंत स्थिर राहू शकेल. त्यामुळे संसार अर्हताचून कधी ओस पडणार नाही. महाराज, याच उद्देशाने भगवान बुद्धाने सुभद्रास सांगितले की, 'सुभद्र, भिक्षूलोक जर धर्मानुसार आपले पवित्र आचरण राखण्यास प्रयत्नशील राहिलेत तर, संसार कधीही अर्हतावाचून ओस पडणार नाही. महाराज, धर्माची मुळे चारित्र्यात आहेत; आणि जोपर्यंत लोकांचे चारित्र्य बिघडणार नाही, तोपर्यंत भगवान बुद्धाच्या धर्माचा कधीही लोप होणार नाही.' महाराज, यासाठी निष्ठापूर्वक कसून धर्माचा अभ्यास केला पाहिजे. अभ्यासात व आचरणातच बुद्ध धर्माचे मूळ सार आहे आणि अभ्यासाच्याच अधिष्ठानावर तो पूर्णतः टिकून आहे."

"भंते, नागसेन, आपण सद्धर्माच्या लोपासंबंधी उल्लेख करता तेव्हा त्याचे कारण काय?"

"महाराज, कोणत्याही धर्माचा लोप होण्याची तीन कारणे आहेत. ती म्हणजे अ) धर्मज्ञानाचा खरोखर अभिप्राय काय, याचा विसर पडल्यामुळे व त्यासाठी योग्य प्रयत्नांचा अभाव, ब) कुणीही धर्मानुसार आचरण करीत नसेल तर धर्माचरणाचा ऱ्हास होतो आणि क) त्यांची सर्व चिन्हे, लोप पावल्यामुळे. **धर्मज्ञानाचा खरा अभिप्राय काय, याचा विसर पडल्यामुळे** त्यानुसार आचरण करणारास देखील त्याचा योग्य बोध होत नाही. धर्मानुसार कुणीही आचरण करीत नसल्यामुळे धर्माचा लोप होतो. कारण

धर्म हा आचरणात आहे, अशास्थितीत फक्त त्याची चिन्हे मात्र शिल्लक राहतात आणि जेव्हा क्रमाक्रमाने ही चिन्हे देखील सर्वथा लोप पावतात, तेव्हा थोडाफार उरलेला धम्मसुद्धा पूर्णतः लोप पावतो.''

''भंते नागसेन, आपण उत्तम प्रकारे समजावून सांगितले. बुद्धिभ्रंश करणारा हा प्रश्न, परंतु अत्यंत सफाईने त्याचा उलगडा करून दिला. गुंतलेले धागे कापून काढलेत. धर्म विरोधकांच्या युक्तीवादाचे एकदम निर्मूलन करून त्यांना निस्तेज केले. आपण खरोखरच सर्व गणाचार्यात सर्वश्रेष्ठ आहात.''

**(सद्धर्मांतर्धान प्रश्न समाप्त)**

## ९. भगवान बुद्धाची निष्कलंकता

''भंते नागसेन, भगवंतानी संबोधीचा लाभ करून आपल्यामधील समस्त पापे जाळून टाकली होती की, त्यापैकी काही शिल्लक राहिली होती ?''

''महाराज, समस्त पापे जाळून टाकल्यामुळेच ते भगवान बुद्ध झाले. त्यांच्यात पापांचा (वाईटांचा) लवलेशही नव्हता.''

''भंते त्यांना कधी तरी शारीरिक पीडा झाली होती काय?''

''होय महाराज, एकदा राजगृह शहरात भगवान बुद्धाच्या पायात दगडाचा एक लहान अणकूचीदार तुकडा रूतला होता. तसेच एकदा त्यांना अतिसार सुद्धा झाला होता. एकदा पोटातू दुखू लागल्यामुळे जीवकाने त्यांना जुलाब देखील दिला होता. एकदा वायूचा प्रकोप झाल्यामुळे स्थवीर आनंद यांनी त्यांना गरम पाणी आणून दिले होते.''

''भंते, भगवान बुद्धाने समस्त क्लेश जाळून जर बुद्धत्वाचा लाभ केला होता, तर त्यांना शारीरिक पीडा भोगाव्या लागल्या होत्या, हे विधान खोटे ठरते आणि त्यांना शारीरिक कष्ट भोगावे लागले होते, हे विधान खरे मानावे तर त्यांनी आपले सर्व
क्लेश (पापे) जाळू टाकले होते, असे केलेले विधान सपशेल खोटे ठरते. भंते, कर्मावाचून कधी सुख, दुःख होऊ शकत नाही. सर्व सुख दुःखाचे मूळ कर्म आहे. हे सुद्धा एक कोडे आपल्या निदर्शनास आणून दिले आहे. आपण उलगडा करून समजावून सांगावे.''

''नाही महाराज, पण सर्वच वेदनांची मूळे कर्मात नाही. ज्या कारणांमुळे

संसारातील सर्वच प्राणीमात्र सुख-दुःख भोगतात, त्यांचीही आठ कारणे आहेत- १) वायू प्रकोप होणे, २) पित्त प्रकोप होणे, ३) कफाची वृद्धी, ४) सन्निपाताचा दोष उद्भवणे, ५) ऋतु बदल होणे, ६) खाण पानात गडबड होणे, ७) नैसर्गिक इतर प्रभाव आणि ८) आपल्या कर्मांचे फळ. याच कारणांमुळे सर्व प्राणीमात्रास सुख-दुःखे भोगावी लागतात. महाराज कर्माच्या फळाशिवाय सुख-दुःखाचे दुसरे कारण असू शकत नाही, असे मानणारे चुकीचे विधान करतात.''

''भंते नागसेन, तरीपण याशिवाय दुसऱ्या सात कारणांचे मूळही कर्मच आहे. कारण ते सुद्धा सर्व कारणापासूनच उत्पन्न होतात.''

''महाराज, जर सर्वच दुःखे कर्माच्याच कारणाने उत्पन्न होता, असे मानले तर त्यांना वेगवेगळ्या प्रकारात विभक्त करता येणार नाही. महाराज, वायूचा प्रकोप होण्याची (बिघडण्याची) दहा कारणे आहेत - १) थंडीमुळे, २) उष्णतेमुळे, ३) भूकेमुळे, ४) तहानेमुळे, ५) अतिभोजनामुळे, ६) अधिक वेळ एकसारखे उभे राहिल्यामुळे, ७) अतिपरिश्रमामुळे, ८) अतिवेगाने चालण्यामुळे, ९) नैसर्गिक प्रभावामुळे आणि १०) आपल्या कर्माच्या फळामुळे. या दहा कारणांपैकी पहिली नऊ कारणे मागील किंवा पुढील जन्मी आपला परिणाम घडवत नाहीत तर केवळ याच जन्मी परिणाम घडवतात. म्हणून सर्वच सुख-दुःखे कर्माच्याच कारणाने परिणाम कारक ठरतात, असे म्हणता येत नाही.''

''महाराज, पित्ताचा प्रकोप होण्याची तीन कारणे आहेत- १) थंडी, २) उष्णता आणि ३) अनियमित भोजन. तसेच महाराज, कफ वृद्धीची सुद्धा तीन कारणे आहेत- १) थंडी, २) उष्णता आणि ३) खाण्यापिण्यातील दोष. या तिन्हीपैकी एखादे जरी बिघडले तरी त्यामुळे वेदना होतात. या वेगवेगळ्या वेदना आपापल्या स्वतंत्र कारणामुळेच होत असतात. महाराज, याप्रमाणे कर्म फळामुळे होणारी दुःखे थोडी आहेत, परंतु अधिक दुःखे तर इतर कारणांमुळेच होणारी आहेत. तथापि मूर्ख लोक मात्र सर्व प्रकारच्या दुःखाची मुळे कर्म फळात आहेत, असे समजतात. कोणाचे कर्मफळ कशात आहे, हे भगवान बुद्धावाचून कुणीही सांगू शकत नाही.''

महाराज, ''भगवान बुद्धाच्या पायास दगडाचा एक लहानसा अणकूचीदार तुकडा लागून जी दुखापत झाली होती. ती वायू किंवा पित्तादी प्रकोपामुळे नाही तर संयोगवश बाह्य कारणांमुळेच झाली होती. महाराज, शेकडो - हजारो वर्षापासून

*धर्मोत्सव करणे, पर्व मानणे, भिक्षूद्वारा शील ग्रहण करणे इ. बाह्य चिन्हे होत.*

भगवान बुद्धाबद्दल देवदत्ताच्या मनात वैरत्व चालून राहिले होते. त्याच वैरामुळे देवदत्ताने एका पहाडाच्या उतारावरून खालच्या रस्त्याने चालत जात असलेल्या भगवान बुद्धाच्या डोक्यावर पडेल अशा बेताने एक फार मोठा धोंडा फेकला, परंतु मध्येच दोन धोंडे आडवे आल्यामुळे तो धोंडा त्यात अडकून राहिला. एवढेच की, त्या धोंड्याशी टक्कर होऊन त्यातील एक लहान तुकडा उसळून भगवान बुद्धाच्या पायास लागून रक्त आले.''

''महाराज, यामुळे भगवान बुद्धाला जे दुःख झाले ते एकतर त्यांच्यात कृत्यामुळे किंवा दुसऱ्या कुणाच्या तरी कृत्यामुळे झाले असावे. याशिवाय तिसरे कारण तर असूच शकत नाही. जसे एखादे बीज उगवत नाही, त्याचे कारण जमीन चांगली नसावी किंवा बीजातच काही दोष असावा. तसेच अन्न पचन होत नाही, याचे कारण पोटात काहीतरी दोष असावा किंवा अतिभोजन झाले असावे, हेच याचे कारण असू शकते. तद्वतच महाराज, भगवान बुद्धाला ते झालेले दुःख त्यांच्यात कृत्यामुळे किंवा दुसऱ्या कोणाच्या तरी कृत्यामुळे झाले असावे. याशिवाय तिसरे कारण असूच शकत नाही.''

''महाराज, भगवान बुद्धास, त्यांच्या स्वतःच्या कर्म फळामुळे किंवा खानपानाच्या दोषामुळे कधीही दुःख झालेले नाहीत. हे खरे की, इतर सहा कारणांपैकी कोणत्या तरी एकामुळे मध्यमध्ये कधी शारीरिक पीडा होत असत. तथापि त्यामुळे भगवान बुद्धाच्या जीवनाचा अंत होईल इतकी शक्ती त्यात मुळीच नव्हती. महाराज, चार महाभूंतापासून बनलेल्या या शरीराला थोडेफार सुख-दुःख तर होतच असतात.''

१- ''महाराज, समजा एखादे लहान मातीचे ढेकूळ वर फेकले असता ते परत जमिनीवरच येऊन पडते. म्हणजे जमिनीने पूर्वी केलेल्या कृत्याचे हे फळ आहे म्हणून ते तिच्यावर जोराने येऊन आदळते असे समजावे काय?''

''नाही भंते, जमिनीने चांगले अगर वाईट कर्म ते काय असणार की, ज्यायोगे तिला सुख-दुःखे भोगावी लागतात ! ते जमिनीच्या कर्मफळामुळे नव्हें तर दुसऱ्याकडून वर फेकले गेल्यामुळे अशारीतीने येऊन पडते.''

''महाराज, बरोबर याच उदाहरणाप्रमाणे भगवान बुद्धांना पृथ्वी समजावे. कोणत्याही कर्मफळावाचून ते ढेकूळ पृथ्वीवर येऊन आदळते, तद्वतच कोणत्याही कर्मफळावाचून भगवान बुद्धाच्या पायावर तो दगडाचा तुकडा पडला, असेच समजावे.''

२- ''महाराज, लोक जमीन खणतात किंवा तिची कुळकाठी करतात. तेव्हा ते तिच्या पूर्व कर्माच्या फळामुळे असे घडते, असे मानावे काय?''

“नाही भंते.”

“महाराज, भगवान बुद्धाच्या पायात दगडाचा एक तुकडा लागला होता, त्याचेही असेच आहे. भगवान बुद्धाला अतिसार झाला होता, तो सुद्धा त्याच्या कर्मफळामुळे नाही तर सन्निपातामुळे होय. यात कर्मफळ व सन्निपात याचा तिळमात्र संबंध येत नाही. याशिवाय आणखी जे काही दुःख तथागताला झाले होते, त्यांची कारणे त्याचे स्वतःच्या कर्मफळात नसून त्या सहा दुसऱ्या दोषांत आहेत.”

“महाराज संयुक्त निकायातील मोलियसीवक सुत्तात स्वतः देवाधिदेव भगवान बुद्धानेच म्हटले आहे की, ‘सीवक, संसारात काही यातना तर पित्त प्रकोप पावल्यामुळे होतात. याची जाणीव स्वतःला देखील होऊ शकते आणि हीच बाब दुसरे- सर्वच लोक मान्य करतात. सीवक सर्व प्रकारची सुख-दुःखे किंवा अन्य कष्ट प्राणी मात्रास भोगावे लागतात, याचे कारण केवळ त्याचे स्वतःचेच पूर्वजन्मीचे कर्मफळ होय, असे जे काही श्रमण परिव्राजक अकारण मानतात ते स्वतःच्याच ज्ञानाची फसवणूक करीत आहेत व लोकांच्या अनुभवाची ते थट्टा करतात, असेच म्हणावे लागेल. म्हणूनच मी म्हणतो की, त्यांचे असे मत चुकीचे आहे. कफ, वायू, सन्निपात इत्यादी समस्त बाह्य दोषांपासून उद्भवणाऱ्या कष्ट व यातना यासंबंधी देखील असेच समजले पाहिजे. याविषयी स्वतःच समजून घेतले पाहिजे आणि समस्त लोक देखील असेच मानतात. सीवक, सर्वच सुख, दुःख उपेक्षा व वेदना भोगाव्या लागतात त्या स्वतःच्याच पूर्वजन्मीच्या कर्माच्या फळामुळे होत, असे जे काही दुसरे श्रमण-ब्राह्मण म्हणतात, ते आपल्या स्वतःच्याच ज्ञानाची व इतर लोकांच्या अनुभवाची अवहेलना करतात. त्याप्रमाणे ते दोन्ही दृष्टीने केवळ लोकांची फसवणूक करीत असल्यामुळे मी म्हणतो की, त्यांचे असे म्हणणे एकदमच चुकीचे आहे.”

“महाराज, यावरून असाच सारांश निघतो की, सर्वच दुःखाचे वा कष्टाचे कारण आपल्या पूर्वजन्मीचे कर्मफळ नाहीत. तेव्हा आता तुम्ही भगवान बुद्धाने आपल्या बुद्धत्व प्राप्तीपूर्वी सर्वच पापांना (क्लेश) जाळून टाकले होते, हे विधान विश्वासपूर्वक मानावयास पाहिजे.”

“बरोबर आहे भंते, आपले म्हणणे, मी सहर्ष स्वीकार करतो.”

## १०. भगवान बुद्ध समाधी कां लावतात ?

“भंते नागसेन, भगवान बुद्धाला जीवनात जे काही करावयाचे शिल्लक राहिले होते ते त्यांनी बोधिवृक्षाखाली बसून सर्व काही इष्ट ध्येय लाभलेले कार्य पूर्ण करून

टाकले होते, पुनः त्यांना करण्यासाठी काहीही शिल्लक राहिले नव्हते. एवढेच नव्हे तर केलेल्या कर्तृत्वात पुन्हा काहीही जोडण्यासारखे राहिले नव्हते. याचबरोबर असेही ऐकण्यात येते की, त्यांनी तीन महिनेपर्यंत समाधी लावून शांतमय अवस्थेत घालवले होते, असे जे आपण लोक म्हणता ते कसे काय आहे?''

''भंते नागसेन, भगवान बुद्धांनी जर बोधिवृक्षाखालीच आपले सर्व इष्ट ध्येय साध्य करण्याचे कार्य संपवले होते, तर त्यांनी पुन्हा तीन महिन्यापर्यंत समाधी लावून बसण्यात घालवले, हे विधान खोटे ठरते आणि जर भगवान बुद्धाने खरोखरच तीन महिन्यापर्यंत समाधी लावून बसण्यात घालविले असेल तर बोधिवृक्षाखाली बसून त्यांनी आपले सर्व इप्सित साध्य केले होते, हे विधानप खोटे ठरते. करावयाचे ते सर्व कृत्य केल्यामुळे आता त्यांच्यासाठी काहीही शिल्लक राहिले नव्हते, तर पुन्हा बुद्धत्व प्राप्तीनंतर समाधी लावून बसण्याची त्यांना काय आवश्यकता होती ? कारण त्यांनी आपले कर्तव्य पूर्वीच संपवले होते ना ?''

''भंते, जो आजारी असेल, त्यालाच औषधाची गरज भासते. निरोगी माणसाला औषधाचे काय प्रयोजन ? भुकेल्यास भोजनाची आवश्यकता असते. जेवण करून तृप्त झालेल्या माणसाला भोजनाचे काय प्रयोजन ? तसेच ज्याने कार्य अपुरे राहिले असेल त्यालाच समाधी लावून बसण्याचवी आवश्यकता असू शकते. ज्यांचे ध्येय सिद्ध करण्याचे कार्यच संपले आहे, त्यांना समाधी लावून बसण्याचे काय प्रयोजन ? हा देखील बुद्धिभ्रंश करणारा किचकट प्रश्न आहे. म्हणूनच मी आपल्या कानी घातला आहे. तेव्हा याचे योग्य उत्तर देऊन आपण माझी समजूत घालावी.''

''महाराज, भगवान बुद्धाने बोधिवृक्षाखालीच सर्व कार्ये समाप्त केले होते आणि बुद्धत्व प्राप्तीनंतर देखील ते तीन महिन्यापर्यंत समाधी लावून बसले होते, या दोन्ही बाबी खऱ्या आहेत. महाराज, समाधी अन्तर्गत पुष्कळ काही चांगले गुणधर्म आहेत. सर्व बुद्धांनी समाधीच्या योगायोगानेच बुद्धत्वाचाच लाभ करून घेतला आहे. म्हणूनच ते बुद्धत्व लाभ घेतल्यानंतरसुद्धा समाधीच्या चांगल्या गुणांचे सदैव स्मरण करतांना पुन्हा-पुन्हा समाधीचा ते उपयोग करतात.''

''महाराज, समजा कुणी एका माणसाने राजाची सेवा केली. त्यामुळे खुश होऊन राजाने त्यास फार मोठे इनाम दिले. आपल्या कर्तृत्वनिष्ठेमुळे लाभलेल्या बक्षिसाचे स्मरण करून तो अधिकच सेवेमध्ये तत्पर झाला. अथवा कुणी दीर्घ आजारी पुरूष आपल्या आजाराची योग्य प्रकारे सुश्रुषा व्हावी म्हणून कुणी एका वैद्यास चांगली रक्कम देण्याचे मान्य करून त्याची सेवासुद्धा निष्ठापूर्वक करतो. तसे त्याला गुणही चांगलाच घडून

येतो व अल्पावधितच तो चांगला निरोगी होतो; परंतु निरोगी झाल्यावर देखील त्या वैद्याच्या उपकारांचे स्मरण करून तो आणखीही सेवा करतो. याप्रमाणेच महाराज, सर्व बुद्धांनी समाधीच्या योगानेच बुद्धत्वाचा लाभ करून घेतला आहे. त्या-त्या समाधीच्या गुणाचे स्मरण करून बुद्धत्व लाभ करून घेतला आहे. त्या त्या समाधीच्या गुणाचे स्मरण करून बुद्धत्व लाभ केल्यानंतर देखील ते त्या समाधीची सेवा करतात.''

''महाराज, समाधीचे २८ असे चांगले गुण आहेत. ते पाहूनच सर्व बुद्ध अव्याहत त्या समाधीची सेवा करतात. ते अठ्ठावीस गुण असे - १) समाधी जीवनाचे रक्षण करते, २) दीर्घायुष्य प्राप्त होते, ३) समाधीमुळे दिव्य बळ लाभते, ४) दोषमुक्त होतो. ५) अपयश धुऊन निघतात. ६) यशाची वृद्धी होते, ७) असंतुष्टपणाचा नाश होतो. ८) पूर्णतः संतोषाचा लाभ होतो, ९) भीती नाश पावते, १०) निर्भयतेचा लाभ होतो, ११) आळस नष्ट होतो, १२) उत्साहात भर पडते, १३-१५) लालसा, द्वेष आणि मलूलपणाचा नाश होतो, १६) मिथ्या गर्व हरण होते, १७) समस्त शंकांपासून निवारण होते, १८) चित्त एकाग्र होते, १९) सदैव मन प्रसन्न राहते, २०) मन एकदम पवित्र व निर्मळ बनते, २१) गांभिर्य प्राप्त होते, २२) मोठा लाभ होतो, २३) अपूर्व नम्रतेचा लाभ होतो, २४) प्रीती उत्पन्न होते, २५) प्रमोद प्राप्त होतो, २६) समस्त संस्कार खिळखिळे करण्याचे ज्ञान होते, २७) पुनर्जन्माचा शेवट होतो आणि २८) श्रमण जीवनाचे यथार्थ फळ प्राप्त होते. महाराज, याच समाधीचा अठ्ठावीस गुणांस अनुलक्षून सर्व बुद्ध तिची सेवा करतात. चित्त एकाग्र होताच जी प्रीती उत्पन्न होते, तिचा आनंद आगळा असतो. म्हणून तृष्णा नाश करून हे महाराज, सर्वच बुद्ध समाधीत मग्न राहतात.''

''महाराज, सर्वच बुद्ध समाधीत मग्न होताच याची चार कारणे अशी आहेत -१) आपदरहित सुखमय जीवन, २) सर्वश्रेष्ठ गुणांचा वास, ३) उच्च ध्येयाचा एकमेव मार्ग आणि ४) सर्वच बुद्धांनी मुक्त कंठाने केलेली समाधीची प्रशंसा. याच कारणाने तथागत नेहमी समाधी-भावनेत मग्न होत असत.''

''महाराज, तथागत बुद्धांस काही करावयाचे शिल्लक राहिले होते म्हणून नव्हे, तर समाधीचे असंख्य गुणधर्म पाहूनच ते समाधीचे चिंतन करीत असत.''

''भंते, आपण अचूक असेच विवरण करून सांगितले आहे आणि ते मी मान्य करतो.''

## ११. ऋद्धिबळाची वाहवा

''भंते नागसेन, भगवान बुद्धांनी म्हटले आहे की, 'आनंद, बुद्धांनी चारही त्रद्धिपाद

अंकित केलेले असतात. ते आचरणाने सिद्ध केलेले असतात. याबाबतीत त्यांनी खूप विकास केलेला असतो. चारही ऋद्धिपादांचे त्यांनी प्रत्यक्ष अनुष्ठान केलेले असते. त्यांची तथागतास पूर्णपणे ओळख पटलेली असते. म्हणूनच मानसिक व बौद्धिक विकासासाठी यांचा कसा उपयोग करता येईल, यासाठी त्यावर तथागताचे नियंत्रण असते. कारण त्यांची अत्युच्च शिखरे त्यांनी ओलांडली असतात. म्हणून,' हे आनंद, तथागत एक कल्पपर्यंत किंवा कल्पातील उरलेल्या काळापर्यंत आपली जीवन स्थिती राखून ठेऊ शकतात.' सोबतच असेही म्हटले आहे की, ''आजपासून तीन महिन्यानंतर तथागत महापरिनिर्वाणाचा लाभ करून घेतील.''

''भंते नागसेन, जर भगवान बुद्धाने म्हटले असेल की, 'तथागत बुद्ध कल्पभर देखील आपली जीवन स्थिती राखून ठेऊ शकतात.' तर त्यांना जीवनाचे केवळ तीन महिने बाकी आहेत. असा अवधी बांधून निश्चित करून दिल्याची घटना खोटी ठरणे आणि तीन महिन्याच्या अवधीनंतर तथागताचे महापरिनिर्वाण होईल ही घटना खरी मानावी तर तथागत पूर्णपणे एक कल्प जिवंत राहू शकतात, ही घटना खोटी ठरते. कोणत्याही गोष्टीला आधार असल्याशिवाय बुद्ध मुद्दामच थाप मारीत नाही. बुद्ध वचन व्यर्थ तर मुळीच जात नाही. घडणारी घटना आणि भगवान बुद्धाचे कथन बरोबर एक दुसऱ्याशी मिळणारे असते हे सुद्धा अत्यंत सूक्ष्म आणि कठीण समजले जाणारे कोडे आपणास मी विचारीत आहे. तेव्हा याचे अचूक असेच उत्तर देऊन वितंडवादी लोकांच्या तोंडावर चांगली चपकार मारावी व त्यांच्या मताचे खंडण करावे.''

''महाराज, भगवान बुद्धानेच विधाने केली होती हे खरे आहे. येथे कल्पाचा अर्थ आयुकल्प (संपूर्ण जीवनकाळ) असा आहे. महाराज, भगवान बुद्धाने अशा प्रकारचे विधान करून स्वतःचे मोठेपण दाखवले नसून यात त्रद्धिबळाचा यथार्थ गौरव केला आहे. महाराज, भगवान बुद्धांनी चारही त्रद्धिपादांची प्रत्यक्ष भावना केली असते. त्यांनी चारही त्रद्धिपादांस आपल्या अंकित करून ठेवले असते. त्यामुळे त्यांच्यात मानसिक व बौद्धिक पूर्णतः विकास झालेला असतो. त्या चार ऋद्धिपादांचा त्यांना पूर्णपणे आधार लाभला असतो. त्यांचे त्यांनी प्रत्यक्ष अनुष्ठान केले असल्यामुळे त्या चारही ऋद्धिपादांची त्यांना चांगली ओळख झालेली असते आणि त्यावर त्यांचे पूर्ण नियंत्रण असते. कारण त्यांची सर्व अत्युच्च शिखरे तथागताने ओलांडली असतात. महाराज, हेच कारण आहे की, बुद्ध स्वतःच्या इच्छेनुसार पूर्ण एक कल्पपर्यंत किंवा एका कल्पातील उरलेल्या पूर्ण काळापर्यंत जीवनमान स्थिर ठेऊ शकतात.''

''महाराज, समजा कुणी एका राजाकडे चांगला मोठा घोडा आहे. तो इतका

वेगवान व जलद पळणारा आहे की, जणू वाराही त्याची बरोबरी करू शकणार नाही. त्याची प्रशंसा करीत असता राजा म्हणाला की, 'हे शहरवासियांनो, नोकरांनो, शिपायांनो, ब्राह्मण-गृहपतींनी, जर इच्छा केली तर हा घोडा एका क्षणात समस्त समुद्राच्या तटातटांनी संपूर्ण पृथ्वीच्या दुसऱ्या लोकांचा फेरफटका मारून येईल. असा माझा उमदा घोडा आहे.' येथे दरबारात घोड्याचा वेग प्रत्यक्ष दाखवत नाही. तरीपण तो घोडा वेगवान असतो, हे सत्य आहे.''

''महाराज त्याचप्रमाणे भगवान बुद्धाने आपल्या ऋद्धिबळाची प्रशंसा करतांना तसे म्हटले होते. ते सुद्धा या तिन्ही विद्यांची जाणीव असलेल्या सहा अभिज्ञानी (दिव्य शक्तींनी) विभूषित असलेल्या, परमपवित्र आणि क्षीणाश्रव असेच देवता व मनुष्यांचा भर सभेत असे म्हटले होते की, 'हे आनंद, बुद्धांनी चारही ऋद्धिपादांचे प्रत्यक्ष अनुष्ठान करून ते पूर्णतः आपल्या अंकित केलेले असते.' म्हणूनच हे आंनद, तथागत इच्छेनुसार पूर्ण एक कल्पपर्यंत किंवा उरलेल्या कल्पाच्या पूर्ण काळापर्यंत आपले जीवनमान स्थिर ठेऊ शकतात.''

''महाराज, स्वतःचे जीवनमान पूर्ण एक कल्पपर्यंत स्थिर ठेवण्याची शक्ती तथागताच्या अंगी होती हे खरे आहे. तरीपण त्या सभेत त्यांना तिचे प्रदर्शन दाखवावयाचे नव्हते. महाराज, भगवान बुद्ध पुढील जन्माच्या अवस्थांपासून (भवतृष्णेपासून) सर्वथा मुक्त आहेत. याबद्दल त्यांनी वेळोवेळी म्हणजे तृष्णेची निंदाही केली आहे. त्यांनीच म्हटले आहे की, 'हे भिक्षूहो, जसे थोडीसी विष्ठा देखील दुर्गंध पसरवणारी असते. तसेच संसारात पुन्हा-पुन्हा जन्म घेण्याची आसक्ती याहीपेक्षा भयानक आहे असे मी समजतो.' महाराज जीवनाला विष्ठेपेक्षाही हीन लेखणारे तथागत संसार आसक्तीस चिकटून राहतील काय?''

''मुळीच नाही भंते!''

''महाराज, यावरून तर हेच सिद्ध होते की, तथागतांनी केवळ ऋद्धिबळाचा उत्कर्ष दाखविण्याकरिताच तसे विधान केले होते.''

''भंते, आपले म्हणणे खरे आहे, याचा मी सहर्ष स्वीकार करतो.''

**(प्रकरण पहिले समाप्त)**

# प्रकरण दुसरे

## (ख) योगी कथा

### १२. लहान मोठे नियम रद्द किंवा बदलले जाऊ शकतात.

‘‘भंते नागसेन, भगवान बुद्धांनी म्हटले आहे की, ‘हे भिक्षूहो, मी स्वतः कोणत्याही गोष्टीचा अनुभव घेऊनच धर्माचा उपदेश करतो. अनुभवावाचून नव्हे.’ या उलट विनयासंबंधी बोलतांना भगवान बुद्ध असेही म्हणतात की, ‘हे आनंद, जेव्हा तथागत निघून गेलेले असणार तेव्हा जर भिक्षू संघास योग्य वाटल्यास संघ सामान्य व दुय्यम नियमात बदल करू शकतो.’ भंते नागसेन, तर मग सामान्य व दुय्यम नियम बनवितांना भगवान बुद्धांनी विचार केला नव्हता कारण, आधाराशिवाय काहीही कारण नसता ते नियम तयार करण्यात आले होते. जेणेकरून त्यांनी ते बदल करण्याची भिक्षू संघास परवानगी दिली होती.’’

१– ‘‘भंते नागसेन, अनुभवपूर्वक कोणताही उपदेश तथागत करीत असतात, अनुभवावाचून नव्हे असे भगवान बुद्धांनी स्वतःच सांगितले आहे. हे जर खरे मानले तर लहान मोठ्या नियमांत बदल करण्याची त्यांनी भिक्षू संघास अनुमती दिली होती. असे म्हणणे खोटे ठरते आणि खरोखरच त्यांनी सामान्य व दुय्यम नियमात बदल करण्याची संघात अनुमती दिली होती, तर तथागत स्वतः कोणत्याही गोष्टीचा प्रथम अनुभव घेऊनच जाणीवपूर्वक धर्माचा उपदेश करतात, अनजाणपणे नाही. असे म्हणणे खोटे ठरते.’’

‘‘भंते, हे सुद्धा एक किचकट असे कोडे आहे. हे अत्यंत सूक्ष्म, कूट, खोल आणि कठीण कोडे आपणास विचारीत आहे. येथेसुद्धा आपल्या ज्ञानबळाचा परिचय देऊन याचा सविस्तर उलगडा करावा.’’

‘‘महाराज, भगवान बुद्धाने वर उल्लेख केल्याप्रमाणे दोन्ही विधाने खरी आहेत. विनयाचा सिद्धांत मांडला असता त्यांनी म्हटले होते की, ‘हे आनंद, तथागत निघून गेल्यानंतर जर संघास योग्य वाटत असल्यास संघ सामान्य व दुय्यम नियमांत बदल करू शकतो.’ तेव्हा असे केवळ त्यांनी भिक्षू लोकांची परीक्षा करण्यासाठीच म्हटले होते. जेणेकरून पाहावे की, भिक्षू लोक यावर काय विचार करतात. ते खरोखरच

---

*धर्मचक्र प्रवर्तन सुत्त. ● दीघनिकाय महापरिनिर्वाण सुत्त.*

नियमांत बदल घडवून आणतात की, त्यावर ते दृढ राहतात हेच त्यांना पहावयाचे होते.''

''महाराज, समजा कुणी एक चक्रवर्ती राजा आपल्या पुत्रास म्हणाला, ''हे प्रिय पुत्रांनो! हा एवढा मोठा अवाढव्य देश चारही समुद्रांपर्यंत पसरला आहे. त्यामुळे आपल्याजवळ असलेल्या सैन्याच्या भरवशावर या महान देशाचे रक्षण करणे अशक्य आहे. तेव्हा माझ्या मृत्यूनंतर सीमेवरील प्रांत तुम्ही स्वतंत्र करून दिलात तर बरे होईल. हे तुम्ही नीट ऐका.'' महाराज, आता तुम्हीच सांगा की, असे राजानी सांगितल्यामुळे राजकुमार आपल्या हातात असलेले ते प्रांत स्वतंत्र करून देतील काय?''

''नाही भंते, राजकुमार हे फार लोभी असतात; अहो एवढेच काय पण आपल्या राजाची सीमा अजून दुप्पट किंवा तिप्पट वाढविण्याचे प्रयत्न करतील. मग आपल्या हातात असलेला भाग सोडून देणे तर दूरच राहिले.''

''महाराज, बरोबर याच उदाहरणाप्रमाणे भगवान बुद्धांनी आपल्या भिक्षू लोकांची परीक्षा घेण्याच्या उद्देशानेच तसे म्हटले होते. परंतु महाराज, धर्मप्रेमामुळे आणि दुःखातून पूर्णतः मुक्त होण्याकरिता बुद्ध भिक्षू निष्ठापूर्वक कर्तव्यबुद्धीने दोनशे पन्नास नियमांचे पाल करीत राहणार. मग त्यांना सोडून देणे तर दूरच राहो, ते वर्ज्य करण्याची धैर्य त्यांना कधीचं होणार नाही.''

२- ''भंते नागसेन, भगवान बुद्धांनी ''सामान्य व दुय्यम नियम'' म्हणून उल्लेख केला, हे खरे आहे, परंतु सामान्य व दुय्यम नियम कोणते हेच समजणे कठीण असल्यामुळे भिक्षू लोकांत गोंधळ निर्माण होईल; कदाचित यामुळे निराश होऊन त्यांच्यात आपसातच शंका संघर्षही होऊ शकतो.''

''महाराज, आचरणातील दुष्कृत्यांच्या दोषासंबंधी सामान्य निमय असून वाचेच्या दोषासंबंधी दुय्यम नियम आहेत. हेच ते दोन सामान्य आणि दुय्यम नियम होते. महाराज, याबाबतीत पूर्वीसुद्धा भिक्षू लोकांच्या सभेत एकदा शंकाकुशंका निर्माण झाल्या होत्या. त्या मोठमोठ्या स्थवीरांना देखील सामान्य नियम कोणते व दुय्यम नियम कोणते हे ठरविणे कठीण झाले होते. याविषयीच्या प्रश्नासंबंधी भिक्षू लोक गोंधळून जातील हे तथागताने पूर्वीच दुरदृष्टीने जाणून घेतले होते.''

---

- *हे उत्तर बरोबर वाटत नाही. कारण परिनिर्वाणानंतर ते परीक्षा कशी करणार ?*
- *२२७ नियम आहेत. पहा विनयपिटक. २. पहा वि. पि.*

"भंते, तथागताची आजपर्यंत गुप्त असलेली मनोभावना आज आपण जगापुढे स्पष्टपणे मोडून शंकेत वाहून जात असलेल्या संघास निश्चितच तारले आहे."

"सध्याच्या परिस्थितीहून वेगळी परिस्थिती पुढे निर्माण होईल आणि त्यावेळी सामान्य व दुय्यम नियमांचे पालन करण्यात काही अर्थ उरणार नाही, असे भगवान बुद्धास आधीच माहित होते. त्यावेळचे लोक जीवन, रहनसहन, देश आणि काळ याकडे पाहून तयार करण्यात आलेले नियम बदलत्या परिस्थितीत कसे काय लागू पडणार ? हे जाणूच तथागताने सामान्य दुय्यम नियमात आवश्यकता भासल्यास बदल घडवून आणता येईल असे संघास सांगितले होते."

## १३. दुर्लक्षणीय प्रश्न

"भंते नागसेन, भगवान बुद्ध म्हणाले की, 'हे आनंद धर्मोपदेश करीत असता तथागत इतर पंथांच्या आचार्याप्रमाणे काहीही लपवून ठेवत नाहीत.' तरीपण स्थवीर मालुंक्य पुत्रांनी प्रश्न विचारले असता तथागतांनी काहीच उत्तरे कशी दिली नाहीत? यात दोनच कारणे असू शकतात - १) कदाचित त्या प्रश्नाचे उत्तर त्यांना माहित नसेल किंवा २) माहित असूनही दुसऱ्यांपासून त्यांना काहीतरी लपवून ठेवण्याची इच्छा असेल."

"भंते नागसेन, धर्मोपदेश करीत असता तथागत काहीही लपवून ठेवत नाहीत हे जर खरे असेल, तर मालुक्य पुत्राच्या प्रश्नांचे उत्तर तथागतास माहीत नसेल म्हणूनच ते चूप पाहिले असावेत आणि जर माहीत असेल, तर ते त्यांच्यापासून लपवून ठेवण्याचा दोष त्यांच्याकडे येतो. भंते, हे सुद्धा एक कोडे आपल्यापुढे मी ठेवत आहे. तरी आपण याची सविस्तर उकल करून द्यावी."

"महाराज, तथागत धर्मोपदेश करीत असता काही एक लपवून ठेवत नाहीत, असे आनंदाजवळ बोलले होते, हे खरे आहे. तसेच स्थवीर मालुंक्य पुत्राच्या प्रश्नांची त्यांनी काहीही उत्तरे दिली नाहीत, हेही खरे आहे. परंतु त्या प्रश्नांची उत्तरे त्यांना अवगत नव्हती किंवा त्यांना ते लपवून ठेवावयाचे होते, हे त्याचे कारण नव्हते. महाराज, कोणत्याही प्रश्नांची उत्तरे देण्याच्या या चार पद्धती आहेत - १) एखादा प्रश्न असा असतो की, त्याचे उत्तर सरळ व तडक दिले जाते, २) एखादा प्रश्न असा असतो की त्याचे उत्तर विभाजन करून दिले जाते, ३) एखादा प्रश्न असा असतो की, त्याचे उत्तर प्रतिप्रश्न करून देण्यात येते आणि ४) एखादा प्रश्न असा काही असतो की, त्याचे उत्तर मौनानेच द्यावे लागते. म्हणजे दुर्लक्षिला जातो."

१- ''कोणत्या प्रश्नाचे उत्तर सरळ व तडक दिले जाते ? तर रूप, वेदना, संज्ञा, संस्कार आणि विज्ञान हे अनित्य आहेत काय? या प्रश्नाचे उत्तर होय.''

२- ''कोणत्या प्रश्नाचे उत्तर विभाजन करून दिले जाते ? तर, रूप, वेदना, संज्ञा, संस्कार आणि विज्ञान हे याप्रमाणे अनित्य आहेत काय ? या प्रश्नांची उत्तरे होत.''

३- ''कोणत्या प्रश्नाचे उत्तर प्रतिप्रश्न करून दिले जाते ? तर, डोळ्यांनी सर्वच वस्तूंचे ज्ञान होते काय? या प्रश्नांचे होय.''

४- ''कोणत्या प्रश्नाचे उत्तर मौनाने (उपेक्षा करून) दिले जाते ? तर, संसार नित्य आहे काय ? संसाराचा शेवट होईल काय ? संसाराचा शेवट कोठे आहे ? संसाराचा शेवट कुठे नाही काय ? संसाराचा कुठे शेवट आहे ? आणि कुठे शेवट नाही, असे आहे काय ? ज्यास जीव (आत्मा) म्हणतात, तेच शरीर होय काय ? जीव (आत्मा) दुसरा आणि शरीर दुसरे आहे काय ? तथागतास महापरिनिर्वाणानंतर अस्तित्व असते काय? तथागतास महापरिनिर्वाणानंतर अस्तित्व नसते काय ? तथागतास महापरिनिर्वाणानंतर अस्तित्व असते आणि नसतेही असे आहे काय ? तथागतास महापरिनिर्वाणानंतर अस्तित्वच नसते आणि अस्तित्व नसणेच योग्य होय. असे आहे काय ? हे ते दुर्लक्षित केले जाणारे प्रश्न होत.''

''महाराज, मालुंक्य पुत्राच्या प्रश्नाचे असे दुर्लक्ष करून उत्तर दिले जाऊ शकत होते. याच कारणाने भगवान बुद्धाने काहीच उत्तर दिले नाही. असा कसा तो प्रश्न होता की, ज्याच्याकडे एकदमच दुर्लक्ष करणे योग्य होते ? कारण अशा प्रश्नांचे उत्तर देण्यात काहीही अर्थ निघत नाही किंवा त्यापासून काही कार्यभागही साधला जाऊ शकत नाही. म्हणून त्या प्रश्नास एकदम त्याज्य ठरविणेच योग्य होते. अर्थहीन, ज्ञानशून्य अशा गोष्टी कधी तथागत करीत नाहीत.''

''बरोबर आहे भंते, आपले म्हणणे, मालुक्य पुत्रांचा प्रश्न असाच होता, हे मी मान्य करतो.''

## १४. मृत्यूचे भय

''भंते नागसेन, भगवान बुद्धाने सांगितले आहे की, सर्व लोक शिक्षेला

- *''महापरिनिर्वाण सूत्र'' दीघ्घ निकाय*
- *''मालुंक्य सूत्र'' मज्झिम निकाय.*

घाबरतात, सर्वजन मृत्यूपुऐ भयभीत होतात. याशिवाय असेही म्हणाले की, 'अर्हत झालेले लोक भीतीच्याही पुढे गेलेले असतात.' भंते, अर्हत लोक शिक्षेला घाबरत नाही काय? आणि काय हो, दुर्गतीच्या नरकात पडून यातना भोगणारे जीव मृत्यूसमयी तया दुर्दशेतून सुटका करून घेण्यासाठी देखील घाबरतात काय ?''

''भंते, 'सर्व लोक शिक्षेला घाबरतात, सर्वजण मृत्यूकडे भयभीत होतात.' असे जर भगवान बुद्धांनी खरोखर सांगितले असेल तर अर्हत लोक भीतीच्याही पुढे गेलेले असतात. हे विधान खोटे ठरते. आणि 'जर अर्हत लोक भीतीच्या पलीकडे गेलेले असल्यामुळे ते शिक्षेला घाबरत नाही.' 'हे विधान खरे मानावे तर' सर्व लोक शिक्षेला घाबरतात, सर्वजण मृत्यूपुढे भयभीत होतात.' या विधानात काहीही तथ्य उरत नाही. भंते, हे सुद्धा एक कोडे आपण सोडवून द्याल म्हणून आपणास विचारत आहे.''

''महाराज, सर्व लोक शिक्षेला घाबरतात असे जे भगवान बुद्धानी सांगितले आहे. ते अर्हत लोकांना वगळूनच. कारण अर्हत लोक या विधानाला अपवाद आहेत. त्यांनी जर भयाची कारणेच नष्ट केलेली असतात. मग कुठून आले त्यांच्यात भय ? क्लेश शिल्लक आहेत, जे आत्म्याच्या भ्रमजाळात अजून सापडलेले आहेत, जे सुख-दुःखाच्या तिरस्काराने इकडून तिकडे व तिकडून इकडे फेकले जातात, त्या सांसारिक लोकांविषयीच केवळ भगवान बुद्धाने तसे सांगितले होते. महाराज, अर्हत लोक आवागमनापासून पूर्णतः मुक्त झालेले असतात. वेगवेगळ्या योनीतील पुनर्जन्मांचा प्रवास त्यांचा सर्वथा अवरूद्ध झाला असतो. आता त्यांना कधीच जन्म घ्यावा लागत नाही. त्यांच्या तृष्णेचे सर्व खांब मोडून पडलेले असतात. ऐहिक जीवनाबद्दलच्या त्यांच्या सर्व भावना नष्ट झालेल्या असतात. सर्व संस्कार जागीच थांबून जातात. त्यांच्याकरिता पाप, (वाईट) पुण्य, विषयीच्या सर्व भावना संपुष्टात आल्या असतात. अविद्या कुठल्या कुठे पळून गेलेली असते, त्यांच्या विज्ञानातील अंकुरण्याची संपूर्ण शक्ती क्षीण पावली असते. त्यांचे सर्व क्लेश जळून खाक झालेले असतात, संसारासंबंधी त्यांचे येणे जाणे एकदमच थांबलेले असते, हेच कारण आहे की, भयाची सर्व सेना एकसाथ मिळून त्यावर तुटून पडली तरी अर्हत लोक किंचीतही घाबरत नाही.''

१- ''महाराज, समजा कुणी एका राजाचे फार उंच पदावर असलेले चार अधिकारी अत्यंत निष्ठावंत, सुप्रसिद्ध, विश्वासू आणि दक्ष आहेत. त्यावेळी राज्यामध्ये एखादी आणिबाणीची परिस्थिती आली असता सर्व लोकांना उद्देशून राजाने असे आदेश काढले की, आता सर्वलोकांनी ताबडतोब कर भरला पाहिजे आणि या कामी पाहाणी करण्यासाठी त्या चार अधिकाऱ्यांना नियुक्त केले. महाराज, आता तुम्हीच सांगा की, अशा

आणिबाणीच्या काळात एक विशेष प्रकारचा कर भरावा लागणार असल्यामुळे ते अधिकारी भयभीत होतील काय?''

''मुळीच नाही भंते!''

''ते कां बरे ?''

''भंते, त्यांना राज्याच्या उच्च अशा अधिकारावर नेमलेले आहे. तेव्हा त्यांना विशेष कर भरण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. ते या बाबीपासून सर्वथा मुक्त झालेले आहेत. त्यामुळे त्यांना वगळूनच असा आदेश काढण्यात आला आहे की, 'सर्व लोकांनी ताबडतोब अमका विशेष कर राजवाड्यात येऊन भरावा.''

''महाराज, हेच उदाहरण अर्हत लोकांना लागू पडणारे आहे. त्यांना सोडूनच भगवान बुद्धाने सांगितले होते की, 'शिक्षेला सर्वच लोक घाबरतात, मृत्यूपुढे सर्वजन भयभीत होतात.' महाराज, अर्हत लोकांवर या नियमाचा काहीही परिणाम होत नाही. कारण ज्या कारणामुळे भय उत्पन्न होते ती सर्व कारणे त्याची केव्हाच नष्ट झालेली असतात. म्हणूनच ज्यांच्यात अजून क्लेश शिल्लक आहेत. त्याच लोकांना उद्देशून वरील विधान केलेले आहे. असे भय अर्हत लोकांच्या सावलीला देखील उभे राहू शकत नाही.''

''भंते नागसेन, परंतु 'सर्व लोक' असा शब्द प्रयोग योजण्यात आला आहे. या शब्द योजनेनुसार कुणीही मोकळा सुटत नाही ना ! तेव्हा आपण केलेल्या विधानास विशेष बळकटी यावी म्हणून सबळ पुरावा द्यावा.''

२- ''महाराज, समजा एखाद्या गावच्या जहागीरदाराने आपल्या हुजऱ्यास सांगितले की, 'सर्व गावकऱ्यांना ताबडतोब माझ्यासमोर एकत्रित करा.' त्यानुसार नोकराने गावातील चौरस्त्यावर जाऊन दवंडी पिटली की, 'हे समस्त नगरवासीयांनो, ऐका आणि लगेच मालकाच्या वाड्यासमोर एकत्रित व्हा.' त्या नोकराचे ते शब्द कानी पडताच सर्व गावकरी घाईघाईने जहागीरदाराच्या वाड्यात येऊन दाखल झाले आणि म्हणाले, 'हे अन्नदाता गावातील सर्वच लोक आहेत. आता आपण आदेश द्यावा.''

''महाराज, येथे 'सर्व लोक' या शब्द योजनेत गावातील शहाणी व घर प्रमुख लोक असाच याचा अर्थ आहे. म्हणजे हेच लोक तेथे जातात. एवढे लोक माझ्या गावात आहेत, असे वाटून जहागीरदाराचे समाधान होते. परंतु पुष्कळ लोक वाड्यात आलेले असतात. जसे- स्त्रिया, पुरूष, दास, दासी, नोकर, मजूर, कारागीर, आजारी

असलेले, बैल, रेडे, बकरे, आणि कुत्री इत्यादी प्राणी. तरीपण त्या जनसमुदायात त्यांची गणती होत नाही. म्हणजे वरील आज्ञा गावातील कर्त्या आणि घरप्रमुखांना उद्देशूनच केलेली असते.''

''महाराज, याचप्रमाणे, 'सर्व लोक शिक्षेला घाबरतात. मृत्यूमुळे भयभीत होऊन सर्व लोकांची बोबडी वळते.' हे तथागताचे म्हणणे अर्हत लोकांना लागू पडत नाही. कारण अर्हत लोकांचे समस्त उपादानाचे निर्मूलन झाल्यामूळे भयभीत होण्याची सर्व कारणे आधीच नष्ट झालेली असतात.''

३- अर्थ समजून घेण्याच्या चार कसोट्या - ''महाराज, कोणत्याही विधानाचा अर्थ समजून घेण्यासाठी चार प्रकारच्या कसोट्या लावल्या जाऊ शकतात - १) काही विधान असे असतात की, ते सांगितले नसतांना त्याचा अर्थसुद्धा सविस्तरपणे घ्यावयाचा नसतो, २) काही विधान असे असतात की, ते सविस्तरपणे सांगितले नसतात परंतु त्याचा अर्थ मात्र सविस्तरपणे घ्यावा लागतो. ३) काही विधान असे असतात की, ते जरी सविस्तरपणे सांगितले असले तरीपण त्याचा अर्थ सविस्तरपणे नाही तर थोडक्यात समजून घ्यावा लागतो, आणि ४) काही असेही विधान केलेले असते की, ते सविस्तरपणे (व्यापक रूपान) सांगितले असतात आणि त्याचा अर्थ सुद्धा सविस्तरपणेच ग्रहण करावा लागतो. तेव्हा कोणतेही विधान समजून घेण्याकरिता आधी त्या अर्थश्रेणीत त्याची विभागणी केली पाहिजे.''

४- ''महाराज, कोणतेही विधान त्या-त्या अर्थश्रेणीत विभाजन करण्याचे पाच प्रकार आहेत जसे - १) परस्परातील संबंध २) बोलण्यातील रूची ३) सांगणाराच्या आचार्याची परम्परा ४) सांगण्याचा उद्देश काय तो समजून घ्यावा आणि ५) त्या विधानाचा आधार पहावा.''

१- ''परस्परातील संबंध पहावेत' म्हणजे सुत्तात हे विधान कुठे आहे व केव्हा सांगितले आहे, यांचा संबध पाहवा.''

२- ''बोलण्यातील रूची पाहवी' म्हणजे ते विधान अन्य सुत्तात आलेल्या विधानाशी जुळवून पहावे.'

३- ''सांगणाराच्या आचार्यांची परंपरा पहावी' म्हणजे वेगवेगळ्या आचार्यांच्या परंपरेनुसार वेगवेगळे सिद्धांत चालत आलेले आहेत.'

४- ''सांगण्याचा उद्देश काय तो समजून घ्यावा' म्हणजे सांगणाराच्या बोलण्यातील खोच काय ती समजून घ्यावी.'

५- ''त्या विधानांचा आधार पहावा' म्हणजे वरील चारही बाबी ध्यानात ठेऊनच अर्थ घ्यावा.'

''फार छान, भंते नागसेन, आपण जसे सांगितले ते मला पूर्णपणे समजले, यावरून हेच समजले पाहिजे की, अर्हत, लोक त्या नियमाला अपवाद असतात. हे मी मान्य करतो आणि मृत्यूचे भय इतरानाच असते हेच खरे आहे.''

५- ''भंते आता आपण सांगा की, नरकवासाच्या यातना भोगणारे जीव देखील त्यातून अन्यत्र जावे लागेल म्हणून मरणाला भितात काय ? म्हणजे नरकवासातील अत्यंत कटू व तीक्ष्ण दुःख भोगणारे, नरकीय ज्वालात सर्व अंग प्रत्यंक सतत जळत असता, अत्यंत-करूण अशा वेदनामुळे ज्याचे तोंड लाल, पिवळे पडले असूनही, अतिशय कठीण अशा दुःख यातना सहन करण्याचे त्राण राहिले नसतांनाही, अत्यंत दयनीय अवस्थेला पोचलो नसतांनाही, शोक सागरात बुडालेले असता, ज्यांना अत्यंत उष्ण आणि धगधगत्या तीक्ष्ण अग्नी ज्वालेत जाळले जात असूनही, ज्या नरकात अत्यंत भयानक व घोर आवाज सतत होत असतात, जिकडे तिकडे मुखर अग्नीच्या ज्वालांनी व्यापलेले जीव दृष्टीस पडतात, ज्या नरकीय अग्नीचे भयानक दृष्य (तेच) चौफरे योजनेपर्यंत पसरलेले आहे. अशा त्या भयानक अवस्थेतून मुक्त होण्याचे भय त्या नरकीय जीवांना वाटते काय?''

''होय महाराज, त्याही दुर्दशेत असले तरी त्या जीवांना मरणाचे भय वाटते.''

''भंते नागसेन, जे प्राणी एवढ्या घोर यातनात सापडलेले आहेत, त्यांना मृत्यूनंतर कायमची सुटका करून घेण्यासाठी मृत्यूचे भय कां वाटते ? की, त्यांना नरकीय यातनाची अवस्था आवडते असे म्हणावे?''

''नाही महाराज, त्यांना नरकवासाच्या यातना आवडत नाही, ते त्यापासून मुक्त होण्यासाठी नेहमी चिंतातूर असतात. परंतु त्यांच्यावर मृत्यूचा इतका धाक बसला आहे की, ते मृत्यूच्या नावानेच गर्भगळीत होतात.''

''भंते नागसेन, मला अजून हे पटले नाही की, ते त्यातून सुटण्याकरिता एवढे चिंतातूर असूनही मृत्यूला कां भीतात. त्यांच्या इच्छेनुसार घडत असलेल्या घटनेबद्दल त्यांनी तर आनंदित व्हावयास पाहिजे होते. पुनर्जन्माने त्याची तर कायमची सुटका होणार आहे. भंते, याविषयी एखादे दुसरे प्रमाण देऊन माणे समाधान करावे.''

अ) ''महाराज, मृत्यू ही अशी बाब आहे की, ज्यांच्या नावानेच अज्ञानी लोकांना थरकाप सुटतो व त्याचे भय कधीही विसरता विसरत नाही महाराज, जे लोक काळ्या नागास, हत्तीस, सिंहास, वाघास, बिबट्यास, अस्वलास, जंगली रेड्यास, तरसास,

खोडास, अग्नीस, पाण्यास, काट्यास आणि तिरास भीतात, त्यांना मृत्यू देखील भयानक वाटतो. महाराज, मरणाला असा धाक बसलेला आहे. ज्यांना अजून चित्तमल चिकटलेला आहे, ते मृत्यूच्या धाकानेच गर्भगळीत होऊन मृत्यूला इतके घाबरतात. हेच कारण आहे की, नरकीय दुर्दशेत पडलेले असूनही ते जीव नरकवासातून कायमची सुटका करून घेण्यासाठी तर चिंतातूर असतातच. परंतु मृत्यूच्या नावानेच त्यांना थरकाप सुटतो.''

ब) ''महाराज, एखाद्या मनुष्याच्या शरीरावर पू भरलेली गाठ उठलेले असून ती सारखी ठसठसत आहे. त्याच्या वेदनांनी त्रस्त होऊन त्याने वैद्यास बोलावले. त्या वैद्याने त्याची चिकित्सा करून शस्त्रक्रिया करण्यासाठी शस्त्र साफ करण्याची, डागण्यासाठी सळई गरम करण्याची किंवा घावावर मीठ सोडण्याकरिता दगडी पाटावर मीठ बारीक वाटण्याची व्यवस्था केली. महाराज, हे पाहून त्या आजाऱ्यास शस्त्रक्रिया करण्याची- जखमेवर डाग देण्याची किंवा मिठाची बारीक भुकटी चोळली जात असता भीती वाटेल की नाही ?''

''होय भंते, त्याला अवश्य भीती वाटेल.''

''महाराज, ज्याप्रमाणे आजारातून सुटका करून घेण्याची इच्छा असून देखील त्याचा उपचार करीत असता होणाऱ्या वेदनांचे त्यास भय वाटते. त्याचप्रमाणे नरकीय यातनांतून कायमची सुटका करून घेण्यासाठी चिंतातूर असून सुद्धा त्यांना मृत्यूचे भय वाटते.''

क) ''महाराज, एका गुन्हेगारास हातकड्या व बेड्या ठोकून एका अंधार कोठडीत डांबून ठेवण्यात आले. तो त्या शिक्षेतून सुटका व्हावी म्हणून व्याकूळलेला आहे. अशा स्थितीत त्याला मोकळा सोडण्याकरिता तुरूंगाधिकारी त्यास बोलावणे पाठवतो. तेव्हा आपल्या गुन्ह्याबद्दल त्याला आठवण होऊन त्या अधिकाऱ्यांकडे जाण्याचे त्यास भय नाही कां वाटणार ?''

''होय भंते, निश्चितच त्यास भय वाटेल.''

''महाराज, याप्रमाणेच नरकीय यातना भोगत असलेले प्राणी त्यातून कायमची सुटका व्हावी म्हणून जरी ते चिंतातूर असले तरी पण ते नुसत्या मृत्यू भयाच्या नावानेच घाबरतात.''

''भंते, आणखी एखादे उदाहरण देऊन माझी समजूत घाला. जेणेकरून माझ्यातील शंका पूर्णतः निघून जाईल.''

ड) ''महाराज, समजा एखाद्या माणसास विषारी सर्पाने दंश केला. त्याच्या विषामुळे तो आता धडाधड पडू लागला, आणि ओरडू लागला. कुणी योगी आपल्या मंत्रशक्तीने त्याच्या अंगातील सर्व विष परत ओढून घेण्यासाठी त्या सर्पास परत बोलावू लागला, तेव्हा त्याला पुन्हा आपल्याकडे येतांना पाहून त्यास भय वाटले की नाही?''

''होय भंते, निश्चितच त्यास भय वाटेल.''

''महाराज, याप्रमाणेच नरकातील घोर यातना भोगणारे प्राणी त्यातून कायमची सुटका करून घेण्यासाठी जरी चिंतातूर असले तरीपण मृत्यूच्या भयाने ते घाबरलेलेच असतात.''

''बरोबर आहे, भंते नागसेन, आपण जसे सांगितले ते तंतोतंत खरे आहे.''

## १५. मृत्यूच्या हातून सुटका

**''भंते नागसेन, भगवान बुद्ध म्हणाले होते की–**
**न वरती अंतरिक्षात, न खाली सागराच्या मध्यात,**
**न पर्वताच्या गुहेत, जाऊनी बैरराता सुरक्षित।**
**संसारामाजी ऐसे कोठे, नच कदापि स्थळ भेटे,**
**स्वजीवन राखाया जेथे नटे, मृत्यूच्या दृष्टीपासून।।''**

यासोबतच तथागताने ''परित्राणाचा'' देखील उपदेश केला आहे. यात रतनसुत्त, खंदपरित्त, मोरपरित्त, धजग्गपरित्त, आटानाटियपस्ति तसेच अंगुलिमालपरित्त इत्यादी सुत्ते उपदेशली आहेत.

''भंते नागसेन, जर अंतरिक्षात उडून, खाली समुद्राच्या तळाशी दडून मोठमोठ्या प्रासादांवर चढून, पर्वतांच्या पठारावर जाऊन किंवा जंगली गुहेत लपून बसले तरी सुद्धा मृत्यूच्या जबड्यातून प्राणीमात्रांची सुटका होऊ शकत नाही. तर मग परित्राणाचा पाठ खोटा ठरतो. आणि जर परित्राणाचा पाठ केल्यामुळे मृत्यूपासून सुटका होत असेल. तर अंतरिक्षात वर व खाली समुद्रतळादीमध्ये कोठेही दडून बसले तरी मृत्यूच्या हातून सुटका होऊ शकत नाही म्हणजे मृत्यूची नजर चुकवून स्वतःला सुरक्षित ठेवता येत नाही, असे म्हणणे खोटे ठरते. हा देखील दुर्बोध प्रश्न आपल्यापुढे ठेवण्यात येत आहे. कृपाकरून याही प्रश्नाचे आपण सविस्तर उत्तर द्यावे आणि धर्म विरोधकांचे तोंड बंद करावे.''

''महाराज, अंतरिक्षात वर किंवा खाली समुद्राच्या मध्यभागी कुठेही लपून बसले असता मृत्यूच्या हातातून प्राणीमात्राची सुटका होऊ शकत नाही, असे जे तथागताने

म्हटले आहे ते यथार्थ आहे. तसेच परित्राण देशना केली असता मृत्यूपासून सुटका होते असे जे म्हटले आहे ते सुद्धा खरे आहे.''

१- ''महाराज, भगवान बुद्धाने परित्राणाचा उपदेश केला आहे हे खरे आहे, परंतु ज्यांचे आयुष्य अजून शिल्लक आहे. ज्यांना जगण्यासाठी वेळ प्रतीक्षा करीत आहे, आणि जे स्वतःला वाईट कर्मापासून रोखण्याचे सामर्थ्य बाळगतात. त्यांच्याचसाठी परित्राणाचा उपदेश आहे. महाराज, ज्यांचे आयुष्य संपुष्टात आले आहे, त्यांचे आयुष्य वाढविण्यासाठी परित्राण मंगल गाथा नाही. महाराज, ज्या वृक्षांची मूळे मृतप्राय झालेली आहेत, ज्या वृक्षाची जीवनशक्ती नष्ट झालेली आहे, जो वाळून गेला आहे, कोमेजून गेला आहे, आणि फिक्का पडला आहे. त्या वृक्षावर हजारो घागरी पाणी टाकले तरी तो पल्लवीत आणि रसरसीत होईल काय ? त्याचप्रमाणे आयुष्य संपलेल्या लोकांना औषध किंवा परित्राणाचा मंगल पाठ कधीही वाचवू शकणार नाही. महाराज, जगात जेवढ्या औषधींच्या जड्या-बुट्या आहेत, त्या सर्व आयुष्य संपलेल्या लोकांकरिता व्यर्थ आहेत. महाराज, ज्यांचे आयुष्य अजून स्वतःला वाईट कर्मापासून रोखण्याचे सामर्थ्य आहे. त्यांच्यासाठी परित्राणाच्या मंगल गाथांचा उपदेश भगवान बुद्धाने केला आहे. कारण त्यानांच परित्राण लाभदायक ठरणारा आहे.''

२- ''महाराज, शेतात जेव्हा पेरलेल्या धानाचे उगवून हिरवे रोपटे होते तेव्हा ते वाढविण्यासाठी शेतकरी वारंवार पाणी देत असतात. पण एकदा पीक परिपक्व झाले की, कापून खळ्यात गंजी लावून त्याची पावसापासून किंवा चोरापासून राखण करतात. त्याचप्रमाणे हे महाराज, ज्यांचे आयुष्य अजून शिल्लक आहे, ज्यांना जगण्यासाठी वेळ प्रतीक्षा करीत आहे आणि ज्यांच्यात स्वतःला वाईट कर्मापासून दूर ठेवण्याचे सामर्थ्य आहे. अशाच लोकांच्या परित्राणाच्या मंगल गाथा रक्षण करतात. त्यानांच परित्राणाच्या मंगल गाथेपासून अवश्य लाभ होतो. ज्यांचे आयुष्य संपले आहे, त्यांना त्यांचा काय उपयोग?''

''भंते नागसेन, ज्यांचे आयुष्य पूर्ण झाले नाही ते तर जगणारच आहेत आणि ज्यांचे आयुष्य पूर्णतः संपलेले आहे ते तर मरणारच आहेत. तर मग औषधे किंवा परित्राणाचा पाठ व्यर्थ समजला पाहिजे.''

''महाराज, औषधाने आजार बरा झाल्याचे आपण कधी पाहिले आहे काय?''

''होय भंते, असे शेकड्यांनी पाहिले आहेत.''

''महाराज, तर मग औषध किंवा परित्राण व्यर्थ आहे असे आपले म्हणणे चुकीचे

ठरते.''

''भंते, वैद्य लोक रोग्यांना औषध देतांना, पाजतांना किंवा जखमेवर लेप लावतांना तर आम्ही प्रत्यक्ष पाहतो व अशा उपायाने तो रोगी आजारमुक्त झाल्याचेही पाहतो.''

''महाराज, परित्राणाच्या मंगल गाथांचा पाठ चालला असता आम्ही त्यातील शब्द ऐकत राहतो. सुकून गेलेली जीभ, मंद पडलेले हृदयाचे ठोके, क्षीण झालेला आवाज, या सर्व गोष्टी पाहण्यात येतात. परंतु परित्राणामुळे त्यांचे निरनिराळे रोग, बिकट प्रसंग किंवा सर्वच प्रकारचे उपद्रव एकदम शांत होतात.''

''महाराज, आपण कधी मंत्रोच्चाराने सर्पदंश झालेल्या माणसाचे विष दूर करीत असता झाडतांना आणि त्याजवर पाण्याचे फडके मारतांना पाहिले आहे काय?''

''होय भंते, जगभर सर्पदंशावर करण्यात येणारे हे उपायच आहेत. त्यामुळे बहुतेक लोक असे करतात.''

### परित्राणाचा प्रताप

''महाराज, औषध किंवा परित्राणाने काही होत नाही, असे जे आपण म्हणता, ते तर आपोआपच खोटे ठरते. महाराज, एखाद्या व्यक्तीसंबंधी परित्राणाच्या मंगल गाथा म्हटल्या असता त्याचा चावा घेण्यासाठी अंगावर धाऊन आलेला साप देखील उघडलेले तोंड आपोआप बंद करील व चावू शकणार नाही. चोरांनी मारण्यासाठी उगारलेली काठी आपोआपच खाली पडेल व ते त्यावर प्रेम करू लागतील. खवळलेला हत्तीसुद्धा जवळ येताच आकस्मिकपणे जागीच थांबेल. उफाळणाऱ्या अग्नीच्या ज्वाला त्याच्याजवळ पोहचण्यापूर्वीच विझून जातील. विषसुद्धा पोटामध्ये गेले तरी ते निरूपद्रवी ठरून शरीर पोषणाचे काम करील. मारण्याच्या इच्छेने धाऊन आलेला मारेकरी देखील जवळ येताच सेवकाप्रमाणे नम्र होईल. जाळ्यात सापडला असता, देखील तो त्यातून सुरक्षित बाहेर पडेल.''

### 'मोरपरित्ता, ची कथा'

''महाराज एका पारध्याने सातशे वर्षेपर्यंत एका मोरास आपल्या जाळ्यात पकडण्यासाठी अविरत प्रयत्न केले, परंतु तो मोर परित्राणाच्या मंगलमय गाथांचे स्मरण करीत असल्यामुळे त्यास तो पारधी आपल्या जाळात पकडू शकला नाही. पण जेव्हा त्याने परित्राणाचे स्मरण करणे सोडून दिले त्याच दिवशी तो जाळात अडकून पडला.

हे आपण ऐकले आहे काय?''

''होय भंते, असे ऐकण्यात येते आणि त्याची कीर्ती देवतासह सर्वच लोकात पसरली आहे.''

''महाराज, तर मग औषधपाण्याने किंवा परित्राणाने लाभ होत नाही, असे आपले कथन आपोआपच खोटे ठरते.''

## दानवाची कथा

''महाराज, आपल्या पत्नीला सुरक्षित ठेवण्यासाठी तिलाएका पिटारात बंद करून एका दानवाने तो पिटाराच गीळून टाकला होता. याप्रमाणे तो तिला आपल्या उदरात घेऊन फिरत होता. तथापि विद्याधराने त्याच्या तोंडातून त्याच्या उदरात प्रवेश मिळवला आणि तेथे त्याच्या पत्नीसह रतिक्रिडा करू लागला. दानवाला जेव्हा हे समजले तेव्हा त्याने तो पिटारा ओढून बाहेर काढला. त्याबरोबर विद्याधर पळून गेला. असे तुम्ही कधी तरी ऐकले आहे काय?''

''होय भंते, असे मी ऐकले आहे, ही घटना तर देवतासह सर्वच लोकात पसरली आहे.''

''महाराज, परित्राणाच्या शक्तीमुळेच विद्याधर दानवाच्या हाती लागला नाही व तो वाचला.''

''होय भंते, हे खरे आहे.''

## विद्याधराची कथा

''महाराज परित्राण देशना (पाठ) करणे मोठे फलदायक ठरते. महाराज, एक दुसरा विद्याधर काशी नरेशाच्या अंतपुरात जाऊन पटराणीच्या सोबत आपली कामवासना पूर्ण करीत असता पकडला गेला होता. परंतु त्याने आपल्या मंत्र बळाने (परित्राण स्मरणाने) तेथून आपल सकुशल सुटका करून घेतली. असे तुम्ही ऐकले आहे काय?''

''होय भंते, ही कथासुद्धा मी ऐकली आहे.''

''महाराज, परित्राणाच्या बळानेच तो असे करू शकला की नाही?''

''होय भंते!''

''महाराज, यावरून तर हेच सिद्ध होते की परित्राणात महान शक्ती आहे.''

''भंते नागसेन, परित्राणाने सर्वच लोकांचे रक्षण होते काय?''

"नाही महाराज, परित्राणाने सर्वच लोकांचे रक्षण होत नसून काहीचेच होत असते."

"भंते नागसेन, तर मग परित्राण सर्व लोकांसाठी लाभदायक नाही, हेच यावरून सिद्ध होते."

"महाराज, भोजन हे सर्वच लोकांसाठी लाभदायक होते काय?"

"भंते, काहीनाच लाभदायक ठरते व काहींना नाही."

"ते कां बरे?"

"भंते, त्याचे कारण असे की, अतिभोजनामुळे पटकीचा आजार होतो व त्यामुळे काही लोकांवर तर मृत्यू देखील ओढवतो."

"तर मग महाराज, भोजन हे सर्व लोकांचे प्राणरक्षण करू शकत नाही, हेच यावरून सिद्ध होते."

"भंते नागसेन, दोन कारणामुळे भोजन माणसाचे प्राण हरण करू शकते. १) प्रमाणापेक्षा अधिक भोजन केल्यामुळे आणि २) पचनशक्ती मंद पडल्यामुळे. भंते नागसेन, जीवनदान देणारे भोजन देखील त्याचा दुरूपयोग केल्याने जीवनोपयोगी अन्न विष बनते."

## परित्राण लाभदायक ठरण्याची तीन कारणे

"याप्रमाणे महाराज, परित्राणाने सर्वांचे रक्षण होत नाही तर, काहींचे होते आणि काहीचे नाही. महाराज, तीन कारणाने परित्रणा रक्षणकार्यात सफल होऊ शकत नाही. १) एखाद्या कर्मफळाची मध्येच बाधा पडल्यामुळे, २) वाईट (पाप) कर्माचे विघ्न बाधक झाल्यामुळे आणि ३) परित्राणाच्या मंगलमय गाथांवर विश्वास नसल्यामुळे, महाराज, परित्राणाच्या मंगलमय पाठात रक्षण कऱ्याचे बळ असून देखील ते व्यर्थ जाण्यास लोकांचे म्हणजे ज्यांचे स्वतःचेच कर्म तेथे आड येते. त्यांच्याच कर्माचा हा परिणाम आहे."

"महाराज, उदरात सामावल्यापासून आई मुलाचे रक्षण करते. अत्यंत सावधानपूर्वक त्याला जन्म देते. त्याचे मलमूत्र इत्यादी काढून त्याला स्वच्छ करून त्याच्या अंगाची शुद्ध सुगंधादी द्रव्याने मालीश करून देते व त्याला मोठ्या ममतेने लहानाचे मोठे करते. आणि समजा त्याला एखाद्या दुसऱ्या माणसाने कधी, रागावले किंवा मारले तर ती त्यावर रागावते व आपल्या मुलाचा पक्ष घेते. एवढ्यानेच ती थांबत नाही तर त्याच्या अंगावर धाऊन जाते व त्याला पकडून गांव प्रमुखाकडे घेऊन जाते व आपल्या मुलास अकारण

त्याने मारल्याबद्दल तक्रार करते. परंतु जर का तिच्या मुलानेच लफंगेगिरी (उनाडकी) केली असेल किंवा तो वेळेवर घरी परत येत नसेल तर ती स्वतःच त्याला शिक्षा करते. महाराज, अशा प्रकारे शिक्षा केल्याबद्दल तो मुलगा सुद्धा तिला गावप्रमुखाकडे घेऊन जातो काय?''

''नाही भंते!''

''कां नाही बरे?''

''भंते, कारण तिच्या, मुलानेच गुन्हा केला आहे.''

''महाराज, त्याचप्रमाणे परित्राणाच्या मंगलमय पाठात प्राण्याचे रक्षण करण्याचे सामर्थ्य असून देखील लोकांच्या स्वतःच्याच दुष्कर्माच्या परिणामामुळे त्यांचे अहित होते.''

''बरे आहे भंते, आपण अगदी स्पष्ट करून सांगितले, गुंतलेल्या गाठी एकदम मोकळ्या करून दिल्या, अंधारात मशाल जाळली, वितंडवादी लोकांच्या खोट्या सिद्धांताचे जाळे झटपट तोडून टाकले. खरोखरच आपण सर्व गणाचार्यात महान आहात, असे मी मानतो.''

## १६. भगवान बुद्धांना पिंडपात मिळाले नाही.

''भंते नागसेन, आपण लोक नेहमी सांगत असता की, 'भगवान बुद्धांना चीवर, पिंडपात, शयनआसन आणि ग्लानप्रत्यय (औषधे) इत्यादी परिष्कारांचा सैदव लाभ होत असे.' तसेच असेही ऐकण्यात येते की, 'भगवान बुद्ध पंचक्षाक' नामक एका ब्राह्मणाच्या गावी गेले असता त्यांना भोजनदान न मिळाल्यामुळे रिकामे पात्र घेऊन जसेच्या तसेच खाली हाताने परत यावे लागले. भंते नागसेन, मला वाटते 'भगवान बुद्धांना सतत चारही परिष्कारांचा लाभ होत असे आणि त्यांना कधीही कोणत्या गोष्टीची कमी पडत नसे.' हे जर खरे मानले तर 'पंचशाल' नामक एका ब्राह्मणाच्या गावी पिंडपात करावयास गेले असता त्यांना काहीच न मिळाल्याने रिकामे भिक्षापत्र घेऊन जसेच्या तसेच खाली हाताने परतावे लागले, हे विधान खोटे ठरते. आणि जर पंचशाल ब्राह्मणाच्या गावातून त्यांना खाली हाताने परतावे लागले, हे जर खरे मानले तर त्यांना सदैव सर्व परिष्कारांचा लाभ होत असे हे विधान चुकीचे ठरते. हे सुद्धा एक बुद्धीभ्रंश करणारे कोडेच आहे. भंते, आपण याची उकल करून सांगावी जेणेकरून धर्मविरोधकांना याचे सरस उत्तर देता येईल.''

''महाराज, भगवान बुद्धांना सदैव कोणत्याही परिष्काराचा तुटवडा पडत नसे

आणि पंचशाल नामक ब्राह्मण गावातून भिक्षा न मिळाल्यामुळे रिकामे भिक्षापात्र घेऊन परतावे लागले; या दोन्ही गोष्टी खऱ्या आहेत. परंतु हे कारस्थान दुष्ट, कुटील व सत्कृत्याचा नाश करणाऱ्या माराचे होते.''

''भंते, असे कसे म्हणता येईल ? अगणित कल्पापासून भगवान बुद्धाने उत्तमोत्तम राशी रचल्या आहेत आणि नुकताच अस्तित्वात आलेल्या पापी माराने त्याच्या इतक्या पुण्यबळावर एवढा कसा प्रभाव टाकला ? एवढे तथागताचे पुण्य कसे लोप पावले? भंते नागसेन, यावरून दोन प्रकाराने आक्षेप घेता येतात. ते म्हणजे पुण्यापेक्षा पाप हे अधिक शक्तिशाली आहे आणि तथागताच्या पुण्यशक्तीपेक्षा माराची पापशक्तीच अधिक बलशाली आहे. झाडाच्या मुळाचा विस्तारापेक्षा झाडाचा वरील विस्तार कसा जड झाला? सद्गुणापेक्षा पातक कसे सामर्थ्यशाली ठरले?''

''महाराज, या आपल्या युक्तीवादावरून दोन्ही विधाने सिद्ध होऊ शकत नाही. तथापि तुम्हाला याची कारण मीमांसा केलीच पाहिजे.''

## राजाला दिलेली भेट

''महाराज, एखाद्या मनुष्य राजास भेट देण्याकरिता उत्तमोत्तम मिठाईचे पदार्थ व शहदाचे पोळे घेऊन राजद्वारावर पोचला, परंतु द्वारपालाने त्यास अडवून सांगितले की, 'भल्या माणसा, राजाला भेटण्याची ही वेळ नाही. तेव्हा शक्य तितक्या लवकर या वस्तू घेऊन परत जा. यावेळी राजाने जर कां तुला तेथे पाहिले तर तुला शिक्षा केल्यावाचून ते राहणार नाहीत.' द्वारपालाचे असे भितीदायक शब्द ऐकून तो बराच घाबरला आणि आपल्या सोबत आणलेल्या सर्व वस्तू सांभाळून तत्काळ निघून गेला. यामुळे त्या दिवशी राजाला भेट मिळाली नाही, म्हणून का राजास त्या द्वारपालापेक्षा कमजोर समजला जाईल की, राजास आता कधीच भेट मिळणार नाही?''

''नाही भंते, असे तर नाही. परंतु आपल्या रूक्ष स्वभावामुळेच द्वारपालाने त्या मनुष्यास परत पाठवले, तरीपण अन्यप्रसंगी त्याहीपेक्षा शेकडो, हजारो पट अधिक चांगल्या व किंमती वस्तू त्यास मिळाल्या असतील व पुढेही मिळत राहतील.''

''महाराज, याचप्रमाणे माराने आपल्या दुष्ट वर्तनामुळे पंचशाल गावातील ब्राह्मणांना तथागतास दान देतांना अडवले. परंतु दुसऱ्या शेकडो व हजारो देवता दिव्य ओजयुक्त मधुर व अमृतमय अन्न घेऊन तथागतास दान देण्याकरिता हात जोडून विनंती करू लागले.''

''भंते नागसेन, तथागतांना चारही प्रत्ययांचे दान सुलभ असेलही, तसेच त्या

पुरूषोत्तम तथागतास देवता व मनुष्यांकडून सदैव त्यांच्या आवश्यक वस्तू अत्यंत भक्तीभावपूर्वक दिल्या जात असतीलही. परंतु तेवढ्यापुरती तर पंचशाल ब्राह्मण-गृहस्थाकडून दान न मिळू देण्याची आपली इच्छा त्या मारांनी पूर्ण करून घेतली. भंते, एवढ्याने माझी शंका दूर होऊ शकली नाही, माझ्यापुढील कोडे तसेच आहे. शंकेचे अजून समाधान झाले नाही. भंते, मारासारखा मत्सरी, दुष्ट, नीच, हलकट, क्षुल्लक, पापी आणि दुर्गूणी जीव पण भगवान बुद्धासारख्या अजिंक्य, पुण्यस्वरूप, अद्वितीय आणि महान पुरूषोत्तमाच्या मार्गात अडथळा कसा काय आणू शकला हेच मला अजून समजले नाही.''

## दानात बाधक होण्याची चार कारणे

''महाराज, चार गोष्टी दानात बाधा पोहचवतात. जसे - १) न पाहिलेले, २) उद्देशांनी केलेले, ३) तयार केलेले आणि ४) उपभोगासाठी तत्पर असलेले.''

१- ''कोणत्या व्यक्तीला पाहिल्यावाचून देण्याकरिता तयार ठेवलेले पाहून दुसरा कुणी व्यक्ती देणारास भडकवतो की, अरे, याला दान देण्यात काय उपयोग! कोणत्या दुसऱ्या व्यक्तीस दिलेले बरे. एवढ्यावरून थांबलेल्या दानास 'न पाहिलेल्यांचा अंतराय' असे म्हणतात.''

२- ''कुणी एखाद्याने कोणत्या खास व्यक्तीला दान देण्याचे ठरवले. परंतु कुणी दुसऱ्याच व्यक्तीने त्यात बाधा टाकली असता न दिलेल्या दानास 'उद्देश अंतराय' असे म्हणतात.''

३- ''कुणी व्यक्ती दान घेऊन कुणाची वाट पाहत बसला आहे. परंतु तेवढ्यातच कोणत्यातरी कारणाने ते देण्यात आले नसेल, तर त्यास 'तयार केलेल्याचा अंतराय' असे म्हणतात.''

४- ''दान मिळताच त्याच्या जागी उपयोगासाठी तो सिद्ध झाला आहे परंतु एवढ्यात कोणत्यातरी कारणाने तो त्याचा उपयोग करू शकत नाही. त्यास 'उपभोगासाठी तयार असलेल्याचा अंतराय' असे म्हणतात.''

''महाराज, हे चार अंतराय आहेत. पंचशाल गावातील ब्राह्मण गृहपतीपैकी माराने कुणालाही भगवान बुद्धाला दान देऊ दिले नाही. हा पहिल्या प्रकारचा 'न पाहिलेल्याचा अंतराय' होता. त्या दिवशी जे कुणी त्या गावात गेले त्यांपैकी कुणालाही काहीच मिळाले नाही.''

''महाराज, देवता, मार, ब्रह्मा, श्रमण, ब्राह्मण, तसेच समस्त जीवमात्रासह या

जगात असा कुणीही नाही की, जे दान भगवान बुद्धांना देण्याच्या उद्देशाने तयार करून ठेवलेले आहे किंवा त्याच्या उपभोगासाठी सिद्ध झालेल्या प्रसंगी कुणी अंतराय आणू शकतील. जर कुणी मत्सराने अंतराय आणण्याचा प्रयत्न करील तर त्याच्या डोक्याचे शेकडो हजारो तुकडे होऊन पडतील.''

## भगवान बुद्धाच्या चार गोष्टी थांबविता येत नाही

महाराज, तथागताच्या चार गोष्टी अशा आहेत की, त्यात कुणीही बाधा आणू शकत नाही, त्या चार गोष्टी अशा- १) तथागतास देण्याच्या उद्देशाने सिद्ध केलेले दान, २) त्याच्या शरीरातून उत्पन्न होऊन आकाशात एक व्याम (बाब) फाकलेली आभा (प्रकाश), ३) त्याचे निरंतर सज्ञत्व आणि ४) आयुष्य पूर्ण होईपर्यंत जिवंत राहणे. महाराज, भगवान बुद्धांसंबंधी या चार गोष्टींना कुणीही थांबवू शकत नाही. या चारही गोष्टी एकसारख्या त्यात असून एकही कमी आढळून येत नाही. त्यांना कुणीही विचलित करू शकत नाही. कोणत्याही प्रकारे त्यांना बदलवणे शक्य नाही. महाराज, जेव्हा पापी मार पंचशाल गावातील ब्राह्मणात जाऊन मिसळला तेव्हा तो अदृश्य होऊन बसला होता.

''महाराज, समजा सीमेवरील घनदाट अशा अरण्यात दडून बसलेले चोर वाटसरूंना लुबाडतात व मारतात परंतु ते जर राजाच्या दृष्टीस पडले तर त्यांची गती काय होईल?''

''भंते, अशा लोकांचे तर शेकडो तुकडे तलवारीने केल्या जाऊ शकतात.''

''महाराज, याचप्रमाणे त्यावेळी मार अदृश्य स्थितीत त्या ब्राह्मणगृहपतींमध्ये बसला होता. महाराज, कोणतीही विवाहीत स्त्री दुसऱ्या पुरूषाकडे लपूनच जाऊ शकते. तद्वतच मार त्या ब्राह्मणगृहपतीमध्ये अदृश्य होऊन बसला होता. महाराज, आपल्या पतीसमोर जर ती स्त्री दुसऱ्या पुरूषाकडे गेली तर यात तिचे हीत होईल काय?''

''नाही भंते, जर तिन असे केले तर तिचा पती तिला जीवे मारून टाकील किंवा दासी तरी बनवून सोडेल.''

''महाराज, याचप्रमाणे मार त्या ब्राह्मण गृहपतीमध्ये अदृश्य अवस्थेत मिसळला होता. महाराज, माराने जर भगवान बुद्धास देण्याच्या उद्देशाने तयार केलेल्या दानात किंवा त्यांना लाभलेल्या दानात काही बाधा उपस्थित केली असती तर त्याच क्षणी त्याच्या डोक्याचे शेकडो तुकडे होऊन इतस्ततः पडले असते.''

''होय भंते नागसेन, आपण अगदी खरे सांगत आहात. त्या दुष्ट व पापी माराने

चोराप्रमाणेच कार्य केले. तो अदृश्य होऊनच त्या ब्राह्मणात जाऊन बसला होता. त्याने जर भगवान बुद्धासाठी देण्याच्या उद्देशाने तयार केलेल्या दानात किंवा त्यांना लाभलेल्या दानात काही बाधा उपस्थित केली असती तर त्याचे शरीर मुठभर भुसा सहज उडून जावा तसे इतस्ततः उडून गेले असते. बरोबर आहे, भंते नागसेन आपण जसे सांगितले ते मी मान्य करतो.''

## १७. अज्ञानाने केलेले पाप व पुण्य

''भंते नागसेन, आपण लोक म्हणता की, 'अज्ञानवश ज्यांच्याकडून हिंसा घडते त्याबद्दल त्यास अधिक पाप लागते.' तरी पण भगवान बुद्धाने विनयावर उपदेश करतांना म्हटले आहे की, अजाणता घडलेल्या पाप कर्माबद्दल काहीही पाप लागत नाही.''

''भंते नागसेन, जर अज्ञानवश घडलेल्या प्राणी हिंसेबद्दल अधिक पाप लागत असेल तर दुसरीकडे अज्ञानवश घडलेल्या पापकर्माबद्दल काहीही दोष लागत नाही. हे म्हणणे सपशेल खोटे ठरते. आणि अज्ञानवश घडलेल्या पापकर्माबद्दल काहीही दोष लागत नाही हे म्हणणे खरे असेल तर अज्ञानवश ज्यांच्याकडून हिंसा घडते त्याबद्दल तसे अधिक पाप लागते असे म्हणणे खोटे ठरते. हे सुद्धा अत्यंत कठीण कोडे आहे. तेव्हा आपण याचीही रीतसर उकल करून द्यावी.''

''महाराज, दोन्ही विधाने बरोबर आहेत. परंतु दोन्ही विधानांच्या अर्थात थोडा फरक आहे. तो कोणता बरे ? कित्येक असे दोष आहेत की, जे अज्ञानवश घडतात आणि कित्येक असे आहेत की, ते जाणीवपूर्वक केले जातात. या दोन्ही दोषासंबंधाने प्रथम दोषाकडे दृष्टी करून तथागताने म्हटले होते की, अज्ञानवश घडलेल्या दुष्कृत्याबद्दल काहीही दोष लागत नाही.''

''बरे आहे भंते, आपण जसे सांगितले आहे. ते मी सहर्ष स्वीकार करतो.''

## १८. भगवान बुद्धाचा भिक्षूप्रती निरपेक्ष भाव

''भंते नागसेन, एकदा भगवान बुद्ध म्हणाले होते की, 'हे आनंद, तथागताना असे कधी वाटत नाही की, मीच केवळ भिक्षू संघाचे संचालन करीत आहे किंवा भिक्षू संघाने माझेच अनुकरण करावे' सोबत मैत्रेय बुद्धाच्या स्वाभाविक गुणांची प्रशंसा करतांना त्यांनीच असेही म्हटले आहे की, 'ज्याप्रमाणे मी सध्या शेकडो भिक्षूंच्या संघाचे संचालन करीत आहे, त्याचप्रमाणे ते हजारो भिक्षूंच्या संघाचे संचालन करतील.''

''भंते नागसेन, मीच या भिक्षू संघाचे संचालन करीत आहे किंवा समस्त भिक्षूंनी माझेच अनुकरण करावे असे जर भगवान बुद्धास वाटत नसेल तर मैत्रेय बुद्धासंबंधी बोलतांना त्यांनी काढलेले उद्‌गार खोटे ठरतात आणि मैत्रेय बुद्धासंबंधी काढलेले उद्‌गार खरे मानावे तर संघ संचलनासंबंधी स्थवीर आनंदाजवळ केलेले त्याचे कथन खोटे ठरते, हे सुद्धा एक कोडे आपण उकलून द्यावे.''

''महाराज, भगवान बुद्धाने आनंदाजवळ काढलेले उद्‌गार आणि मैत्रेय बुद्धाच्या स्वाभाविक गुणासंबंधाने काढलेले उद्‌गार हे दोन्ही बरोबर आहेत. परंतु महाराज, या प्रश्नातील एकाचा अर्थ सावशेष असून दुसऱ्याचा अर्थ निरवशेष आहे. महाराज, भगवान बुद्ध मला अनुयायी हवेत म्हणून ते कोणाच्या पाठीमागे लागत नाहीत तर अनुयायीच त्यांच्या मागे येतात. महाराज, 'हा मी आहे' किंवा 'हे माझे आहे.' असा लोकांचा केवळ समज असतो, परंतु परमार्थतः असे काहीच आढळून येत नाही. महाराज, भगवान बुद्ध प्रेमबंधनापासून सर्वथा मुक्त झालेले असतात. त्यांच्या मनात कोणाच्याही प्रती आपलेपणाची भावना उरली नसते. 'हे माझे आहे' याबद्दलचा भ्रमसुद्धा भगवान बुद्धात उरलेला नसतो. असे असूनही भिक्षू संघ मात्र त्यानांच आपला संचालक मानून तसे आचरण करतो.''

''महाराज, पृथ्वीवर राहणाऱ्या समस्त जीवमात्रांचा आधार पृथ्वी असली तरी तिला कधीही वाटत नाही की, 'हे सर्व माझेच आहेत.' महाराज, याचप्रमाणे भगवान बुद्ध सर्वच मानवास आधारभूत असून ते जीवन कंठतात ते केवळ दुसऱ्यांना आश्रय देण्यासाठी परंतु चूकून देखील त्यांच्या मनात असे येत नाही की, 'हे फक्त माझेच आहेत.' अशी त्यांना भावना नसते.''

''महाराज, एखादा पावसाचा प्रचंड ढग पावसाचा वर्षाव करून गवत, झाडे, पशु किंवा मनुष्याची वृद्धी करतो; त्यांच्या कूळतंतुची जोपासना करतो; त्यांच्या वर्षावानेच सर्वांना जीवदान मिळते, तरी पण त्यास असे कधी वाटत नाही की, 'हे सर्व माझेच आहेत. मीच त्यांचा पालनकर्ता आहे.' महाराज, याचप्रमाणे भगवान बुद्ध सर्व प्राणीमात्रास पुण्यरूपी चांगले गुण देऊन जीवनदान देतात. आणि त्यांना पुण्याचे वाटेकरी बनवतात. त्यांच्यामुळेच सर्वांना पुण्य कर्मांची जाणीव झाली आहे. तरी पण ते चुकून देखील अशी अपेक्षा करीत नाही की, 'हे माझेच आहेत.' असे आपलेपणाचे किंवा परकेपणाचे भाव त्यांना नसतात. कारण, या भावनांपासून ते वर गेलेले असतात.''

''ठीक आहे, भंते नागसेन, आपण हा प्रश्न अगदी स्वच्छ करून दिलात. योग्य तर्काने समजावून सांगितले, गुंता उकलून दिला. गाठ उकलून दिली. अंधारात प्रकाशासाठी

मशाल जाळली, धर्म विरोधकांच्या तोंडावर चांगलीच चपराक दिली. आणि बुद्ध श्रावकांना ज्ञानदृष्टी दिली.''

## १९. खरे बुद्धानुयायी बदलू शकत नाही.

''भंते नागसेन, तुम्ही लोक म्हणता की, बुद्धानुयायी कधीही आपल्या निष्ठेपासून विचलित होऊ शकत नाही. सोबतच असेही म्हणता की, देवदत्त आपल्या सोबत एकाचवेळी पाचशे भिक्षूंना घेऊन वेगळा संघ स्थापन करण्याकरिता निघून गेला. ही गोष्ट खोटी ठरते आणि देवदत्ताकडे पाचशे भिक्षू एकाचवेळी गेले होते, हे जर खरे मानले तर बुद्धानुयायी आपल्या निष्ठेपासून कधीही ढळू शकत नाहीत ही, गोष्ट खोटी ठरते हे सुद्धा अतिशय कठीण कोडे आपल्यासमोर ठेवले आहे. याची उकल करणे अत्यंत कठीण आहे, मोठा भ्रमजाळ आहे. यात मनुष्य सहज फसला जातो, गोंधळून जातो. भ्रमरूपी जाळांनी झाकला जातो, बांधला जातो. तेव्हा आपण येथे विपक्षी लोकांच्या तर्काचे खंडण करण्यासाठी आपले ज्ञान बळ दाखवावे.''

''महाराज, यथार्थतः निष्ठावंत बुद्धानुयायी विचलित होऊ शकत नाही आणि देवदत्ताने आपल्या सोबत पाचशे भिक्षूंना फोडून नेले होते. ही दोन्ही विधाने खरी आहेत. महाराज, मार्गभ्रष्ट करणारा तसा जर बलवान असेल तर तो इतरांना मार्गभ्रष्ट करू शकतो. महाराज, मार्गभ्रष्ट करणारा जर इतका चलाख असेल तर असा कोण आहे की, तो कुमार्गाने जाणार नाही. आई व मुलात सुद्धा वितुष्ट निर्माण करून एक दुसऱ्यापासून वेगळे केले जाऊ शकतात. पितापुत्रांना देखील एकदुसऱ्यांच्या विरूद्ध केले जाऊ शकते. बहिणभावात सुद्धा भांडण उभे करता येते. दोन मित्रांना परस्परांच्या विरूद्ध करता येते. नावेच्या सर्व पाट्या एकत्र जोडल्या असून देखील पाण्याच्या लाटांमुळे वेगवेगळ्या होतात. हवेच्या माराने गोड फळांचे वृक्ष देखील उन्मळून पडतात, लोखंडाच्या हातोडीने सोन्याचा सुद्धा चुरा होतो, महाराज, परंतु विज्ञ (शहाणे) लोक असे करू शकत नाही. बुद्ध आणि पंडित लोकांच्या मनात चुकून देखील बुद्धानुयायांत फूट पडावी असे कधी येत नाही, महाराज, बुद्धानुयायांत कधी फूट पाडली जाऊ शकत नाही, असे जे म्हटले आहे, त्याचे काही विशेष कारण आहे. कोणते बरे कारण आहे ते?''

''महाराज, भगवान बुद्धाने आपल्या अनुयायांना कठोर बोलल्यामुळे, त्यांच्यावर रागावल्यामुळे, त्यांना टाकून बोलल्यामुळे, काही अपशब्दाने अपमानित केल्यामुळे किंवा स्वतःच गैरवर्तन केल्यामुळे त्यांचे अनुयायी कधी बिघडले असतील असे आजपर्यंत तरी ऐकण्यात नाही. याच कारणाने म्हटले जाते की, बुद्धानुयायांना कधीही त्यांच्या निष्ठेपासून विचलित केले जाऊ शकत नाही. महाराज, बुद्धांच्या नऊ लोकांपैकी कुठेतरी

एखाद्याला तरी कोणत्या बोधिसत्वाने बुद्धानुयायांना त्याच्या निष्ठेपासून विचलित करण्याचे उदाहरण आपल्या ऐकण्यात आहे काय?''

''नाही भंते, असे कधी पाहण्यात किंवा ऐकण्यात अजूनपर्यंत तरी आले नाही. म्हणून आपण म्हणता तेच बरोबर आहे असे मी मानतो.''

**(प्रकरण दुसरे समाप्त)**

# प्रकरण तिसरे

## (ख) योगी कथा (पुढे चालू)

### २०. उपासकाने सदैव भिक्षूचा आदर केला पाहिजे

''भंते नागसेन, भगवान बुद्धाने सांगितले आहे की, 'हे वाशिष्ठ, जगात धर्म हाच सर्वश्रेष्ठ आहे, मग तो या जन्मी असो की कोणत्याही जन्मी असो,' तरी पण श्रोतापन्नपदाचा लाभ केलेला एखादा गृहस्थ म्हणजे ज्याचे आता आपल्या त्या पदावरून पतन होणे शक्य नाही, असे जाणून घेतले आहे, परंतु असे असूनही तो एखाद्या अज्ञानी भिक्षूला किंवा श्रामणेराला प्रणाम करतो आणि त्यांचे उठून उभे राहून स्वागत करतो. भंते नागसेन, 'धर्म हाच जगामध्ये सर्वश्रेष्ठ आहे. तो मग या लोकी असो की कोणत्याही लोकी असो.' हे जर खरे असले तर धर्माचरणानेंच श्रोतापन्नपद प्राप्त केलेला एखादा गृहस्थ एकदमच अज्ञानी भिक्षूला किंवा श्रामणेराला प्रणाम करतो आणि उठून उभा राहून त्याचे स्वागत करतो, हे शोभनीय वाटत नाही. आणि जर श्रोत्तापन्न गृहस्थांनी एखाद्या अज्ञानी भिक्षूस किंवा श्रामणेरास प्रमाण करणे यथार्थतः योग्य असेल तर 'धर्म हाच जगात सर्वश्रेष्ठ आहे' असे मानणे चुकीचे ठरते. हेही एक कठीणच कोडे आहे. भंते, कृपाकरून याचे स्पष्टीकरण करून सांगा, जेणे करून विरोधकांना सडेतोड उत्तर देता येईल.''

''महाराज, जगात धर्म हाच सर्वश्रेष्ठ आहे आणि श्रोतापन्न नामक उच्चपदी पोचलेल्या उपासकाने एखाद्या अज्ञानी भिक्षूला किंवा श्रामणेराला प्रणाम केला पाहिजे व उठून उभे राहून त्यांचे स्वागत केले पाहिजे. या दोन्ही गोष्टी आनंदी संयुक्तीकच आहेत. महाराज, असे करण्याचे कोणते कारण आहे?''

''महाराज, श्रमण (भिक्षू) होण्यासाठी वीस श्रेष्ठ गूण आणि बाहेरील दोन लक्षणे असावे लागतात. त्यामुळेच ते अज्ञानी असले तरी श्रोतापन्नपद प्राप्त केलेले उपासक किंवा दुसरे लोक त्यांना आदराने प्रणाम करतात व उभे राहून त्यांचे स्वागत करतात. ते वीस गुण आणि दोन बाहेरील लक्षणे कोणते आहेत ते ऐका-''

#### श्रमणांचे गुण व लक्षणे

१) 'ते अरण्य, वृक्ष व एकांत अशा तीन श्रेष्ठ ठिकाणी वास्तव्य करीत असतात. २) ते सर्वच चांगल्या गोष्टीत अग्रेसर असतात. ३) ते आपले अधिष्ठान नियमानुसार

ठेवत असतात, ४) ते सदाचारी असतात. ५-६) शांत आणि संयमाने विहार करतात, ७) परम संयमी असतात, ८) क्षमाशील असतात, ९) उत्तम कार्यात मग्न राहतात, १०) आचार विचाराने श्रेष्ठ असतात, ११) उच्च व पवित्र इच्छा बाळगतात, १२) विवेकशील असतात, १३) पापांची लाज- भीती बाळगतात, १४) प्रयत्नशील असतात, १५) अप्रमादी असतात, १६) शिक्षापदाचा अभ्यास करण्यात सदैव तत्पर असतात, १७) धर्माचे ज्ञान मिळविण्यासाठी सदैव तत्पर असतात, १८) शीलाचे पालन करण्यात तत्पर असतात, १९) तृष्णेवर विजय मिळवणारे आणि २०) ते शिक्षापदाचा अभ्यास पूर्ण करतात. हेच त्यांचे स्वतःचे विशेष असे वीस गुण आहेत. असेच १) काषायवस्त्र धारण करणारे व २) डोक्याचे मुंडण करणारे ते असतात, ही त्यांची दोन बाह्य लक्षणे होत.

''महाराज, भिक्षू लोक वर सांगितलेल्या गुणांवर आरूढ होऊन धर्माचे पालन करतात व त्यायोगे अर्हतपद सुद्धा लाभ करून घेतात. म्हणूनच श्रोतापन्नपद प्राप्त केलेले गृहस्थ उपासक एखाद्या अज्ञानी भिक्षूस प्रणाम करतात आणि त्याचे उभे राहून स्वागत करतात. 'आश्रव क्षीण पावल्यामुळे त्यांनी भिक्षू जीवनाचा अंगीकार केला आहे, असे पवित्र जीवन करण्याप्रत अजून माझी अवस्था नाही.' असा विचार करूनच श्रोतापन्न पद प्राप्त केलेले गृहस्थ उपासक कोणत्याही भिक्षूंना प्रणाम करतात आणि त्यांचे उभे उठून स्वागत करतात. त्यांनी भिक्षू जीवनाचा अंगीकार करून श्रेष्ठ अशा सज्जन लोकांच्या समुहात स्थान मिळवले आहे. परंतु मला मात्र अजून तेथे स्थान लाभलेले नाही. त्यांना प्रतिमोक्षाचा उपदेश ऐकण्याइतपत योग्यता प्राप्त केली आहे. परंतु माझी ती अवस्था नाही, ते इतरांना प्रवर्जित व उपसंपन्न करुन बुध्दशासनाची वृध्दी करु शकतात. परंतु माझी अजून तरी ती योग्यता नाही. ज्यांचे मी पालन करु शकत नाही. अशा पुष्कळ पवित्र शिक्षापदांचे ते पालन करतात, त्यांनी भगवान बुद्धानाच आपला एकमात्र आधार देणारे गुरू मानून भिक्षू जीवनाचा अंगीकार केला आहे, त्याच्या काखेत मोठमोठे घाण केस नाहीत, ते अंजन लावत नाहीत की, दुसरा कोणताही साजश्रृंगार करीत नाहीत, तर सदाचारांचा सुगंध हेच एकमात्र त्यांचे साजश्रृंगाराचे प्रसाधन आहे; परंतु मी मात्र अनेक प्रकारच्या प्रसाधनाने साजश्रृंगार करीत आहे. महाराज याशिवाय जे वीस सर्वोच्च गुण आणि दोन बाहेरील लक्षणे, ही सर्वथा भिक्षू लोकांतच पाहावयास मिळतात. तसेच भिक्षू लोक दुसऱ्याही अनेक शिक्षापदांचे निष्ठेने पालन करतात. परंतु अजूनपर्यंत माझा त्या शिक्षापदांशी काहीच संबंध आलेला नाही. असा विचार करूनच श्रोतापन्न पदाचा लाभ केलेले गृहस्थ उपासक कोणत्याही भिक्षूंना प्रणाम करतात आणि त्यांचे उभे राहून स्वागत करतात आणि असे करणे आवश्यकही आहे.''

''महाराज, राजकुमार पुरोहिताजवळच क्षत्रियांना आवश्यक त्या सर्व विद्यांचे शिक्षण घेतो. त्यानंतर तो तरूण झाल्यावर योग्यवेळी राजसिंहासनावर बसतो, त्याला राजपदाचा लाभ होतो. तरीपण तो आपल्या आचार्यांना प्रणाम करतो व उभे राहून त्यांचे आदराने स्वागत करतो. कारण त्यास असे वाटते की, 'हे माझे गुरू आहेत, यांनी दिलेल्या शिकवणुकीमुळेच मला ही योग्यता प्राप्त झाली आहे.' महाराज, याचप्रमाणे भिक्षू लोक अशाच शिकवण देण्याच्या महान पिढीतील आहेत. असा विचार करूनच श्रोतापन्न पदाचा लाभ केलेले गृहस्थ उपासक कोणत्याही भिक्षूंना प्रणाम करतात आणि आपल्या आसनावरून उठून उभे राहून त्यांचे स्वागत करतात.''

''महाराज, एवढ्यावरूनच आपण समजून घ्यावयास पाहिजे की, भिक्षूंचा दर्जा किती महान आहे. महाराज, समजा एखाद्या श्रोतापन्न गृहस्थाला अर्हतपदाचा लाभ झालाच तर त्यावेळी त्याला दोनच गती प्राप्त होऊ शकतात, तिसरी गती लाभणे शक्यच नाही– एक तर तात्काळ त्याच दिवशी महापरिनिर्वाण किंवा दुसऱ्या भिक्षू जीवाचा अंगीकार. पण ही स्थिती भिक्षूंची नाही कारण भिक्षूभाव अत्यंत अचल, उत्तम व श्रेष्ठ असतो.''

''भंते, नागसेन, ही गोष्ट आता मला समजली. आपल्यासारख्या बुद्धीमान व्यक्तीकडूनच असा प्रश्न चांगल्याप्रकारे स्पष्ट केला जाऊ शकतो. आपणास वगळता दुसरा कुणीही याप्रमाणे समजावून सांगू शकत नाही.''

## २१. बुद्ध सर्वच लोकांचे हितकर्ते आहेत.

''भंते नागसेन, तुम्ही लोक म्हणता की, भगवान बुद्ध सर्व प्राणीमात्रांवरील संकट दूर करून त्यांच्या हितांचे रक्षण करतात. सोबतच असेही ऐकण्यात येते की, भगवान बुद्धांनी, 'अग्नीस्कंधोपम' सुत्तावरील धर्मोपदेश केला असता साठ भिक्षूंनी गरम रक्ताच्या उलट्या केल्या. भंते, यावरून असेच दिसून येते की, असा उपदेश करून त्यांनी हित नाही तर त्या साठ भिक्षूंचे अहितच केले आहे.''

''भंते नागसेन, भगवान बुद्ध जर सर्व प्राणीमात्रांची सर्व संकटे दूर करून त्यांच्या हितांचे रक्षण करणारे आहेत असे जर खरे मानले तर 'अग्नीस्कंधोपम' सुत्तावर धर्मोपदेश करीत असता साठ भिक्षूंनी तोंडातून गरम रक्ताच्या उलट्या केल्या असे म्हणणे खोटे पडते आणि अग्नीस्कंधोपम सुत्ताचा उपदेश ऐकून जर साठ भिक्षूंनी गरम रक्ताच्या उलट्या झाल्या हे खरे मानले तर भगवान बुद्ध सर्वांचे अहितापासून रक्षण करून हित करणारे आहेत असे म्हणणे खोटे पडते. भंते हा देखील अत्यंत गुंतागुंतीचा प्रश्न आहे. तेव्हा

या प्रश्नाचा योग्यरीतीने खुलासा करून समाधान करावे.''

''महाराज भगवान बुद्ध अहितापासून लोकांचे रक्षण करून त्यांचे हित करणारे होते हे काही खोटे नव्हे. तसे भगवंतानी उपदेश केला असता तो ऐकताच साठ भिक्षूंनी गरम रक्ताच्या उलट्या केल्या, हे ही काही खोटे नाही. तरीपण यात भगवान बुद्धाचा काहीच दोष नसून त्या भिक्षूंचाच दोष आहे.''

''परंतु भंते नागसेन, भगवान बुद्धाने जर उपदेश केला नसता तर त्यांच्या तोंडातून रक्तच पडले नसते ते खरे नाही.''

''नाही महाराज, तसे नाही, भगवान बुद्धाचा उपदेश ऐकून कुमार्गाने जाणाऱ्या दुष्कर्मी भिक्षूंच्या हृदयात एकदमच जळफळाट उत्पन्न झाला. कारण तथागतांच्या उपदेशांचा त्यांनी चुकीचा अर्थ काढला होता. अशा वाईट विचारांच्या अतिरेकामुळेच त्यांच्या तोंडातून गरम रक्ताच्या उलट्या झाल्या होत्या.''

**वारूळातील साप**

''भंते नागसेन, पण तथागताच्या उपदेशाने त्यांना असा परिणाम भोगावा लागला की नाही? यावरून त्यांच्या अनिष्टांचे कारण भगवान बुद्धच झालेत की नाही? भंते, एका वारूळात साप जाऊन दडला. तेव्हा एखाद्याला माती हवी असल्यामुळे तो त्याच वारूळास उकरू लागला आणि हवी तेवढी माती घेऊन तो निघून गेला. त्यामुळे वारूळाची बिळे बंद झाली आणि हवा न मिळाल्यामुळे साप तेथेच आत मरण पावला अशा स्थितीत त्या माणसामुळे सापाला मरण आले हे खरे की नाही?''

''होय महाराज!''

''भंते नागसेन, याचप्रमाणे त्या भिक्षूंचा नाश भगवान बुद्धामुळेच झाला, असेच म्हणता येईल.''

''महाराज, एक गोष्ट समजून घ्यावयास पाहिजे. ती म्हणजे भगवान बुद्ध कुणाची चापलुसी करण्यासाठी किंवा कुणाच्या मत्सरामुळे कधी कोणता धर्मोपदेश करीत नाही. त्यांच्या उपदेशात निरपेक्षभाव ओतपोत भरलेला असतो. त्यांच्या अशा उपदेशामुळे जे चांगल्या विचारांचे असतात ते प्रज्ञावंत बनतात, परंतु जे वाईट विचारांचे असतात ते ज्ञानास मुकतात.''

**फळलेला वृक्ष**

''महाराज, समजा एखादे आंब्याचे, जांभळीचे किंवा मोहाचे फळलेले झाड

आहे. ते हलवल्यास पक्की व सत्वपूर्ण देठ असलेली फळे तेवढे झाडालाच राहतील, कधीही खाली पडणार नाहीत. परंतु कच्चा व सडलेल्या देठांची जितकी फळे असतील तितकी झटपट खाली पडतील. महाराज, याचप्रमाणे भगवान बुद्ध व्यर्थच कोणाच्या स्तुतिकरिता किंवा मत्सरामुळे कधी धर्मोपदेश करीत नाही. याप्रमाणे निरपेक्ष भावनेनी ते उपदेश करीत असल्यामुळे जे चांगल्या विचाराने ग्रहण करतात ते प्रज्ञांवत बनतात आणि जे त्यांचा वाईट अर्थ लावतात ते प्रज्ञेस मुकतात. म्हणजे खाली पडतात.''

### शेतीची नांगरणी

''महाराज, शेतीची पेरणी करण्यासाठी एखादा शेतकरी प्रथम शेतीची नांगरणी करतो. त्यामुळे बरेचशे गवत उपटल्या जाऊन नाश पावते. त्याचप्रमाणे कुणाच्या व्यर्थ स्तुतीसाठी किंवा मत्सरामुळे भगवान बुद्ध कधी उपदेश करीत नाहीत. तर निरपेक्ष भावनेने धर्मोपदेश करीत असतात. त्यामुळे जे चांगल्या भावनेने उपदेश ग्रहण करतात ते प्रज्ञावंत बनतात आणि जे दूषित भावनेने ग्रहण करतात ते प्रज्ञेला मुकतात.''

### उस गाळणे

''रास गाळण्याकरीता उस घाण्यात टाकला जातो. तेव्हा त्यासोबतच बरेच किडे, माकोडे आणि जे जे प्राणी त्यात पडतात ते सर्व पिसले जातात. तसेच भगवान बुद्धाचा धर्मोपदेश चांगल्या विचाराने ग्रहण करणारे ज्ञानी होतात आणि वाईट विचारांचे लोक ज्ञानास मुकतात. तसेच त्या भिक्षूंचे झाले.''

''परंतु भंते नागसेन, ते भिक्षू त्यांच्याच उपदेशामुळे ज्ञानाने मुकतात किंवा पतन पावतात नाही कां?''

''महाराज, आता तुम्हीच सांगा, एखादा सुतार वाकदार लाकडाजवळ जाऊन अगदी गप्प उभा राहिला तर ते लाकूड सरळ, गुळगुळीत आणि कामास येणारे असे तो करू शकेल काय?''

''नाही भंते, सुतार त्या लाकडास छिलून व तासूनच सरळ, गुळगुळीत व कामास येण्याजोगे करू शकेल.''

''महाराज, याचप्रमाणे भगवान बुद्ध केवळ भिक्षू लोकांकडे उभे राहून पाहत बसल्याने त्यांना कधीही सन्मार्गावर आणू शकणार नाहीत. तर वाईट विचारांच्या भिक्षूंना उपदेश करून किंवा प्रसंगी त्यांना दूर सारूनच ज्ञानमार्गावर आणत होते. महाराज, त्यात तथागताचा काय दोष ? आपल्या वाईट कर्तृत्वानेच दुष्कर्मी लोकांची अवनती होते.

महाराज, ज्याप्रमाणे केळीचे झाड, वेळूचे झाड व खच्चरी फळाला आल्यावर किंवा अपत्यांना जन्म देऊन त्यांच्यामुळेच स्वतःचा नाश करून घेतात. तद्ववतच वाईट विचारांची माणसे आपल्याच करणीने स्वतःची अवनती करून घेतात. महाराज, ज्याप्रमाणे चोरांनी स्वतः केलेल्या कृत्यामुळेच त्यांचे डोळे काढले जातात, सुळावर चढवले जातात किंवा त्यांचे शीर कापले जाते. त्याचप्रमाणे जे लोक वाईट विचारांचे असतात ते स्वतःच्या दुष्कृत्यानेच अधोगतीला जातात आणि सर्वश्रेष्ठ बौद्ध धर्मापासून वंचित होतात.''

''महाराज, ज्या साठ भिक्षूंना तोंडातून रक्ताच्या उलट्या कराव्या लागल्या त्या तथागतामुळे नाही की, दुसऱ्या कोणामुळेही नाही, तर त्याला कारण त्याचे स्वतःचेच दुष्कृत्यच होते.''

## अमृत वाटणे

''महाराज, समजा एखाद्याने सर्व उपस्थित लोकांना अमृत पिण्यास दिले. ते पिऊन लोक निरोगी, सुदृढ दीर्घायुषी आणि दुःखमुक्त झालेत. परंतु तेच अमृत पिऊन काही लोक ते पचवू न शकल्यामुळे मृत्यू पावले. तर मग याबद्दल त्या अमृत देणारास दोषी ठरवता येईल काय?''

''नाही भंते!''

''महाराज, याचप्रमाणेच भगवान बुद्ध दहा हजार सत्वलोकांमध्ये समस्त देवता आणि मनुष्यांच्या कल्याणासाठी कोणत्याही प्रकारे भेदभाव न करता धर्मरूपी भोजन सर्वांनाच देतात. ते निरोगी लोकांना जीवनदान देणारे ठरते तर आधाशीपट्कीच्या रोग्यास मरणाचे कारण बनते, त्यात त्या खाणारांचाच दोष आहे. जे आपली अवस्था पाहत नाही.''

''फार छान, भंते नागसेन, आपण जसे सांगितले आहे, तसेच मी स्वीकारा करतो.''

## २२. वस्त्र-गोपन-दृष्टांत

''भंते नागसेन, भगवाना बुद्धाने सांगितले आहे की-''

**संयम पाळावा कायेने**
**वाचेस संयमाचे वळण।**
**राखावे मनाचे संतुलन,**
**सकल ठेवावे नियंत्रित।।**

''तरी पण भगवान बुद्धांनी चारही प्रकारच्या लोकसमुहांत बसले असता देवता आणि मनुष्यासमोर शैल नामक ब्राह्मणाला आपले कोषाच्छादित उपस्थ (पुरूषेंद्रिय) दाखवले. भंते, भगवान बुद्ध जर संयम पाळणारे होते तर शैल ब्राह्मणाला आपले कोषाच्छाति उपस्थ दाखविण्यापर्यंत त्यांचा शरीर संयम कसा सुटला. म्हणजे त्यांनी अशाप्रकारे गुह्यंद्रिय दाखविले असेल, हे खरे वाटत नाही. आणि जर त्यांनी शैल ब्राह्मणाला आपले कोषाच्छादित गुह्येद्रिय दाखवले असेल तर ते असे संयम पाळणारे होते, असे म्हणणे खोटे ठरेल. हे सुद्धा कठीण कोडे आकलनाकरिता आपणासमोर मी ठेवत आहे. कृपाकरून ते समजावून सांगावे.''

''महाराज, 'शरीराप्रती संयम पाळणे उत्तम आहे.' असे भगवान बुद्धाने सांगितले ते खरे असून शैल ब्राह्मणाला त्यांनी आपले कोषाच्छादित गुह्यंद्रिय दाखविले होते, हे सुद्धा खरे आहे. महाराज, त्याला भगवान बुद्धप्रती शंका होती आणि ती दूर करणे आवश्यक होते. त्याकरिताच भगवान बुद्धांनी आपल्या ऋद्धिबळाने आपले शरीर स्पष्टपणे प्रकाशित केले होते. तो ऋद्धिशक्ती निर्मित शरीरच तो पाहू शकला. त्यामुळे तथागताचा संयम सुटला, असे म्हणता येणार नाही.''

''भंते नागसेन, भगवान बुद्ध सर्व लोकांच्या समुहात बसले होते आणि त्यांच्यापैकी केवळ एकटा शैल ब्राह्मण त्याचे गृह्यंद्रिय पाहू शकला आणि बाकीच्यांना त्याचा सुगावाही लागू नये, यावर कोण बरे विश्वास ठेऊ शकेल? तेव्हा कृपाकरून अशी आश्चर्यकारक घटण्याचे कारण सांगावे.''

## आजाराच्या वेदना आजाऱ्यासच माहीत

''महाराज, ज्यांच्या सभोवार त्याचे नातेवाईक आणि मित्र लोकांचा घोळका उभा आहे. असा एखादा आजारी माणूस आपण कधी पाहिला काय?''

''होय, भंते पाहिला आहे.''

''महाराज, ज्या आजाराने तो त्रस्त झालेला आहे, त्याच्या वेदना त्या इतर लोकांना होऊ शकतात काय?''

''नाही भंते, त्या आजारामुळे होणाऱ्या वेदना तो एकटा आजारी माणूसच भोगू शकतो.''

''महाराज, या उदाहरणाप्रमाणेच ज्याला शंका आली होती, त्यालाच भगवान बुद्धाने आपले उपस्थ दाखवले.''

## अंगात येणारे भूत

"महाराज, एखाद्याच्या अंगात भूत आले. तर मग तो येत असतांना इतर लोक पाहू शकतात काय?"

"भंते, मुळीच नाही. ज्यांच्या अंगात येतो तीच व्यक्ती त्यास पाहू शकते."

"महाराज, भगवान बुद्धाबद्दल असेच घडले. ज्याला शंका आली त्यालाच भगवान बुद्धाने ऋद्धिशक्तीच्यायोगे आपले गृह्यंद्रिय दाखवले होते."

"भंते, एकाला वगळून तेथे बसलेले कुणीही दुसरे लोक पाहू शकले नाही. ही मोठी विचित्र घटना आहे."

"महाराज, त्यातील यथार्थ बाब तर ही आहे की, भगवान बुद्धांनी त्याला आपले उपस्थ दाखवले नसून आपल्या दिव्य अशा ऋद्धिशक्तीने त्याचे प्रतिबिंब मात्र दाखवले होते."

"परंतु हे भंते, प्रतिबिंबच का होईना पण ते सुद्धा दाखवणेच झाले की नाही! ज्याच्या दर्शनाने त्याची शंक दूर झाला !"

"होय महाराज, कोणाला काही समजावून सांगावयाचे असल्यास भगवान बुद्ध कधी-कधी मोठ्या आश्चर्यकारक लीला करीत असत. भगवान बुद्धांनी जर काही क्रिया केली तर ती लोकांना लगेच समजून येत नसे. महाराज, भगवान बुद्ध फार मोठे योगी होते. ज्ञानपिपासू लोकांना समजावून देण्याकरिता ज्या-ज्या अनुष्ठानाची आवश्यकता असेल, नेमके त्याच योगबळाचे अनुष्ठान करून ते समजावून सांगत असत. महाराज, आजारी माणसाला ज्या-ज्या औषधाने आजार मुक्त करता येईल, वैद्य लोक त्याला त्याच औषधी देतात. जसे- उल्टी करवतात, जुलाब देतात, लेप लावतात, शेकुन काढतात किंवा मालीश करवतात. याचप्रमाणे ज्ञानपिपासून लोकांना समजावून सांगण्याकरिता भगवान बुद्ध आवश्यक त्याच योगबळाचे अनुष्ठान करून समजावून सांगत असत."

"महाराज, प्रसुतीच्यावेळी एखाद्या कठीण प्रसंग ओढवला असता स्त्रीही आपले गुप्तांग कोणत्याही पुरूषास न दाखवता वैद्याला दाखवते. महाराज, याचप्रमाणे जाणून घेण्यास उत्सुक अशा लोकांना जाणीव करून देण्यासाठी भगवान बुद्ध आपल्या ऋद्धिशक्तींच्या योगाने कधी-कधी आपल्या गुह्यंगाचे प्रतिबिंब देखील दाखवत असत. महाराज, अशा शंकेखोर व्यक्तींना न दाखवता येणारी अशी कोणतीही बाब नाही. महाराज, जर कुणी एखादा भगवान बुद्धाचे हृदय देखील दाखवू शकत होते. महाराज, भगवान बुद्ध फार मोठे योगी आणि उपदेश करण्यात अत्यंत कुशल होते."

### नंदाची गोष्ट

''महाराज, नंद स्थवीरांच्या मनातील विचार ओळखून भगवान बुद्ध त्यांना देवलोकी घेऊन गेले व तेथील देवकन्यांचे दर्शन घडविले. त्यांना हे चांगल्याप्रकारे समजून आले होते की, नंद स्थवीरांना अशाप्रकारचे ज्ञान लाभ होऊ शकतो आणि खरोखर त्यांना यामुळेच लाभ झाले. स्थवीर नंदाला ज्ञानाचा लाभ व्हावा म्हणून तथागतांनी कोंबडीच्या पायाप्रमाणे लाल आणि अत्यंत कोमल तळपाय असलेल्या सुकुमार अप्सरांचे दर्शन घडवले आणि ज्या सांसारिक सौंदर्याच्या जाळात स्थवीर नंद अडकून गेले होते त्या सौंदर्यातील हीनपणा, दोष आणि दुष्परिणाम हे स्पष्टपणे त्यांच्या निदर्शनास आणून दिले.''

### चुळ पंथक

''महाराज, अशाचप्रकारे स्थवीर चुळ पथकांना ज्ञानलाभ करून देण्याकरिता तथागतांनी त्यांना अगदी नवीन शुभ्र रंगाचा एक रूमाल दिला होता. त्यामुळेच त्यांना लाभ झाला. महाराज, याप्रमाणे भगवान बुद्ध धर्मोपदेश करण्यात मोठे कुशल होते.''

### मोघराज ब्राह्मणाची गोष्ट

''महाराज, मोघराज ब्राह्मणाचा गर्व हरण व्हावा आणि तो नम्र व्हावा म्हणून त्याने तीन वेळा प्रश्न विचारूनही तथागताने त्याचे काहीच उत्तर दिले नाही, आणि खरोखर यामुळेच त्याचा गर्व नाश होऊन त्यास सहा अभिज्ञासह ज्ञानाचा लाभ झाला. महाराज याप्रमाणे भगवान बुद्ध धर्मोपदेश करण्यात फारच कुशल होते.''

''ठीक आहे, भंते नागसेन, आपण उत्तम प्रकारे हा प्रश्न समजावून सांगितला. विविधप्रकारे युक्तीवादाची मांडणी केली आणि गुंता उकलून दिला. अंधारात प्रकाश दाखविला. न सुटणारी गाठ सोडून दाखवली. विरूद्ध पक्षाच्या कुतर्काचे खंडण केले. आणि बौद्ध भिक्षूंना नवीन दृष्टी दिली. दुसऱ्या धर्माच्या लोकांच्या मुखावरील तेज फिके पडले. तुम्ही निश्चितच सर्व गणाचार्यांमध्ये सर्वश्रेष्ठ आहात.''

### २३. भगवान बुद्धाची कठोर वाणी

''भंते नागसेन, धर्मसेनापती स्थवीर सारीपुत्राने म्हटले आहे की, 'आवुसो, भगवान बुद्धाचे भाषण सर्वथा सभ्य असते. भगवान बुद्धाच्या वाणीत असे कोणत्याही प्रकारचे दोष आढळून येत नाही की, जे श्रद्धावान अनुयायांनी दुसऱ्यांना कळू नये म्हणून जागृत करावे.' तरीपण कलंदपुत्र स्थवीर सुदिन्नाकडून चूक झाली असता पहिल्या पारिजिकेचे विधान केले. त्यावेळी भगवान बुद्धाने त्यांना 'मोघपुरूष' (फालतू माणूस)

म्हणून कठोरवाणीने दाटले होते, त्यामुळे स्थवीर फारच घाबरले होते. त्यांना इतका पश्चाताप झाला की, त्या कारणाने श्रेष्ठ-मार्गाचा लाभ देखील होऊ शकला नाही.''

''भंते, भगवान बुद्धाची वाणी जर पूर्णतः सभ्य असेल तर त्यांनी कठोर बोलून स्थवीर सुदिन्नास रागावले होते, हे विधान खोटे ठरते. आणि त्यांनी जर स्थवीर सुदिन्नास कठोर बोलून रागावले असेल, तर त्यांची वाणी सभ्यतेची नव्हती. असेच म्हणावे लागेल. हे सुद्धा एक कोडेच आहे. कृपाकरून तुम्ही याची उकल करून सांगावी.''

''महाराज, धर्मसेनापती स्थवीर सारीपुत्रांनी भगवान बुद्धाची वाणी पूर्णतः सभ्य असते, असे जे म्हटले आहे, हे खरे आहे; तसेच स्थवीर सुदिन्नावर रागावले होते, हे सुद्धा खरे आहे. परंतु तथागतांनी आपल्या उद्धट स्वभावामुळे किंवा रागीट स्वभावामुळे सुदिन्न स्थवीरास रागावले नाही तर त्यांना अपाय होणार नाही, याची जाणीव ठेऊनच त्यांचा असलेला स्वभाव व्यक्त केला.''

''त्यांचा असलेला स्वभाव व्यक्त केला, म्हणजे काय?''

''महाराज, मनुष्य जन्मी येऊन जर त्यास चार आर्यसत्याचे ज्ञान झाले नाही तर त्याचा जन्म व्यर्थच (मोघ) होय. एखादे काम करीत असता ते सोडून दुसरेच काहीतरी करतो, त्यास फाजील मनुष्य असे म्हणतात. महाराज सुदिन्न स्थवीर ज्या स्वभावाचे होते त्यानुसारच कथन केले. यात भगवान बुद्धांनी काहीही चूक केली नाही.''

''भंते नागसेन, पण एखादाने जरी सत्य घटना कथन करीत दुसऱ्याचा अपमान केला तरी त्यास आम्ही क्षुल्लक कां होईना पण एक कहापण (त्यावेळचा पैसा) दंड करतो. कारण तो सुद्धा अपराधच आहे ना! त्यावरून देखील परस्परात पुढे चालून झगडा होण्याची शक्यता नाकारता येत नाही.''

## अपराधाची शिक्षा

''महाराज, एखाद्या गुन्हेगारास लोक अदबीने नमस्कार करतात, त्याचे उठून उभे राहून स्वागत करतात, त्याला मान देतात ऐवढेच नव्हे तर त्यास कधी काही भेटही देतात, असे तुम्ही कधी ऐकले आहे काय?''

''नाही भंते, एखाद्याने जर कधी कुठे अपराध केला तर लोक त्याची टर्र उडवतात, त्याला धाक देतात, इतके नव्हे तर त्याला बांधून नानाप्रकाराने त्रस्त करतात व शिरच्छेद करून त्याला जीवेसुद्धा मारतात.''

''महाराज, यावरून हेच सिद्ध होते की, तथागताने जे केले ते बरोबर केले, चूक

नाही.''

''होय भंते, तथागतांनी जे केले ते योग्यच केले होते, भंते, तथागतांचे अशाप्रकारचे सत्यदर्शक व कठोर शबद जे कुणी देवता व मनुष्य ऐकतील त्यांना पाप कर्मे करावयाची लाज वाटेल व त्याला पाहून ते निश्चितच घाबरतील. त्यामुळे त्यांच्या हातून अधमपणाचे कृत्य घडणार नाहीत. कुकर्म करावयास जाणे किंवा करणे तर दूरच राहिले पण त्याचे नाव ऐकूनच ते भयभीत होतील.''

### कडू औषध

''महाराज, एखाद्या मनुष्याची प्रकृती संपूर्ण ढासळलेली आहे, आणि त्यांच्या सर्व अंगाला रोग जडलेला आहे अशा स्थितीत वैद्य लोक त्याला गोड औषधेच देतील काय?''

''नाही भंते, त्याला पूर्णपणे दुरूस्त करण्यासाठी वैद्य लोक त्याला अत्यंत कडू व प्रभावशाली असेच औषध देतील.''

''त्याचप्रमाणे महाराज, तथागत बुद्ध कडक शब्दात कुणाची कान उघाडणी करतात, ते इतरांचे दोष नाहीसे करण्याच्या हेतूनेच ! त्यांच्या वाणीत कधी कधी कठोरता आढळून येते, परंतु ती सुद्धा लोकांना शांत व नम्र बनवण्याच्या हेतूनचे!''

''महाराज, गरम पाणी असले तरी अनेक कडक वस्तूंना अगदी नरम बनवते. तद्वतच हे महाराज, भगवान बुद्धाच्या शब्दात वरवर पाहता कठोरता असली तरी त्यानेच काम बनते, कारण त्यात करूणा भरलेली असते. महाराज, ज्याप्रमाणे वडिलांचे कठोर शब्द पण मुलाकरिता फारच उपयुक्त ठरतात. कारण त्यात वत्सलता असते. त्याचप्रमाणे वरवर पहाता भगवान बुद्धाचे शब्द कठोर असले तरी अत्यंत उपयुक्त असतात. कारण त्यात करूणा भरलेली असते.''

''महाराज, भगवान बुद्धाची कठोर वाणी देखील लोकांची पापे धुऊन काढण्याकरिताच असते.''

### गो-मूत्र

''महाराज, ज्याप्रमाणे अत्यंत वाईट स्वाद व गंध असलेले गोमूत्र पिणे कठीणच जाते; परंतु ते शरीरातील रोगाचा नाश करते. त्याचप्रमाणे भगवान बुद्धाची कठोर वाणी सुद्धा परिणामी हितावह व करूणेने ओथंबलेली असते. महाराज, ज्याप्रमाणे रूईचा एखादा गोळा अंगावर पडला असता थोडीसुद्धा इजा होत नाही. त्याचप्रमाणे भगवान बुद्धाच्या

वाणीत जरी कठोरता असली तरी त्यापासून कोणालाही आघात होत नाही."

## २४. बोलके झाड

"भंते नागसेन, भगवांतनी म्हटले आहे की, 'हे ब्राह्मण, जे कधी ऐकू शकत नाही व निर्जीव आहे, याची जाणीव तुला असून देखील या पळसाच्या झाडास तू कां पुन्हा पुन्हा विचारतोस ? तसा तू फार हुशार मनुष्य दिसतो !' तथापि असेही म्हटले आहे, अस्पन वृक्षाने उत्तर दिले. की हे भारद्वाज, मी सुद्धा बोलू शकतो !"

"भंते, खरोखरच जर झाडास जीव नसते, तर अस्पन वृक्षाने उत्तर दिल्याबद्दलचे विधान खोटे ठरते. आणि अस्पन वृक्षाने संभाषण केले हे खरे मानले, तर झाड निर्जीव असते, हे विधान खोटे ठरते. हे देखील अत्यंत कठीण असे कोडे आहे. तेव्हा याचे स्पष्टीकरण करून देण्यात तुम्ही आपली बुद्धिमत्ता दाखवावी."

"महाराज, तुम्ही नजरेस आणून दिलेल्या दोन्ही गोष्टी खऱ्या आहेत. झाडास जीव नसतो आणि अस्पन वृक्षाचे भारद्वाजाशी संभाषण केले हे रूढ भाषेतील विधान आहे. झाडास जाणीवेची भावना नसल्यामुळे ते कधी बोलू शकत नाही. तथापि त्या झाडावर वास्तव्य करणाऱ्या देवतांच्या बोलण्याला उद्देशून 'झाड बोलले' असा शब्दप्रयोग केला आहे."

### धानाची गाडी व बोलके झाड

"महाराज, गाडीत धान भरलेले असता लोक 'ही धानाची गाडी' असे म्हणतातच ना! परंतु धानापासून ती गाडी बनलेली नसते ती असते लाकडाची आणि तिच्यात धान भरले असल्यामुळे लोक 'धानाची गाडी' म्हणून शब्दप्रयोग करतात. महाराज, त्याचप्रमाणे झाड कधी बोलत नाही. कारण त्याला तसा जीव नसतो. परंतु त्यावर वास्तव्य करणाऱ्या देवतांच्या बोलण्यास उद्देशून 'झाड बोलते' असे म्हणतात. दही बांधून मठ्ठा जमवत असता लोक म्हणतात की, 'मी मठ्ठा जमवत आहे.' खरे म्हणजे फडक्यात बांधतांना ते दहीच असते, पण शब्दप्रयोगच तो ! महाराज, त्याचप्रमाणे कोणतेही झाड बोलत नाही. कारण त्याला बोलण्याची जाणीवच नसते. परंतु त्यावर वास्तव्य करणाऱ्या देवतांचे शब्द ऐकून 'झाड बोलते' असे म्हणतात."

### अमकी वस्तू बनवत आहे

"महाराज, लोक म्हणतात की, 'मी अमकी वस्तू बनवत आहे.' तेव्हा जी वस्तू अजून अस्तित्वातच नाही, ती कसे काय बनवणार? परंतु रूढ भाषेत लोक तसे म्हणतात. त्याचप्रमाणे झाड कधी बोलत नाही. कारण त्यास जीव नसते. परंतु त्यावर

वास्तव्य करणाऱ्या देवतांचे शब्द ऐकून 'बोलके झाड' असे म्हणतात.''

''महाराज, भगवान बुद्ध आपला धर्म समजावून सांगत असता, लोकांमध्ये रूढ असलेल्या अशा भाषेचाच उपयोग करीत असत.''

''छान आहे. भंते नागसेन !''

## २५. भगवान बुद्धाचे अंतीम भोजन

''भंते नागसेन, धर्मसंगीतीत भाग घेणाऱ्या स्थवीरांनी असा निर्णय घेतला की, असे मी ऐकले आहे की, चुंद नामक सोनाराचे घरी भोजन केल्यानंतर भगवान बुद्ध अतिशय आजारी पडले, आणि त्यातच त्यांचा अंत झाला. परंतु याबद्दल भगवान बुद्धांनीच स्पष्ट केले होते की, 'हे आनंद, मला देण्यात आलेल्या सर्व भिक्षामध्ये दोन भिक्षा सर्वश्रेष्ठ फळ आणि पुण्य प्रदान करणाऱ्या समान पातळीच्या आहेत. कोणत्या बरे त्या दोन भिक्षा?' १) भिक्षेत मिळालेले जे भोजन ग्रहण करून मी अलौकिक अशा बुद्धत्वाचा लाभ करून घेतला आणि २) भिक्षेत लाभलेले जे भोजन करून मी संसारचक्रातून कायमची सुटका देणाऱ्या महापरिनिर्वाणाचा लाभ करून घेतला. या दोन्ही भिक्षा कोणत्याही इतर भिक्षापेक्षा अधिक पुण्यफळ प्रदान करणाऱ्या असून यांची किंमत सारखीच आहे.''

''भंते, जर चंदाच्या घरी भोजन केल्यामुळे तथागतास अतिशय आजार जडला आणि त्यातच त्यांचा अंत झाला तर ही भिक्षा अधिक फळ व पुण्य प्रदान करणारी समजली जाऊ नये. आणि जर ती भिक्षा इतरांनी दिलेल्या भिक्षापेक्षा अधिक फळ व पुण्य प्रदान करणारी असेल, तर ती खाऊन तथागताला असा आजारा जडला होता, त्यातच त्यांचा अंत झाला. भंते, एक प्रकारे विषासमान तथागताचे प्राणहरण करणारी ती भिक्षा इतरांच्या भिक्षेपेक्षा अधिक फळदायक कशी काय ठरू शकेल? विरूद्ध पक्षांच्या लोकांच्या कुतर्कांना सडेतोड उत्तर देण्याकरिता आपण याबद्दलचे खरे कारण काय आहे ते सांगावे. विरोधकांनी तर अशा अफवा उठवल्या आहेत की, तथागतांनी खूप भोजन केले असेल. म्हणूनच त्यांना अपचन होऊन अतिसार झाला व त्यातच त्यांचा अंत झाला. भंते, हा फारच चिंतेचा विषय आहे. अत्यंत कठीण असे हे कोडे आपण उकलून द्यावे.''

''महाराज, धर्मसंगीतात भाग घेणाऱ्या स्थवीरांनी चुंद नामक सोनाराचे घरी तथागतांनी भोजन केले आणि त्यांना असा आजार झाला की, त्यातच त्याचा अंत झाला. असा जो निर्णय दिला तो सत्य आहे. तसेच चुंदाच्या घरची भिक्षा इतरांच्या भिक्षेपेक्षा अधिक पुण्यफळ प्रदान करणारी आहे, असे जे तथागतांनी सांगितले आहे,

तेही बरोबर आहे.''

''महाराज, तथागताच्या या अंतीम भोजनावर देवता लोक अतिशय आनंदित झाले होते. त्यांनी हा सुकर महत्वाच्या पक्वान्नात दिव्य ओज भरून दिले होते. त्यामुळे ते अत्यंत हलके, स्वादिष्ट आणि पाचक बनले होते. या पक्वान्नांच्या भोजनाने तथागतांना आजारच जडला नाही तर त्यांचा देह अत्यंत अशक्त झाला होता. आणि त्यांना आयुर्मानपूर्ण झाल्यामुळे आजार पडला आणि त्यांचे आरोग्य बिघडत गेले.'

''महाराज, स्वतःच जळत असलेल्या अग्नीमध्ये जळाऊ इंधन टाकले असता तो अधिकच भडकतो. तद्वतच भगवान बुद्धाचे शरीर अत्यंत अशक्त झाले आणि आयुर्मानपूर्ण झाल्यामुळे त्यांचा आजार वाढत गेला. महाराज, ज्याप्रमाणे पावसाचा खूप वर्षाव झाला असता नदी आणखी खळखळ आवाज करीत वाहू लागते; लिव्हर कमजोर असतांना अर्धपक्व अन्नाचे भोजन केले असता अजून स्थिती बिकट होते. त्याचप्रमाणे भगवान बुद्धाचे शरीर अधिकच अशक्त झाले होते. आणि आयुर्मानपूर्ण झाल्यामुळे त्यांचा आजार वाढतच गेला. याप्रमाणे महाराज, चुंदाने दिलेल्या भोजन दानात कोणताच दोष नव्हता. तसेच चुंदावर देखील कोणत्याच प्रकारे दोष देता येत नाही.''

''परंतु भंते, त्या दोन्ही भिक्षा दुसऱ्या लोकांच्या भिक्षेपेक्षा अधिक पुण्यफळ देणाऱ्या म्हणून समजल्या जातात, याचे कारण काय?''

''महाराज, याचे कारण असे की, दोन्ही भिक्षान्न खाऊनच त्यांना धर्मातील सर्वश्रेष्ठट वस्तूंचा लाभ झाला होता.''

''भंते, धर्मातील सर्वश्रेष्ठ वस्तू कोणती, ते सांगा?''

''महाराज, आनुपूर्वीक- विहाराच्या नऊ समापत्तीच्या अवस्थांचा सरळ आणि उलट पध्दतीने साक्षात्कार करणे.''

''भंते, भगवान बुद्धांनी, बुद्धत्वाचा लाभ आणि महापरिनिर्वाण या दोन्ही वेळी याचा साक्षात्कार केला होता काय?''

''होय महाराज!''

''भंते, आश्चर्य आहे! फारच अद्भूत आहे!! भगवान बुद्धांना दिलेल्या दोन्ही भिक्षा खरोखरच महान गौरवशाली समजल्या जातात. ते व्यर्थच नाही. आनुपूर्वीक विहाराच्या नऊ समापत्तींच्या अवस्थांचा साक्षात्कार करणे खरोखरच धन्य आहे. त्या कारणानेच जे भिक्षान्न खाऊन तथागतांनी बुद्धत्व प्राप्त केले आणि जे भिक्षान्न खाऊन

महापरिनिर्वाण प्राप्त केले ह्या दोन्ही भिक्षांना महत्वपूर्ण मानले जाते. ठीक आहे. भंते नागसेन, आपण जे सांगितले, त्याचा मी आदरपूर्वक स्वीकार करतो.''

## २६. बुद्धपूजा ही भिक्षू लोकांकरिता नाही

''भंते नागसेन, भगवान बुद्धाने सांगितले की, 'हे आनंद, तुम्ही लोक तथागतांच्या शरीर-पूजेतच आपला वेळ व्यर्थ घालवू नका.' त्यासोबतच असे देखील म्हटले आहे की, त्या सन्मानास पात्र असलेल्याच्या अस्थीधातूंचा सन्मान ठेवा व श्रद्धापूर्वक त्याची पूजा करा. असे करीत असता तुम्हाला उत्तम गती प्राप्त होईल.''

''भंते, भगवान बुद्धांनी जर आनंदाला तुम्ही लोक बुद्धांच्या शरीर पूजेतच आपला अमूल्य वेळ व्यर्थ घालवू नका असे सांगितले असेल, तर त्या सन्मानासा पात्र पूजनीयांच्या धातूंचा सन्मान ठेवा, इत्यादी विधान कधी केले नसावे आणि जर त्यांनी त्या सन्मानास पात्र, पूजनीयांच्या धातूंचा सन्मान ठेवा इत्यादी विधान खरोखर केले असतील तर स्थवीर आनंदास बुद्धाच्या शरीर पूजेत आपला अमूल्य वेळ व्यर्थ घालवू नका हे विधान केलेच नसावे. हे सुद्धा एक कठीण कोडे आहे. कृपाकरून याचे स्पष्टीकरण करून सांगावे.''

''महाराज, दोन्ही विधाने भगवान बुद्धांनीच केले आहेत, हे खरे आहे. परंतु असे सर्वांनाच उद्देशून केले नव्हते तर फक्त भिक्षू लोकांनाच उद्देशून असे म्हटले होते की, 'हे आनंद, तुम्ही लोक बुद्धाच्या शरीर पूजेतच व्यस्त राहू नका.' महाराज, केवळ पूजा करीत राहणे हे भिक्षू लोकांचे काम नव्हे. तर सर्व संस्कार नश्वर आहेत, असे मनात चिंतन करणे, ध्यान भावनेचा अभ्यास करणे, सर्वच गोष्टीतून सत्य तेवढे शोधून काढणे, क्लेशाचा नाश करण्याचा प्रयत्न करणे आणि पवित्र अशा कार्यात स्वतःला गुंतवन ठेवणे- हेच बौद्ध भिक्षूंचे परम कर्तव्य आहेत. बाकी सन्मान पूजा अर्चा करणे हे देवता आणि साधारण मनुष्याचे निश्चितच कर्तव्य आहे.''

''महाराज, हत्ती, घोडे, रथ, भाला आणि धनुष्यबाण चालवण्याची विद्या संपादन करणे, मालमत्तेसंबधीचे कायदे समजून घेणे, क्षत्रियांची परंपरा चालवणे, युद्धात लढणे, आघाडीवरील सेनेचे संचालन करणे इत्यादी कर्तव्ये क्षत्रियांची आहेत. शेती करणे, व्यापार उदीम करणे व पशुधनाची जोपासना करणे ही कर्तव्य वैश्य, शुद्रादी दुसऱ्या लोकांची आहेत. त्याच्याप्रमाणे महाराज, चारही वेदांचा अभ्यास करणे, लक्षणशास्त्र, इतिहास, पुराण, पुरोहिती, कौत्सुभ, काव्य, व्याकरण, ज्योतिषशास्त्र, शकुन पाहणे, स्वप्नविद्या, निमित्तविद्या, सहा वेदांगे, सूर्य आणि चंद्रग्रहण विद्या, ताऱ्यांचे भ्रमण, ग्रहांच्या चौकड्या, आकाशातील गडगडाट, नक्षत्र पाहून फळ सांगणे, गणित,

वितरणातील शुभाशुभ फळ सांगणे, कुत्री, मृग, उंदीर, संकरित प्राणी तसेच पक्षांच्या ओरडण्याचे शुभाशुभ फळ सांगणे इत्यादि विद्या, ब्राह्मणास संपादन कराव्या लागतात. त्याचप्रमाणे महाराज, पूजा-अर्चेतच अडकून पडणे हे बौद्ध भिक्षूंचे काम नव्हे. तर सर्व संस्कार अनित्य, नश्वर असण्याबद्दल मनात चिंतन करणे, ध्यानाभ्यास करणे, सत्य शोधून काढणे, स्वतःमधील क्लेश नष्ट करण्याचा प्रयत्न करणे आणि पवित्र अशा कार्यात स्वतःला गुंतवूण ठेवणे, हीच बौद्ध भिक्षूंची परम कर्तव्य होत. बाकी सन्मान, पूजा अर्चा करणेही देवता व मनुष्यांचे आवश्यक कर्तव्ये आहेत, असे भगवान बुद्धाने सांगितले. महाराज, भिक्षू लोकांनी व्यर्थ कामात स्वतःला अडकून ठेवू नये म्हणून तथागतांनी असे म्हटले होते की, 'हे आनंद, तुम्ही तथागताच्या शरीर पूजेची व्यर्थ भानगड स्वतःवर लादून घेऊ नका.' त्याहून अधिक महत्वाची पुष्कळ कार्ये तुम्हाला करावयाची आहेत.''

''महाराज, तथागतांनी जर असे सांगितले नसते, तर पुष्कळ भिक्षूंनी आपली चीवरे व भिक्षापात्र बाजूला ठेवून व महत्वपूर्ण इतर कर्तव्याकडे दुर्लक्ष करून केवळ बुद्धपूजा करणे हेच एकमात्र आपले कर्तव्य मानले असते.''

''फार छान, भंते नागसेन, तुम्ही केलेल्या खुलाशाने खरोखरच माझे समाधान झाले.''

## २७. भगवान बुद्धाच्या पायावर दगडाचा तुकडा पडणे

''भंते नागसेन, तुम्ही लोक म्हणता की, भगवान बुद्ध चालत असता खड्डे असलेली किंवा ओबडधोबड जमीन देखील एकाच समपातळीवर असल्याप्रमाणे बनत असे. तसेच असेही ऐकले जाते की, एकदा दगडाच्या एका तुकड्याने तथागताच्या पायास इजा झाली होती, तेव्हा तथागताच्या पायाला लागणारा दगड दुसरीकडे का जाऊन पडला नाही. त्याच्या पायावरच कां बरे जाऊन पडला ? अशा स्थितीत भगवान बुद्ध चालू लागताच अचेतन भूमीचे खड्डे भरले जाऊन ओबडधोबड भूमी समपातळीवर येत असे, हे खरे मानले तर तथागतांच्या पायास एका दगडाचा तुकडा लागून त्यांचा पाय कापून रक्तबंबाळ झाला होता, हे म्हणणे कसे शक्य होऊ शकते? किंवा खरोखरच दगडाचा तुकडा लागून तथागताचा पाया कापला जाऊन रक्तबंबाळ झाला हे विधान खरे मानले तर ओबडधोबड भूमी समतल होत असे, हे विधान कसे खरे मानता येईल ? भंते नागसेन, हे सुद्धा आमच्याकडून कधी न उलगडणारे असे कोडे आहे. तेव्हा कृपाकरून आपणच याचे स्पष्टीकरण करावे.''

''महाराज, दोन्ही विधाने खरी आहेत, यात शंका घेण्यासारखे काहीच नाही. कारण दगडाची तुकडा आपोआपच किंवा निसर्गतःच तथागताच्या पायावर येऊन पडला

नसून देवदत्ताने तुच्छता व इर्शाल बुद्धीने जाणूनबुजून फेकल्यामुळे तो त्याच्या पायावर जाऊन पडला. महाराज, शेकडोच काय पण हजारो जन्मापासून भगवान बुद्धाप्रती देवदत्ताच्या मनात इर्षा आणि वैर घर करून बसला होता. त्यामुळेच त्याने तथागताच्या डोक्यावर पडेल अशा बेताने एक मोठा दगड एका उंच अशा पहाडावरून फेकला होता. उद्देश हा की, त्यामुळे तथागत त्या दगडाने चेंगरून जावे व त्यांना मृत्यू यावा; परंतु मध्येच दोन दगडाला तो अडकून पडल्यामुळे त्याचा लहान तुकडा उडून ती तथागतांच्या पायावर जाऊन पडला आणि त्यांच्या पायास इजा झाली.''

''भंते, ज्याप्रमाणे तो ढकलून दिलेला दगड फरफटत येत असता मध्येच दोन दगडात जाऊन अडकला तद्वतच त्या तुकड्यालासुद्धा मध्येच अडकून राहावयास पाहिजे होते.''

### ओंजळीभर पाणी

''महाराज, ज्या कोणत्या वस्तूस अडवले जाते, त्यातील थोडे ना थोडे पाणी घसरू शकते किंवा निसटू शकते महाराज, ओंजळीत पाणी घेतले असता बोटांच्या फटीतून काही पाणी खाली सांडतच असते. हीच गोष्ट दही, दूध, मध, तूप व तेल याबाबत सुद्धा आहे. अगदी याप्रमाणे देवदत्ताने पायाने लोटलेला दगड फरफरत खाली येत असता मध्येच दुसऱ्या दोन दगडांवर जोराने आपटला गेल्यामुळे त्याला तेथेच प्रतिबंध झाला असला तरी त्यातील एक लहानशी कपरी उडून ती तथागताचे पायावर येऊन पडली.''

### मूठीतील धूळकंण

''महाराज, मूठीत कितीही बारीक धूळकण घेतले तरीपण बोटांच्या फटीतून काहीना काही धूळकण खाली पडतातच! तसेच या दगडाच्या तुकड्याचे झाले.''

### तोंडातील घास

''महाराज, कितीही सावधानपूर्वक तोंडात घास घेतला असला तरी काही ना काही भाताची शिते खाली भोजनपात्रात पडत असतात, तसेच या दगडांच्या तुकड्याचे आहे, असे समजले पाहिजे.''

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, फरफटत येणारा दगड मध्येच थांबला, हे मी मान्य करतो; परंतु ही धरणी जशी तथागतास एवढा आदर दाखवीत होती, तसेच या तुकड्याने देखील तथागताच्या गौरवार्थ मध्येच कोठेतरी थांबून आदर दाखवायला पाहिजे होता की नाही?''

''महाराज, बारा प्रकारचे असे लोक असतात की, ते कोणाचाही गौरव करीत

नाहीत. कोण बरे ते बारा? १) लालसी मनुष्य लालसेमुळे आदर दाखवत नाही, २) चिडखोर व्यक्ती द्वेषामुळे आदर दाखवत नाही, ३) मोहात गुरफटलेला मनुष्य, ४) गर्विष्ठ मनुष्य, ५) वाईट मनुष्य, ६) हट्टी मनुष्य, ७) हलकट मनुष्य, ८) बडबड करणारा मनुष्य, ९) दुष्ट मनुष्य क्रूरपणामुळे, १०) चिडलेला मनुष्य बदल्याच्या भावनेमुळे, ११) लोभी मनुष्य लोभामुळे आणि १२) धंदेवाईक मनुष्य आपल्या फायद्याच्या लोभात असल्यामुळे कोणाचा गौरव किंवा आदर करीत नाही. महाराज, याप्रमाणे हे बारा प्रकाराचे लोक कोणाचाही आदर किंवा गौरव करीत नाहीत. परंतु दगडावर दगड आदळला गेल्याने तो तुकडा आकस्मिकपणे उडाली व तथागतांच्या पायावर जाऊन पडला.''

''महाराज, ज्याप्रमाणे बारी वाळू किंवा धूळकण वाऱ्याच्या वेगामुळे उडते व काही कारण नसताही आकस्मिकपणे चोहीकडे फेकली जाते, त्याचप्रमाणे दगडाचा तो तुकडा आकस्मिकरित्या दगडावर दगड आदळल्यामुळे उडून तथागतांच्या पायावर जाऊन पडला. महाराज, जर तो तुकडा तुटून वेगळा झाला नसता, तर त्या तुकड्यासह पूर्ण दगडच वर अडकून राहिला असता. महाराज, तो तुकडा धरणीवर नव्हता की वर अंतराळवर राहिला नव्हता. तर एका दगडावर दुसरा दगड आदळला गेल्यामुळे कोणते कारण नसता निश्चतपणे तो तुकडा उडाला व तथागतांच्या पायावर जाऊन पडला. महाराज, सोसाट्याचा वारा सुटला की झाडाची वाळलेली पाने जिकडे-तिकडे उडून विखुरली जातात. तसेच झाले त्या दगडाच्या तुकड्याचे.''

''महाराज, तथागतांच्या पायावर तो तुकडा जाऊन पडण्याचे खरे कारण म्हटले म्हणजे त्या दुष्ट व कृतघ्न देवदत्ताचे दुष्कृत्य होय. ज्याने तथागतांना दुःखी केले.''

''फार छान. भंते नागसेन, तुम्ही जे विश्लेषण करून सांगितले, ते मी स्वीकार करतो.''

## २८. श्रेष्ठ आणि सामान्य श्रमण

''भंते, नागसेन, तथागतांनी म्हटले आहे की, आश्रवांचे शमन करूनच कोणी श्रमण होतो. तसेच असेही म्हटले आहे की, 'ज्यांच्यात हे चार गुण आहेत. त्यांना लोक श्रमण म्हणतात' जसे - १) सहनशीलता, २) माफक अन्नसेवन, ३) वैराग्य, आणि ४) अल्पगरजा बाळगणारा. पण भंते, ज्यांच्या आश्रवांचे अजून शमन झाले नाही, त्यांच्यातसुद्धा हे चार गुण असू शकतात ना? भंते, जर कोणी आश्रवांच्या शमनाने श्रमण होत असेल, तर चार गुणांनी युक्त मनुष्यास श्रमण म्हणतात, ही गोष्ट खोटी ठरते. आणि चार गुणांनी युक्त मनुष्यास श्रमण मानले; तर आश्रव शमन पावल्यानेच

कुणी मनुष्य श्रमण होतो, हे म्हणणे खोटे ठरते, हे सुद्धा एक कठीण असेच कोडे, कृपाकरून आपण याचे स्पष्टीकरण करून सांगावे.''

''महाराज, दोन्ही विधाने तथागतांनीच केली आहेत, हे खरे होय. यात असत्य असे काहीच नाही. यातील पहिले विधान म्हणजे आश्रव क्षय पावल्यानेच श्रमण होऊ शकतो. हे उद्‌गार सहजपणे काढले असून दुसरे विधान विशिष्ट प्रकारचे गुणधर्म असलेल्या माणसाबद्दलचे आहे. यात जे काही भिक्षू आपले क्लेश जिंकण्याचे प्रयत्न करीत असतात, त्या सर्वांना साधारण श्रमण म्हणतात. परंतु ज्यांनी आपले क्लेश सर्वथा जिंकून घेतले आहेत, ते सर्वश्रेष्ठ श्रमण होत. महाराज, जसे जल, स्थळ व सर्वठाई फुलणाऱ्या फुलात वर्षांनी फुलणारे गुलमोगऱ्याचेच फूल त्याच्या सुगंधामुळे श्रेष्ठ मानले जाते. आश्रव जिंकण्याचा प्रयत्न करणाऱ्या सर्वसाधारण श्रमणापेक्षा आश्रवां (क्लेश) वर विजय मिळविणारांचे स्थान सर्वश्रेष्ठ असे आहे.''

''महाराज, सर्व प्रकारचे अन्न उपयुक्त, भक्षणीय आणि शरीर पोषक असते. परंतु त्या सर्वात भातच सर्वश्रेष्ठ समजला जातो. तद्वतच क्लेशनाशाचे प्रयत्न करणाऱ्या सर्वसाधारण भिक्षूपेक्षा ज्यांनी आपले समस्त क्लेश नष्ट केलेले आहेत, तेच सर्वश्रेष्ठ समजले जातात.''

''ठीक आहे, भंते नागसेन, आपल्या कथनांचे मी स्वागत करतो.''

## २९. गुणांचा प्रकाश

''भंते नागसेन, तथागतांनी म्हटले आहे की, 'हे भिक्षूंहो, जर दुसरे कुणी माझी, धर्माची अगर संघाची तुमच्यासमोर स्तुती करू लागले तर त्यामुळे तुम्ही उगाच फुलून जाता कामा नये.' परंतु शैल ब्राह्मणाने त्यांचीच तोंडभर स्तुती केली असता ते स्वतःच आनंदविभोर होऊन गेले होते आणि स्वतःच्या चांगुलपणाची अतिशयोक्ती करीत असता म्हणाले की, 'हे शैल, मी स्वतःच राजा आहे. अलौकिक असा धर्मराजा आहे. धर्मानुसार सदाचारांची मी सतत राज चक्रे या भूमीवर फिरत ठेवतो. माझ्यावाचून कुणालाही ही चक्रे फिरविता येणे शक्य नाही.''

''भंते, दुसऱ्यांनी स्तुती केल्यास फुलून जाऊ नये असे म्हणणारे तथागत स्वतःच सैल ब्राह्मणाने केलेली स्तुती ऐकून कसे काय आनंदविभोर होऊन गेले. ही त्यांची कृती त्यांनी प्रथम केलेल्या विधानाशी विसंगत वाटते. आणि समजा तेच स्वतः अशा स्तुतीने फुलून गेले असतील तर त्यांनी केलेले विधान खोटे असले पाहिजे, असे मला वाटते. तेव्हा अशा गुंतागुंतीच्या कोड्याचे तुम्हीच निरसन करून सांगावे व

सत्य प्रकाशात आणून द्यावे.''

''महाराज, 'भिक्षूहो जर कुणी माझी, धर्माची किंवा संघाची स्तुती केली तर तेवढ्याने आनंदाने बेहोश होऊन जाऊ नका.' असे जे तथागतांनी सांगितले ते यथार्थच आहे. तसेच शैल ब्राम्हणाने त्यांची वास्तविक प्रशंसा केली असता ते स्वतःच आनंदविभोर झाले व आपल्या अंगचे विशेष गुण दर्शवीत म्हणाले की, 'हे शैल, मी अलौकिक असा धर्मराजा आहे. धर्मानुसार मी या भूतलावर सदाचाराची स्वतःच चक्रे फिरवीत आहे. ती माझ्यावाचून दुसरे कुणीही कधी फिरविणे शक्य नाही. ही घटनादेखील सत्य आहे. तथापि या दोन्हीपैकी पहिल्या विधानात तथागतांनी धर्माचे खरे स्वरूप, धर्माचे सार व धर्माची लक्षणे सत्याला अनुसरून लोकांना कळावी म्हणून सांगितली आहेत. यात धर्माचा स्वाभाविकपणा, सरसपणा, सत्यत्व आणि अस्सलपणा दर्शवला असून दुसऱ्या प्रसंगी शैल ब्राम्हणास जे सांगितले ते फायद्याकरिता, कीर्तीच्या हव्यासापायी, पक्षपातीपणाने किंवा आपले शिष्यबळ वाढवण्याकरिता नव्हे तर याउलट अत्यंत ममतेने व करूणेने त्या ३०० ब्राम्हण शिष्यांना धर्मज्ञान व्हावे व त्यांचे कल्याण व्हावे, याच उद्देशाने त्यांनी शैली ब्राम्हणास तसे सांगितले.''

''फार छान, भंते नागसेन, आपण केलेला खुलासा मला मान्य आहे.''

## ३० अहिंसेचा निग्रह

''भंते नागसेन, भगवान बुद्धांनी असे म्हटले आहे की, 'कोणाचाही घातपात न करता आपसांत प्रेमपूर्वक मिळून, मिसळून, गोडीगुलाबीने राहावे.' याउलट असेही म्हटले आहे की, 'जो शिक्षेस पात्र असेल, त्यास शिक्षा द्यावी; जो सहकार्य देण्यास योग्य असेल, तयाला सहकार्य द्यावे.' भंते, हातपाय कापणे, जीवे मारेण, कारागृहात टाकणे, हालहाल करून मारणे किंवा देशाबाहेर हाकलून लावणे, हाच ना शिक्षा देण्याचा अर्थ आहे? तथागतांनी असा आदेश द्यायला नको होता; आणि ते देऊच शकत नाही. कारण त्यांनीच जर 'कोणाचाही घातपात न करता आपसात प्रेमपूर्वक मिळून मिसळून गोडीगुलाबीने राहावे.' असे म्हटले आहे. तेव्हा तेच तथागत असे म्हणूनच शकत नाही की, 'जे शिक्षेस पात्र असतील, त्यास शिक्षा द्यावी. समजा त्यांनी शिक्षा देण्याचा आदेश दिला असेल तर त्यांनी असे तरी म्हटले नसेल की, 'कोणाचाही घातपात न करता आपसात सलोख्याने राहावे.' हे सुद्धा कोंडीत टाकणारे असेच कोडे आहे. आपल्या निदर्शनास आणून दिलेल्या कोड्याची आपण उकल करून द्यावी व विरोधकांना सडेतोड उत्तर देण्याचा मार्ग मोकळा करून द्यावा.''

''महाराज, कोणाचा घातपात न करता आपसात सलोख्याने वागावे,' असे जे

तथागतांनी म्हटले आहे ते योग्यच आहे. शिवाय 'शिक्षेस पात्र असतील, त्यास शिक्षा द्यावी आणि सहकार्यास पात्र असतील त्यास सहकार्य द्यावे.' असा ममतेने दिलेला सल्ला देखील अनाठाई नाही. तर योग्यच आहे. महाराज, आजपर्यंत सर्व बुद्धांनी असाच सल्ला दिला आहे. याच विधानातून धर्म काय आहे व धर्मोपदेश कसा करावा, ते समजून येते. कोणलाही अपाय न करता अहिंसेने वागण्याची शिक्षा देतो, हेच तर तथागतांच्या धर्माचे मुख्य लक्षण आहे. बुद्धांची ही स्वाभाविक वचने होत. आणि महाराज, त्यांनी 'शिक्षेस पात्र असतील त्यांना शिक्षा द्यावी,' असे जे म्हटले आहे. त्याचा वेगळाच अर्थ आहे. तो म्हणजे उद्धट चित्ताचे दमन करावे, शांत पावलेल्या चित्ताची जोपासना करावी, वाईट विचारांचे दमन करावे, चांगल्या विचारांची जोपासन करावी, मनाचा कलुषितपणा काढून टाकावा व त्यास शुद्ध ठेवण्याची शिकस्त करावी. खोट्या सिद्धांताच्या आहारी कधी जाऊ नये, खऱ्या धर्म सिद्धांतापासून कधी पाठ फिरवू नये, वाईट संगतीचा त्याग करावा आणि सन्मार्गी विद्वानांची संगत धरावी. चोरांचे दमन करावे आणि सज्जनांचे रक्षण करावे, हा याचा खरा अर्थ आहे.'

"भंते नागसेन, हं, आता तुम्ही माझ्या सापळ्यात पूर्णतः सापडलेत, मला जे विचारावयाचे होते, याचा अर्थ आता आपोआपच बाहेर आला, भंते, चोरांचे दमन करावे हे तर ठीक आहे पण ते कोणत्या प्रकारे?"

"महाराज, चोराला धमकी देणे उचित असेल तर धमकी द्यावी. शिक्षा करणे उचित असेल तर त्यास शिक्षा करावी. देशातून हाकलून देणे योग्य असेल तर देशाबाहेर हाकलून द्यावे आणि एवढेच नव्हे तर त्यास फाशी देणे योग्य असेल तर फाशी सुद्धा द्यावी."

"भंते, पण फाशी देण्यासारखी कृती बौद्ध धर्माच्या सिद्धांताला अनुकूल आहे काय?"

– "नाही महाराज!"

"तर मग बौद्ध धर्माच्या सिद्धांताला अनुकूल ठरेल त्यासाठी चोरांचे कसे दमन करावे?"

"महाराज चोरांनी जी शिक्षा दिली जाते ती बुद्धधर्माचा आदेश आहे म्हणून नव्हे, तर त्याच्या स्वतःच्याच वाईट कृत्यामुळे होय. महाराज, कोणताही बुद्धिमान निरपराधी मनुष्य रस्त्याने जाणाऱ्या माणसांना पकडून ठार करा, असा आदेश बुद्धधर्म देतो काय?"

"मुळीच नाही भंते!"

"कां नाही ?"

"कारण, त्याने कोणताही अपराध केला नाही."

"त्याचप्रमाणे महाराज, चोरांना जी शिक्षा केली जाते ती बुद्ध धर्माचा आदेश म्हणून नव्हे तर त्याच्या स्वतःच्याच वाईट कृत्यामुळे होत. यात बुद्ध धर्माचा काय दोष?"

"नाही भंते! आम्हाला पाहण्यात येते की, भगवान बुद्धांनी दिलेली शिकवण सर्वथा उपयुक्त व कल्याणकारी अशीच आहे. भंते, आपण सांगितले ते योग्य असेच आहे. हेच मला कळून आले."

## ३१. स्थवीरांना संघातून काढणे

"भंते नागसेन, भगवान बुद्ध म्हणतात की, 'माझ्या मनात कुणाविषयी क्रोध नाही की मत्सरही नाही.' परंतु त्यांनी स्थवीर सारीपुत्र आणि स्थवीर महामोग्गलायन यांना त्यांच्या सर्व सहाय्यायी भिक्षूंसमवेत विहारातून घालूवन दिले होते. भंते, तथागतांनी असे कोणत्या भावनेनी केले, क्रोधामुळे की आनंदातिरेकाने, ते सांगावे. भंते, त्यांनी जर क्रोधामुळे असे केले असेल तर त्यांच्या मनात क्रोध उरलाच नव्हता, असे म्हणणे शक्यच नाही. आणि जर आनंदाने असे केले असेल तर याचे काहीच असे कारण सापडत नाही. त्यांनी अज्ञानवश असे केले पाहिजे. या कोड्याचेसुद्धा आपण निरसन करावे."

### पृथ्वीचे उदाहरण

"महाराज, क्रोधामुळे किंवा त्वेषांमुळे त्यांनी सारीपुत्रादिकांना काढून दिले नव्हते. महाराज, समजा कुणी एखादा माणूस मुळाला, झाडाच्या पाचराला, दगडाला ठेचाळून पडला किंवा ओबडधोबड जमिनीवर पाय घसरून खाली पडला तर काय ही जमीन त्यावर क्रोधायमान होऊन त्यास खाली पाडेल, असे म्हणता येईल काय?"

"नाही भंते, या पृथ्वीला कोणाविषयी क्रोध येत नाही की, आनंदही होत नाही. कोणावर ती प्रेम करीत नाही की कोणाचा वैर बाळगत नाही. तर आपल्याच निष्काळजीपणामुळे तो ठेचाळून खाली पडतो."

"याचप्रमाणे महाराज भगवान बुद्ध कोणावर रागावत नाहीत की कोणावर प्रसन्न

होत नाहीत. भगवान बुद्ध प्रेम किंवा वैरत्वाच्या संबंधापासून सर्वथा मुक्त झालेले आहेत. त्यंचे सर्व क्लेश नष्ट झालेले असतात. म्हणूनच ते सम्यक्संबुद्ध झालेले असतात. त्यांच्या स्वतःच्या कृत्यामुळेच त्या भिक्षूंना विहाराबाहेर घालूवन देण्यात आले होते.''

**समुद्राचे उदाहरण**

''महाराज महासमुद्राचा असा गुणधर्म आहे की, तो कोणतेही प्रेत स्वतःमध्ये सामावून घेत नाही. एखादे प्रेत समुद्रामध्ये पडले असता तात्काळ ते तटावर नेऊन पाडतो. महाराज, यावरून क्रोधातिरेकाने महासमुद्र असे करतो, असा त्यावर दोष लावता येईल काय?''

''नाही भंते, समुद्र कोणावर कधी रागवत नाही की, कुणावार प्रसन्न होत नाही. प्रेम किंवा गौरव यासंबंधी महासमुद्रास काहीही कर्तव्य नसते.''

''याचप्रमाणे महाराज, बुद्ध कुणावर क्रोध करीत नाही की कुणावर प्रसन्न होत नाहीत. प्रेम किंवा वैरत्वाच्या संबंधापासून ते पूर्णतः मुक्त झालेले असतात आणि ते सम्यकसंबुद्ध झालेले असतात. म्हणूनच त्या भिक्षूंना त्यांच्या स्वतःच्याच कृत्यामुळे बाहेर घालवून देण्यात आले होते. महाराज, ज्याप्रमाणे एखाद्याला ठेचाळण्याची शिक्षा तो खाली पडणे ही आहे. त्याचप्रमाणे बुद्ध शासनात चूकभूल करण्याची ठेच लागते तो सुद्धा असाच पडतो.''

''महाराज, भगवान बुद्धांनी सारिपुत्रादिक भिक्षूंना संघाबाहेर घालूवन दिले होते ते त्यांच्यात कल्याणाकरिता, सौख्याकरिता, हिताकरिता व त्यांच्याच पावित्र्याकरिता होय. असे केल्याने ते जन्म, वृद्धत्व, जन्म व मृत्यू यापासून ते सर्वथा मुक्त होण्याचा प्रयत्न करतील, याच विचारामुळे तथागतांनी त्यांना संघाबाहेर घालवून दिले होते.''

''फार छान! भंते नागसेन, आपल्या कथनाचे मी सहर्ष स्वागत करतो.''

**(प्रकरण तिसरे समाप्त)**

# प्रकरण चवथे

# (ख) योगी कथा (पुढे चालू)

## ३२. महामोग्गलायन यांचा खून

''महाराज, भगवान बुद्धांनी म्हटले आहे की, 'हे भिक्षूहो, माझ्या ऋद्धिमान भिक्षू श्रावकांत महामोग्गलायन सर्वश्रेष्ठ आहे,' तरीसुद्धा ते लाठ्याकाठ्यांनी (गुंडाच्या हाती सापडून) बदडल्यामुळे डोके फुटून, हाताचा चुराडा झाल्यामुळे आणि मांस व रक्तवाहिन्या पिसून निघाल्यामुळे परिनिर्वाण पावले.''

''भंते नागसेन, जर खरोखरच महामोग्गलायन फार मोठे ऋद्धिमान स्थवीर होते तर याप्रमाणे लाट्याकाठ्यांच्या मारामुळे त्यांचे परिनिर्वाण झाले हे कसे शक्य आहे? आणि समजा, लाट्याकाठ्यांच्या मारामुळे त्यांचे परिनिर्वाण झाले असेल तर ते फार मोठे ऋद्धिमान भिक्षू होत असे म्हणणे कसे शक्य आहे? भंते, बुद्धिबळाने तर कुणी पुरूष देवता आणि मनुष्यांसह समस्त संसाराला शरणाधार देऊ शकतो. तेव्हा त्यांनी आपल्या ऋद्धिबळाने स्वतःची हत्या का थांबवली नाही?''

''महाराज, 'हे भिक्षूंहो, 'माझ्या सर्व ऋद्धिमान भिक्षू श्रावकांत महामोग्गलायन सर्वश्रेष्ठ आहे, असे जे भगवान बुद्धांनी म्हटले ते खरे आहे.' आणि लाट्याकाठ्यांनी गुंड लोकांनी महामोग्गलायन यांना बदडून काढल्यामुळे डोके फुटून हाडे चुरा झाली व रक्तवाहिन्या आणि मांस पिसल्या जाऊन त्यांचे परिनिर्वाण झाले, हे ही खोटे नाही. परंतु अशा रीतीने ऋद्धिमान महामोग्गलायाचे परिनिर्वाण होण्यामागे त्यांच्या पूर्वजन्मीच्या कृत्यांचेच फळ कारणीभूत झाले होते.''

''भंते नागसेन, ऋद्धिमान पुरूषांचे ऋद्धिबळ आणि कर्मफळ ही दोन्ही तर अमूर्त आहेत. तेव्हा अमूर्ताने अमूर्ताला कां बरे थांबविले नाही? भंते, एखादे कवठाचे फळ झाडावरील दुसऱ्या फळास नेम धरून मारले असते ते खाली पडू शकते किंवा एखादा आंबा नेम धरून मारला असता दुसरा आंबा खाली पडू शकतो. त्याचप्रमाणे एका अमूर्ताने दुसऱ्या अमूर्तास कां बरे थांबवले नाही?''

### बलवान राजा

''महाराज, अमूर्त विषयात देखील एकापेक्षा दुसरा अधिक बलवान असतो. संसारातील सर्व राजांना राजा म्हणून संबोधित असले तरी त्यांच्यामध्येसुद्धा एक राजा

दुसऱ्यापेक्षा अधिक बलवान असतो; त्यामुळे दुसऱ्या सर्व राजांना त्यांच्या आज्ञेचे पालन करावे लागते. त्याचप्रमाणे समस्त अमूर्त विषय एकत्र आले तरी सुद्धा कर्मफळांची शक्ती अधिक प्रभावशाली ठरते. दुसऱ्या शक्तींना अंकीत करून त्यापेक्षा वरचढ ठरते. कर्मफळ वरचढ असता दुसऱ्या शक्तींचे त्यापुढे काही एक चालत नाही.''

**अपराधी (गुन्हेगार)**

''महाराज, एखाद्या माणसाने काही अपराध केला असला तर त्यापासून त्याचे कुणीही रक्षण करू शकत नाही. मग ते आईवडील असोत, बहीणभाऊ असोत, किंवा दुसरे कोणी नातेवाईक असोत. त्यांचा निकाल केवळ राजाच लावू शकतो. याचे कारण काय?''

''तर मग त्याने केलेला गुन्हा होय.''

''महाराज, याच उदाहरणाप्रमाणे सर्व अमूर्त विषय आपली शक्ती एकवटून देखील कर्मफळाचा प्रभाव त्या सर्वांपेक्षा वरचढच ठरतो. त्यापुढे इतर सर्वच दबून राहतात. कर्मफळ वरचढ असता त्यापुढे दुसऱ्या कोणाचेही काही एक चालत नाही.''

**वणवा**

''महाराज, समजा एखद्या जंगलास वणावा लागला असता त्यावर हजारो घागरी पाणी ओतले तरी तो विझवणे शक्य नाही. एनकेन प्रकारे तो वाढतच जातो. याचे कारण काय? तर दावाग्नी अधिक तेज असणे हे होय. महाराज, याप्रमाणे सर्व अमूर्त विजय एकवटून देखील कर्मफळाचा प्रभाव त्या सर्वांपेक्षा अधिकच शक्तिशाली असते. दुसरे सर्व अमूर्त विषय त्याच्यापुढे दबून जातात; त्यापेक्षा ते वरचढ असते.''

''महाराज, याच कारणामुळे महामोग्गलायन याचे कर्मफळ वरचढ ठरले आणि त्यांना मारले जात असता त्यांचे ऋद्धि-बळ हतवीर्य ठरले.''

''बरोबर आहे! भंते नागसेन, ही गोष्ट अशीच घडली आहे. हे मी मान्य करतो.''

## ३३. प्रतिमोक्षाचा उपदेश भिक्षूंपर्यंतच सीमित का?

''भंते नागसेन, तथागतांनी म्हटले आहे की, हे भिक्षूंहो, तथागताचा धर्म आणि विनय ही उघड असतानाच अधिक तेजस्वी होतात, लपवून ठेवले असता नव्हे. तरीपण प्रतिमोक्षाचा उपदेश मात्र लपूनच एकांतात केला जातो. एवढेच नव्हे तर संपूर्ण विनयपिटकच भिक्षूशिवाय सर्व लोकांपासून लपवून ठेवले जाते. भंते नागसेन, जर बुद्ध धर्माची उपयुक्तता आणि अनुकूलता याविषयी विचार केला असता विनयप्रज्ञप्ती

(प्रतिपादन) सर्व लोकांकरिता खुले करून देणे हेच योग्य होय. ते का ? तर त्यात केवळ शिकवण, संयमन आचारासंबंधीचे नियम व शील इत्यादी सद्‌गुण तसेच पवित्र आचरण याविषयीची शिकवण दिली आहे. ही शिकवण सर्वमान्य होण्यासारखी आहे, धर्म समजण्याकरिता उपयुक्त आणि युक्तीच्या दिशेने घेऊन जाणारी आहे. भंते, तथागताचा धर्म आणि विनय हे सर्वासाठी खुली असतानाच अधिक तेजस्वी होतात. लपवून ठेवल्याने नव्हे. असे जर खरोखरच तथागतांनी भिक्षूंना सांगितले असते, तर प्रतिमोक्षाचा उपदेश व विनयपिटक लपवून भिक्षूशिवाय इतर लोकांपासून लपवून ठेवले जाते हे विधान खोटे ठरते. आणि प्रतिमोक्षाचा उपदेश व विनय-पिटक लपवून ठेवले जात असेल, तर तथागतांनी सांगितले की, भिक्षूहो, तथागताचा धर्म आणि विनय सर्वांसाठी खुले असतानाच अधिक तेजस्वी होतात, लपवून ठेवल्याने नव्हे. हे विधान खोटे ठरते. हे सुद्धा एक कोडे आहे. तेव्हा आपणच याचा खुलासा करून सांगावा.''

''महाराज, तथागतांनी सांगितले की, 'हे भिक्षूहो बुद्धाचा धर्म व विनय सर्वांसाठी खुले असतानाच अधिक तेजस्वी होतात, लपवून ठेवल्याने नव्हे, हे खरे आहे. तसेच प्रतिमोक्षाचा उपदेश भिक्षू लोकांशिवाय इतरांपासून गुप्त ठेवला पहिजे तद्वतच विनयपिटक सुद्धा गुप्त ठेवले पाहिजे. हे सुद्धा खरे असले तरी सर्वच लोकांपासून हे लपवून ठेवले जात नाही तर काही खास लोकांपासूनच ते लपवून ठेवले जाते.''

''विनय-पिटक लपवून ठेवण्याची कारणे- ''महाराज तीन कारणामुळे त्या लोकांपासून प्रतिमोक्षाचा उपदेश गुप्त राखून ठेवण्याची अनुमती भिक्षू संघास दिली आहे. १) पूर्वीच्या बुद्धापासूनच अशी पद्धत चालत आली आहे, २) धर्माचा गौरव कमी न होता वृद्धींगत व्हावा आणि ३) भिक्षूच्या पवित्रपदाचा गौरव कायम राहावा. हीच ती कारणे होत.''

''पूर्वीच्या बुद्धापासूनच अशी पद्धत चालत आली असल्याकारणाने प्रतिमोक्षाचा उपदेश काही लोकांतर्गतच दुसऱ्यांना कळू नये अशी रीतीने केला पाहिजे.''

१- ''महाराज, पूर्वी होऊन गेलेल्या बुद्धापासूनच ही पद्धत अमलात आली आहे की, प्रतिमोक्षाचा उपदेश भिक्षूंनी आपसांमध्येच गुप्तरीतीने केला पाहिजे, इतरांसमोर नाही. महाराज, क्षत्रियांचे नियम हे क्षत्रियांमध्येच चालत असतात. संसारातील सर्वच क्षत्रियांना हे माहीत आहे. परंतु इतरांना त्याविषयी काहीही माहीत नाही. याचप्रमाणे प्रतिमोक्षाचा उपदेश भिक्षूंनी आपसांमध्येच दुसऱ्यांना समजणार नाही, अशा रीतीने केला पाहिजे. पूर्वी होऊन गेलेल्या बुद्धापासूनच ही पद्धत अमलात आली आहे.''

### तत्कालीन संप्रदाय

"महाराज, संसारात पुष्कळ संप्रदाय आहेत. जसे- मल्ल, पर्वत, धर्मगिरी, नाटक, नृत्यक, लंछक, पिशाच, मणीभद्र, चंद्र, सूर्य, श्रीदेवता, कलीदेवता, शैव, वासुदेव, धनिका, असिपार्श आणि भद्रीपुत्र. या सर्वांमध्ये काहींना काही रहस्य असतेच. आणि ते आपसामध्येच गुप्त ठेवतात, दुसऱ्यांना मुळीच कळू देत नाही. महाराज, याप्रमाणेच प्रतिमोक्षाचा उपदेश भिक्षूंनी आपल्या अंतर्गतच सीमित ठेवला पाहिजे. इतरांच्या समोर नाही. हीच पूर्वी होऊन गेलेल्या बुद्धांपासून चालत आलेली पद्धत आहे."

२- "धर्माचा गौरव राखण्यासाठी भिक्षूंनी आपसातच गुप्तरीतीने प्रतिमोक्षाचा उपदेश करावयास पाहिजे ते कां?"

"महाराज, हा धर्म अत्यंत गौरवर्णीय आणि श्रेष्ठ असा आहे. यामुळेच अन्य धर्माचा विद्वान मनुष्य इतरांना कितीही समजावून सांगत असला तरी या धर्माचा मागचा व पुढचा संदर्भ त्यास अवगत नसल्यामुळे तो धर्मज्ञानाचे आकलन करू शकत नाही. ज्यांना मागचा व पुढचा संदर्भ माहीत असेल तरच ते या धर्मांच्या ज्ञानाचे आकलन करू शकतील. हा धर्म इतका जीवनसारांनी भरलेला व गौरवशाली असून देखील मागचा व पुढचा संदर्भ न जाणणाऱ्या लोकांच्या हातात तो पडला तर निंदास्पद व अपमानीत होऊ शकतो, तसे होता कामा नये, इतरांनी याचे हसे उडवू नये, इतरांना हा धर्म वाईट आहे आणि कमी दर्जाचा आहे असा अपप्रचार करण्याची संधी मिळू नये! याच एकमात्र उद्देशाने प्रतिमोक्षाचा उपदेश भिक्षूंनी आपसातच दुसऱ्यांना कळू न देता करावयास पाहिजे."

### चांडाळाचे घरी चंदन

"महाराज, श्रेष्ठ, उत्तम, अप्राप्य, अतिशय सुंदर आणि चांगल्या जातीचे लाल चंदन चांडाळाच्या गावात उपलब्ध होऊन अपमानीत व निंदास्पद ठरते; तेथील लोक त्याला हास्यास्पद, तुच्छ आणि निरूपयोगी जळाऊ लाकूड समजतात. महाराज याचप्रमाणे हा बुद्धधर्म इतका गौरवशाली व जीवन रहस्याची खाण असून देखील मागचा व पुढचा संदर्भ जाणणाऱ्या अज्ञानी लोकांच्या हाती पडून तो निंदास्पद आणि अपमानीत होऊ नये, लोकांनी त्याचे हसे उडवू नये, हा धर्म वाईट आहे आणि कमी दर्जाचा आहे असा अपप्रचार करण्याची लोकांना संधी मिळू नये. याच उद्देशाने प्रतिमोक्षाचा पाठ भिक्षूंनी आपसात (सीमित) केला पाहिजे इतर लोकांसमोर नाही."

३- "भिक्षूपदाचा गौरव राखण्याकरिता प्रातिमोक्षाचा पाठ भिक्षूंनी आपसात

(सिमीतच) केला पाहिजे इतरासमोर नाही. ते कां?''

''महाराज, भिक्षूभाव अतूल्य आहे, श्रेष्ठ आहे, आणि अमूल्या अशी पुण्यखाण आहे. कुणीही याला तोलू शकत नाही, यातील रहस्य अथांग आहे याचा कुणीही अंदाज लावू शकत नाही. 'एवढे पवित्र आणि परिशुद्ध भिक्षू जीवन अगदी खालच्या थरातील सर्वसाधारण लोकांच्या तोलाने मापले जाऊ नये.' याच उद्देशाने प्रतिमोक्षाचा पाठ (सीमांतर्गत) भिक्षूंनी करावयास पाहिजे. इतरांसमोर नाही.''

''महाराज, सर्वोत्तम वस्तू जसे- कापड, गाद्या, गिरद्या, हत्ती, घोडे, रथ, सोने, चांदी, माणिक, मोती, स्त्री, रत्न इत्यादी सर्वश्रेष्ठ बाबी केवळ राजे लोकांनाच मिळत असतात याप्रमाणेच महाराज, भगवान बुद्धांनी सांगितलेले सर्वश्रेष्ठ आचार संहितेची शिकवण म्हणजे आचार, संयम, सदाचार, संवर इत्यादी सद्‌गुण भिखू संघालाच प्राप्त होत असतात. याप्रमाणे भिक्षूंच्या अत्युच्च अशा गौरवशाली पदाच्या आदरार्थ प्रातिमोक्षाचा (सीमांतर्गत) पाठ भिक्षूंनी आपसातच करावयास पाहिजे दुसऱ्यासमोर नाही.''

''अगदी बरोबर आहे. भंते नागसेन, आपण जे सांगितले आहे, त्यांचा मी सहर्ष स्वीकार करतो.''

## ३४. मिथ्या भाषणाचे दोन प्रकार

''भंते नागसेन, तथागतांनी सांगितले आहे की, 'जाणूनबुजून खोटे बोलण्यात पाराजिकेचा दोष आहे.' पुन्हा असेही सांगितले आहे की, 'जाणूनबुजून खोटे बोलण्याने थोडा दोष घडला असता तो दुसऱ्या भिक्षू समोर स्वीकार केला पाहिजे. म्हणजे तो दोषमुक्त होतो.' भंते नागसेन, यात अशी काय गोष्ट आहे, कोणते कारण आहे की, एके ठिकाणी खोटे बोलले असता संघाबाहेर काढून दिल्या जाते, तर दुसऱ्या ठिकाणी खोटे बोलले असता केवळ दुसऱ्या भिक्षू समोर आपली चूक मान्य केली असता माफी मिळते. भंते नागसेन, 'आजणू बुजून खोटे बोलण्याने थोडा दोष घडला असता त्याबद्दल दुसऱ्या भिक्षूजवळ आपली चूक मान्य करावी, 'म्हणजे दोषमुक्त होतो.' हे दुसरे विधान खोटे ठरते. आणि हे दुसरे विधान खरे मानले तर पहिले विधान खोटे ठरते. ही विसंगती कशी?' भंते, हे सुद्धा एक कोडे आहे. याचा आपणच उलगडा करून सांगावा.''

''महाराज, ही दोन्ही वर केलेली विधाने तथागतांचीच असून दोन्ही खरी आहेत. महाराज, विषयानुरूप खोटे बोलण्याचे दोन प्रकार आहेत- (१) खोटेपणाची सीमा गाठणे व (२) किंचित खोटे बोलणे!''

**साधारण माणसास थापड मारणे**

"महाराज, जर कोणत्या साधारण माणसास एखाद्याने थापड किंवा बुक्की मारली तर आपण त्यास शिक्षा कराल काय?"

'भंते नागसेन, मी त्याला मुळीच क्षमा करणार नाही'. असे जर त्यांने केले, तर त्यास आम्ही एखादा कार्षापण दण्ड करु."

**राजास थापड मारणे**

"महाराज, जर त्याच मनुष्याने तुम्हाला एखादी थापड किंवा बुक्की मारली तर तुम्ही त्याला दंड द्याल काय?"

"भंते, त्याचा हात, पाय कापून शरीरवेगळा करीन. जिवंत असूनही त्याचे चामडे सोलून काढीन. याची सर्व संपत्ती जप्त करीन. त्याच्या दोन्ही बाजूच्या परिवारातील सात पिढ्यात जेवढे काही लोक असतील, त्या सर्वांना ठार मारीन."

"महाराज, असे यात काय घडले की, एके ठिकाणी थापड मारण्याच्या आपराधाबद्दल त्याला फक्त एक कार्षापण दंड केला जातो आणि दुसऱ्या ठिकाणी त्याच अपराधाबद्दल हात पाय कापले जातात, जिवंतपणीच त्याचे चामडे सोलून काढले जाते, त्याची सर्वसंपत्ती ज़प्त केली जाते आणि त्याच्या दोन्हीकडील घराण्यातील सात पिढ्यांपर्यंत असणारे जेवढे लोक असतील त्या सर्वांना ठार केले जाते. असा फरक का?"

"भंते, या दोन्ही माणसांमध्ये भेद असल्यामुळेच एकाच गुन्ह्याबदल दोन प्रकारच्या शिक्षा दिल्या ज़ातात."

"महाराज, बरोबर, याप्रमाणेच विषयभेदाने खोटे बोलण्याचे देखील दोन प्रकार होतात (१) अतिवाईट व (२) साधारण

## ३५. बोधिसत्वाचे धार्मिक जीवन

"भंते नागसेन, धर्माची स्तुती करतांना धार्मिक विषयासंबंधाने भगवान बुद्धाने म्हटले आहे की, 'बोधिसत्वाचे मातापिता आधीच ठरलेले असतात. कोणत्या वृक्षाखाली ते बुद्धत्व प्राप्त करतील. त्यांचे प्रमुख शिष्य कोण असतील. त्यांचा पुत्र कोण हे आणि कोण भिक्षू मनोभावे त्यांची सेवा करील हे सुद्धा आधीच ठरलेले असते."

"तसेच तुम्ही लोक तर असे देखील म्हणता की, 'तूषित लोकांत वास्तव्य करीत असतानाच बोधिसत्व मोठमोठ्या आठ गोष्टी पाहून घेतात- (१) मनुष्य लोक जन्म

घेण्याकरिता योग्य समय कोणता? (२) कोणत्या द्वीपात जन्म घ्यावा लागेल? (३) कोणत्या स्थळी जन्म घ्यावा लागेल? (४) कोणत्या कुळात जन्म घ्यावा लागेल? (५) कोणत माता असेल? (६) किती काळ गर्भात राहावे लागेल? (७) कोणत्या महिन्यात जन्म होईल? (८) घर सोडून केव्हा जावे लागेल ? (९) हे देखील आधीच पाहून घेतात.''

''भंते नागसेन, जोपर्यंत ज्ञान परिपक्व होत नाही तापर्यंत अशा तऱ्हेच्या काहीच बाबी समजता येत नाहीत. परंतु ज्ञान परिपक्व झाल्यावर मात्र एका क्षणाचाही उशीर लागत नाही. ज्ञान परिपक्व झाल्यावर समजून घ्यावयास कठीण पडेल, अशी कोणतीही बाब शिल्लक राहत नाही. तेव्हा मी कोणत्या वेळी जन्म घेईन, अशा वेळ पाहण्याची त्यांना आवश्यकताच काय ? ज्ञान परिपक्व झाल्याशिवाय तर काहीच समजून घेता येत नाही. आणि ज्ञान परिपक्व झाले की, नाही हे समजून घेण्याकरिता क्षणाचाही उशीर लागत नाही. तेव्हा मी कोणत्या कुळात जन्म घेईन असे त्यांना कूळ पाहायची आवश्यकताच काय? भंते, बोधिसत्वाचे मातापिता पूर्वीच ठरलेले असतात, तर मग मला कोणत्या कुळात जन्म घ्यावयाचा आहे, असे ते कूळ पाहतात, ही गोष्ट साफ खोटी ठरते. आणि खरोखरच जर ते मला कोणतया कुळात जन्म घ्यावयाचा आहे, हे प्रत्यक्ष पाहत असतील तर त्याचे मातापिता पूर्वीच ठरलेले असतात, ही बाब खोटी ठरते. ही सुद्धा एक दुविधा आपणासमोर ठेवीत आहे. तेव्हा या कोड्याचे निराकरण करावे.''

''महाराज, बोधिसत्वाचे मातापिता आधीच ठरलेले असतात, हे अगदी सत्य आहे. त्याचप्रमाणे हे सुद्धा सत्य आहे की, बोधिसत्व (तूषित देवलोकात वास्तव्य करीत असता) कोणत्या कुळात जन्म घ्यावयाचा आहे? ते कोणते कूळ आहे?'' त्यांचे मातापिता क्षत्रिय कुळातील असणार की, ब्राह्मण कुळातील ? याप्रमाणे ते त्या कुळास पाहत असतात.

''महाराज, आठ बाबींचा त्या घडण्यापूर्वीच विचार केला पाहिजे. त्या आठ बाबी कोणत्या बरे- (१) व्यापाऱ्याने घ्यावयाचा असेल तो माल आधीच पाहून ठेवला पाहिजे, (२) हत्तीने पाऊल पुढे टाकण्यापूर्वीच आपल्या पुढची जमीन सोंडाने साफसूफ करून घ्यावयास पाहिजे, (३) गाडीवानास अनोळखी नदी पार करावयाची असल्यास कोठून आपल्या गाड्या जाऊ शकतील हे पूर्वीच पाहून ठेवावयास पाहिजे, (४) नावाड्यास आपली नाव किनाऱ्यास लावण्यापूर्वीच किनारा निरखून घ्यावयास पाहिजे, त्यानंतर आपली नाव किनाऱ्यास लावली पाहिजे, (५) वैद्याने चिकित्सा सुरू करण्यापूर्वीच रोग्याचे

वय पाहिले पाहिजे, (६) बासाचा पूल पार करण्यापूर्वीच तो मजबूत आहे की नाही, ते तपासून पाहिले पाहिजे, (७) भोजन करण्यापूर्वीच भिक्षूने सूर्य किती वर आला ते पाहिले पाहिजे, आणि (८) बोधिसत्वाला आपणास जन्म घ्यावयाचा आहे ते कूळ कोणते आहे, ते आधीच पाहून घ्यावयास पाहिजे. महाराज, या आठ बाबी त्या घडण्यापूर्वीच पाहून घ्यावयाचा असतात.''

''ठीक आहे, भंते नागसेन, अगदी बरोबर सांगितले. याबाबतीत मी अगदी सहमत आहे.''

### ३६. आत्महत्येविषयी

''भंते नागसेन, भगवान बुद्धाने सांगितले आहे – 'भिक्षूंनो, आत्महत्या करू नये. जो असे करी त्याला विनयानुसार अपराधी ठरवण्यात येईल.' याशिवाय तुम्ही लोक सांगत होता की, भगवान बुद्ध आपल्या शिष्यांना एखाद्या विषयावर उपदेश करीत असता, नेहमी म्हणत असत की, 'अनेक प्रकारचे जन्म, म्हातारपण, आजार आणि मृत्यूपासून स्वतःची सुटका करून घेतली पाहिजे आणि जो कुणी यापासून स्वतःला मुक्त करून घेत असत, त्यांची तथागत प्रशंसा करीत असत.''

''भंते, जर खरोखरच आत्महत्या करू नये असा भगवंताने उपदेश केला असेल तर ज्या कोणत्या विषयावर आपल्या शिष्यांना उपदेश करीत असता 'अनेक प्रकारचे जन्म, म्हातारपण, आजार आणि मृत्यू यापासून मुक्त व्हा' असे सांगितले असल्याचे खोटे ठरते. आणि जर कोणत्याही विषयावर उपदेश करीत असता, 'अनेक जन्म, म्हातारपण, आजाार आणि मृत्यू यापासून मुक्त व्हा' असे तथागत आपल्या शिष्यांना वेळोवेळी सांगत होते हे खरे मानावे तर 'भिक्षूंनो, आत्महत्या करू नये' असे तथागतांनी म्हटले होते, असे म्हणणजे खोटे ठरते. हे एक कठीण कोडे आपणासमोर ठेवीत आहे. कृपाकरून ते सोडवून माझी शंका दूर करावी.''

''महाराज, वरील दोन्ही वचने भगवंताचीच आहेत, यात मुळीच शंका नाही.''

''पण महाराज, आत्महत्येला आळा घालण्याचा किंवा जन्ममृत्यू पासून सुटकेच्या भगवंतानी उपदेश केला, त्याला कारण आहे.''

''भंते, एकाला परावृत्त करावे आणि दुसऱ्याली प्रवृत्त करावे यात कोणते कारण आहे?''

''महाराज, प्राणीमात्रांचे क्लेशरूपी विष उतरविण्यासाठी शीलवान होणे, हा

सर्वश्रेष्ठ उपचार होय. क्लेशरूपी आजार नष्ट करण्यासाठी हेच सर्वोत्तम औषध आहे. क्लेशरूपी मळ धुऊन काढण्यासाठी हेच सर्व प्रकारच्या जलात विशुद्ध व निर्मळ जल आहे. सर्व प्रकारची संपत्ती प्राप्त करून देण्यासाठी हाच सर्वोत्तम श्रेष्ठ चिंतामणी आहे. चारही प्रकारच्या प्रवाहांना (काम, भव, अविद्या व मिथ्यादृष्टी) पार करून जाण्यासाठी हाच सर्वोत्तम उपाय आहे. तिन्ही प्रकारच्या अग्नीचा (लोभ, द्वेष व मोह) ताप दूर करण्यासाठी हाच सर्वश्रेष्ठ शीतल वायू आहे. मनोसागरास भरण्याकरिता हाच उत्कृष्ट मेघ आहे. उत्तमोत्तम शिक्षण देणारा हाच सुविद्य आचार्य आहे. निरापद मार्ग दाखविणारा हाच चांगल्या वाटाड्या आहे. महाराज, याप्रमाणे शीलवानाची गुण संपत्ती अथांग आहे. शीलवान सर्वच जीवांची वृद्धी करणारा असतो. म्हणुनच समस्त प्राणीमात्रावर अनुकंपाची छत्रछाया धारण करणाऱ्या भगवान बुद्धाने या श्रेष्ठ शिक्षापदांचा उपदेश केला होता की, 'हे भिक्षूंनो, आत्महत्या करू नये, जो असे करील, त्यास विनयानुसार अपराधी ठरविण्यात येईल.' महाराज, याच कारणामुळे तथागताने आत्महत्येला मनाई केली होती.''

''महाराज, परलोकासंबंधी बोलतांना पायासी राजाजवळ महान वक्ता स्थवीर कुमार काश्यपाने सांगितले होते की, 'हे राजन्य शीलवान आणि धर्मात्मे श्रमण असोत की, ब्राह्मण पण जितके अधिक दिवस जगतात, तितकेच ते लोकहिताचे कार्य अधिक करतात. ते लोकांना सुखाचा मार्ग दाखवतात. लोकांविषयी ते आपल्या हृदयात अनुकंपा बाळगून देवता आणि मनुष्याच्या कार्यात कल्याणाचा आणि सुखाचा मार्ग दाखवण्यासाठी सहाय्यक होतात.''

''जन्म मरणादिकापासून स्वतःची सुटका करावी असे त्यांनी का सांगितले?''

''तर महाराज, जन्म घेणे, वृद्ध होणे, आजारी पडणे, मृत्यू पावणे, शोक करणे, रडणे, तडफडणे हे सर्व दुःखच आहे. दौर्मनस्य, व्यर्थच चिंता होणे, अप्रियाची व प्रिय व्यक्तींचा विरह हेही दुःखच आहे. आई-वडिलांचा मृत्यु, बहीण-भावाचा मृत्यू, पुत्राचा मृत्यू, आपल्या बांधवांवर संकट येणे, ते आपत्तीत पडणे हे सर्व दुःखच आहे. रोगाने जरजर होणे, संपत्तीचा विनाश होणे, शीलभ्रष्ट होणे. आपल्या ध्येयाला अंतरणे, हेही दुःखच आहे, राजाची भीती, चोरांची भीती, शत्रूपासून भयभीत होणे, दुष्काळाचे, अग्नीचे, पुराचे, महापुरात सापडल्याचे, वावटळात सापडण्याचे, वाघाचे व सुसरीचे भय हे सुद्धा दुःखावाचून काय आहे? स्वतःची व दुसऱ्यांची निंदा होणे व सुसरीचे भय हे सुद्धा दुःखावाचून काय आहे? स्वतःची व दुसऱ्यांची निंदा होणे हे देखील दुःखच आहे. दंड होण्याचे भय; दुर्गती होण्याची, सभेत घाबरण्याची, जीवन निर्वाहाची, मरणाची भीती, बेताने, चाबकाने किंवा काठी कोणी मारेल की काय, याचे भय हेही दुःखच

आहे. किंवा हात व पाय दोन्ही कापले जाणे हे सर्वच दुःख आहे. १. बिलङ्गथालिक २. शंखमुडिक, ३. राहूमुख. ४. ज्योतिर्मालिका, ५. हस्तप्रज्योतिका, ६. एरकवर्तिका, ७. चीरकवासिका, ८. ऐणेयक, ९. बलिसमसिका, १०. कार्षापणक, ११. खारापतच्छिका, १२. परिघपरिवर्तिका, १३. पलालपीठक, हे सर्व दुःखच दुःख आहे. अंगावर गरम तेल झोकणे, कुत्र्याकडून लचके तोडविणे, फासावर चढविले जाणे, तलवारीने शीर उडवणे यात दुःखावाचून काय आहे? महाराज, याप्रमाणे असेच अनेक दुःख या संसारात राहणाऱ्या प्राण्यांना भोगावे लागतात.''

१. बिलङ्गथालिक - डोक्यावसर तापलेला लोखंडाचा गोळा ठेवणे.
२. शंखमुडिक - डोक्याचे चामडे काढून शंखाप्रमाणे डोळे करणे.
३. राहूमुख - कानापर्यंत तोंड चिरणे.
४. ज्योतिर्मालिका - शरीरावर तेलाने भिजविलेले कापड गुंडाळून त्यास पेटवून देणे.

५. हस्तप्रज्योतिका - हाताला कापड गुंडाळून त्यास अग्नी लावणे.
६. एरकवर्तिका - गळ्यापर्यंत चामडे सोलून त्यास ओढत नेणे.
७. चीरकवासिक - गळ्यापासून चामडे काढून कमरेवर लोंबर ठेवणे व याखालील चामडे काढून गुडघ्यावर लोंबत ठेवणे.
८. ऐणेयक - हाता पायाला जमिनीत रूततील असे खिळे ठोकून आग लावणे.
९. बलिसमसिका - लोखंडाचा अंकुश तोंडात घालून ओढणे.
१०. कार्षापणक - पैशाएवढे मासाचे तुकडे सर्व शरीरातून कापून काढणे.
११. खारापतच्छिाक - शरीरावर घाव करून त्यावर मीठ चोळणे.
१२. परिघपरिवर्तिका - दोन्ही कानातून आरपार सळई जमिनीत ठोकून पाय धरून फिरविणे.
१३. पलालपीठक - शरीरातील सर्व हाडे मोंगरीने बारीक करून मासासारखे करणे.

''महाराज, हिमालय पर्वतावर पावसाचा वर्षाव झाला असता पाण्याचा तेज प्रवाह वृक्ष आणि दगड यांना उन्मलून टाकत तो पुढे जातो. याचप्रमाणे संसारप्रवाहात सापडलेल्या पापकर्मात मग्न असणाऱ्या जीवांना दुःखच दुःख झेलावे लागतात. वेळोवेळी संसारात जन्म घेणे हे भयंकर दुःख चक्राला रोखण्यासाठी भगवान बुद्धाने जन्मादिकांपासून मुक्ती मिळवून घेण्याचा उपदेश दिला आहे.''

''अगदी बरोबर आहे. भंते नागसेन, आपण हे कोडे उत्तमरीतीने सोडवून दिले.

अनेकानेक तर्क लढवून हा गुंता सोडवून दिला. आपले म्हणणे मी मान्य करतो.''

## ३७. मैत्री भावनेचे फळ

''भंते नागसेन, भगवंत म्हणतात – 'हे भिक्षूंनो, चित्ताला विमुक्त करणाऱ्या मैत्री भावनेनुसार आचरण करीत असता तिचे चिंतन करीत राहिल्याने, तिचा सतत अभ्यास करीत राहिल्याने, आपल्या मनात तिचा विस्तार होऊ दिल्याने, तिलाच मुख्य आधार मानल्याने, तिचे अनुष्ठान केल्याने, तिला योग्यरीतीने आत्मसात केल्याने आणि तिच्या भावनेत पूर्णतः रममाण झाल्याने अकरा प्रकारचे फळ प्राप्त होऊ शकते. ते असेः–''

''१) सुखाने झोप येते, २) उत्साहपूर्वक जाग येते, ३) वाईट स्वप्न पडत नाही, ४) इतर मनुष्यांशी मैत्री जडते, ५) अमनुष्यांशीही मैत्री घडून येते, ६) देवता त्यांचे रक्षण करतात, ७) अग्नी, विष किंवा हत्यारामुळे त्याला कधीच हानी पोहचत नाही, ८) तात्काळ चित्त स्थिर होऊन समाधी लागते, ९) त्याला नेहमी प्रसन्नता लाभते, १०) न घाबरता प्रसन्नतापूर्वक मृत्यू पावतो आणि ११) तो अर्हतपदापर्यंत पोहचू शकला नाही, तरी तो निश्चितच ब्रह्मलोकात जन्म ग्रहण करतो. तथापि तुम्ही लोक आपल्या उपदेशात सांगत असता की, 'सामकुमार मैत्री–भावनेने चिंतन करीत हरणासोबत वनात विचरण करीत असे. एके दिवशी पिलीयक्ख नावाच्या राजाचा विषात बुडलेला बाण लागून तो मुर्च्छित होऊन खाली पडला.''

''भंते, जर भगवंताने खरोखर मैत्रीभावनेचे असे फळ सांगितले असतील, तर मैत्रीभावनेचे चिंतन करणारा सामकुमार विषात बुडलेला बाण लागून मूर्च्छित पडला होता, असे म्हणणे खोटे ठरते. आणि साकुमार जर मैत्री–भावनेचे चिंतन करीत वनात फिरत असता बाण लागून मुर्च्छित पडला होता हे यथार्थ सत्य असेल तर मैत्री भावनेची फळे तथागताने सांगितले असे म्हणणे खोटे ठरते. ह्यासुद्धा एक गुंता अत्यंत सूक्ष्म व गंभीर आहे. चांगल्या बुद्धीवंताच्याही अंगला हा प्रश्न ऐकून घाम सुटतो. तेव्हा हा प्रश्न आपणासमोर मी ठेवत आहे. या अतिशय गुंतागुंतीच्या प्रश्नाची आपण उकल करून सांगा. जेणेकरून भविष्यातील बौद्ध भिक्षूंना स्पष्टपणे समजून घेण्याकरिता दृष्टीलाभ होईल.''

''महाराज, मैत्री भावनेची फळे भगवंतानेच सांगितले हेही खरे आहे; आणि सामकुमार मैत्री भावनेचे चिंतन करीत असता बाण लावून तो मूर्च्छित पडला हेही खरेच आहे. महाराज, अशी गोष्ट घडून येण्याचे एक कारण आहे.''

"ते कोणते बरे?"

## गुण मनुष्याचे नाहीत, मैत्री भावनेचे आहेत

"महाराज, वर सांगितलेले गुण एखाद्या मनुष्याचे नाहीत, तर ते मैत्री भावनेचे आहेत. महाराज, त्यावेळी घडे भरभरून पाणी ओतणारा सामकुमार मैत्री भावनेचे चिंतन करीत नव्हता. महाराज, ज्यावेळी मैत्री भावना माणसाच्या मनात ओतप्रोत भरली असते त्यावेळी अग्नी, विष किंवा हत्याराचा त्याचेवर कसलाही परिणाम होत नाही. महाराज, अशा अवस्थेत जर कुणी एखादा मनुष्य त्याच्यावर दुष्ट हेतूने चाल करून आली तर त्याच्याकडे त्याला पाहण्याची सुद्धा हिंमत होणार नाही. आणि त्याचे काही बरे वाईट करण्याची त्या दुष्ट माणसाला संधीसुद्धा लाभणार नाही. महाराज, वर सांगितलेले गुण एखाद्या मनुष्याचे नसून ते मैत्रीभावनेचे आहेत."

## कवच

"महाराज, कुणी एखादा लढवैय्या सैनिक अभेद्य जाळीदार कवच अंगात घालून रणमैदानात उतरतो तेव्हा त्याचेवर कितीही बाण मारले तरी ते सर्व कवचाला लागून खाली पडतात. त्यामुळे त्या सैनिकाचे काही एक बिघडत नाही. तेव्हा हा गुण त्या सैनिकाचा समजला जाणार नाही, तर हा गुण त्याने अभेद्य कवचाच होय."

"महाराज, त्याचप्रमाणे हे गुण त्या व्यक्तीचे नसून मैत्रीभावनेचे आहेत. महाराज ज्यावेळी कुणी मनुष्य मैत्रीभावनेत रमून गेलेला असतो, त्यावेळी त्याचे अग्नी, विष किंवा तीक्ष्ण हत्यारसुद्धा काही एक बिघडवू शकत नाहीत आणि दुष्ट विचाराने कुणी एखादा त्याच्यावर चाल करून आलाच तर त्या मैत्री भावनेच्या चिंतनात मग्न असलेल्या व्यक्तीकडे पाहण्याची हिंमत सुद्धा होणे शक्य नाही, तर त्याचे काही बरे वाईट करणे तर दूरच राहिले. महाराज, हे गुण व्यक्तीचे नसून त्या मैत्री भावनेचे होत, असे समजले पाहिजे."

## जादूची कांडी

"महाराज, कुणी एक मनुष्य आपल्या हातात मंथरलेली जादूची कांडी घेतो. ती कांडी हातात घेता क्षणीच तो अदृश्य होतो. त्यामुळे तो सामान्य माणसांच्या दृष्टीस पडत नाही. तेव्हा हा गुण त्या व्यक्तीचा नसून या मंथरलेल्या कांडीचाच समजला जाईल. यप्रमाणेच वरील गुण त्या व्यक्तीचे नसून मैत्री भावनेचे होत असे समजावे...... (वरीलप्रमाणे)"

## पर्वतगुंफा

''महाराज, कुणी एक माणूस एखाद्या चांगल्याप्रकारे सुरक्षित असलेल्या पर्वताच्या गुंफेत बसला असता गुंफेबाहेर मुसळधार पाऊस आला तरी तो त्या पावसाने ओला होऊ शकत नाही. महाराज, यात त्या माणसाचे काहीही नसते तर त्या पर्वतातील गुंफेचा हा गुण आहे. महाराज, हे असेच समजले पाहिजे.....(वरील प्रमाणे)''

''भंते नागसेन ! आश्चर्य आहे !! अद्भूत आहे!!! आता मला समजले की, सर्वच प्रकारच्या पाप नाशाकरीता मैत्रीभावना आवश्यक आहे. मैत्रीभावनेने समस्त पुण्याला लाभ होतो. भंते नागसेन, जे कुणी कल्याणमार्गी किंवा अधोगतीच्या मार्गाला लागले असतील, त्या सर्वांच्या प्रती मैत्रीभावना केली पाहिजे. एवढेच नव्हे तर या जगात जेवढे काही प्राणी आहेत, त्या सर्व प्राण्यांच्या प्रती मैत्रीभावनेची फळे वाटून दिली पाहिजेत.''

## ३८. पाप आणि पुण्य

''भंते नागसेन, पुण्य आणि पापांची दोन्ही फळे समानच असतात की दोन्हीमध्ये फरक आहे?''

''महाराज, पुण्याची फळे वेगळी आणि पापांती फळे वेगळी असतात. महाराज, पुण्यकर्म करणारे लोक सुख प्राप्त करून घेतात आणि त्यांना स्वर्ग गतीचा लाभ होतो. तर याउलट पापकर्म करणारे लोक दुःख भोगत असतात आणि नरकवासाला जातात.''

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, देवदत्त कुटील ह्रदयाचा, दुर्गूणी होता आणि बोधिसत्व सद्गुणांची खाण एकदम स्वच्छ-पवित्र ह्रदयाचे होते. तथापि अनेक जन्मांत देवदत्त बोधिसत्वासमान किंवा त्यांच्याहीपेक्षा यशस्वी होता असे दिसते. त्याचा पक्षही नेहमी शक्तिशाली राहिलेला आहे. भंते, जेव्हा देवदत्त बनारसमध्ये राजा ब्रह्मदत्ताच्या पुरोहिताचा पुत्र म्हणून जन्मास आला होता, तेव्हा बोधिसत्व जादू टोना करणाऱ्या डोम नावाच्या एका नीच जातीत जन्माला आले होते. ते आपल्या मंत्र बळाने अवेळीच आंब्याला फळवीत होते. हे एक असे उदाहरण आहे की, देवदत्तापेक्षा बोधिसत्व जातीने आणि यशाने हीन होते.''

''भंते, याशिवाय जेव्हा देवदत्त फार मोठा योगसंपन्न राजा होता, तेव्हा बोधिसत्व उत्तम लक्षणांनीयुक्त असा त्याच्या सवारीचा हत्ती होते. त्या हत्तीचे भाव आणि सुंदरता पाहून त्या राजाचे (देवदत्ताचे) मन मस्तराने पेटून गेले. तेव्हा त्याने त्या हत्तीस जीवे मारण्याच्या इच्छेने पिलेवानास सांगितले होते की, 'हे पिलेवान, या हत्तीला चांगले

शिक्षण दिले नाही. तेव्हा त्याला आकाशगमन नावाची चाल चालवून बघ.' येथे सुद्धा बोधिसत्व देवदत्तापेक्षा जातीने नीच म्हणजे पशूयोनीतच जन्मले होते.''

''याशिवाय जेव्हा देवदत्त शिकारीकरिता जंगलात फिरत होता, तेव्हा बोधिसत्व महापृथ्वी नावाचा वान होते. येथेही मनुष्य आणि पशू यात किती फरक आहे! म्हणजे बोधिसत्व देवदत्तापेक्षा जातीने कनिष्ठच होते.''

''आणखी जेव्हा देवदत्ता शोणोत्तर नावाचा एक अत्यंत बलवान मारेकरी होता तेव्हा बोधिसत्व छद्दन्त नावाचा हत्तीराज होते. तेव्हा एके दिवशी मारेकऱ्याने त्या छद्दन्त नावाच्या हत्तीराजास जीवे मारून टाकले. याजन्मी सुद्धादेवदत्त बोधिसत्वापेक्षा श्रेष्ठ असाच होता.''

''आणखी जेव्हा देवदत्त मनुष्य होऊन गृहहीन अवस्थेत वनोवनी फिरत होता, तेव्हा बोधिसत्व तित्तिर पक्षी होते. आणि वेदांचे मंत्र शिकत होते. त्याजन्मातही त्या वनचराने त्या तित्तिर पक्षास (बोधिसत्वास) जीवे मारले होते. येथेसुद्धा देवदत्त बोधिसत्वापेक्षा उंचच ठरतो.''

''आणखी जेव्हा देवदत्त कलाबू नावाचा काशीराज होता, तेव्हा बोधिसत्व शांतीचा प्रचार करीत फिरणारा एक तपस्पी मात्र होते. तेव्हा त्या राजाला क्रोध आल्यामुळे त्याने त्या तपस्व्याचे हात-पाय कापून बांबूप्रमाणे तुकडे-तुकडे केले होते. त्याजन्मी देखील देवदत्त बोधिसत्वापेक्षा जातीने उच्च व यशस्वी असाच होता.''

''आणखी जेव्हा देवदत्त जंगली माणूस होता तेव्हा बोधिसत्व नंदीय नावाचा वानरांचा राजा होते. तेथेसुद्धा त्या जंगली शिकाऱ्याने त्या वानराच्या आईला व लहान भावाला जीवे मारले होते. येथे देखील देवदत्त हाच बोधिसत्वापेक्षा मोठा होता.''

''आणखी जेव्हा देवदत्त कारंभीय नावाचा नग्न साधू होता, तेव्हा बोधिसत्व पंडरीक नावाचा सर्पराज होते. येथे ही देवदत्त हाच बोधिसत्वापेक्षा श्रेष्ठ ठरतो. जेव्हा देवदत्त जंगलात राहणारा एक जटाधारी साधू होता तेव्हा बोधिसत्व तच्छक नावाचे सुकर होते. देवदत्त चेतिय राष्ट्रात सुरपरिचर नावाचा राजा होता. तो एक पुरूष उंचावरून आकाशातून चालणारा महान शक्तिशाली राजा होता, तेव्हा बोधिसत्व कपिक नावाचा एक ब्राह्मण होते. देवदत्त साम नावाचा एक मनुष्य होता. तर बोधिसत्व रूरू नावाचा मृगांचा राजा होते. देवदत्त वनचर शिकारी होता, तर बोधिसत्व हत्ती होते. तेव्हा त्या वनचर शिकाऱ्याने त्या हत्तीचे दात तोडून घेतले होते. देवदत्त एके समयी माहन लढवय्या वीर सैनिक होता. त्याने भारत वर्षातील सर्वच राजांना आपल्या वश केले होते, तेव्हा

बोधिसत्व विधूर नावाचे ब्राह्मण होते. देवदत्त 'अधर्म' नावाचा यक्ष असताना बोधिसत्व धर्म नावाचे यक्ष होते. देवदत्त पाचशे कुस्तीगीर पहेलवानांचा शिक्षक होता तर बोधिसत्व दुसऱ्या पाचशे कुस्तीबाज पहेलवानांचा शिक्षक होते. देवदत्त पाचशे गाड्या माल घेऊन जाणारा व्यापारी होता, तर बोधिसत्वही पाचशे गाड्या मालांची ने आण करणारा व्यापारी होते. देवदत्त साख नावाचा मृगाचा राजा होता, तर बोधिसत्व निग्रोध नावाचा मृगांचा राजा होते. देवदत्त साख नावाचा सेनापती असतांना, बोधिसत्व निग्रोध नावाचा राजा होते. देवदत्त खंडहाल नावाचा राजा असतांना, बोधिसत्व चंद नावाचे राजकुमार होते. देवदत्त ब्रह्मदत्त नावाचा राजा असतांना, बोधिसत्व कुमार महापद्म नावाचे राजकुमार होते, तेव्हा राजाने चोरांना ज्या डोंगरावरून ढकलून देण्याचा दंड दिला जात असे, त्याच डोंगरावरून त्या आपल्या राजकुमारास सात वेळा जीवे मारण्याच्या उद्देशाने ढकलून दिले होते. देवदत्त महाप्रताप नावाचा राजा असताना, बोधिसत्व त्यांचाच कुमार धर्मपाल नावाचा पुत्र होते, तेव्हा राजाने आपल्या पुत्राचे हात, पाय व शीर कापले होते.''

''याशिवाय या जन्मात दोघेही शक्य कुळात जन्मास आले. आणि बोधिसत्व सर्वज्ञ संसाराचे नायक-बुद्ध झाले, तेव्हा देवदत्तानेसुद्धा त्या देवाधिदेव भगवान बुद्धाच्या धर्मशासनात प्रव्रजा घेतली. जेव्हा त्याला महान ऋद्धीचा लाभ झाला, तेव्हा त्याच्या मनातही बुद्ध बनण्याची उत्सुकता निर्माण झाली.''

''या सर्व उदाहरणांवरून देवदत्त बोधिसत्वापेक्षा उच्च किंवा बरोबरीचाच होता असे दिसून येते. परंतु पुण्यवान बोधिसत्वापेक्षा पापी देवदत्त कमी दर्जाचा दिसत नाही. भंते नागसेन, हे जे काही बोलत आहे, ते सर्व बरोबर आहे ना? यात काही चूक तर नाही?''

''नाही महाराज, यात आपली काहीच चूक नाही. आपण अगदी बरोबर तेच बोलून दाखवले.''

''तर भंते नागसेन, यावरून हेच सिद्ध होते की, कुणी हृदयाचा कुटील होणे, किंवा सरळ विशुद्ध होणे, यात काहीच फरक दिसून येत नाही, तर दोन्हीचे फळे समानच सिद्ध होतात.''

''नाही महाराज, पाप व पुण्याची फळे समान कधीच होऊ शकत नाही. महाराज, देवदत्ताच्या बाजूने लोकमत अल्प राहत असे तर बोधिसत्वाच्या विरूध्द कुणी जात नसत. बोधिसत्वाच्या प्रती देवदत्ताने जे वैरत्व पत्करले होते. त्याची परिणती अनेक जन्मांत पक्व होऊन तत्काळ त्याचे फळही मिळत गेले. महाराज, असे कोण म्हणतो की, दान देणे, दमनशील होणे, संयम पाळणे आणि उपोसथ व्रतासारखे पुण्यकर्म

केल्याशिवाय कुणी संपत्तीशाली होऊ शकतो? महाराज, देवदत्तानेसुद्धा ऐश्वर्य प्राप्त होताच लोकांचे रक्षण केले होते. पुण्याचे निर्माण, न्यायमंदिरे व धर्मशाळा यासारखे लोककल्याणाचे कार्य करीत होता. तो श्रमण, ब्राह्मण, दरिद्र, वाटसरू, मुसाफीर आणि अनाथांना त्यांच्या आवश्यकतेनुसार दान देत असे. याच पुण्यमय कृत्यांच्या फलस्वरूपाने तो प्रत्येक जन्मात संपत्तीशाली होत राहिला.''

''महाराज, तुम्ही जे म्हणता की, देवदत्त आणि बोधिसत्व हे दोन्ही सोबतच जन्म घेत आलेत ते केवळ काही शतके किंवा हजारो जन्मापासूनच नाही तर अनादी काळापासूनच हा योग घडून येत आहे. महाराज भगवंतानी जेव्हा मनुष्यत्व प्राप्त करण्याच्या प्रयत्नात असलेल्या कासवाची गोष्ट सांगितली होती. तेव्हापासूनच हे दोघेही सोबत जन्म घेत आलेत, असे समजले पाहिजे. महाराज, केवळ, बोधिसत्वाशी देवदत्ताचीच भेट होत राहिली असे नसून स्थवीरांनी सारीपुत्र सुद्धा शेकडो, हजारो जन्मांत कधी बोधिसत्वाचे पिता तर कधी काका, कधी बंधू तर कधी पुत्र; कधी मेव्हणे तर कधी मित्राच्या रूपात सोबतच जन्मास आले होते.''

''महाराज, या संसाराच्या धारेत वाहणारे जेवढे काही प्राणी आहेत, ते सर्व या वेगवान धारेत सापडून प्रिय-अप्रिय अशा दोन्ही प्रकारच्या सोबत्यांशी कधीना कधी मिळत असतात. जसे- धारेत आलेले पाणी चांगले किंवा दुर्गंध सर्वच प्रकारच्या वस्तूंशी मिळून जाते.''

''महाराज, देवदत्ताने पाणी यक्षाच्या जन्मात अनेकांना पापकृत्यात प्रवृत्त केले होते. त्या कर्मफळामुळे तो अनेक काळपर्यंत नरकात पक्व होत राहिला. याउलट बोधिसत्वाने पुण्यशाली यक्षाच्या जन्मात अनेकांना पुण्यकृत्याकडे वळवले होते. त्या फळ स्वरूपाने अनेक काळपर्यंत स्वर्गीय सुख उपभोगीत राहिले होते. आणि याजन्मी भगवान बुद्धाचा नाश करण्याच्या व संघ फोडण्याच्या पापकर्माच्या फळामुळे तो जिवंतपणीच जमिनीत गडम झाला. भगवान बुद्धाने समजण्यायोग्य सर्वच गोष्टींचे ज्ञान प्राप्त करून बुद्धत्वाचा लाभ करून घेतला आणि जीवनाचे जे काही उपादान कारण असतात त्या सर्वांचा नाश करून घेतला आणि जीवनाचे जे काही उपादान कारण असतात त्या सर्वांचा नाश करून निर्वाण लाभ करून घेतला.''

''ठीक आहे, भंते नागसेन, तुम्ही जे सांगितले त्याचा मी स्वीकार करतो.''

### ३९. अमरादेवीची गोष्ट

''भंते नागसेन, स्वतः भगवान बुद्धानेच म्हटले आहे की-

**जर का येता संधी चालून।**
**आणि लाभता एकान्त स्थान।**
**असो कुणी दुष्टमती जाण।**
**पुरूष तो।।**
**न लाभता कुणी समर्थ।**
**लुळा-पांगळा असो असमर्थ।**
**सकल स्त्रिया व्यभिचारार्थ।**
**होती प्रवृत्त।।''**

''पुन्हा असेही म्हटले आहे की, 'महोषधाची पतिव्रता पत्नी अमरादेवी ही पती विदेशात गेला असता आपल्या गावी ती एकटी व एकांतात राहत असतांना तिला हजारो रूपयांचे प्रलोभन दिले जात होते परंतु; तिन आपल्या पतीसच सर्वस्व मानून पाप कर्म करावयास ती प्रवृत्त होऊ शकली नाही.''

''भंते नागसेन, वरील बुद्धोपदेशाची एक दुसऱ्याशी मुळीच संगती जुळत नाही. पहिला उपदेश खरा मानावा तर दुसरा खोटा पडतो व दुसरा खरा मानावा तर पहिला खोटा पडतो, ही विसंगती कशी, ते समजावून सांगावे.''

''महाराज, स्त्रियांविषयी आणि अमरादेवी विषयी भगवान बुद्धाने जे सांगितले ती दोन्ही वचने खरेच आहेत. महाराज, तिने असे पापकर्म केले असो किंवा नसो परंतु या गोष्टीची परीक्षा उपयुक्त वेळ, एकान्त स्थान आणि तसा दुष्टपुरूष मिळाला तरच होऊ शकते. अमरादेवीला तसे काहीच मिळाले नव्हते.''

''महाराज, लोकनिंदेच्या भयामुळे, मृत्युनंतर नरकवासाला जाण्याच्या भयामुळे, पापकर्माच्या वाईट परिणामाच्या भयामुळे तसेच पतीचा त्याग करणे योग्य नाही अशा विचारामुळे, आपल्या पतीच्या इज्जतीच्या स्मरणामुळे, धर्माचरणाच्या आठवणीमुळे, पापकर्माची ती घृणा करीत असल्यामुळे माझे व्रत तुटू नये या विचारामुळे, त्याचप्रमाणे अशाच अनेक कारणांमुळे, अमरादेवीने तशी आपल्यावर वेळच येऊ दिली नाही. असे पापकर्म इतर मनुष्यापासून कधीही लपून राहू शकत नाही, जरी मनुष्यापासून लपून राहिले तरी अमनुष्यापासून कधीही राहू शकत नाही. त्यांचे पासूनही लपून राहिले तरी दुसऱ्याच्या चिंतातील भाव ओळखणाऱ्या भिक्षू लोकांपासून लपून राहू शकणार नाही.

*भगवान बुद्धाने ही गाथा कोठेही म्हटल्याचे आढळत नाही. ग्रंथकर्त्याने ती प्रमादवश लिहिली असेल. जातक ५३६ मध्ये जरी ही गाथा आली असली तरी बुद्धधोपपेश म्हणून नव्हे तर लोकोक्ती म्हणून होय.*

अशा भिक्षूंपासून लपून राहिले तरी परचित ज्ञान असलेल्या देवगणापासून ते लपून राहू शकत नाही. जरी त्यांचेपासून लपून राहिले तरी ते पाप कर्म माझ्या स्वतःच्या मनात पश्चाताप उत्पन्न करतील, आणि मनात पश्चाताप उत्पन्न झाला नाही तरी अधर्म तर निश्चितच घडेल, अशा अनेक कारणांमुळे अमरादेवीने तरी पापकर्म केले नाही.''

''महाराज, अमरादेवीचे पती महोषध यांचे अंगी हे अठ्ठावीस गुण होते-''

''महाराज, महोषध - १) शूर, २) नम्र, ३) पापांचा संकोच बाळगणारा, ४) पुष्कळ मित्रांचा संगाती, ५) क्षमाशील, ६) सत्यवादी, ७) पवित्र, ८) क्रोध मुक्त, ९) घमंडरहित, १०) द्वेषरहित, ११) कर्तव्यपरायण, १२) उत्तम कामात स्वतःला गुंतवणू ठेवणारा, १३) लोकप्रिय, १४) कोणत्याही वस्तूचा इतर लोकांत वाटून उपभोग घेणारा, १५) विशुद्ध मैत्री टिकविणारा, १६) साज श्रृंगारापासून दूर राहणारा, १७) स्वहितासाठी दुसऱ्यात वितुष्ट न आणणारा, १८) निष्कपट प्रवृत्तीची, १९) बुद्धिमान, २०) संपत्तीशाली, २१) कीर्तीमान, २२) ज्ञानी, २३) आपल्याकडे येणाराचे हित चिंतणारा, २४) सर्वच लोकांकडून प्रशंसा पावलेला, २५) धनवान, २६) यशस्वी आणि २७) विद्वान असा होता. महाराज, महाषेध पंडितांच्या अंगी हे अठ्ठावीस गुण होते. म्हणुन अमरादेवीला बिघडवणारा असा कुणहीही दुसरा मिळाला नाही. याचकारणाने अमरादेवीने कोणतेही पापकर्मे पतीच्या पश्चात केले नाही.''

''बरोबर आहे, भंते नागसेन, आपण सांगितले त्यात मुळीच चूक नाही. हे मी स्वीकार करतो.''

## ४०. क्षीणाश्रव- अर्हतांची निर्भयता

''भंते नागसेन, तथागताने सांगितले आहे- 'अर्हत लोक भयापासून सर्वथा मुक्त झालेले असतात.' तथापि राजगृह नगरात धनपाल नावाचा हत्ती तथागतावर चालून येत आहे असे पाहून पाचशे क्षीणाश्रव- अर्हत भिक्षू तथागतास तसेच टाकून आपला जीवन मुठीत घेऊन वाट पडेल तिकडे पळून गेले. त्यातील केवळ आनंद स्थवीर एकटेच काय ते तथागताच्या सोबती राहिले. भंते नागसेन, हे असे कां घडले? ते भीतीमुळेच पळून गेले असावेत काय? किंवा तथागतास त्यांचा मृत्यू कळलेला असेलच असा विचार करून त्यांना एकटेच सोडून ते पळून गेले होते की तथागत आपले असीम सामर्थ्य कसे दाखवतात, हे पाहण्याकरिता ते पळूने गेले होते?''

''भंते नागसेन, भगवंताचे हे वचन जर खरे असेल की, 'अर्हत लोक सर्व प्रकारच्या भयांपासून मुक्त असतात.' तर 'धनपाल हत्ती भगवंताच्या अंगावर चालून येताच

आनंदाशिवाय पाचशे क्षीणाश्रव अर्हत भिक्षू पळून गेले' असे म्हणणे चूक ठरते. आणि 'पाचशे अर्हत भीतीमूळे पळून गेले' होते की तथागत आपले अगाध सामर्थ्य कसे दाखवतात, हे पाहण्याकरिता ते पळून गेले होते?''

''भंते नागसेन, भगवंताचे हे वचन जर खरे असेल की, 'अर्हत लोक सर्व प्रकारच्या भयांपासून मुक्त असतात.' तर 'धनपाल हत्ती भगवंताच्या अंगावर चालून येताच आनंदाशिवाय पाचशे क्षीणाश्रव अर्हत भिक्षू पळून गेले' असे म्हणणे चूक ठरते. आणि 'पाचशे अर्हत भीतीमुळे पळून गेले' हे म्हणणे खरे असेल तर 'अर्हत लोक भीती पासून मुक्त असतात, असे भगवंतनी म्हटले असेल हे खरे वाटत नाही.' हे सुद्धा एक कोडे सोडवण्याकरिता आपणापुढे मी ठेवत आहे.''

''महाराज, 'अर्हत क्षीणाश्रव भिक्षू भयापासून मुक्त असतात.' असे भगवंत म्हणाले ते यथार्थच आहे. आणि 'राजगृह नगरात धनपाल नामक हत्ती भगवंताच्या अंगावर चालून येत असलेला पाहून पाचशे अर्हत क्षीणाश्रव भिक्षू पळून गेलेत. केवळ त्यावेळी भगवंतासोबत राहिले ते आनंद स्थवीर,' असेही सांगितलेले काही खोटे नाही. परंतु त्यांची भयामुळे अशी गाळण उडाली व ते पळून गेले असे नाही किंवा भगवंताला एकटेच मरू देण्याच्या इच्छेने ते सैरावैरा पळून गेले असेही नाही. अर्हत लोकात भयाची जी काही कारणे असतात ती समूळ नाश पावलेली असतात. त्यामुळे ते सर्व प्रकारच्या भयापासून मुक्त झालेले असतात.''

''महाराज, जेव्हा कुणी एखादा माणूस जमीन खोदू लागतो तेव्हा पृथ्वी घाबरून जाते काय? किंवा मोठमोठ्या समुद्रांचा आणि पर्वतांचा भार सहन करताना पृथ्वी घाबरून जाते काय? किंवा मोठमोठ्या पर्वतांना खचून जाण्याची, कोलमडून पडण्याची, भेगा पडण्याची किंवा जळून जाण्याची भीती वाटते काय?''

''नाही भंते!''

''कां नाही?''

''कारण, त्यांच्यात घाबरून जाण्याचे किंवा भयभीत होण्याचे कोणतेच कारण शिल्लक नसते.''

''महाराज, अर्हत क्षीणाश्रवांच्या बाबतीत सुद्धा असेच असते. या जगात भीतीची जी काही रूप असतील, ती सर्व एकत्र मिळून एखाद्या अर्हताला घाबरवण्याचा प्रयत्न करू लागले तरीपण त्यांच्या हृदयात कोणत्याही प्रकारच्या भीतीचा विकार निर्माण होणार नाही.''

"महाराज, ज्यावेळी त्या पाचशे अर्हतांच्या मनात असे विचार आले होते की, 'आज नर श्रेष्ठ आणि जितेंद्रीय भगवान बुद्ध या श्रेष्ठ अशा राजगृह नगरात प्रवेश करताच घनपाल नावाचा हत्ती अगदी समोरून तथागतावर तुटून पडेल, त्यावेळी देवाधिदेव त्या तथागताचा निष्ठावंत सेवक स्थवीर आनंद हा काही त्यांना सोडून जाऊ शकत नाही. आणि अशावेळी आम्ही जर त्यांना सोडून गेलो नाही, तर आनंद स्थवीरांचा गुण प्रगट होऊ शकणार नाही. आणि बुद्धापर्यंत त्या हत्तीला येण्याचा वाटही मिळणार नाही. तेव्हा आम्ही लोकांचे हित इथून निघून जाण्यातच आहे. असे केल्याने बरेच लोक क्लेशांच्या बंधनातून मुक्त होतील. आणि चहुकडे आनंदाच्या गुणांची प्रसिद्धीही होईल.' याच एकमात्र विचाराने पाचशे अर्हत निघून गेले."

"ठीक आहे, भंते नागसेन, आपण फारच उत्तमरीतीने समजावून सांगितले. प्रत्यक्षात हे असेच आहे. अर्हतांना त्यावेळी मुळीच भय वाटले नव्हते किंवा ते घाबरूनही गेले नव्हते. चांगल्या विचारानेच ते चहूकडे निघून गेले होते."

## ४१. सर्वज्ञतेचे अनुमान

"भंते नागसेन, तुम्ही लोक सांगत असता की, 'बुद्ध सर्वज्ञ होते.' तथापि असे ऐकण्यात येते की, 'सारी पुत्र आणि महामोग्गलायन यांना त्यांच्या समर्थकांसह संघातून काढून टाकल्यावर चातुमाचे शाक्य आणि ब्रह्मा सहपती हे भगवंताकडे आले आणि त्यांनी बीज व वासरू यांची उपमा देऊन भगवंताची समजूत घातली आणि त्यांना क्षमा करायला लावली.' भंते नागसेन, भगवंतांना ह्या उपमा माहीत नव्हत्या काय की, जेणे करून त्या ऐकून तथागतावर त्यांचा परिणाम झाला आणि त्यांनी त्याना क्षमा केली?"

"भंते नागसेन, जर त्या उपमा भगवंतांना माहीत नसतील तर त्याचे सर्वज्ञत्व वादातील पडते आणि जर त्या उपमा माहीत होत्या तर उगीच कठोरतापूर्वक त्यांना त्रास देण्याच्या उद्देशाने संघातून काढून दिले, असे म्हणावयास सबळ पुरावा मिळतो. याप्रमाणे त्यांच्या करूणेवर आक्षेप घेता येतो. हा सुद्धा आक्षेप आपल्यामुळे ठेवण्यात येत आहे.'

"महाराज, बुद्ध सर्वज्ञ होते. तरीपण त्या उपमांनी त्यांचे समाधान झाले आणि त्यांनी सारीपुत्र व महामोग्गलायन यांना क्षमा केली. महाराज, भगवान तथागत धर्माचे गुरू आहेत. त्या दोन्ही उपमा त्यांनी पूर्वी सांगितल्या होत्या."

### पती आपल्याच वस्तूंनी प्रसन्न होतो

"महाराज, पतीकडून मिळालेल्या वस्तूंचा उपयोग करूनच पत्नी त्याला प्रसन्न

करून घेते व त्याला राजी करते. त्यामुळे तो तिची कोणतीही गोष्ट मान्य करतो. महाराज, याचप्रमाणे चातुमा नगराचे शाक्य आणि ब्रह्मा सहंपती यांनी भगवंतानीच पूर्वी सांगितलेल्या उपमांचा उपयोग करून त्यांना प्रसन्न केले. आपला आग्रह मान्य करावयास लावला. भगवान तथागताने देखील 'फार छान' असे म्हणून आपली स्वीकृती दर्शवली.''

## राजाच्याच कंगव्याने

''महाराज, राजाच्याच कंगव्याने न्हावी राजाचे केश नीट करून राजाला प्रसन्न करून घेतो. ते पाहून 'फार छान' असे उद्गार काढून राजा त्यास आपली सम्मती दर्शवतो आणि न्हाव्याला मागेल तेवढे बक्षिस देतो. महाराज याचप्रमाणे चातुमा नगरचे शाक्य आणि ब्रह्मा सहंपतीने पूर्वी भगवंतानी सांगितलेल्या उपमांचा उपयोग करून त्यांना प्रसन्न करून आपला आग्रह मान्य करावयास लावले त्याप्रमाणे भगवान तथागतांनी देखील 'फार छान' असे म्हणून आपली संम्मती दर्शविली.''

उपाध्यायाच्याच पिडंपात्राने

''महाराज, कुणी एक सेवा करणारा श्रामणेर त्याच्याच उपाध्यायांनी आणलेल्या भिक्षा पात्रातून अन्न काढून आपल्या उपाध्यायास चांगल्याप्रकारे वाढतो. त्यामुळे ते उपाध्याय प्रसन्न होऊन 'फार छान' असे आनंदोद्गार काढून त्यास आपली संमती प्रकट करतात. याप्रमाणेच महाराज, चातुमा नगरचे शाक्य आणि ब्रह्मा सहंपती यांनी भगवंतानीच पूर्वी सांगितलेल्या उपमांचा उपयोग करून त्यांना प्रसन्न करून आपला आग्रह मान्य करवला. जेणेकरून भगवान तथागतांनी देखील 'फार छान' म्हणून त्यांस आपली सम्मती दर्शवली होती.''

''ठीक आहे. भंते नागसेन, आपण जसे सांगितले, त्यांचा मी स्वीकार करतो.''

**(प्रकरण चवथे समाप्त)**

# प्रकरण पाचवे

## (ख) योगी कथा (पुढे चालू)

### ४२. विहार बांधणे

"भंते नागसेन, भगवंत म्हणतात - 'भिक्षूनो, अतिस्नेहाने भय उत्पन्न होते, गृहस्थीमुळे आसक्ती निर्माण होते. तेव्हा अतिस्नेहही करू नका व गृहस्थी जीवनाचाही अवलंब करू नका. मुनी लोकांची हीच इच्छा असते.' तरी पण दुसऱ्या एके ठिकाणी असेही म्हटले आहे की, 'सुंदर विहारांचे निर्माण करून त्यात विदूतज्जनांना आश्रय द्यावा."

"भंते जर अतिस्नेहाने भय निर्माण होते, इत्यादी भगवंतोच वचन खरे असेल तर 'सुंदरसुंदर विहारांचे निर्माण करून त्यात विदूतज्जनांना आश्रय द्यावा.' ही त्यांचीच वाणी खोटी ठरते. आणि सुंदरसुंदर विहारांचे निर्माण करून त्यांत विदूतज्जनांना आश्रय द्यावा. ही त्यांची वाणी खरी मानावी तर 'अतिस्नेहाने भय निर्माण होते,' इत्यादी त्यांचेच वचन खोटे ठरते. हे सुद्धा एक कोडे आपणापुढे ठेवत आहे, त्यात खरे काय आहे, ते स्पष्ट करून सांगावे."

"महाराज, भगवंताने असे जे म्हटले की, 'अति स्नेहाने भय उत्पन्न होते. इत्यादी वचनात आणि सुंदर-सुंदर विहारांचे निर्माण करावे, इत्यादी तथागताच्या वचनांत पूर्णतः सत्यता आहे. त्यात काही एक दुसरे जोडण्याची आवश्यकता नाही. याबद्दल शंका घेण्यणाचे कारणच नाही. पण हे भिक्षूसाठी अत्यंत उपयुक्त, भिक्षूचर्येस योग्य व उचित असेच आहे. महाराज, जंगलात राहणारा मृग कोणत्याह प्रकारे घराचा आश्रय न घेता स्वच्छंदपणे विहार करतो. जेथे इच्छा झाली तेथेच सुखपूर्वक झोप घेतो. याप्रमाणेच स्वच्छंदपणे विहार करण्यासाठी भयमुक्त व आसक्ती रहित जीवन यापन करण्यासाठी भिक्षूकरिता हे अगदी उपयुक्त आहे."

"महाराज, भगवंतानी असे जे म्हटले आहे की, 'सुंदरसुंदर विहारांचे निर्माण करून त्यांत विदूतज्जनांच्या राहण्याची सोय करावी' यामागे भगवंताचे दोन दृष्टीकोन आहेत. ते असे - (१) विहार बांधून ते दोन करण्याची सर्वच बुद्धांनी स्तुती केली आहे. त्यासाठी अनुमती देऊन मुक्तकंठाने त्यांची प्रशंसा केली आहे. पुण्यवृद्धीसाठी हे महान आणि भव्य असे कार्य आहे, असे म्हटले आहे. याप्रमाणे विहार बांधून ते भिक्षूंना दान केल्याने जन्मापासून, वृद्धत्वापासून, आजारापासून आणि मरणापासून त्या दात्याची सुटका होते. विहार दानाचे हे पहिले फळ होय. याशिवाय (२) विहार बांधलेले असल्यामुळे भिक्षूंना

निवाऱ्याचे स्थळ लाभते. भिक्षूंचे दर्शन घेऊ इच्छिणाऱ्या उपासक उपासिकांना सहजासहजी दर्शनाचा लाभ होतो. जर भिक्षूंना राहण्यासाठी कुठेही विहार बनले नसेल तर त्यांची भेट घेणेच अत्यंत कठीण होऊन जाईल. विहार बांधून ते भिक्षूंना दान करण्याचे हे दुसरे फळ होय. हेच दोन दृष्टीकोन पुढे ठेवून भगवंतानी सांगितले की, 'सुंदरसुंदर विहार बांधून त्यात विद्वतज्जनांना राहण्याची सोय करावी.' पण याचा अर्थ असा समजू नये की, विहारास भिक्षू लोक आपले घर समजतील.''

''ठीक आहे, भंते नागसेन, आपले म्हणणे मी मान्य करतो.''

## ४३. भोजनासंबंधी संयम पाळावा

''भंते नागसेन, भगवान बुद्धाने इशारा दिला आहे की, उठा, जागृत व्हा; आळस करू नका; भोजनासंबंधी संयम पाळावा. तसेच त्यांनी असेही म्हटले आहे की, हे उदाय, मी कधी पात्र भरून तर कधी त्याहीपेक्षा अधिक भोजन करतो.[१]''

''भंते नागसेन, पहिल्या वचनाची दुसऱ्या वचनाशी व दुसऱ्या वचनाची पहिल्या वचनाशी विसंगती निर्माण करणारी ही भगवान बुद्धाची वचने कशी? हे सुद्धा एक न उकलणारे कोडेच आहे. भंते, या विषयावर आपण प्रकाश टाकावा.''

''महाराज, भगवान बुद्धाच्या दोन्ही वचनात यथार्थ सत्य आहे.''

''महाराज, उठा, जागृत व्हा. आळस करू नका. भोजनासंबंधी संयम पाळावा. असे जे भगवान बुद्धाने सांगितले ते यथार्थ सत्य आहे. सदासर्वकाळ सर्वांवर लागू पडणारी ही बाब आहे. यात काहीएक खोटेपणा नाही. यावर मुळीच टीकाटिपणी करावयास वाव नाही. जसे हे सत्य आहे अगदी तसेच भगवान बुद्धाने सांगितले आहे. या सत्या कुणीही खंडन करून शकत नाही. हे एक ऋषी, मुनी, भगवान, अर्हत, प्रत्येक बुद्ध, जीन, सर्वज्ञ बुद्ध, सम्यकसम्बुद्ध इत्यादी थोर ज्ञानीवंतानी प्रदर्शित केलेले सत्य आहे. महाराज, भोजनात संयम न पाळणारा, हिंसा, चोरी, परस्त्रीगमन, खोटे बोलणे, दारू पिणे इत्यादी सर्वच दुष्कर्म करू शकतो. स्वतःच्या मातेस व अर्हत लोकांस सुद्धा जीवे मारू शकतो. संघात फूट पाडू शकतो आणि असा दुष्ट मनुष्य बुद्धाच्या शरीरातून रक्त सांडवण्याकरीतासुद्धा कधी मागे पुढे पाहत नाही. महाराज, भोजनात संयम न पाळल्याकारणानेच देवदत्ताने संघात फूट पाडून एक कल्पपर्यंत त्याचे फळ भोगत राहिला. या आणि अशाच अनेक गोष्टींचा विचार करून भगवान बुद्धाने सांगितले आहे की, 'उठा, जागे व्हा.' आळस करू नका आणि भोजनासंबंधी संयम पाळावा.''

''महाराज, भोजनासंबंधी संयम पाठणारास चार आर्यसत्याच्या ज्ञानाचा लाभ

होतो. ब्रह्मचर्यवासाच्या मोठमोठ्या चार फळांचा लाभ होतो. अर्थात श्रोतापत्ती, सकृदागामी, अनागामी व अर्हत्वाचा लाभ होतो. चार प्रतिसम्भिदा, आठ समापती आणि सहा अभिज्ञा यांत पूर्णत्व प्राप्त करून घेतो. समस्त श्रमणधर्मांचे पालन करतो.''

''महाराज, भोजनात संयम बाळगल्यामुळे या पोपटाने तावंतीस नावाच्या देवलोकापर्यंत समस्त लोकांस कंपायमान करून देवेन्द्र शुक्रास आपली सेवा करावयास भाग पाडले होते. ते माहित आहे ना? हा आणि अशा अनेक गोष्टींचा विचार करूनच भगवान बुद्धाने तसे सांगितले होते.''

''याशिवाय, हे महाराज, भगवान बुद्धाने उदायीस असे सांगितले होते की, 'हे उदायी, मी कधी पात्र भरून किंवा त्याहून अधिक भोजन सुद्धा करतो. तर ही त्याची स्वतःची बाब होती. ज्यांनी करणीय सर्व कार्ये पूर्ण केले आहेत, परमफळाचा लाभ करून घेतला आहे. ज्यांचे ब्रह्मचर्य सार्थकी लागले आहे. ज्यांचे समस्त मळ नष्ट झाले आहेत. जे सर्वज्ञ, स्वयंभू व सम्येकसम्बुद्ध आहेत, त्यांची ही स्वतःची बाब आहे.''

''महाराज, ज्यांना उलटी करवून घ्यावयाची आहे, जुलाब द्यावयाचा आहे, जलध औषध द्यावयाचे आहे, अशा बिमारास पथ्य पाळलेच पाहिजे. त्याचप्रमाणे ज्वाला अजून सत्य गवसले नाही, अशा व्यक्तींनी भोजनासंबंधी संयम पाळलाच पाहिजे.''

''महाराज, चमकणाऱ्या, उत्तमजातीच्या, अगदी शुद्ध मणीरत्नास साफ करण्याची, घासून काढण्याची, किंवा धुऊन काढण्याची मुळीच आवश्यकता नाही व त्याचप्रमाणे सम्यकसम्बुद्ध 'काय करणे योग्य आहे आणि काय अयोग्य आहे' या बाबींपासून कितीतरी वर निघून गेले होते.''

''बरोबर आहे, भंते नागसेन, आपले म्हणणे मला एकदम मान्य आहे.''

## ४४. निरोगी भगवान बुद्ध

''भंते नागसेन, भगवान बुद्धाने म्हटले आहे की, 'हे भिक्षूनो, मी आत्मत्यागी आचरणाने परिशुद्ध अंतीम देह धारण करणारा असा ब्राह्मण आहे. आणि अलौकिक वैद्य आहे.' त्यांनीच पुन्हा असेही म्हटले आहे की, 'हे भिक्षू श्रावकांत सर्वश्रेष्ठ निरोगी राहणारा केवळ बक्कुल आहे. तसेच भगवान बुद्धाच्या स्वास्थ्याकडे पाहिले असता असे दिसून येते की, त्यांचे स्वास्थ्य अनेकदा बिघडलेले होते.''

“भंते नागसेन, भगवान बुद्ध अलौकिक होते तर त्यांनीच बक्कुलासंबंधी केलेले वक्तव्य खोटे ठरते. आणि खऱ्या अर्थाने बक्कुलचे स्वास्थ्य उत्तम होते, तर भगवान बुद्धाच्या अलौकिकतेवर आक्षेप येतो, हा ही एक बिकट प्रश्नच आहे. ही गुंतागुंत आपणच सोडवून द्यावी.”

“महाराज, भगवान बुद्धाने स्वतःच्या अलौकिकतेविषयी आणि बक्कुलाविषयी सांगितले. त्या दोन्ही वचनात सत्यता आहे. परंतु भगवान बुद्धाचा उपदेश ऐकून त्यात आपल्याकडून काही जोडून मूळ उपदेशात विपरीत स्वरूपाने लोकांत प्रसारित करणाऱ्या त्या भिक्षूंना उद्देशून भगवान बुद्धाने ते सांगितले होते. महाराज, भगवान बुद्धांच्या भिक्षू श्रावकांत कित्येक असे होते की, जे रात्रंदिवस केवळ उभे राहूनच भावना करीत असत, चक्रमणातच किंवा बसून राहण्याच कित्येक दिवस घालवत असत. तथापि भगवान बुद्ध मात्र कधी उभे राहून तर कधी चक्रमण करीत तर कधी आसन मांडून बसून भावना करीत असत. असेच भोजनासंबंधीही करीत असत. याप्रमाणे ते काही बाबतीत भगवान बुद्धापेक्षाही कठोर आचरण करीत असत. याचप्रमाणे अशा पुष्कळ श्रावकांविषयी वेगवेगळ्या गोष्टी ऐकण्यात येतात. परंतु भगवान बुद्ध त्या सर्वापेक्षा शीलाने, समाधीने, प्रज्ञेने, वैराग्यांने मोक्षाचा साक्षात्कार करण्यात शक्तीने, चार वैशारद्यचा लाभ करण्यात, अठरा बुद्ध गुणात, सहा अलौकिक ज्ञानात याशिवाय भगवान बुद्धाने प्रत्यक्ष साक्षात्कार करून घेतलेल्या सर्वच गुणात ते प्रत्यक्ष अलौकिक होते. यात मुळीच शंका नाही.”

“महाराज, कुणी कुणी उच्च कुळातील असतात, कुणी धनवान, कुणी विद्येत पारंगत, कुणी शिल्पकार, कुणी शूर, कुणी अतिहुशार असतात. तथापि राजा या सर्वांपेक्षा सर्वच बाबतीत श्रेष्ठ असतो. त्याचप्रमाणे हे महाराज, भगवान बुद्ध सर्वश्रेष्ठ सर्वोत्तम आणि सर्वांपेक्षा अग्रज्ञानी असे होते. आयुष्मान निरोगी होते. ते केवळ आपल्या संकल्पामुळे. एवढे खरे की, इतर भिक्षूंत स्वास्थ्याने ते बरे होते. महाराज, भगवान अनोमदशी वाताचा आजार झाला होतो आणि ते आपल्या अडसुष्ट हजार भिक्षूं श्रावकांच्या संगाती तृणपुष्पक नावाच्या आजाराने पीडीत होते. त्यावेळी बक्कुल हे एका तपस्व्याच्या रूपात असतांना त्यांनी अनेक प्रकारच्या औषधाने त्यांचा उपचार करून त्यांचा आजार मुक्त केले होते. म्हणूनच भगवान बुद्धाने स्वास्थासंबंधी बक्कुलाची प्रशंसा केली आहे.”

“हे महाराज, आजारी होवोत किंवा न होवोत, धुवांगाचे ते पालन करोत किंवा न करोत, परंतु भगवान बुद्धाच्या बरोबरीचे दुसरे कुणीही असू शकत नाही. महाराज,

संयुक्त निकाय ४४-१०३

त्या देवाधिदेव भगवान तथागताने संयुक्त निकायात सांगितले आहे की, 'हे भिक्षूंनो पाय असलेले, पाय नसलेले, चार पाय असलेले, द्वीपाद, पुष्कळ पाय असलेले, रूप असलेले, रूप नसलेले, संज्ञा धारण केलेले, असंज्ञी, संज्ञा-असंज्ञेपासून मुक्त या सर्व प्राण्यांत अर्हत सम्यक सम्बुद्ध हेच सर्वश्रेष्ठ अग्रज्ञानी आहेत.''

''बरोबर आहे भंते नागसेन, ही अशीच बाब आहे.''

## ४५. भगवान बुद्धांनी शोधून काढलेला नवीन मार्ग

''भंते नागसेन, एके ठिकाणी भगवंतानी म्हटले आहे की, हे भिक्षूंनो जो इतरांना कधी गवसला नाही, असा परम सुखदायी नवीन मार्गाचा सम्यकसम्बुद्ध शोध लावत असतात. तसेच दुसऱ्या ठिकाणी म्हटले आहे की, हे भिक्षूंनो मला तो सनातम मार्ग प्राप्त झाला आहे. ज्या मार्गाने पूर्वी होऊन गेलेले बुद्ध चालत आले आहेत. भंते नागसेन, आता आपणच सांगा. या दोन्ही वचनात किती विसंगती आहे? पहिले वचन आणि दुसरे वचन एक दुसऱ्याचा विसंगत नाही का? भंते, हे सुद्धा एक अवघड असेच कोडे आपण उकलून द्यावे.''

''महाराज, वरील दोन्ही बाबी एकदम सत्य आहेत. महाराज, पूर्वी होऊन गेलेल्या बुद्धांचे परिनिर्वाण झाल्यामुळे आणि त्यांचे शासन आता न राहिल्यामुळे बुद्ध मार्गाचा एकदम लोप होऊन गेला होता. त्याच लोप पावलेल्यसा सनातन मार्गाचे भगवान बुद्धांना प्रज्ञाचक्षूद्वारे नव्याने दर्शन घडले. त्यामुळेच सनातम मार्गाचे मला दर्शन घडले, असे तथागतांनी म्हटले आहे.''

''महाराज, पूर्वी होऊन गेलेले बुद्ध परिनिर्वाण पावल्यामुळे त्यांच्या शासनाचा नायनाट झाल्यामुळे तो मार्ग लोप पावला होता. तो मार्ग एकदम अस्पष्ट झाला होता. लोकांना त्याचा विसर पडला होता. नाहिसा झाला होता. तोच मार्ग पुन्हा नवीन रूपात तथागत बुद्धाने शोधून काढला. म्हणूनच त्यांनी म्हटले आहे की, हे भिक्षूंनो जो इतरांना कधीही प्राप्त झाला नाही, मार्ग तथागत बुद्धच शोधून काढतात.''

### चक्रवर्ती राजाचे मणीरत्न

''महाराज, चक्रवर्ती राजा मृत्यू पावला असता त्याच्याजवळील अमूल्य मणीरत्न देखील पर्वत शिखरावर अतर्धान पावते. परंतु जर दुसरा चक्रवर्ती राजा जन्माला आला असला व त्यांनी चक्रवर्ती राजास करावी लागणारी सर्व व्रते पूर्ण केली असली तर ते पुन्हा प्रकट होते. महाराज, अशावेळी आपण असे म्हणाल काय की, त्यांनी ते मणीरत्न निर्माण केले?''

''नाही भंते, ते मणीरत्न तर पूर्वीच अस्तित्वात होते. एवढेच की, त्याने पुन्हा आपल्या सद्‌गुणाने प्रकट केले.''

''महाराज बरोबर. त्याचप्रमाणे जे पूर्वी बुद्ध होऊन गेलेत आणि त्यांचा जो अस्सल सर्वश्रेष्ठ असा अष्टांगिक मार्ग होता, तो त्यांचे शासन अस्तित्वात नसल्यामुळे लोप पावला होता. अस्तित्वात राहिला नव्हता. त्याच मार्गाला पुन्हा भगवान बुद्धाने आपल्या प्रज्ञाचक्षूने शोधून काढला. यामुळेच असे म्हटले आहे की, 'हे भिक्षूंनो, जो मार्ग इतरांना कधी प्राप्त झाला नाही, तो मार्ग अर्हत सम्यकसम्बुद्ध शोधून काढतात.''

## आईने मुलाला जन्म देणे

''महाराज, आईच्या उदरात मूल आधीच सामावले असते. परंतु ते उदरातून बाहेर येताच लोक असे म्हणतात की, 'आईने त्या मुलाला जन्म दिला.' महाराज, त्याचप्रमाणे पूर्वीचाच मार्ग पण तो शासन अस्तित्वात नसल्यामुळे लोप पावला होता. अस्तित्वात राहिला नव्हता. त्याला पुन्हा भगवान बुद्धाने आपल्या प्रज्ञाचक्षूने शोधून काढला. महाराज आता दुसरे उदाहरण ऐका.''

## हरवलेली वस्तू शोधून काढणे

''महाराज, एखादी वस्तू हरवलेली असेल आणि ती एखाद्या माणसाने शोधून काढली असेल, तर लोक म्हणतात की, 'अमक्या माणसाने ही वस्तू शोधून काढली.' महाराज, याप्रमाणेच पूर्वीचाच मार्ग पण जो शासन अस्तित्वात न राहिल्यामुळे लुप्त झाला होता, त्या मार्गाला भगवान बुद्धाने आपल्या अलौकिक प्रज्ञा चक्षूद्वारा शोधून काढला आहे. महाराज, आणखी एक उदाहरण ऐका.''

## जंगल कापून जमीन तयार करणे

''महाराज, जर एखाद्या माणसाने जंगल तोडून जमीन साफ करून वहिवाटीत येण्यायोग्य जागा केली तर लोक म्हणतात की, 'त्याने जमीन तयार केली' यातील यथार्थ सत्य हे आहे की, जमीन यापूर्वीच तेथे बनलेली असते. केवळ तो मनुष्य ती वहिवाटीत आणणारा असतो. महाराज, याप्रमाणेच पूर्वी असलेला मार्ग पण शासन अस्तित्वात नसल्याकारणाने लुप्त पावल्यामुळे तो पुन्हा भगवान बुद्धाने आपल्या दिव्य प्रज्ञाचक्षूद्वारा शोधून काढला. म्हणूनच भगवान बुद्धांनी सांगितले आहे की, हे भिक्षूंनो इतरांना जो मार्ग प्राप्त झाला नाही, तो सर्वश्रेष्ठ मार्ग अर्हत सम्यकसम्बुद्ध शोधून काढतात.''

''ठीक आहे, भंते नागसेन, आपण जसे समजावून सांगितले, अगदी तसेच मी स्वीकार करतो.''

## ४६. लोमस काश्यपाची गोष्ट

''भंते नागसेन भगवान बुद्धांनी सांगितले आहे की, पूर्वी लाभलेल्या अनंत अशा मनुष्य जन्मांपासूनच मी अहिंसेचा अभ्यास केला होता.' याशिवाय दुसऱ्या ऐके ठिकाणी त्यांनीच सांगितले आहे की, 'ज्यावेळी मी लोमस काश्यप' नावाचा ऋषी होऊन विचरण करीत होतो त्यावेळी मी शेकडो प्राण्यांचा वध करवून वाजपेय्य नावाचा महायज्ञ केला होता.''

''भंते नागसेन, अनंत जन्मांपासून अहिंसेचे पालन करण्याची गोष्ट खरी मानावी तर लोमस ऋषीच्या जन्मातील यज्ञात शेकडो प्राण्यांच्या वधाची गोष्ट खोटी ठरते. आणि यज्ञातील प्राणी खरा मानावा तर अहिंसेबद्दल सांगितलेले वचन खोटे ठरते. हे सुद्धा एक भयंकर कोडे आहे. तेव्हा कृपाकरून आपणच हे उकलून द्यावे.''

''महाराज, अहिंसेच्या अभ्यासाची गोष्टही सत्यच आहे. आणि यज्ञातील शेकडो प्राण्यांच्या केलेल्या वधाची गोष्ट सुद्धा खरीच आहे. तथापि हे लोमस तापसाच्या जन्मातील विकाराच्या आहारी जाऊन अज्ञानवश केलेले कृत्य होय; विचारपूर्वक केलेले सद्कृत्य नव्हे.''

''भंते नागसेन, आठ प्रकारचे लोक हिंसा करीत असतात. ते आठ प्रकार असे – १) रागीट मनुष्य रागाने बेभाग झाल्यामुळे, २) द्वेषी मनुष्य आपल्या मत्सरी स्वभावामुळे, ५) लोभी मनुष्य लोभामुळे, ६) निर्धन मनुष्य आपली उपजीविका चालविण्यासाठी, ७) मूर्ख मनुष्य केवळ करमणूक म्हणून आणि ८) राजे लोक दंड देण्यासाठी जीव हिंसा करतात. भंते, हेच आठ प्रकारचे लोक जीव हिंसा करतात. परंतु भंते नागसेन, बोधिसत्वाने या कारणांवाचून स्वाभाविकपणे जीव हिंसा केली नसेल काय?''

''नाही महाराज, बोधिसत्वाने स्वाभाविकपणे जीव हिंसा केली नव्हती. महाराज, जर बोधिसत्वाने स्वाभाविकपणे महायज्ञ करून जीव हिंसा केली असती तर असे कदापि म्हटले नसते की, हे सह्य, तू निश्चित समजून घे की, 'चारही बाजूंनी सागरापर्यंत विस्तार पावलेल्या ज्या पृथ्वीला सागराचे संरक्षण मिळाले आहे, त्या संपूर्ण पृथ्वीवर मी निंदेचा विषय व्हावा हे मला मुळीच मान्य नाही.''

''महाराज, त्यांनी जरी असे म्हटले असले तरी बोधिसत्व काश्यप चंद्रावती

नावाच्या राजकुमारीला पाहून तिच्या प्रेमात पडून मनाचा तोल सांभाळू न शकल्यामुळे ते स्वतःला विसरून गेले. तिच्याविषयी मनात असलेल्या उत्कंठेमुळे आणि विरहामुळे त्यावेळी त्यांच्यावर वेडा होण्याची पाळी आली आणि एखाद्या भटकलेल्या किंवा विसरलेल्या माणसाप्रमाणे त्यांनी घाईघाईने महायज्ञ केला. या यज्ञात अनेक पशूंचा बळी देण्यात आला होता. पशूंचा माना कापल्यामुळे रक्ताचा जणू काही ओहोळ वाहू लागला होता.''

''महाराज, ज्यांचा मेंदू स्थिर आणि संतुलीत नाही असा वेडा माणूस कधी-कधी जळत असलेला अग्नीसुद्धा हातात पकडतो, चिडलेला सापसुद्धा पकडतो, मदोन्नत हत्तीच्या सुद्धा पुढे जातो, अथांग समुद्रातसुद्धा उडी टाकतो, विहिरीतही उडी घालतो, काटेरी जागेतही जातो, पहाडाच्या उंच कड्याहून देखील उडी टाकतो, घाण खातो, रस्त्याने नग्न अवस्थेतच फिरतो, याशिवाय अशाच अनेक लीला करतो. महाराज, याप्रमाणेच बोधिसत्व काश्यपाचे इंद्रावती नामक राजकुमारीला पाहून तिच्यावर प्रेम जडले. आणि मनाचा तोल न सांभाळता आल्यामुळे ते स्वतःलाच विसरून गेले. तिच्याविषयी मनात असलेल्या उत्कंठेमुळे व विरहामुळे त्यावेळी त्यांच्यावर वेडा होण्याची पाळी आली आणि एखाद्या भटकलेल्या किंवा विसरलेल्या माणसाप्रमाणे त्यांनी घाईघाईने अविचाराने हा महायज्ञ केला.''

''महाराज, राजदंड विधानानुसार वेड्यणा माणसाचे अपराध तेवढे दंडनीय मानले जात नाहीत. तसेच पारलौकिक बाबींतही समजले जाते. महाराज, एखाद्या वेड्या माणसाने कोणाला ठार मारले तर तुम्ही त्याला कोणता दंड द्याल?''

''भंते, वेड्या माणसाला दंड तरी काय देणार ? त्याला मारपीट करून सोडून देण्यात येते. त्याच्यासाठी एवढाच दंड पुरेसा असतो.''

''महाराज, खरी बाब तर ही आहे की, वेड्या माणसाला दंडच नसतो. वेड्या माणसाचा अपराध म्हणजे अपराधच मानला जात नाही; त्याला क्षमा करण्यात येते. महाराज, याप्रमाणेच बोधिसत्व राजकुमारी चंद्रावतीला पाहताच तिच्यावर लुब्ध झाले आणि स्वतःला विसरून गेले होते. तिच्यावरील प्रेमामुळे मनास लागलेली उत्कंठा व विरहामुळे त्यांच्यावर वेडा होण्याची पाळी आली. अशा भटकलेल्या मनःस्थितीत घाईघाईने त्यांनी अविचाराने महायज्ञ केला.''

''परंतु जेव्हा त्यांची प्रेमाची धूंदी उतरली आणि मनःस्थिती ठिकाणावर आली तेव्हा ते प्रव्रजित होऊन पाचही अभिज्ञा प्राप्त करून त्यांनी ब्रह्मलोकास गमन केले.''

''ठीक आहे. भंते नागसेन, आपण उत्तम प्रकारे समजावून सांगितले.''

## ४७. छद्दंत आणि ज्योतिपाल

"भंते नागसेन, भगवंतानी गजराज षडदंताविषयी सांगितले आहे की, 'या भिक्षूला ठार मारावे असा विचार करीत असता त्याच्या अंगावरील काषाय वस्त्र पाहून ही सद्धर्माची ध्वजा आहे. अशा साधूशील अर्हतांना मारणे योग्य नाही, असा पुन्हा त्या दुःखदस्थितीतही बोधिसत्वाने विचार केला. आणि तो शांत झाला.' यासोबतच दुसऱ्या एके ठिकाणी असेही सांगितले आहे की, 'बोधिसत्वाने ज्योतिपाल मानवक म्हणून जन्म घेतला असता अर्हत सम्यकसंबुद्ध भगवान काश्यप यांना 'मथमुंडा', 'नकली साधू' इत्यादी कठोर शब्दांनी चिडवून अपमानित करण्याचा प्रयत्न केला होता."

"भंते, बोधिसत्वाने जर पशूयोनीत जन्म घेऊन देखील काषाय वस्त्रांची त्यांनी प्रतिष्ठा राखली होती तर ज्योतिपाल मानवकाची गोष्ट खोटी ठरते आणि जर ज्योतिपाल मानवकाने भगवान बुद्धांना 'मथमुंडा', 'नकली साधू' इत्यादी अपशब्द आणि कठोर बोलून चिडवत असता अपमानित करण्याचा प्रयत्न केला असेल तर जे काही षडदंत गजराजासंबंधी सांगण्यात येते हे सर्व खोटे ठरते. जर बोधिसत्वाने पशू-योनीत जन्म घेऊन अत्यंत कठोर दुःख भोगत असतानासुद्धा त्यांनी काषाय 'वस्त्रांची प्रतिष्ठा राखली होती. तर ज्ञानाने परिपक्व अशा मनुष्य जन्मात भगवान काश्यप बुद्धाबद्दल मुद्दाम असे आचरण कां केले? जेव्हा की, अर्हत सम्यकसंबुद्ध, दहा बुद्धबळानीयुक्त, लोकनायक तसेच महान प्रतापी होते, ज्यांच्याभोवती एक व्याम दिव्य तेज पसरले होते, जे मनुष्यांमध्ये सर्वश्रेष्ठ मानले जात होते आणि ज्यांच्या लक्षणयुक्त सुंदर शरीरावर उत्तम असे बनारसी चीवर शोभून दिसत होते, त्या बुद्धासोबत असा व्यवहार त्यांनी कां केला?"

"महाराज, अत्यंत यातना भोगत असतांना त्यांनी संयम पाळून अहिंसेचे रक्षण केले हे खरे आहे. आणि ज्योतिपाल मानवक होऊन बुद्धास अपमानित केले हे ही खरे आहे. तथापि ज्योतिपाल मानवकाने आपल्या कुळ परंपरेनुसारच तसे केले होते. महाराज, ज्योतिपाल ज्या कुळात जन्माला आला होता, त्यांची धर्माप्रती मुळीच श्रद्धा नव्हती. भिक्षूंचा ते कधीच आदर करीत नसत. त्याचे आईवडील, भाऊबहीण, दासदासी, नोकरचाकर तसेच परिवारातील इतर सर्वलोक ब्रह्माचे उपासक होते. ब्रह्माचीच ते पूजाअर्चा करीत होते. ब्रह्मा हाच काय तो सर्वश्रेष्ठ आणि उत्तम आहे, असे मानून ते इतर साधू-श्रमणांना नीच समज असत, त्याची निंदा करीत असत. त्या सर्व लोकांचे बोलणे नेहमी ऐकून भगवान काश्यापांना भेटण्याकरिता घटिकार नावाच्या कुंभाराने बोलावताच ज्योतिपाल यांनी 'त्या मथमुंड्या' नकली भिक्षूंच्या दर्शनात काय लाभ आहे?' असे बोलून त्यांना अपमानित करण्याचा प्रयत्न केला होता."

''महाराज, जर कां अमृत विषात मिळवले तर ते सुद्धा कडू होऊन जाते. अगदी थंडगार पाणीसुद्धा विस्तवार ठेवले असता उकडू लागते. याप्रमाणेच ज्योतिपाल ज्याकुळात जन्माला आला होता, त्या कुळात श्रद्धा व धर्माकडे मुळीच कल नव्हता. म्हणूनच आपल्या कुळपरंपरेच्या विचाराने प्रभावित होऊन, आंधळ्यागत तो भगवान बुद्धाप्रती निंदाजनक व अपमानकारक शब्द बोलला होता.''

''महाराज, धगधगत जळत असलेला भयंकर अग्नीसुद्धा पाणी पडताच विझून जातो. त्याचे सर्व तेज नष्ट होते, थंड पडते आणि पक्व झालेल्या निर्गुंठीच्या फळाप्रमाणे केवळ काळ्या कोळशांची राख मात्र पडून राहते. महाराज, याप्रमाणेच ज्योतिपाल मानवक महान पुण्यवान, परमश्रद्धाळू आणि अत्यंत ज्ञानी असून देखील तो श्रद्धा व धर्महीन कुळात जन्माला आल्यामुळे त्या कुळपरंपरेच्या विचाराने अंध बनून बुद्‌धाप्रती निंदाजनक आणि अपमानकारक अपशब्दाने बोलला होता.''

''परंतु जेव्हा तो भगवान काश्यप बुद्धापाशी गेला होता, बुद्धाचे अलौकिक तेज पाहून व जाणून त्यांचा तो नम्रसेवक बनला. बुद्ध धर्मानुसार प्रव्रजा घेऊन त्यांनी अभिज्ञा आणि समापती प्राप्त करून घेतल्या व ब्रह्म लोकास गमन केले.''

''ठीक आहे, भंते नागसेन, जसे आपण सांगितले अगदी तसेच मी स्वीकार करतो.''

## ४८. घटिकार कुंभार

''भंते नागसेन, भगवान बुद्धाने म्हटले आहे की, घटिकार कुंभाराचे घर तीन महिन्यापर्यंत पूर्णतः शाकारल्याविना पडून राहिले; तथापि त्यावर पावसाचा एक थेंब सुद्धा पडला नाही. शिवाय त्यांनी असेही म्हटले आहे की, 'भगवान काश्यप यांच्या कुटीवर मात्र जोरदार वृष्टी वर्षाव झाला होता.''

''भंते नागसेन, बुद्धासारख्या पुण्यवान महापुरूषाच्या कुटीवर पावसाचा वर्षाव झाला, हे कसे घडले? बुद्धाचे तेजही तर तसेच श्रेष्ठ असावयास पाहिजे होते?''

''भंते, घटिकार कुंभारोच घर तीन महिन्यापर्यंत पूर्णतः शाकारल्याविना पडून राहिले, परंतु पावसाचा एक थेंबसुद्धा त्यावर पडला नाही.' असे जर भगवान बुद्धाने खरोखर म्हटले असेल तर 'भगवान काश्यप बुद्धाचया कुटीवर मात्र जोरदार-वृष्टीवर्षाव झाला होता,' हे त्यांनीच सांगितलेले वचन खोटे ठरते आणि जर 'भगवान काश्यप बुद्धाच्या कुटीवर वृष्टी वर्षाव झाला.' हे खरे असेल तर 'घटिकार कुंभाराच्या शाकारल्याविना पूर्ण तीन महिन्यापर्यंत पडून राहिलेल्या घरावर वृष्टीवर्षाव झाला नाही,'

ही बाब खोटी ठरते. हा एक गुंतागुंतीचाच प्रश्न आहे.''

''महाराज, यातील दोन्ही वचने खरी आहेत. खोटे काहीच नाही.''

''महाराज, घटिकार कुंभार शीलवान, धार्मिक आणि पुण्यवान होता. तो आपल्या अंध व म्हाताऱ्या मातापित्याचे पालनपोषण करून त्यांची श्रद्धाभावाने सेवा करीत होता. एकेवेळी तो दुसऱ्या गावाला गेला असता त्याला न विचारताच लोकांनी त्याच्या घरावरील छप्पर काढून घेतले आणि त्या साहित्यांनी बुद्धाची कुटी शाकारून दिली. याप्रमाणे त्याचे घर उजाड व बरबाद केले, तरी घटिकारास त्याचा राग आला नाही किंवा याबद्दल दुःखही झाले नाही. एवढेच नव्हे तर आपल्या घराचे छप्पर बुद्धाची कुटी शाकारण्याच्या कामी आले, म्हणून त्यास आनंद झाला आणि आनंदाने भरून गेलेल्या मनाने तो विचार करू लागला की, 'अहो, संसारात सर्वश्रेष्ठ भगवान बुद्ध माझ्याप्रती प्रसन्न होवोत, त्या पुण्याचे फळ त्या घटिकारास तात्काळ मिळाले.''

''महाराज, एवढ्याशा गोष्टीवरून बुद्धाचे चित्त कधीही चंचल होत नसते. महाराज, पर्वतराज सुमेरू असा आहे की, मोठ्यात मोठे वादळ आले तर तो कधीही हलत नाही. कितीही मोठमोठ्या नद्या जरी सागराला येऊन मिळाल्या तरी तो महासागर कधी भरत नाही की, त्याला ओहोटी येत नाही. महाराज, असेच बुद्धाचे सुद्धा असते. ते एवढ्याशा गोष्टीवरून कधीच चंचलचित होत नाहीत.''

जगातील सर्व लोकांच्याप्रती बुद्धाच्या मनात असीम अनुकंपा होती, त्यामुळेच त्या कुटीवर वृष्टी वर्षाव झाला होता. महाराज, दोन बाबींमुळे बुद्ध आपल्या योगशक्तीने उत्पन्न केलेल्या वस्तूंचा उपयोग करण्याचा चमत्कार दाखवीत नाही. ती दोन कारणे अशी – १) देवता आणि मनुष्य बुद्धांना आवश्यक अशा वस्तूंचे दान करून त्या पुण्यबळाने आवागमनाच्या दुःखमय जंजाळातून मुक्त होतील. आणि २) बुद्ध आपल्या ऋद्धिबळाच्या चमत्काराच्या आधारावर आपला जीवनचरितार्थ चालवितात, अशी टीका इतर लोक करू नयेत. याच दोन कारणांमुळे बुद्ध आपल्या योग बळाने निर्माण केलेल्या कोणत्या वस्तूंचा उपयोग करीत नाहीत.

''महाराज, जरी स्वतः ब्रह्मदेवाने किंवा इंद्राने त्याच्या कुटीवर पावसाचा वर्षाव होऊ दिला नसता तर ते सुद्धा योग्य न ठरता निदंनीयच ठरले असते. कारण यावरून देखील हे बुद्ध आपल्या मायेचा प्रताप दाखवून जगाला भुरळ घालून वश करतात, असेच लोक म्हणाले असते. यासाठी त्यावेळी काहीही न करणे हेच यांच्यासाठी योग्य होत. महाराज, बुद्ध स्वतःसाठी कधीही काही मागत नसतात, म्हणूनच त्यांच्याकडे

कुणीही वाईट दृष्टीने बोट दाखवू शकत नाही.''

''बरोबर आहे, भंते नागसेन, आपण जे सांगितले, ते मी सहर्ष मान्य करतो.''

## ४९. बुध्दाची जात

''भंते नागसेन, भगवंतानी स्वतः सांगितले आहे की, 'हे भिक्षूंनो, मी आत्मयज्ञ करणारा एक ब्राह्मण आहे.' तसेच दुसऱ्या एकेठिकाणी त्यांनीच सांगितले आहे की, 'हे शैल, मी एक राजसम्राट आहे.''

''भंते, भगवान बुद्धांनी खरोखरच असे सांगितले असेल की, 'हे भिक्षूंनो, मी आत्मयज्ञ करणारा एक ब्राह्मण आहे.' तर त्यांनी हे तरी खोटे सांगितले असले पाहिजे की, 'हे शैल, मी एक राजसम्राट आहे.' असे खरोखरच सांगितले असेल तर 'हे भिक्षूंनो, मी एक आत्मयज्ञ- करणारा ब्राह्मण आहे.' असे त्यांनी सांगितलेले ते खोटे असले पाहिजे. महाराज, एक तर ते क्षत्रिय असू शकतील. एकाच वेळी ते दोन्हीतर असू शकत नाही. हे सुद्धा एक सामान्य माणसाला न उलगडणारे कोडे आहे. कृपाकरून आपणच ते सोडवून द्या.''

''महाराज, एका कारणाने भगवान बुद्ध ब्राह्मण आणि क्षत्रिय दोन्ही एकाचवेळी ठरतात. आणि म्हणूनच त्यांची दोन्ही वचने सत्य ठरतात.''

''भंते नागसेन, असे ते कोणते बरे कारण आहे?''

### बुद्ध ब्राह्मण आहेत

महाराज जेवढी काही पापे आणि वाईट गोष्टी आहेत, बुद्धापासून त्या समस्त बाहेर निघून गेल्या आहेत, नाश पावल्या आहेत, एकदम दूर निघून गेल्या आहेत व तुटून क्षीण पावल्या आहेत. यामुळेच त्यांना ब्राह्मण म्हणणे शक्य आहे. ज्यांनी आपल्यातील सर्व संशय आणि भ्रम दूर केले आहे, त्यांनाच ब्राह्मण असे म्हणतात. सत्यार्थाने भगवान बुद्ध असेच आहेत. म्हणूनच त्यांना ब्राह्मण म्हणतात.

''महाराज, ज्याची तृष्णा नष्ट झाली, जो जन्ममृत्यूच्या आवागमनातून मुक्त झाला, ज्याला पुन्हा जन्म ग्रहण करावा लागणार नाही, ज्यांनी वाईट विचार व वासनांचा समूळ त्याग करून स्वतःला एकदम परिशुद्ध केले आणि जो दुसऱ्या कोणावरही अवलंबून न राहता स्वतःवर पूर्णतः निर्भर आहे, त्यालाच ब्राह्मण म्हणतात. सत्यार्थाने बुद्ध हे असेच आहेत, म्हणूनच त्यांना ब्राह्मण म्हणतात.''

''महाराज, जे उच्च, श्रेष्ठ, सुंदर आणि दैवी भावना उराशी बाळगून पवित्र जीवन

जगतात, त्यांनाच ब्राह्मण म्हणतात. सत्यार्थाने भगवान बुद्ध हे असेच आहेत. म्हणूनच त्यांना ब्राह्मण म्हणतात.''

''महाराज, जो स्वतः अभ्यासक असून इतरांनासुद्धा विद्यादान करणारा आहे, दान ग्रहण करणारा आहे. इंद्रियावर ताबा ठेवणारा आहे, आत्मसंयमी आहे, कर्तव्यपरायण आहे, आणि जो चांगल्या परिपाठाच्या परंपरेची जोपासना करणारा आहे, त्यालाच ब्राह्मण म्हणतात. सत्यार्थाने भगवान बुद्ध असेच आहे, म्हणूनच ते ब्राह्मण आहेत.''

''महाराज, जो सदैव चारही ब्रह्म विहाराच्या भावनेत (समाधीची एक अवस्था) स्वतःच्या चित्ताला गुंतवून ठेवतो. त्यालाच ब्राह्मण म्हणतात. सत्यार्थाने बुद्ध हे असेच आहेत. म्हणूनच ते ब्राह्मण आहेत.''

''महाराज, ज्याला पूर्वजन्माचेसुद्धा पूर्णतः ज्ञान आहेत, त्यालाच ब्राह्मण म्हणतात. सत्यार्थाने भगवान बुद्ध हे असेच आहेत, म्हणूनच त्यांना ब्राह्मण म्हणतात.''

''महाराज, भगवान बुद्धाचे 'ब्राह्मण' हे नाव त्यांच्या मातापित्यांनी, भावानी, बहिणीनी, मित्रांनी किंवा आप्तानी, इतर संबंधितानी, कोणत्या श्रमण ब्राह्मणानी किंवा देवतांनी दिलेले नाही, तर विमोक्ष ज्ञानदर्शनाचा त्यांना लाभ झाल्यामुळे त्यांना हे नाव प्राप्त झाले आहे. बोधिवृक्षाखाली मारसेनचा पराभव करून तिन्ही काळातील पापांचा नाश करून, सर्वज्ञतेचा त्यांनी लाभ करून घेतल्यामुळे त्यांना 'ब्राह्मण' हे नाव पडले आहे.''

''महाराज, याच कारणामुळे भगवान बुद्धांना ब्राह्मण म्हणण्यात येते.''

''पण, भंते नागसेन, भगवान बुद्धांना 'राजसम्राट' असे कोणत्या कारणाने म्हणतात?''

## बुद्ध राजसम्राट आहेत

''महाराज, जो राजपाट चालवतो, सर्व ठिकाणी आपली शासन सत्ता प्रस्थापित करतो, त्यालाच 'राजसम्राट' असे म्हणतात. महाराज, भगवान बुद्धसुद्धा दहा हजार लोकांवर आपले धर्मराज्य चालवत आहेत; आणि सर्व देवता, ब्रह्मा, श्रमण आणि ब्राह्मणासह संपूर्ण संसारावर त्यांची शासनसत्ता प्रस्थापित झाली आहे. म्हणून भगवान बुद्धास 'राजसम्राट' असे म्हणतात.''

''महाराज, जो सर्व लोकांना आपल्या आज्ञेत ठेवतो, आपल्या आप्तेष्टांची प्रीती संपादन करतो, शत्रूंचे पारीपत्य करतो, ज्याची यश आणि कीर्ती दूरवर पसरलेली असते,

जो सर्व बळांनी संपन्न असतो आणि जो आपली श्वेतपताका उंच उभारतो, त्यालाच 'राजसम्राट' असे म्हणतात. महाराज, भगवान बुद्धाने सुद्धा दुष्ट मारसेनेच पूर्णतः परिपत्य केले आहे आणि देवता व मानवांना आनंदित केले आहे, दहा हजार लोकात त्यांचे यश व कीर्ती गाजली आहे, ते क्षमाबळाने दृढ असून समस्त ज्ञान शक्तीने युक्त आहेत. श्वेत, निर्मल अशा विमुक्तीरूपी श्वेतछत्र त्यांनी उंच उभारले आहे, म्हणूनच ते 'राजसम्राट' आहेत.''

''महाराज, जो आपल्या काया, वाचा व मनाच्या शुद्धाचरणाने मर्जी संपादन करणारास म्हणेल इतके बक्षिस देतो, त्यालाच 'राजसम्राट' असे म्हणतात. भगवान बुद्धसुद्धा काया, वाचा व मनाच्या शुद्धाचरणाने मर्जी संपादन करतात आणि दुःखमुक्त करून जगात सर्वश्रेष्ठ असे बक्षिस निर्वाण फळ देतात. म्हणूनच ते 'राजसम्राट' झाले आहेत.''

''महाराज, राजन्याच्या विरूद्ध आचरण करणाराची जो निर्भत्सना करतो, त्यास दंड देतो, त्यास कारागृहात डांबून ठेवतो किंवा याहूनही अधिक कडक शिक्षा देतो, त्यालाच 'राजसम्राट' असे म्हणतात. महाराज, त्याचप्रमाणे भगवान बुद्धसुद्धा निर्लज आणि दुराग्रही स्वभावामुळे बुद्धांनी सांगितलेल्या धर्मविनयाविरूद्ध आचरण करणाऱ्या असंतुष्ट व्यक्तींची निर्भर्त्सना करतात, त्यास अपमानीत करतात आणि एवढेच नव्हे तर कधी आपल्या शासनसत्तेबाहेर घालवून देण्याची सुद्धा शिक्षा देतात. म्हणूनच भगवान बुद्ध 'राजसम्राट' झाले आहेत.''

''महाराज, पूर्वी होऊन गेलेल्या राजांनी सांगितलेल्या न्याय व नियमांना लागू करून धर्मपूर्वक शासन चालवतो आणि आपल्या प्रजेला प्रिय बनतो तसेच धर्मबळाने जो आपल्या राजगादीला सांभाळणाऱ्या राजवंशाला चिरकाळपर्यंत टिकून राहण्याकरिता योग्य बनवतो, त्यालाच 'राजसम्राट' असे म्हणतात. महाराज, त्याचप्रमाणे भगवान बुद्धाने पूर्वीपासून चालत आलेल्यसा बुद्ध राजाचे नियम आणि न्याय आपल्या शासन सत्तेत लागू केले आहेत. ते सर्वश्रेष्ठ असे जगताचे धर्मगुरू ठरले आहेत. देवता आणि मनुष्यांना ते प्रिय आहेत. तसेच आपल्या धर्मबळाने त्यांनी आपली शासनसत्ता चिरकालपर्यंत चालावी म्हणून तशी सोय आधीच करून ठेवली आहे. म्हणूनच ते सर्वश्रेष्ठ असे धर्मराज्याचे 'राजसम्राट' झाले आहेत.''

''महाराज, याच कारणामुळे भगवान बुद्ध ब्राह्मण आणि क्षत्रिय दोन्ही एकाचवेळी होऊ शकतात. या कारणांचे मोजमाप अत्यंत चतुर भिखू एका कल्पात सुद्धा करू शकत नाही. तेव्हा मी यापेक्षा अधिक सांगण्याची आवश्यकता नाही. मी जे काही

थोडक्यात समजावून सांगितले, त्यावरून आता आपण समजून घ्यावे.''

''ठीक आहे. भंत नागसेन, आपण सांगितलेला सिद्धांत मी सहर्ष मान्य करतो.''

## ५०. धर्मोपदेश केल्यानंतर भोजन करू नये.

''भंते नागसेन, भगवंतानी सांगितले आहे की, आधी धर्मोपदेश करून तेथे भोजन करू नये. 'हे ब्राह्मण, ज्ञानी लोक असे कधी करत नाही. धर्मोपदेशांच्या मोबदल्यात काही घ्यावयास भगवान बुद्ध कधी आपली सहमती देत नाहीत. हे ब्राह्मण धर्मानुसार आचरण करणाराचे असेच असते.' तथापि लोकांना धर्मोपदेश करीत असता सर्वप्रथम भूमिकेचा विस्तार करतांना भगवान बुद्ध दानाचीच खूप प्रशंसा करीत असतात. त्यानंतरच शालाविषयी काही उपदेश करीत. सर्व लोकेश्वर त्या भगवंताचया उपदेशाने प्रभावित झालेले देवता आणि मनुष्य सर्वच खूप दान देते. तेव्हा त्यांनी आणलेले दान सर्व भिक्षू आनंदाने ग्रहण करीत.''

''भंते 'धर्मोपदेश करून भोजन करू नये.' या भगवंताच्या वचनात जर यथार्थ सत्य असेल, तर 'धर्मोपदेश करीत असता भगवंत सर्वप्रथम दानाची प्रशंसा करीत होते.' असे म्हणणे संयुक्तिक वाटत नाही. आणि जर 'धर्मोपदेशाची सुरवात सर्वप्रथम भगवंत दानाच्या प्रशंसेने करीत असतील तर धर्मोपदेश करून तेथे भोजन घेऊ नये, असे ते कधीच म्हणू शकत नाही. ते कां, बरं भंते, जो दानास खरोखरच पात्र आहे, तो जर श्रद्धावान गृहस्थासमोर दानाची प्रशंसा करू लागला तर ते आणखी अधिक दान देणारच.' आणि ते दान जो ग्रहण करील ते त्या धर्मोपदेशाचाच मोबदला ठरल्यावाचून कसे राहील? हा गुंतागुंतीचाच प्रश्न आहे. कृपाकरून स्पष्ट करून सांगावे.''

''महाराज, 'धर्मोपदेश करून भोजन स्वीकारू नये कारण, ज्ञानी लोक ते उचित मानत नाहीत. धर्मोपदेश करावयाच्या मोबदल्यात काही घेण्याकरीता बुद्ध कधी संमती देत नाहीत. हे ब्राह्मण, धर्म विनयानुसार आचरण करणारे असेच वागतात.' असे भगवंत म्हणाले ते सत्य आहे. आणि हे सुद्धा सत्य आहे की, भगवंत उपदेश सुरू करीत असता सर्वप्रथम दानाची प्रशंसा करीत होते. असे करून ते प्रथम त्यांच्या चित्ताला प्रभावीत करीत असत व नंतरच शील पालनाचा उपदेश करीत असत. ही सर्व बुद्धापासून चालत परंपरा आहे.''

### लहान मुलास खेळणी देणे

''महाराज, लहान मुलास सर्वप्रथम, एखादी बाहुली, विटी दांडू, बाबा गाडी, चक्री, पेला, धनुष्य इत्यादी खेळायला देतात. आणि इच्छेनुसार त्याच्याकडून कार्य

करवून घेतात. याप्रमाणेच सर्वप्रथम भगवान बुद्ध दानाची प्रशंसा करून श्रोत्यांचे चित्त आकर्षित करून घेऊन नंतरच शील पालन करावयाचा उपदेश देत असतात.''

### आजाऱ्यास तेल मालीश करणे

''महाराज, वैद्य लोक सर्वप्रथम रोग्यास चार-पाच दिवसपर्यंत तेलाची मालीश करावयास सांगतात. त्यामुळे त्याच्या शरीरात तरतरी येऊन थोडी शक्ती येते. त्यानंतर औषधी दिली जातं. महाराज, तसेच भगवान बुद्धाचे सुद्धा उपदेश करण्याविषयी समजावले.'' ''महाराज, दान करणाऱ्या दात्यांचे चित्त अत्यंत कोमल व मृदू असते. त्यामुळे ते दानरूपी पुलावरून किंवा नावेवर बसून संसार सागराच्या पैलतारीला सहज निघून जातात. याच कारणाने भगवान बुद्ध सर्वप्रथम त्यांच्या कर्मभूमीची ओळख करून देतात. याचा अर्थ ते उलटसुलट पद्धतीने त्यांच्याकडून दान मागतात, असा होत नाही.''

### दान कसे मागितले जाते

''भंते, उलटसुलट पद्धतीने कसे काय दान मागितले जाते?''

''महाराज, दान दोन प्रकारचे आहे - १) प्रत्यक्ष कृती करून आणि २) प्रत्यक्ष याचना करून. एकप्रकारे उलटसुलट रीतीने दान मागणे चांगलेही आहे. परंतु दुसऱ्यसा प्रकारे ते वाईटही आहे. त्याचप्रमाणे एक प्रकारे याचना करून उलटसुलट रीतीने दान मागणे चांगलेही आहे, तसेच दुसऱ्या प्रकारे तसे करणे वाईटही आहे.''

### अ) प्रत्यक्ष कृती करून मागणे वाईटच

''कोणती कृती करून उलटसुलट रीतीने दान मागणे वाईट आहे?''

''एखादा भिक्षू दान मागण्यासाठी गृहस्थाच्या घरी गेला असता अनुचित जागी उभा राहतो. हे प्रथम वाईट करून उलटसुलट रीतीने दान मागणे होय. चांगला भिक्षू याप्रमाणे निंद्य कृत्य करून अशा उलटसुलट पद्धतीने कधीच दान ग्रहण करीत नाही. जी व्यक्ती असे आचरण करतो तिला बुद्ध शासनात निंदनीय, वाईट, पतीत आणि अपात्र समजण्यात येते. तिला वाईट मार्गाने जीविका चालविणारी आहे असे समजण्यात येते.''

''महाराज, याशिवाय एखादा भिक्षू भिक्षाटनासाठी एखाद्या गृहस्थाच्या घरी गेला असता अनुचित जागी जाऊन उभा राहतो; आणि आपल्याकडे कुणाचे तरी लक्ष जाऊन त्यांनी आपणास भिक्षा द्यावी. अशा उद्देशाने आपली मान मोराप्रमाणे लांब करून इकडे

तिकडे आत डोकावून पाहतो. हे सुद्धा प्रथम वाईट कृत्य करून उलटसुलट पद्धतीने दान मागणेच होय. उत्तम भिक्षू याप्रमाणे निंदनीय कृत्य करून उलटसुलट पद्धतीने दान मागून ते ग्रहण करीत नाही. जो व्यक्ती अशी करते तिला बुद्ध शासनात निंदनीय, वाईट, पतीत आणि अपात्र समजण्यात येते. तिला अनुचित मार्गाने जीविका चालवणारी आहे असे मानण्यात येते.''

''महाराज, याशिवाय एखादा भिक्षू मान हलवून, भुवयांची खूण करून किंवा इशारा करून भिक्षा मागतो. हे सुद्धा उलटसुलट रीतीने भिक्षा मागणेच होय. जो उत्तम भिक्षू आहे, तो याप्रमाणे निंदनीय कृत्य करून उलटसुलट मार्गाने शिक्षा मागून ती तो ग्रहण करीत नाही. जो भिक्षू असे करतो, त्यास बुद्ध शासनात निंदनीय, वाईट, पतीत आणि अपात्र समजण्यात येते. त्याला अनुचित मार्गाने जीविका चालवणारा आहे असे समजण्यात येते.''

## ब) उचितपणे दान मागणे

''कोणती कृती करून दान मागणे उचित आहे?''

''महाराज, एखादा भिक्षू भिक्षाटनासाठी निघाला असता गृहस्थाच्या दरवाजावर जाऊन उचित ठिकाणी जाऊन अगदी सावधानपणे सतर्क आणि शांतपणे उभा राहतो. जर कुणाची काही देण्याची इच्छा असेल तर तो तेथे थांबतो अन्यथा पुढे निघून जातो. हे चांगले कृत्य करून दान मागणेच होय. जो चांगला भिक्षू आहे, तो याप्रमाणे उचित कृत्य करून मागितलेले दान ग्रहण करतो. जो भिक्षू असे आचरण करतो तो बुद्ध शासनात प्रशंसेस पात्र, उत्तम, श्रेष्ठ आणि सभ्य असे समजण्यात येते. परिशुद्ध जीविका चालविणारा आहे, असे त्याला मानण्यात येते. महाराज, देवाधिदेव भगवान बुद्धाने सुद्धा सांगितले आहे की–''

''ज्ञानी लोक कधीही याचना करीत नाहीत, आर्यजण याचना करणे हे वाईट कृत्य समजतात. आर्यलोक भिक्षेसाठी गेले असता अगदी शांतपणे दाराशी जाऊन उभे राहतात हीच त्यांची याचना होय.''

## क) तोंडाने मागून घेणे वाईटच

''कोणत्या प्रकारचे दान तोंडाने मागितले असता वाईट समजले जाते?''

''महाराज, कुणी भिक्षू 'मला चीवर, भिक्षा पात्र, शयनासन द्या किंवा ग्लान प्रत्यय द्या.' असे उघडपणे तोंडाने बोलून मागून घेतो. तेव्हा अशारीतीने मागून घेणे

वाईट आहे. जो चांगला भिक्षू आहे, तो अशारीतीने कधीच कुणाला मागून घेत नाही. जो भिक्षू असे करतो त्यास बुद्ध शासनात निंदनीय, वाईट, पतीत आणि अपात्र असे समजण्यात येते. त्याला अनुचितरीतीने जीविका चालविणारा आहे. असे समजण्यात येते.''

''महाराज, कुणी भिक्षू 'मला अमकी वस्तू द्या' असे इतरांजवळ उघडपणे बोलून मागत असतो. याप्रमाणे इतरांकडे याचना करून तो लोभी होतो. अशी याचना करणे सुद्धा वाईटच आहे. जो चांगला भिक्षू आहे तो कधीही कुणाकडे याप्रमाणे याचना करून काहीही मागून घेत नाही. जो भिक्षू अशाप्रकारे याचना करतो त्यास बुद्ध शासनात निंदनीय, वाईट, पतीत आणि अपात्र समजण्यात येते. त्याला अनुचितरीतीने जीविका चालवणारा आहे, असे समजण्यात येते.''

''महाराज, याशिवाय कुणी भिक्षू लोकांना असे सांगत असतो की, भिक्षूंना असे दान दिले पाहिजे, ते ऐकून लोकसुद्धा त्यांनी सांगितलेल्यसा वस्तूंचेच दान देत असतात. याप्रमाणे बोलून वस्तूंचे दान मागणेसुद्धा वाईटच आहे. जो चांगला भिक्षू आहे तो अशाप्रकारे कधीच आपणाकरिता दान मागून घेत नाही. जो भिक्षू असे करतो त्यास बुद्ध शासनात निंदनीय, वाईट, पतीत आणि अपात्र समजण्यात येते. त्याला अनुचित मार्गाने जीविका चालवणारा आहे, असे समजण्यात येते.''

''महाराज, एकदा धर्म सेनापती स्थवीर सारिपुत्र सूर्य मावळला आणि रात्री आजारी पडले. तेव्हा धर्म सेनापती स्थवीर महामोग्गलायन त्यांनी त्यांना विचारले की, 'तुम्हाला कोणते औषध पाहिजे?' यावर स्थवीर सारिपुत्रांनी सांगितलेले औषध आणले गेले. परंतु एवढ्यातच स्थवीर सारिपुत्रांना स्मरण झाले की, 'अरे ! मी तर हे औषध स्वतःच्य इच्छेप्रमाणे मागवून घेतले आहे. हे फार वाईट झाले, असे केल्याने माझी जीविका अशुद्ध ठरेल.' तेव्हा त्यांनी ते औषधच सेवन केले नाही. याप्रमाणे मागून घेणेसुद्धा वाईटच आहे. जो चांगला भिक्षू आहे, तो कधीही मागून घेत नाही. असे करणारी व्यक्ती बुद्ध शासनात निंदनीय, वाईट, पतीत आणि अपात्र समजली जाते. तिला अशुद्ध जीविका चालवणारी आहे, असे समजण्यात येते.''

### ड) उचितपणे याचना करणे

''उचितपणे केलेली याचना उत्तम म्हणून समजण्यात येते ती कोणती बरे?''

''महाराज, एखाद्या भिक्षूला आवश्यकता पडली असता तो आपल्या गुरूबंधूना किंवा ज्या लोकांनी वर्षावासासाठी निमंत्रित केले आहे, त्यांना तो सूचित करतो. याप्रमाणे

मागून घेणे उचित समजले जाते. जो उत्तम भिक्षू आहे, तो याच पद्धतीने मागणी करून ते ग्रहण करतो. जो भिक्षू असे करतो त्यास बुद्ध शासनात सन्मानीत उत्तम, श्रेष्ठ आणि सत्पात्र म्हणून समजण्यात येते, त्याला पवित्र जीविका चालवतो, असे समजण्यात येते. भगवान अर्हत सम्यकसंबुद्धांनी सुद्धा असे दान स्विकारण्याची अनुमती दिली आहे. महाराज, कुशक भारद्वाज नावाच्या ब्राह्मणांनी दिलेल्या निमंत्रणाचा अस्विकार केला होता. कारण, ओढूनताणून तो मिथ्यातर्काद्वारे भगवान बुद्धांना दोष लावू इच्छित होता. म्हणूनच भगवान बुद्धांनी त्याच्या निमंत्रणाचा अस्विकार केला होता.''

## ५१. भगवान बुद्धाच्या भोजनात देवतांनी भरलेले दिव्य ओज

''भंते, भगवंताच्या भोजनात देवता लोक नेहमीच दिव्य ओज भरून देत होते की, केवळ मद्दवात व मधुपायस या दोनच भोजनांत त्यांनी दिव्य ओज भरले होते?''

''महाराज, नेहमीच भगवान बुद्ध भोजन करीत असता देवता लोक त्यांनी घास उचलला की, त्यात दिव्य ओज भरून देत असत. ज्याप्रमाणे राजाने घास उचलला की, त्याचा स्वयंपाकी त्या प्रत्येक घासावर कोशिंबीर घालतो. तद्वतच देवता लोक भगवंताच्या भोजनसमयी प्रत्येक घासावर ओज भरीत असत. वेरंजामध्येसुद्धा कोरड्या जवाचे भोजन करीत असता देवतांनी ते दिव्य ओजांनी वेळोवेळी भिजवले होते. त्यामुळे भगवान बुद्धाचे शरीर अगदी पुष्ट बनले होते.''

''भंते, भगवान बुद्धाचे शरीर अगदी पुष्ट व निरोगी राहावे म्हणून ज्या देवता नेहमी तत्पर राहत असत, त्या देवता धन्य होत. ठीक आहे. भंते नागसेन, मी एवढ्यावरून समजले आहे.''

## धर्मोपदेशासाठी बुद्धाची अनुत्सुकता

''भंत नागसेन, तुम्ही लोक म्हणता की, 'भगवान बुद्ध चार असंख्य एक लाख कल्पापासून जगाचा उद्धार करण्यासाठी क्रमाक्रमाने आपल्या ज्ञानात वृद्धी करून शेवटी बुद्धत्वाचा लाभ करून सर्वज्ञ झाले.''

## धनुर्धर

''तथापि सर्वज्ञतेचा लाभ होताच धर्मोपदेश करण्याकरिता कटिबद्ध न होता केवळ शांतीच्या आनंदात स्वस्थपणे मग्न राहावे असे त्यांना वाटू लागले. भंते नागसेन, जसा की, एखादा लढवय्य सैनिक किंवा त्याचा शिष्य लढाईत न जाता अनेक दिवस पर्यंत लढाईचे डावपेच शिकून पूर्णपणे तयार होताच अगदी लढाई सुरू व्हावी आणि त्यासाठी

त्याने लढाईच्या मैदानात न जाता स्वतः पळ काढावा. त्याचप्रमाणे बुद्धाने चार असंख्य एक लाख कल्पापासून या जगाच्या उद्धारासाठी हळूहळू आपल्या ज्ञानात वृद्धी करून धर्मोपदेश करण्यापासून माघार घेतली.''

## कुस्तीबाज मल्ल

''भंते नागसेन, ज्याप्रमाणे एखादा कुस्तीबाज मल्ल किंवा त्यांचा शिष्य अनेक दिवसपर्यंत कुस्तीचे सर्व डावपेच शिकून त्यात तो तरबेज व्हावा; पण ज्या दिवशी कुस्तीची दंगल असेल, त्याचदिवशी त्याने आखाड्यातून पलायन करावे. अगदी तसेचस भगवान बुद्धाने चार असंख्य एक लाख कल्पापासून या जगाच्या उद्धारासाठी क्रमाक्रमाने आपल्या ज्ञानाची वृद्धी करून शेवटी बुद्धत्व प्राप्त करून सर्वज्ञतेचा लाभ होताच धर्मोपदेशाच्या आखाड्यातून पलायन केले.''

''भंते नागसेन, याप्रमाणे भगवान बुद्ध भयभीत झाल्यामुळे असे पळून जाऊ इच्छित होते की, आपण लोकांना आपल्या उपदेशाने समजावू शकत नाही किंवा आपल्यात अभाव आहे. तेव्हा लोकांना काय धर्मोपदेश करावा असे वाटून की यथार्थाने त्यांना सर्वज्ञतेचा लाभ झाला नव्हता, त्यामुळे त्यांनी धर्मोपदेश करण्यापासून माघार घेतली होती? यातील खरे कारण कोणते? ते कृपाकरून समजावून सांगावे आणि माझ्या शंकाचे निरसन करावे.''

''भंते, जर 'बुद्धाने चार असंख्य एक लाख कल्पापासून क्रमाक्रमाने आपल्या ज्ञानाची वृद्धी करून शेवटी बुद्धत्वाची प्राप्ती करून सर्वज्ञता संपादन केली.' हे खरे असेल तर सर्वज्ञता संपादन करताच धर्मोपदेश करायचे सोडून शांतपणे स्वस्त राहण्याचा विचार त्याच्या मनात आला, असे म्हणणे योग्य वाटत नाही. आणि जर ''सर्वज्ञ बुद्ध झाल्यानंतर धर्मोपदेश न करता शांतपणे कालक्रमण करीत राहण्याचे विचार मनात आले होते.'' हे खरे मानावे तर 'भगवान बुद्धाने चार असंख्य एक लाख कल्पापासून या जगाच्या उद्धारासाठी क्रमाक्रमाने आपल्या ज्ञानाचा विकास करून शेवटी बुद्धत्व प्राप्त करून सर्वज्ञ झाले.' असे म्हणणे संयुक्तिक वाटत नाही. कृपा करून हे एक कोडे सोडवून माझ्या शंका दूर कराव्यात.''

''महाराज, वरील दोन्ही विधाने अगदी बरोबर आहेत. हे खरे आहे की, बुद्धाने चार असंख्य एक लाख कल्पापासून या जगाच्या उद्धारासाठी क्रमाक्रमाने आपल्या ज्ञानाची वृद्धी करून शेवटी बुद्धत्वाचा लाभ पदरात पाडून घेतला व सर्वज्ञ बुद्ध झाले. तथापि सर्वज्ञ बुद्ध होतात धर्मोपदेशाकडे न वळता स्वस्थ व शांत राहण्याची त्यांना इच्छा

झाली. परंतु अशी इच्छा होण्याचे एक कारण आहे. प्रथम भगवान बुद्धांना हा धर्म अत्यंत गंभीर, सुक्ष्म, दूर्ज्ञेय आणि दुर्बोध आहे असे दिसून आले आणि दुसरे असे की, या जगातील लोक कामवासनात अतिशय चिकटून गेले आहेत. तसेच खोट्या भौतिक सुखात अडकून पडले आहेत. हे दुष्य पाहून धर्मोपदेश करावयासाठी मागे पुढे करू लागले. मी कुणाला शिकवावे ? कोणत्याप्रकारे शिकवावे ? त्यांना असे प्रश्न निर्माण होताच लोकांचा कमकुवतपणा त्यांच्या दृष्टीस पडला. म्हणून त्यांनी धर्मोपदेश करण्यापासून माघार घेतली.''

### एखादा वैद्य

''महाराज, कुणी एक वैद्य आजाराने जर्जर झालेल्यसा बिमाराला पाहून असा विचार करतो की, कोणत्या उपायाने व कोणत्या औषधाने याचा आजार दूर होईल? त्याचप्रमाणे प्रथम भगवान बुद्धांना आपला धर्म अत्यंत गंभीर व दूर्बोध वाटला आणि दुसरे असे की, कामवासनांच्या कैफात मस्त असलेल्या लोकांना खोट्या, मिथ्या दृष्टीचे शिकारी बनलेले पाहून धर्मोपदेश करण्यासाठी त्यांचे मन मागेपुढे करू लागले की, 'अशा अवस्थेत मी कुणाला शिकवावे ? कसे शिकवावे ?' शेवटी लोकांचा कमकुवतपणा त्यांच्या दृष्टीस पडला.''

### कोणी राजा

''महाराज, कोणी एक क्षत्रिय राजा गादीवर बसल्यानंतर आपल्या द्वारपालास, शरिररक्षकास, सभासदास, नागरिकास, शिपायास, चतुरंगीनी सेनाध्यक्षास, कोषपालास, अधिकाऱ्यांना, मांडलिक राजास आणि असेच इतर अनुभवी लोकांना पाहून अशी विचारण करतो की, मी राज्य कारभार कसा चालवावा. त्याचप्रमाणे भगवान बुद्धाने प्रथम हे पाहिले की, हा धर्म अत्यंत गंभीर, सूक्ष्म, दुर्ज्ञेय आणि दुर्बोध असा आहे आणि त्यातल्या त्यात या जगातील सर्व लोक कामवासनाच्या कैफात मस्त झालेले असून खोट्या सत्कायदृष्टीच्या (आत्मवादाच्या) पाशात अडकूल पडले आहेत. हे पाहून धर्मोपदेश करण्यासाठी त्याचे मन मागे पुढे पाहू लागले की, 'मी कुणाला शिकवावे? कसे शिकवावे?' असा विचार करीत असता लोकांचा कमकुवतपणा त्यांच्या नजरेस पडला.''

### सर्व बुद्धांची एकच पद्धती

''महाराज, आणि सर्वच बुद्धांनी ही एकच पद्धती आहे. ती असी की, ब्रह्माते प्रार्थना केल्यावरच ते धर्मोपदेश करीत असतात. त्याचे कारण काय? तर त्यांचे असे आहे की, त्यावेळी सर्व तपस्वी, परिव्राजक, श्रमण आणि ब्राह्मण हे सर्वच ब्रह्माचे उपासक

होते व त्याचीच ते पूजा अर्चा करीत होते. तेव्हा त्या बलवान, यशस्वी, विख्यात, ज्ञानी, अलौकिक आणि सर्वांचा नेता असा ब्रह्म भगवान बुद्धाच्या चरणांवर नम्रपणे नतमस्तक होऊन नमस्कार करीत असलेला पाहून समस्त देवगणासह सर्व लोक आपोआपच शरण येतात. त्याचे धर्मसिद्धांत मान्य करून त्याचे ते उपसक बनतात. महाराज याच कारणामुळे ब्रह्माने प्रार्थना केल्यानंतरच भगवान बद्ध धर्मोपदेश करू लागतात.''

**राजाकडून सत्कार**

''महाराज, ज्याप्रमाणे एखाद्या राज किंवा राजमंत्री एखाद्या पुरूषाचा खूप मानसन्मान करत असतो. त्याची सेवा करत असतो. तो असे करत आहे असे पाहून समस्त प्रजानन देखील त्याचा तसाच सनमान व सेवा करू लागते. महाराज, याप्रमाणेच बुद्धासमोर ब्रह्म नतमस्तक झालेला पाहून समस्त देवगणासह सर्व लोक आपोआपच बुद्धाच्या चरणावर नतमस्तक होतात. ब्रह्मा ज्याची पूजा करतो, त्याचीच सर्व जग पूजा करते. याच कारणामुळे ब्रह्मा स्वतःच सर्व बुद्धांनी धर्मोपदेश करण्यासाठी नम्रभावे प्रार्थना करत असते. याप्रमाणे ब्रह्मांनी प्रार्थना केल्यानंतरच बुद्ध धर्मोपदेश करत असतात.''

''ठीक आहे. भंते नागसेन, आपण उत्तम प्रकारे समजावून सांगितले. खूप उदाहरणे देऊन माझ्या मनातील किल्मीश बाहेर काढले. आपले म्हणणे मी मान्य करतो.''

**(प्रकरण पाचवे समाप्त)**

## (ख) योगी कथा (पुढे चालू)

### ५२. बुद्धाचे कुणीही गुरू नाहीत

"भंते नागसेन, भगवंतानी स्वतःच सांगितले आहे की–

**नसे आचार्य कोणी मज इथे, न मज समही दूजा।**
**नर–देवे व्यापिल्या भूवरी या, ममतुल्य पाही प्रजा[१]।।"**

"परंतु दुसऱ्या ठिकाणी त्यांचीच सांगितले आहे की, 'हे भिक्षूंनो, **आंडार कालाम** हा माझा गुरू होता आणि मी त्यांचा शिष्य, तथापि त्यांनी मला आपल्या बरोबरीच्या आसनावर बसवून माझा बहुमान केला.[२]"

"भंते नागसेन, माझ कुणीही आचार्य नाही, आणि माझी बरोबरी करू शकेल असाही कोणी नाही. देवता आणि मनुष्यांसह या समस्त पृथ्वीतलावर माझ्याशी तुतलना होईल, असा कुणीही नाही." असे जर भगवंतानी खरोखरच सांगितले असेल, तर 'भिक्षूंनो, आडार कालाम हा माझ गुरू असता आणि मी त्यांचा शिष्य, तथापि, त्यांनी मला आपल्या बरोबरीच्या आसनावर बसवून माझा सन्मान केला.' असे त्यांचे म्हणणे खोटे ठरते. आणि त्यांनी यथार्थाने 'आडार कालाम हा माझा गुरू होता' इत्यादी बरोबर सांगितले असेल तर 'माझा कुणीही आचार्य किंवा गुरू नाही.' इत्यादी त्यांनीच सांगितलेले वचन खोटे ठरते. हे सुद्धा एक न उकलणारे कोडेच आहे. कृपाकरून आपण त्याची उकल करून सांगावे."

"महाराज, वरील दोन्ही वचने भगवंताचीच केली असून ती अगदी बरोबर आहेत. परंतु पहिल्या वचनात त्यांनी सांगितलेली घटना बुद्ध व्हावयाच्या पूर्वीच असून त्यावेळी ते सम्यकसम्बुद्ध झाले नव्हते. तेव्हा ते केवळ बोधिसत्व होते त्यावेळी 'आडार कालाम गुरू होता.' असे सांगितले आहे."

"महाराज, सम्यकसम्बुद्ध होण्यापूर्वी जेव्हा केवळ ते बोधिसत्व होते त्यावेळी

---

१. *बुद्धत्व प्राप्तीनंतर भगवान बुद्ध धम्मचक्रप्रवर्तन करण्याकरिता वाराणसीकडे जात असता वाटेत भेटलेल्या 'उपक' परिव्राजकाने त्याची पृच्छा केली की, हे मित्रा, तुमचे गुरू कोण? यावर तथागतांनी उत्तरादाखल ही गाथा म्हटली. पहा, विनयपिटक–पृष्ठ ७९*

२. *पहा, मज्झिमनिकायः 'बोधिराज कुमार' सुत्त–८५*

**पुनः भोजन करणे**

"महाराज पोटभर, गळ्यापर्यंत भोजन करून कोणी एक मनुष्य अगदी संतुष्ट व प्रसन्न झाला असेल. आता त्याच्या पोटात पुनः काही खाण्यासाठी मुळीच जागा शिल्लक राहिली नाही. त्यामुळे तो अगदी एखाद्या काठीप्रमाणे ताठ झाला असेल. परंतु त्यानंतर सुद्धा तो चांगले ठासून बळजबरीने तेवढेच भोजन करू लागला, तर महाराज, त्या माणसाला सुख लाभले काय?"

"मुळीच नाही. भंते, त्याच्या खाण्यामुळेच त्याला अजीर्ण होऊन त्याला मृत्यू होईल."

"महाराज, त्याप्रमाणेच हे जग एकावेळी फक्त एकाच बुद्धाला धारण करू शकते, दुसऱ्याला नाही."

"भंते, परंतु धर्मगुणाचे सामर्थ्य अधिक वाढले असता ही पृथ्वी काय म्हणून हळूडोलू लागते?"

**दोन गाड्यांचे वजन एकाच गाडीवर**

"महाराज, समजा बहुमुल्य रत्नांनी दोन गाड्या पूर्णपणे भरलेल्या आहेत. आणि त्यानंतर एका गाडीतीतल रत्ने काढून त्या दुसऱ्या गाडीत भरण्यात आली तर महाराज, ती गाडी दोन गाड्यांच्या भरतीचे ओझे सांभाळून शकेल काय?"

"मुळीच नाही, भंते, अशाने तिची नाभी फाटून जाईल, तिचे आरे तुटून जातील आणि तिचा कणाही मोडून जाईल."

"महाराज रत्नाच्या भारानेच ती गाडी अशारीतीने मोडून जाईल की नाही?"

"होय भंते, निश्चितच मोडून जाईल."

"महाराज, याप्रमाणेच धर्माचा भार अधिक झाल्यामुळे ही पृथ्वी हलूडोलू लागते. म्हणूनच जेव्हा जेव्हा इतर बुद्ध सांगितले आहे, तेव्हा तेव्हा भगवंतानी हा उपदेश अवश्य केला आहे. याशिवाय दोन बुद्ध एकाचवेळी अस्तित्वात येऊ शकत नाही, याचे उत्तम कारण ऐका–"

**शिष्य संघात झगडा होऊ नये**

"महाराज, जर एकाचवेळी दोन बुद्ध अस्तित्वात आले तर 'हे आमचे बुद्ध ते तुमचे बुद्ध,' असे म्हणून त्यांच्या संघात आपसातच फुट पडून भांडण उपस्थित

होऊन दोन मंत्र्यांच्या दोन गटांत होणाऱ्या भांडणाप्रमाणे स्थिती होण्याची शक्यता आहे. महाराज, दोन बुद्ध एकाचवेळी अस्तित्वात न येण्यास हेही एक कारण आहे. महाराज, संसारात एकाचवेळी दोन बुद्ध उत्पन्न होत नाही, याचे अजून एक कारण ऐका–''

### बुध्द हे सर्वश्रेष्ठच असतात

''महाराज, एकाचवेळी जर दोन बुद्ध अस्तित्वात आले, तर 'बुद्ध हे सर्वश्रेष्ठ पुरूषोत्तम असतात' हे वचन खोटे ठरेल. ते सर्वात महान आहेत. ते सर्वात अग्रगण्य आहेत. ते सर्वात वैशिष्टपूर्ण आहेत. ते सर्वोत्तम आहेत. प्रवर आहेत, ते अप्रतिम आहेत, त्यांच्यासमान दुसरा कोणी असू शकत नाही. ते अप्रतिभाग आहेत. हे चिरकालापासून ऐकलेले वचन खोटे ठरेल. महाराज, संसारामध्ये एकाचवेळी दोन बुद्ध अस्तित्वात न येण्याचे हेही एक कारण आहे. महाराज, सर्व बुद्धाची हीच पद्धती आहे. एकाचवेळी दोन बुद्ध कधीही अस्तित्वात येत नाही. हा त्यांचा स्वभावच आहे. असे का होते?''

### एकावेळी एकच मोठी वस्तू अस्तित्वात येते

''कारण सर्वज्ञ बुद्धाचे गुणच महान असतात. महाराज, याशिवाय पृथ्वी तलावर जेवढ्या मोठ्या वस्तू म्हणून समजल्या जातात, त्या एकावेळी एक याच पद्धतीने अस्तित्वाला येत असतात. महाराज, पृथ्वी महान आहे, तीही एकच आहे? महासागर महान आहे; तोही एकच आहे; सुमेरू पर्वत महान आहे, तोही एकच आहे; आकाश मोठे आहे, ते सुद्धा एकच आहे; देवेंद्र, मार व महाब्रह्मा हे सर्व महान आहेत, ते सुद्धा एकएकटेच आहेत. त्याचप्रमाणे अर्हत सम्यकसंबुद्ध भगवान महान आहेत, म्हणूनच ते संसारात एकएकटेच आहेत. महाराज, यावरून समजून घ्यावयास पाहिजे की, अर्हत सम्यकसंबुद्ध भगवान हे एकावेळी एकच उत्पन्न होतात असे जे म्हटले आहे, ते अगदी बरोबर आहे.''

''भंते नागसेन, उपमांच्याद्वारे हा प्रश्न तुम्ही उत्तम प्रकारे समजावून सांगितला माझ्यासारख्यां बुद्धिमानाचे तर सोडाच पण एखादा मूर्ख माणूसही हे विश्लेषण ऐकून सहजपणे समजू शकतो. ठीक आहे, भंते नागसेन, तुम्ही जे सांगितले, ते मी मान्य करतो.''

## ५४. महाप्रजापती गौतमीचे वस्त्रदान

''भंते नागसेन, भगवंताची मावशी महाप्रजापती गौतमी ही जेव्हा भगवंताला वर्षावासाकरिता[१], चीवर दान देण्यासाठी आली, तेव्हा त्यांनी तिला सांगितले होते की,

बुद्धाने 'धम्मदायाद' नामक सूत्राचा उपदेश करतांना अल्पेच्छतेची स्तुती करीत असता स्वतःच म्हटले आहे की, 'हे भिक्षूंनो, तोच सर्वात श्रेष्ठ, पूजनीय आणि स्तुतीस पात्र आहे. जो अल्पेच्छ व संतुष्ठ राहणारा आहे.' महाराज, या सर्व संसारात बुद्धापेक्षा पूजनीय, महान किंवा उंच असा कुणीही नाही. बुद्ध हेच एकमात्र सर्वश्रेष्ठ, सर्वज्ञान संपन्न आणि उच्च असे आहेत. महाराज, देवगण आणि मनुष्यांच्या मेळाव्यात भगवान बुद्धाच्या पुढे उभे राहून मानवगामिक नावाचा देवपुत्र संयुक्त निकायात म्हणाला होता की–''

**''राजगृहाच्या पर्वतात विपुल सर्वात श्रेष्ठ आहे,**
**हिमालयाच्या पर्वतात सेत, तारांगणांत सूर्य,**
**जलाशयांत श्रेष्ठ आहे समुद्र, नक्षत्रात चंद्रमा,**
**देवतांनी युक्त समस्त संसारी मानतात**
**अग्र तथागत बुद्ध.''**

''महाराज माणवगामिक देवपुत्राने जे म्हटले ते अगदी यथार्थच म्हटले आहे याचा स्वीकार स्वतः भगवान बुद्धाने सुद्धा केला होता.''

''महाराज धर्मसेनापती सारिपुत्रसुद्धा म्हणाले की, 'मारसेनेचे दमन करणाऱ्या एकट्या बुद्धावरच श्रद्धा ठेवावी, एकट्या बुद्धालाच शरण जावे आणि प्रणाम करावा, तर हा महान भवसागर पार करू शकाल.''

''देवाधिदेव भगवान बुद्धसुद्धा म्हणाले की, 'हे भिक्षूंनो, लोकांच्या हितासाठी, लोकांच्या सुखासाठी, त्याच्यावर अनुकंपा करून त्यांच्यात एकोपा निर्माण करण्यासाठी तसेच देवगण आणि मनुष्यांच्या कल्याणासाठी एकाच व्यक्तीचे उत्पन्न होणे सार्थक आहे आणि ती व्यक्ती म्हणजे अर्हत सम्यकसंबुद्ध तथागत होत.''

''ठीक आहे भंते नागसेन, जसे आपण सांगितले, तसेच ते मी स्वीकार करतो.''

## ५५. गृहस्थ राहणे उत्तम की भिक्षू?

''भंते नागसेन, भगवंतानी असे सांगितले आहे की, 'हे भिक्षूंनो, गृहस्थ असो की भिक्षू असो, पण नियमानुसार योग्यमार्गाने चालणारांची मी स्तुती करतो. हे भिक्षूंनो' असाच व्यक्ती समानरूपाने ज्ञान, धर्म आणि पुण्याचा उत्तराधिकारी होऊ शकतो.''

''भंते पांढरे शुभ्र वस्त्र परिधाण करणारे, विषय सुखाचा आस्वाद घेणारे स्त्री पुत्रांच्या मोहजाळात अडकून पडलेले, काशीच्या सुगंधित, चंदनचूर्णाने आपल्या अंगाचे

उटणे करणारे, नाना प्रकारच्या माळा, गंध व उटण्याचा वापर करणारे, रूपये पैशाच्या व्यवहार चक्रात सापडलेले तसेच आपल पगडी रत्न व मोत्यांनी सजवणारे गृहस्थ सुद्धा योग्य आचरणाने ज्ञान, धर्म व पुण्याचे उत्तराधिकारी होऊ शकतात आणि आपल्या डोक्याचे मुंडन करणारे, केवळ काषाय वस्त्र धारण करणारे, भिक्षेवर आपला जीवन निर्वाह करणारे, चार शीलसमुहाचे पालन करणारे तसेच तेरा धुत गुणानुसार राहणारे प्रवर्जित भिक्षूसुद्धा योग्य आचरणाने ज्ञान, धर्म आणि पुण्याचे उत्तराधिकारी होऊ शकतात. तर भंते, गृहस्थ आणि भिक्षू यांच्यात फरक तो काय राहिला? असे असेल तर तप करणे व्यर्थ आहे, भिक्षू होण्यात काहीच स्वारस्य नाही शिक्षापदाचे पालन केल्याने काहीच फळप्राप्ती होत नाही, धुत गुणानुसार जीवन घालवण्यात काहीच अर्थ नाही. जर सहजपणे निर्वाणपद प्राप्त होऊ शकते तर तशी नानाप्रकारची दुःखे भोगण्याची गरज काय?''

''महाराज, दोन्ही वचने भगवान बुद्धाचीच असली तरी प्रवर्जित व गृहस्थ यांच्यात फरक आहे.''

''महाराज जर कुणी प्रवर्जित 'मी प्रवर्जित भिक्षू आहे' असे म्हणून गर्वाने फुगून गेला आणि योग्य आचरण करीत नसेल, तर त्याचे भिक्षू बनणे व्यर्थ होय. त्यांनी कितीती ज्ञान प्राप्त केले असले, तरी त्याची त्याला काहीच फळप्राप्ती होणार नाही. त्याचे प्रयत्न व्यर्थ समजावे. यात पांढरे शुभ्र वस्र परिधान करण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. महाराज, एखाद्या भिक्षूचे हे असे असते, तर एखादा गृहस्थ धर्मविनयानुसार योग्य आचर करीत असेल, तर तो ज्ञान, धर्म व पुण्याचा उत्तराधिकारी होऊ शकतो. महाराज, एखादा प्रवर्जित भिक्षू देखील धर्माच्या विनयानुसार आचरण करून ज्ञान, धर्म व पुण्याचा उत्तराधिकारी होऊ शकतो. प्रश्न येथे कोणते जीवन जगतो हा नसून कसे जीवन जगतो हा आहे.''

''महाराज, असे असले तरी भिक्षू हाच अधिपती आहे. प्रवर्जेत अनेक गुण आहेत, त्याचे मोजमाप करता येत नाही. प्रवर्जेच्या गुणांचा अंदाजच लावता येत नाही. महाराज, ज्याप्रमाणे यथेच्छ वरदान देणाऱ्या मणीरत्नांच्या गुणांचे मूल्यमापन करणे शक्य नाही. त्याचप्रमाणे प्रवर्जेचे गुण अथांग व अगणित आहेत. प्रवर्जेत विविध गुण आहेत. त्यांचा अंदाज लावणे अशक्य आहे.''

''महाराज, ज्याप्रमाणे महासमुद्राच्या तरंगाची गणती करता येत नाही, त्याचप्रमाणे प्रवर्जेत गुण पुष्कळ आहेत, विविध आहेत, अथांग आहेत. प्रवर्जेच्या गुणांचा कोणालाच

---

*प्रतिमोक्षाचे २२७ नियम आहेत. २५० का म्हटले हेच कळत नाही.*

''ठीक आहे. भंते नागसेन, तुम्ही जे काही सांगितले, त्या वचनांचा मी स्वीकार करतो.''

## ५७. भिक्षूंचा चीवर त्याग

''भंते नागसेन, भगवान बुद्धाचा धर्म महान आहे, शाश्वत सत्य आहे, उत्तम आहे, श्रेष्ठ आहे, अत्युच्च आहे, अनुपमेय आहे, परिशुद्ध आहे, विमल आहे, स्वच्छ आणि दोषरहित असा आहे. या धर्माच्या पावित्र्याकडे जोपर्यंत कोणी श्रोतापत्ती फळ प्राप्त करून घेत नाही तोपर्यंत गृहस्थ असतांनाच चांगले शिक्षण दिले पाहिजे, कारण पुन्हा तो चीवराचा त्याग करून परत गृहस्थ जीवनात येणार नाही. श्रोतापन्न झाला की, आनंदाने कोणाला प्रवर्जित करावे?''

''असे कां?''

''कारण की, असे किती तरी वाईट लोक या विशुध्द धर्मात प्रवर्जित होऊन नंतर पुन्हा चीवर त्याग करून गृहस्थ बनतात. ते असे करीत असल्यामुळे इतर लोकांना असा निष्कर्ष काढण्याची संधी मिळते की, 'श्रमण गौतमाचा धर्म उत्तम नसावा. म्हणून तर इतके लोक चीवर त्याग करून परत गृहस्थ जीवनात येतात,' यासाठीच माझा हा प्रस्ताव आहे.''

### तलावाची उपमा

''महाराज, समजा एखादा अत्यंत पवित्र, निर्मळ आणि शीतल पाण्याने लबालब भरलेला तलाव आहे. आता घाण व चिखल माखलेला कोणी मनुष्य त्या तलावाच्या अगदी जवळ जाऊन त्यात आंघोळ न करता तो परत आला तर महाराज, दोष लावणारे लोक कोणाला दोषी ठरवतील, त्या मनुष्याला की त्या तलावाला?''

''भंते, दोषी ठरवतील त्या मनुष्यालाच, तो तलावाच्या अगदी जवळ जाऊन देखील आंघोळ न करता परत आला. तेव्हा त्याची इच्छाच तशी नाही, तर तलाव बळजबरीने त्याला पकडून आंघोळ करून देणार आहे काय? यात तलावाचा काय दोष?''

''महाराज, त्याचप्रमाणे भगवान बुद्धाने विमुक्तीरूपी सुंदर जलाने काठोकाठ भरलेला सद्धधर्मरूपी तलाव निर्माण केला आहे. जे लोक क्लेशाच्या घाणीने बरबटलेले असतील, त्यांनी या तलावात स्नान करून आपल्या सर्व क्लेशाची घाण धुऊन काढावी पण जर कोणी या तलावाजवळ येऊन तेथे घाणीने माखलेले अंग न धुता व आंघोळ

न करता तसेच पर जात असेल, तर त्या माणसाचा तो दोष मानला जाईल. लोकही त्याला असेच म्हणतील की, 'बुद्ध धर्मात प्रवर्जित होऊन तिथे टिकाव धरू न शकल्यामुळे परत गृहस्थ झाला.' तो स्वतः उद्योग करून निर्वाणरूपी शुद्धीचा आपल्या शरीराला वाराही लागू देत नाही, तर त्याला बुद्धधर्म बळजबरीने पकडून शुद्ध करील काय? यात बुद्ध धर्माचा काय दोष आहे?

**वैद्याची उपमा**

"महाराज, कोणी एक भयंकर आजाराने जर्जर झालेला मनुष्य एखाद्या चांगल्या हुशार वैद्याला पाहतो, ज्याचा चिकित्सा करण्यात व उपचार करण्यात हातखंडा आहे. परंतु त्याला पाहून देखील तो त्याच्या जवळही जात नाही व त्याच्याकडून उपचारही करवून घेत नाही. आणि तसाच आजारी अवस्थेत परत येतो. तेव्हा यात लोक कोणाला दोष देतील ! त्या वैद्याला की, त्या रोग्याला ?"

"भंते, लोक त्या रोग्यालाच दोष देतील. एवढ्या चांगल्या निष्णात वैद्याकडे जाऊन तर तो त्याच्याकडून औषधोपचार न करताच परत आला, तर वैद्य काय त्याला बळजबरीने पकडून औषध देईल? यात त्या वैद्याचा काय दोष?"

"महाराज, त्याचप्रमाणे भगवान बुद्धांनी आपल्या सद्धम्मरूपी पेटीत सर्वच क्लेशरूपी रोगांवर अचूक असे औषध भरून ठेवले आहे. जे कोणी चतुर व बुद्धिमान असतील, तेही औषध पिऊन आपल्या क्लेशरूपी भयंकर आजारातून मुक्त होतील. परंतु जर कोणी हे औषध न पिताच क्लेशरूपी रोगाने जर्जर अवस्थेतच परत आले आणि गृहस्थ झालेत तर लोक त्यालाच दोष देतील. आणि म्हणतील की 'हा बुद्ध धर्मानुसार प्रवर्जित तर झाला, पण आळसामुळे टिकाव न धरू शकल्या कारणारने परत गृहस्थ बनला.' यांनी स्वतः काहीच प्रयत्न केले नाही."

**अन्नसत्राची उपमा**

"महाराज, कोणी एक भुकेला मनुष्य एका धर्मार्थ चाललेल्या अन्नसत्रात जाऊन तेथे काही न खाता न पिता तसाच उपवाशी परत आला, तर लोक कुणाला दोषी ठरवतील? त्या मनुष्याला की, त्या धर्मार्थ चालवण्यात येणाऱ्या अन्नसत्राला?"

"भंते, त्या उपवासाने व्याकूळ असलेल्या माणसालाच दोष देऊन म्हणतील की, 'हा भुकेने व्याकूळ असून देखील ते पुण्यार्थ देण्यात येणारे भोजन न घेताच परत

‘‘महाराज, याप्रमाणेच ज्यांच्या पदरी अधिक पुण्य नाही, ज्यांच्यात कोणतेच वैशिष्ट्य नाही आणि जे बुद्धिमान आहेत, ते बुद्ध शासनात प्रवर्जित तर होतात परंतु त्या महान गौरवनीय प्रवर्जापदाचा भार सहन करून शकल्यामुळे स्वतःला तेथे सांभाळू शकत नाही आणि अधःपात झाल्यामुळे चीवराचा त्याग करून ते पुन्हा गृहस्थ बनतात. ते कां? तर व्रर्जाभूतीच त्यांच्या पात्रतेपेक्षा किती तरी पटीने महान असते. याप्रमाणे ते प्रवर्जाभूमीच्या महान पदास पाहून घेतात.’’

२) प्रव्रजा किती शुद्ध आणि निर्मळ आहे, हे त्यांना कसे दिसून येते?

## कमळ पानावरील पाणी

‘‘महाराज, कमळाच्या पानावर पाण्याचे थेंब कधीच थांबत नाही, ते गडबडून खाली सांडते, अस्ताव्यस्त होते आणि त्याला थोडेसुद्धा चिकटून राहत नाही. असे कां? तर कमळाचे पानच अत्यंत परिशुद्ध व मळरहित असते.’’

‘‘महाराज, याप्रमाणेच जे शठ, कपटी, कुटील, आडमार्गाने जाणारे आणि वाईट विचाराचे असतात. ते प्रव्रजित तर होतात. परंतु बुद्धशासन अत्यंत परिशुद्ध, मळरहित, निष्कंटक, पवित्र व स्वच्छ असल्यामुळे तेथून त्याचा लवकरच अधःपात होतो घसरून पडतात आणि ते चीवर त्याग करून पुन्हा गृहस्थ होतात. त्याते ते टिकू शकत नाहीत, स्थिर राहू शकत नाहीत. असे कां? तर बुद्धाचे शासन इतके परिशुद्ध आणि निर्मळ आहे. याप्रमाणे त्यांना ही प्रव्रजा किती परिशुद्ध आणि निर्मळ आहे, हे दिसून येते.’’

३) मलिनता राखून ठेवणाऱ्या माणसांना प्रव्रजिताचे पवित्र जीवन जगणे शक्य नाही, हे त्यांना कसे समजून येते?

## महासागरातील प्रेत

‘‘महाराज, महासागरात कधीही प्रेत राहू शकत नाही. कोणाचेही प्रेत जर महासागरात पडले तर ते शक्य तितक्या लवकर किनाऱ्याला लागून जमिनीवर येऊन पडते. ते का? तर महासागराचा स्वभावगुणच महापुरूषासारखा असतो.’’

‘‘महाराज, याप्रमाणेच जे व्यक्ती सुस्त, निर्वीय कामाला कंटाळणारे, दुष्ट हृदयाचे आणि कुकर्मी लोक आहेत. ते बुद्धशासनात प्रवर्जित तर होतात. पण अर्हत, विमल, क्षीणश्रव इत्यादी महापुरूषांमध्ये त्यांची राहण्याची पात्रता नसल्याकारणाने ते लवकरच तेथून पलायन करतात आणि चीवर त्याग करून गृहस्थ बनतात. ते का ? तर बुद्धशासनात मलीन मनाच्या दुष्ट माणसांना प्रवर्जिताचे जीवन जगणे शक्य नाही. याप्रमाणे मलिनता

राखून असलेल्या दुष्ट माणसांना बुद्ध शासनात प्रवर्जित होऊन राहणे कधीच शक्य नाही.''

४) महान प्रव्रजेचे गौरवनीय महात्म्य सर्वसाधारण लोकांना समजणे हे त्याच्या बुद्धीच्या बाहेरचे कसे आहे?

## अजाण माणसाचे तीर चालवणे

''महाराज, जे अजाण, (अकुशल) अशिक्षित आणि चंचल स्वभावाचे तसेच ज्यांनी कोणतेच कौशल्य शिकून घेतले नाही, ते तीर मारून अंश पात्र देखील वेध घेऊ शकत नाहीत. त्यांचा तीर निशाना सोडून आजूबाजूला जाऊन पडेल. असे का? तर तीर चालवून सूक्ष्म केसाला छेदण्यासाठी श्रेष्ठप्रकारचे कौशल्य आवश्यक असते.''

''महाराज, याप्रमाणेच जे दुष्प्रज्ञ, जड, मूर्ख, मूढ आणि अडाणी आहेत. ते तर बुद्ध शासनात अवश्य प्रवर्जित होतात. पण चार आर्यसत्यांचे सूक्ष्म आणि उच्च गुण न समजल्यामुळे ते तेथे टिकाव धरून राहू शकत नाही. त्यांचे शीघ्रतापूर्वक पतन होते आणि ते चीवर सोडून गृहस्थ बनतात. असे कां ? तर आर्यसत्याचे ज्ञान अत्यंत सूक्ष्म व उच्च प्रतीचे आहे. याप्रमाणे महान प्रव्रजेचे महात्म्य समजणे सर्व साधारण लोकांच्या आटोक्याबाहेरचे आहे, असे त्यांना कळून येते.''

५) प्रवर्जितांना अधिक संयम पाळावा लागतो, हे त्यांना कसे दिसून येते ?

## घनघोर युद्ध

''महाराज, एखादा हुशार सैनिक भयंकर युद्धसंग्रामात गेला असता सर्वबाजूंनी शत्रूकडून घेरल्या गेला. तेव्हा शत्रूवीर हातात, तीर, तलवार व भाले घेऊन आपल्याकडेच येत आहेत, असे पाहून तो भयभीत झाला, घाबरून गेला आणि शेवटी मैदान सोडून पळून गेला. ते कां ? तर लढाईत स्वतःचे चहूबाजूंनी संरक्षण करावे लागत असते म्हणून.''

''महाराज, याप्रमाणेच जे स्वभावतःच संयमशील नाहीत, ज्यांना-कोणतेही पाप करावयाची थोडीसुद्धा लाज वाटत नाही, जे सुस्त आहेत, ज्यांच्या अंगी धैर्य नाही, जे स्वभावाने चंचल आहेत आणि जे मूर्ख जेथे तेथे चुकाच करीत असतात. ते बुद्ध शासनात प्रवर्जित तर होतात, परंतु प्रवर्जितांना फार मोठा संयम पाळावा लागतो, हे पाहून ते घाबरून जातात आणि तेथे टिकाव न धरू शकल्यामुळे चीवर सोडून पुनः गृहस्थ बनतात. असे कां ? तर बुद्धशासनात प्रवर्जितांना फार मोठा संयम पाळावा लागतो. याप्रमाणे बुद्ध शासनात प्रवर्जितांना किती संयम पाळावा लागतो, असे त्यांना दिसून येते.''

## फुलझाडातील कीडे

"महाराज, फुलात सर्वात उत्तम फूल मोगऱ्याचे आहे, त्याच्याही झुडपावर कधी कधी किटक पडतात आणि एक दोन फूले कुरतडून खाली पडतात. परंतु एक दोन फूले पडल्याने त्या झाडाची संपूर्ण सुंदरता काही नष्ट होऊन जात नाही. त्यावर जी काही फुले असतात हीच आपल्या सुगंधाने दाहीदिशांच्या वातावरणास सुगंधीत करून टाकतात."

"महाराज, त्याचप्रमाणे बुद्ध शासनात जे प्रवर्जित होऊन त्यानंतर चीवर त्याग करून गृहस्थ बनतात, ते त्या कीड लागून सौंदर्यहीन व सुगंधापासून वंचित झालेल्या फुलासमान समजावे. याप्रमाणे ते गृहस्थ जीवनात परत गेल्याने बुद्ध धर्मावर कोणत्याही प्रकारचा कलंक लागत नाही. कारण जे सामर्थ्यसंपन्न भिक्षू बुद्ध शासनात राहतात, त्यांच्यातील सुगंध निश्चितच देवता आणि मनुष्यांनीयुक्त अशा या सर्वसंसारात व्यापून टाकतो."

## कुरूंभकाची झाडे

"महाराज, ज्याप्रमाणे साळी नामक लाल धानाच्या शेतात कुरूंभक नावाची झाडे उगवून मध्येच वाळूनही जातात. परंतु त्यामुळे धानाच्या शोभीवंत शेताला कोणत्याही प्रकारे कीड लागत नाही. जो धान टिकून राहतो, त्याचेच सौंदर्य विशेष असते."

"महाराज, त्याचप्रमाणे जे बुद्ध शासनात प्रवर्जित होतात आणि त्यानंतर चीवर सोडून गृहस्थ बनतात, ते त्या लाल धानाच्या शेतामध्येच उत्पन्न होऊन वाळून गेलेल्या कुरूंभक नावाच्या झाडाप्रमाणे मध्येच सुकून जाणारे समजावे. याप्रमाणे त्यांनी चीवर त्याग करून पुन्हा परत गृहस्थ जीवनात गेल्यामुळे भिक्षूसंघाची शोभा थोडीसुद्धा कमी होत नाही. जे काही भिक्षू टिकून राहतात ते अर्हतपद प्राप्त करून घेण्यास पात्र होतात."

## रत्नातील निष्क्रिय भाग

"महाराज, येथेच्छ फळ देणाऱ्या रत्नामध्येसुद्धा एका भागात निष्क्रियता येऊ शकते. परंतु त्यामुळे त्यांची किंमत कमी होत नाही. कारण रत्नाचा जो स्वच्छ भाग असतो, त्याचेच तेज विशेष असते. ते पाहूनच लोकांना अतिशय आनंद होतो."

"महाराज, त्याचप्रमाणे बुद्ध शासनात जे प्रवर्जित होतात. आणि काही दिवसानंतर चीवर सोडून गृहस्थ बनतात, ते त्या रत्नाच्या निष्क्रिय भागासमान होत. परंतु त्यांनी याप्रमाणे चीवर सोडून निघून गेल्यामुळे बुद्ध शासनाला थोडासुद्धा कलंक

लागत नाही. जे भिक्षू टिकून राहतात, तेच समस्त देवता आणि मनुष्यांनी व्यापलेल्या या जगाला प्रसन्न करीत असतात.''

## चंदनाला लागलेली कीड

''महाराज, चांगल्या जातीच्या लाल चंदनाचा सुद्धा काही भाग कीड लागून सडून जातो. आणि सुगंधहीन होतो. परंतु त्यामुळे लाल चंदनाचे काहीच बिघडत नाही व त्याची किंमतही कमी होत नाही. त्यांच्या चांगल्या असलेल्या भागातच इतका सुगंध भरलेला असतो की, तो आजूबाजूचे सर्व वातावरण सुगंधित करून सोडतो.''

''महाराज, त्याचप्रमाणे जे बुद्ध शासनात प्रवर्जित होऊन नंतर चीवर त्याग करतात, ते त्या कीड लागलेल्या चंदनाच्या सडलेल्या भागा समान होत. त्यांनी अशाप्रकारे चीवर सोडले असले आणि गृहस्थ बनले असले तरी त्यामुळे बुद्धधर्माच्या पावित्र्यास काहीच कलंक लागत नाही. जे काही भिक्षू बनून टिकाव धरून राहतात त्यांच्याच शीलरूपी चंदनाच्या सुगंधाने देवता आणि मनुष्यासहीत सर्व लोक भारून जातात.''

''ठीक आहे भंते नागसेन, एकापेक्षा एक अशी अनेक उदाहरणे व उपमा देऊन आपण बुद्ध शासनाची विशुद्धता उत्तमप्रकारे दाखवून दिली. वस्तुतः चीवर सोडून जाणाऱ्यांना सुद्धा बुध्द शासन किती महान आहे व भिक्षू जीवन किती पवित्र आहे. हे दिसून येते, हे आपले म्हणणे मी सहर्ष मान्य करतो.''

## ५८. अर्हतांच्या वेदना

''भंते नागसेन, तुम्हा लोकांचे म्हणणे आहे की, 'अर्हतांना फक्त शारीरिक वेदनाच होत असतात, मानसिक वेदना होत नसतात.' तर मग भंते, मानसिक वेदनांवर त्यांचे नियंत्रण नसते काय?''

''होय महाराज, गोष्ट अशीच आहे.''

''भंते, अर्हतांनी आपल्या शारीरिक अनुभवांवर नियंत्रण मिळवून घेऊ नये, ही बाब बरोबर वाटत नाही. एखादी चिमणीसुद्धा आपल्या घरट्यावर अधिकार ठेवते.''

''महाराज, हे दहा गुण जन्मजन्मांतरी सुद्धा शरीराला चिकटून राहणारे आहेत. ते असे – (१) सर्दी, (२) गर्मी, (३) भूक, (४) तहान, (५) मलविसर्जन, (६) मूत्रविसर्जन, (७) थकवा, (८) म्हातारपण, (९) रोग आणि (१०) मृत्यू या अशा बाबी आहेत की, त्यावर अर्हतांचा कोणताच अधिकार चालत नाही.''

''भंते, आपल्या शारीरिक बाबीवर अर्हतांचा काहीच अधिकार चालत नाही.

याचे कारण काय? कृपाकरून मला हे समजावून सांगा.''

''महाराज, पृथ्वीवर राहणारे सर्वच जीव तिच्यावरून चालतात, फिरतात आणि आपले कामकाज करतात. महाराज, तर त्या सर्वांनाच त्या पृथ्वीवर अधिकार असतो काय? किंवा त्या सर्वांनी तिला वश करून घेतले असते काय?''

''मुळीच नाही भंते.''

''महाराज, त्याचप्रमाणे अर्हतांचे चित्त, शरीराच्या आधाराने परिवर्तीत होत असले तरी पण तिच्यावर ते अधिकार गाजऊ शकत नाहीत.''

''भंते, सर्वसाधारण लोक मानसिक आणि शारीरिक अशा दोन्ही प्रकारच्या वेदनांचा अनुभव करतात, याचे कारण काय?''

''महाराज, सर्व साधारण लोकांचे चित्त अभ्यासाद्वारे वश केलेले नसते म्हणूनच त्यांना शारीरिक आणि मानसिक या दोन्ही वेदनांचा त्रास होतो.''

**भुकेने व्याकुळलेला बैल**

''महाराज, चारापाणी न मिळाल्यामुळे भुकेने व्याकुळ असलेला शक्तिहीन बैल एखाद्या गवताच्या लहानशा कमजोर दोरीने किंवा एखाद्या वेलीनेसुद्धा बांधला जाऊ शकतो. परंतु तीच भुकेची आग क्रोधित होऊन भडकली तर चांगली मजबूत दोरीही तोडून पळून जाऊ शकतो. महाराज, याप्रमाणेच चित्त चंचल झाले असता शरीर तळमळून जाते आणि वापस जाण्याचा विचार करते. संभावना चित्त वेदनेमुळे थरथर कापू लागते, ओरडते आणि हायहाय करते. महाराज, याच कारणामुळे सर्वसाधारण लोकांना शारीरिक आणि मानसिक दोन्ही प्रकारच्या वेदना त्रास देत असतात.''

''भंते नागसेन, असे आहे तर अर्हतांना शारीरिक वेदनाच कां होतात, मानसिक कां होत नाहीत?''

''महाराज, अर्हत आपल्या मनातील भावनांचा अभ्यास करून पूर्णतः वश करून घेतात. त्यांचे मन पूर्णपणे त्यांच्या अधिकारात आलेले असते. ते आपल्या इच्छेप्रमाणे फिरवू शकतात. त्यांना जर काही दुःख झाले, तर जगाच्या अनित्यतेबद्दल दृढतापूर्वक विचार करतात, जणूकाही आपल्या चित्ताला समाधिरूपी खुंट्याला बांधून ठेवतात. यामुळे त्यांचे चित्त चंचल न होता, स्थिर आणि दृढ राहते. दुःखामुळे त्याचे शरीर कितीही तळमळू लागले व लोळू लागले, तरी त्यांच्या मनावर त्याचा काहीच परिणाम होत नाही. महाराज, याप्रमाणे अर्हतांना केवळ शारीरिक वेदना होतात, मानसिक वेदना

मुळीच होत नसतात.''

''भंते नागसेन, दुःखामुळे शरीर कितीही तळमळले, लोटांगण घेऊ लागले, तरी पण चित्त मात्र स्थिर आणि दृढ राहते, ही तर फारच मोठी गोष्ट झाली. कृपाकरून एखादी उपमा देऊन स्पष्ट करावे.''

### वृक्षाच्या बुंध्यासमान योग्याचे चित्त असते

''महाराज, समजा एखादे फार मोठे हिरवेगार झाड आहे. त्याचे खोड ही त्यामानाने फारच मोठे आहे. त्याच्या फांद्यासुद्धा चहुफेर लांबच लांब पसरल्या आहेत. तेव्हा कधी जोराचा वारा आला आणि सर्व फांद्या मागेपुढे व इतस्ततः हलू लागल्या असता महाराज, त्या वाऱ्याने त्याच झाडाचे ते खोड सुद्धा हलू लागेल काय?''

''भंते, मुळीच नाही.''

''महाराज, त्या खोडाप्रमाणेच अर्हतांचे चित्त स्थिर व दृढ समजले पाहिजे.''

''भंते नागसेन, किती आश्चर्य आहे ! किती अद्‌भूत आहे !! याप्रमाणे सतत प्रज्वलित राहणारा धर्मप्रदीप मी कधी आजपर्यंत पाहिला नव्हता.''

## ५९. गृहस्थाचे पाप

''भंते नागसेन, कोणी एका गृहस्थाने पाराजिक पाप केले आणि त्यानंतर तो प्रवर्जित झाला. आता त्याला हेही स्मरण राहिलेले नाही की, आपण गृहस्थ असतांना पाराजिक पाप केले होते आणि दुसऱ्याने सुद्धा कधी त्याला त्या पापाची आठवण करून दिली नाही. अशा अवस्थेत आता तो अर्हतपदाचा लाभ करून घेण्यासाठी प्रयत्न करीत आहे. तर त्याला अर्हतपदाचा लाभ करून घेण्यात यश मिळू शकणार नाही त्याचप्रमाणे-

''सत्यपथावर येण्याचा जो त्याचा हेतू होता, तो एकदमच नष्ट झाला आहे. त्यामुळे त्याला यश मिळणार नाही.''

''भंते नागसेन, तुम्ही लोक असे ही सांगत असता की, 'आपण केलेल्या पापांची आठवण होताच पश्चाताप होतो. पश्चातापामुळे चित्त गूढ बनते, चित्त गूढ बनल्यामुळे सत्याकडे त्याची गती वाढत नाही.' जर अशीच बाब असेल, तर पापांची आठवण होत नसल्यामुळे त्याला पश्चातापही होणार नाही व त्याचे चित्तसुद्धा गूढ बनणार नाही. आणि चित्तच जर गूढ बनले नाही. तर त्याची गती सत्याकडे कां बरे वाढणार नाही ? या गूढ प्रश्नाचे दोन उलटे परिणाम निघतात. तेव्हा जरा विचारपूर्वक उत्तर द्यावे.''

### शेतात बीज पेरणे व दगडावर बीज पेरणे

"महाराज, चांगल्या प्रकारे मशागत केलेल्या आणि उपजाऊ, ओलीत केलेल्या शेतात विचारपूर्वक वेळेवर चांगले बी पेरले तर ते उगवेल की नाही ?"

"होय भंते, अवश्य उगवेल."

"महाराज, तेच बी एखाद्या मोठ्या खडकावर फेकले, तर तेथे उगवेल काय?"

"मुळीच नाही, भंते"

"महाराज, तेज बीज चांगल्या उपजाऊ जमिनीत पेरले असता उगवते आणि खडकावर टाकले असता उगवत नाही, याचे कारण काय ?"

"भंते, खडकावर बीज उगवण्याचे हेतू (साधन) व उपलब्ध नाहीत. आणि साधन सामुग्रीशिवाय बीज उगवू शकत नाही."

"महाराज, त्याचप्रमाणे सत्याकडे गतिमान होण्याचे जे साधन (हेतू) होते, ते सर्व त्याचे नष्ट झाले आहेत. आणि साधनांशिवाय सत्याकडे गतिमान होणे शक्य नाही."

हवेत काठी तरंगू शकत नाही.

"महाराज, एखादी काठी, दगड, छडी किंवा लोखंडाचा गोळा हवेत फेकला असता तो तेथे पृथ्वीप्रमाणेच राहू शकेल काय?"

"मुळीच नाही, भंते !"

"महाराज, तो पृथ्वीवर तर राहू शकतो पण हवेत राहू शकत नाही, याचे कारण काय?"

"भंते तो हवेत स्थिर राहण्याकरिता हवेत काहीच साधन उपलब्ध नाहीत. तेव्हा साधनांशिवाय तो तेथे कसा राहू शकेल?"

"महाराज, त्याचप्रमाणे सत्याकडे गतिमान होण्याकरिता त्याचे कर्मफळबाधक ठरल्यावाचून राहणार नाहीत."

**पाण्यावर अग्नी जळत नाही**

"महाराज, पृथ्वीवर जसा अग्नी जळू शकतो तसाच तो पाण्यावरसुद्धा जळू शकेल काय?"

"मुळीच नाही. भंते !"

"कां नाही?"

‘‘भंते, अग्नी जळावयाची जी काही साधने असतात, ती पाण्यात उपलब्ध नाहीत. आणि साधनांशिवाय अग्नी जळू शकत नाही.’’

‘‘महाराज, सत्याकडे गतिमान होण्याकरिता त्याचे कर्मफळ बाधक ठरल्यावाचून राहणार नाही.’’

‘‘भंते नागसेन, या विषयावर अजून थोडा विचार करा. कारण आपण सांगितलेल्या गोष्टी अजूनही मला पटल्या नाहीत. आपण केलेल्या पापांचे स्मरण झाल्याशिवाय पश्चाताप होत नाही, तेव्हा तेथे अडचण ती कशी?’’

**न जाणता विष खाणे**

‘‘महाराज, विषाची ओळख नसता जर एखाद्याने विष सेवन केले, तर त्यामुळे तो मरणार की नाही?’’

‘‘भंते, तो निश्चितच मृत्यू पावेल.’’

‘‘महाराज, त्याचप्रमाणे त्यालाही त्याचे कर्मफळ बाधक ठरल्याशिवाय राहणार नाही?’’

**अजाणता अग्नीवरून चालणे**

‘‘महाराज, कोणी एक मनुष्य अजाणता अग्नीवरून चालू लागला, तर तो भाजेल की नाही?’’

‘‘भंते, अवश्य तो भाजेल.’’

‘‘महाराज, त्याचप्रमाणे जरी त्याने त्या मोठ्या पापाची आठवण केली नाही, तरी त्याची बाधा त्याच्या कार्यात अडथळा निर्माण केल्याशिवाय राहणार नाही.’’

**अजाणता सर्पदंश**

‘‘महाराज, एखाद्याला माहीत न होताच अतिशय विषारी साप चावला, तर तो मरणार की नाही?’’

‘‘भंते, यात काय शंका ! तो अवश्य मरेल.’

‘‘महाराज, त्याचप्रमाणे तो त्या मोठ्या पापांची जरी आठवण करीत नसला तरीपण त्याच्या जीवनात निश्चितच बाधा निर्माण करील.’’

**कलिंग देशाचा राजा**

"महाराज, आपणास हे माहीत आहे काय की, 'जेव्हा कलिंग देशाचा राजा सात रत्नांसह आपल्या हत्तीवर बसून त्याचया आप्तांसह भेटावयास जात असता त्याला माहित नसून देखील तो सरळ बोधिवृक्षावर जाऊ शकला नाही.' अगदी त्याचप्रमाणे स्वतः तो त्या मोठ्या जपाचे स्मरण करीत नसला, तरी पण तो सत्याकडे गतिमान मुळीच होऊ शकत नाही."

"भंते, बरोबर आहे. भगवान बुद्धाने सांगितलेली गोष्ट कुणीही बदलू शकत नाही. हे मी स्वीकार करतो."

## ६०. गृहस्थ आणि भिक्षू यांच्या कुशीलातील भेद

"भंते नागसेन, एक गृहस्थ दुःशील आहे आणि एक भिक्षू दुःशील (दुराचारी) आहे. या दोघांत फरक काय आहे? या दोघांचेही दुःशील असणे ही सारखीच बाब आहे काय? दोघांनाही त्याचे फळ सारखेच मिळते की, दोघांनाही मिळणाऱ्या फळात काही भेद आहे."

"महाराज, भिक्षू जरी दुःशील असला तरी दुःशील गृहस्थापेक्षा त्याच्यात हे दहा गुण अधिक व विशेष आहेत. या दहा गुणांमुळे तो आपली दक्षिणा शुद्ध करून घेतो. दुःशील गृहस्थापेक्षा दुःशील भिक्षेत हे दहा सद्गुण अधिक आणि विशेष आहेत- महाराज, १) भिक्षू जर दुःशील असला तरी तो बुद्धाविषयी अत्यंत श्रद्धावान असतो, २) धर्माच्याप्रती अत्यंत श्रद्धावान असतो, ३) संघाप्रती अत्यंत श्रद्धावान असतो, ४) आपल्या गुरूबंधुप्रती अत्यंत श्रद्धा बाळगणारा असतो, ५) सदैव धार्मिक चर्चेत रमून गेलेला असतो, ६) तो विद्वान असतो, ७) सभेमध्ये तो सभ्यपणाने वागत असतो, ८) निंदा भयामुळे तो आपल्या शरीरावर व वाणीवर पूर्णतः संयम ठेवतो, ९) त्याचा ओढा उन्नतेच्या पथाकडेच असतो आणि १०) दुसऱ्यणा भिक्षूंच्या संगतीत आपले जीवन घालवत असतांना जर काही पाप करीतही असला तरी ते सीमित असते. अतिशय संकोचपूर्वक ते तो लपून करतो."

"महाराज, ज्याप्रमाणे एखादी विवाहित स्त्री अत्यंत संकोचपूर्वक लपूनच पाप करते त्याचप्रमोण दुःशील भिक्षू अत्यंत संकोचपूर्वक लपूनच एखादे पापकर्म करतात. महाराज, हे दहा गुण दुःशील गृहस्थापेक्षा दुःशील भिक्षूंच्या अंगी अधिक व विशेष असतात."

"कोणत्या वरील दहा गुणांमुळे तो आपली दक्षिणा शुद्ध करतो? - १) भिक्षू वेश धारण करून तो आपली दक्षिणा शुद्ध करतो, २) ऋषीप्रमाणे आपल्या डोक्यांचे

मुंडण करून तो आपली दक्षिणा शुद्ध करतो, ३) भिक्षू संघात सहभागी होऊन तो आपली दक्षिणा शुद्ध करतो, ४) बुद्ध, धर्म व संघाला शरण जाऊन तो आपली दक्षिणा शुद्ध करतो, ५) अर्हतपदाच्या प्राप्तीसाठी प्रयत्नशील राहून योग्य वातावरणात वास्तव्य करून तो आपली दक्षिणा शुद्ध करतो, ६) बुद्धधर्माच्या उच्च विषयाच्या संशोधनात मग्न राहून तो आपली दक्षिणा शुद्ध करतो, ७) उत्तमोत्तम धर्मदेशना करून तो आपली दक्षिणा शुद्ध करतो, ८) धर्माला प्रकाशात आणू तो आपली दक्षिणा शुद्ध करतो, ९) बुद्धाला सर्वश्रेष्ठ मानून तो आपली दक्षिणा शुद्ध करतो आणि १०) उपोसथव्रताचे आचरण करून तो आपली दक्षिणा शुद्ध करतो. महाराज, वर सांगितलेल्या दहा गोष्टींचे प्रत्यक्ष आचरण करून तो आपली दक्षिणा शुद्ध करून घेतो.''

''महाराज, भिक्षू दुःशील असला, तरी तो याप्रमाणे आचरण करून दायकांनी दिलेली दक्षिणा (दान) सफल करतो. महाराज, एखादी वस्तू कितीही घाण, चिखल, धुळीने मळलेली असली, तरी तो पाण्याने स्वच्छ धुऊन काढली जाऊ शकते. त्याचप्रमाणे भिक्षू जरी दुःशील असला तरी तो चांगल्या प्रकारचे आचरण करून दायक लोकांनी दिलेली दक्षिणा (दान) सफल करून सोडतो.''

''महाराज, उकळते गरम पाणी सुद्धा भडकलेला जोरदार अग्नी विझवून टाकते. त्याचप्रमाणे भिक्षू जर दुःशील असला, तरी तो चांगल्या गोष्टीच्या आचरणात गतिमान राहून, दायकांकडून मिळालेली दक्षिणा सफल करून सोडतो.''

''महाराज, भोजन तरी स्वादिष्ट नसले तरी ते भूक नष्ट करते. त्याचप्रमाणे भिक्षू जरी दुःशील असला तरी तो चांगल्या आचरणाने दायकांकडून मिळालेली दक्षिणा सफल करून सोडतो. महाराज, मज्झिमनिकायत 'दक्षिणा विभंग' नावाचा गृहस्थ धर्मोपदेश करीत असता त्या देवाधिदेव भगवंतानी सांगितले आहे की, 'धर्म आणि श्रद्धेने युक्त होऊन जो शीलवान पुरूष दुःशील भिक्षूंना सुद्धा दान देतो, त्याला उत्तम कर्मफळ प्राप्त होते, त्या दायकांनी दिलेली दक्षिणा शुद्ध होऊन जाते.''

''भंते नागसेन, किती आश्चर्य आहे ! किती अद्भूत आहे !! मी तुम्हाला एक क्षुल्लक प्रश्न विचारला होता. परंतु तुम्ही तर अनेक उपमा आणि युक्तीवादाच्याद्वारे इतका सुंदर खुलासा करून सांगितला की, आता हेच ऐकत राहण्यात अमृताचे माधुर्य वाटू लागले आहे.''

''भंते, एखाद्या उत्तम स्वयंपाक्याला थोडेसे जरी मांस मिळाले, तरी त्यात मीठमसाले टाकून इतके स्वादिष्ट करून सोडतो की, राजासुद्धा ते मिटक्या मारीत खात

असतो. त्याचप्रमाणे मी तुम्हाला एक क्षुल्लक प्रश्न विचारला होता, परंतु तुम्ही अनेक उपमा आणि तर्क उपस्थित करून उत्तमरीतीने त्याचा खुलासा करून दिला. जेणेकरून ऐकणाऱ्यांना अमृताचे माधुर्य वाटू लागले.''

## ६१. पाण्यात जिवंतपणा आहे काय?

''भंते नागसेन, विस्तवावर पाणी ठेवले असता 'बुडबुड-खळखळ' असे अनेक प्रकारचे आवाज होतात. यावरून पाण्यातसुद्धा सजीवपणा असला पाहिजे !'' ते केवळ आनंद म्हणून तसा आवाज काढते की, त्याला काही दुःख झाल्यामुळे तसा आवाज करू लागते?

''महाराज, पाण्यामध्ये सजीवपणा किंवा प्राण मुळीच नसते. परंतु अग्नीच्या उष्णतेमुळे पाण्यात एक प्रकारची हालचाल (बाधा) निर्माण होते. आणि 'बुडबुड खळखळ' असा आवाज होऊ लागतो.''

''भंते नागसेन, दुसऱ्या मताला मानणारे अनेक लोक पाण्यात जीव आहे, असे म्हणतात. त्यामुळे ते थंड पाणी न पिता गरम करून पाणी पितात. आणि ते बौद्धांची नेहमी निंदा करतात की, 'हे बौद्ध भिक्षू एकपेशीय जीवांचा नाश करणारे आहेत.' तेव्हा अशा निंदकांना सडेतोड व योग्य उत्तर देऊन त्यांना चूप करावे.''

''महाराज, पाण्यात जीव नाही किंवा प्राणही नाही. तर अग्नीच्या अधिक उष्णतेमुळे पाण्यात एक प्रकारचा अडथळा निर्माण होऊन त्यातून 'बुडबुड-खळखळ' असा आवाज निघतो. महाराज, डबके, सरोवर, झील, तलाव, डोह आणि विहीरीचे पाणी कधी कधी फार मोठे वादळ आल्यामुळे वर उडून त्याची वाफ होईल. तेव्हा असा आवाज करते काय?''

''मुळीच नाही, भंते!''

''महाराज, पाण्यात जीव किंवा प्राण राहिला असता तर त्यावेळी सुद्धा त्याने अवश्य असा आवाज केला असता. महाराज, यावरून आपण समजून घ्यावे की पाण्यात सजीवपणा नाही. तर अग्नीच्या अधिक उष्णेमुळे त्याची अशी स्थिती होत असते.''

''महाराज, पाण्यात जीव किंवा प्राण मुळीच नाही याविषयी एक उदाहरण ऐकावे. पाण्यात तांदूळ टाकून एखाद्या भांड्यात ते झाकून ठेवले आणि ते भांडे अग्नीवर ठेवले नाही, तर बुडबुड असा आवाज करील काय?''

“नाही भंते, त्यावेळी काहीच फरक पडणार नाही व ते जसेच्या तसे चूप राहील.”

“महाराज, जर तेच भांडे तसेच उचलून चुलीवर ठेवले आणि खालून जाळ लावला तर मग ते चूप राहील काय?”

“नाही भंते तेव्हा त्यातून बुडबुडे निघू लागतील आणि ते वाफ फेकू लागेल. सर्व भांडे खदखदून भरून जाईल. तरंग उठतील, फेसावर फेस येईल आणि त्या भांड्यातील तांदूळ वरून खाली व खालून वर असे होऊ लागतील.”

“महाराज, तेच भांड्यातील पाणी थंड असता चंचल कां होत नाही? जसेच्या तसे शांत का राहते?”

“भंते, अग्नीच्या अधिक उष्णतेमुळे ते असे प्रवाही होऊन खदखदू लागते.”

“महाराज, यावरूनही पाणी सजीव नाही असे समजून घ्यावे.”

“महाराज, पाण्यात सजीवपणा नाही, याबद्दल पुन्हा एक उदाहरण ऐकावे. घरोघरी पाण्याने भरून ठेवलेले घडे असतात की नाही?”

“होय भंते, असतात.”

“महाराज, तर मग त्या घड्यातील पाणीसुद्धा उकळ्या येऊन, प्रवाही होते आणि खदखदू लागते काय?”

“नाही भंते, त्या घड्यातील पाणी अगदी शांत व स्वाभाविक स्थितीत राहते.”

“महाराज, महासमुद्राचे पाणी नेहमी अशांत असते, त्याच्या लाटावर लाटा उसळतात, तरंगावर तरंग उठतात, वरून खाली आणि खालून वर अशा उसळ्या मारतात, चढउतार होत राहते, लाटांचा मारा होत राहतो, त्याला भरती किंवा ओहोटी येते, फेसाळत असते, किनाऱ्याला टकरा मारीत असते आणि नेहमी भयंकर गर्जना करीत असते. असे तुम्ही ऐकले आहे काय?”

“होय भंते, असे मी ऐकले आणि पहिले सुद्धा आहे. महासमुद्राचे पाणी शंभर हात किंवा दोनशे हातसुद्धा वर उसळ्या मारते.”

“महाराज, घड्यातील पाणी कधी लाटांनी उसळ्यणा मारीत नाही किंवा आवाजही करीत नाही पण समुद्राचे पाणी मात्र उसळ्या मारते व आवाज करते, याचे कारण काय?”

"भंते, जोरदार हवा वाहत असल्यामुळेच समुद्राचे पाणी उसळ्या मारते व भयंकर आवाज करीत राहते. परंतु झाकलेल्या घड्यातील पाण्यावर हवेचा मुळीच प्रभाव पडत नाही त्यामुळे ते हलत नाही, डोलत नाही किंवा शब्दही करीत नाही, तर ते एकदम शांत राहते."

"महाराज, हवेच्या प्रभावाखाली येऊन पाणी उसळ्यणा मारू लागते. तसेच अग्नीच्या उष्णतेमुळे सुद्धा पाण्यात एकप्रकारची हरकत उत्पन्न होऊन भांड्यातील पाणी उकळू लागते आणि खदखदू लागते."

**नगाऱ्यात सजीवणा आहे काय?**

"महाराज, वाळलेल्या लाकडाच्या नगाऱ्याला गाई-गुरांच्या वाळलेल्या चामड्यांनीच लोक मढवत असतात ना?"

"होय भंते !"

"महाराज, त्या नगाऱ्यातसुद्धा जीव किंवा प्राण असतो काय?"

"नाही भंते!"

"महाराज, तर मग नगाऱ्यातून आवाज कसा काय येतो?"

"भंते, कोणी स्त्री किंवा पुरूषाने टोला मारताच नगाऱ्यातून आवाज बाहेर पडतो."

"महाराज, ज्याप्रमाणे कोणी स्त्री किंवा पुरूषाने टोला मारताच नगाऱ्यातून आवाज बाहेर पडतो त्याचप्रमाणे अग्नीच्या अधिक उष्णतेमुळे पाणी उकळते आणि खदखदू लागते. महाराज, या उदाहरणावरून तरी समजून घ्यावयास पाहिजे की, पाण्यात जीव किंवा प्राण मुळीच नसते."

"महाराज, मला देखील हे कोडे एकदम साफ करून टाकण्यासाठी काही प्रश्न विचारावेसे वाटतात. महाराज, सर्वच भांड्यात पाणी गरम केले असता त्यांतून आवाज निघतात की, काही विशिष्ट प्रकारच्या भांड्यात पाणी गरम केले असता आवाज निघतात?"

"नाही भंते, सर्वच भांड्यात पाणी गरम केले असता आवाज निघत नाही, तर काही विशिष्ट भांड्यातील पाण्याचाच आवाज येतो."

"महाराज, यावरून असे दिसते की, तुम्ही आपला पक्ष सोडून माझ्या पक्षाला आले आहात. पाण्यात सजीवपणा नाहीच. जर सर्वच भांड्यात पाणी गरम केले असता

त्यातून आवाज आला असता तर कदाचित असे म्हणता आले असते की, पाणी सजीव आहे. महाराज, आवाज करीत जगणारे पाणी आणि आवाज न करता जगणारे पाणी असे पाण्याचे दोन प्रकार तर असू शकत नाही.''

## मोठमोठ्या जीवांचे पाणी पिणे

''महाराज, मोठमोठे मदोन्मत हत्ती आपल्या सोंडाने पाणी शोषून घेऊन ते आपल्या शरीरावर उधळून फेकतात किंवा ते तोंडाने घेऊन पिऊन टाकतात अशा स्थितीत जर पाणी सजीव असते, तर अशा तऱ्हेने त्यांच्या दातांमध्ये भरडल्या गेल्यामुळे जोरजोराने ओरडावयास पाहिजे होते. समुद्रात तिमी, तिमिंगल इत्यादी अनेक प्रकारचे मासे असतात. ते सुद्धा पाणी आत घेऊन बाहेर सोडत असतात. त्यांच्याही दातांत सापडल्यामुळे पाण्याने ओरडावयास पाहिजे होते. महाराज, एवढ्या मोठमोठ्या प्राण्यांकडून दाताने रगडल्या जात असता त्या पाण्याने मुळीच ओरडू नये, हे केवढे आश्चर्य ! या सर्व स्पष्टीकरणाने हेच सिद्ध होते की, पाण्यात जीव किंवा प्राण नाही. महाराज, यावरून पाणी सजीव नाही, हे आपण समजून घ्यावे.''

''भंते नागसेन, उत्तम प्रकारे प्रश्नाचे विश्लेषण करून आपण योग्यरीतीने त्यावर निर्णय दिला. चांगल्या रत्नपारख्याकडूनच उत्तम रत्नांची पारख होत असते, मोती पारख्याकडूनच मोत्यांची खरी परीक्षा होत असते. बाजाराकडूनच उत्तम शाल किंवा दुशालाची खरी किंमत होत असते. सुगंधाची पारख करणाराकडूनच उत्तम लाल चंदनाची प्रतिष्ठा राखली जाऊ शकते. त्याचप्रमाणे आपण या प्रश्नांचे उत्तम प्रकारे उत्तर दिले.''

**(प्रकरण सहावे समाप्त)**

# प्रकरण सातवे

## (ख) योगी कथा (पुढे चालू)

### ६२. प्रपंचापासून सुटका

''भंते नागसेन, भगवान बुद्धाने सांगितले आहे की, 'हे भिक्षूंनो, प्रपंचात पडू नका, प्रपंचापासून दूर रहा.' तेव्हा हे प्रपंचापासून दूर राहणे म्हणजे काय?''

''महाराज, श्रोतापत्ती फळात प्रपंच (यातायात) नसतो, सकृदागामी फळात प्रपंच नसतो, अनागामी आणि अर्हत फळ प्राप्तीत सुद्धा प्रपंच नसतो.''

''भंते नागसेन, जर अशीच बाब असेल, तर भिक्षू लोक सूत्र, गाथा, उदान, इतिवुतक, जातक, अद्‌भूत धर्म (चमत्कारिक घटना) आणि वेदल्ल या भानगडीत का पडतात? या गोष्टी ते कां शिकवतात आणि स्वयं परस्परांत याच विषयावर चर्चा तरी कां करतात? नवीन-नवीन विहारांची निर्मिती करणे, दान घेणे आणि पूजा अर्जा करवून घेण्याच्या व्यर्थ चक्रात कां पडतात? याप्रमाणे ते भगवान बुद्धांनी विरोध केलेली कामेच करीत नाहीत काय?''

''महाराज, तुम्ही सांगितलेल्या सर्व गोष्टी ते प्रपंचापासून स्वतःची सुटका करून घेण्यासाठी करीत असतात. महाराज, जे आपल्या पूर्वजन्मीच्या वासनापासून शुद्ध झालेले असतात, ते शीघ्रताशिघ्र प्रपंचातून आपली सुटका करून घेऊन अर्हत पद प्राप्त करतात. आणि ज्या भिक्षूत अजून काही वासना (तृष्णा) शिल्लक असतील, ते भिक्षू याच उपायाने क्रमाक्रमाने प्रपंचातून आपली सुटका करून घेऊ शकतात.''

''महाराज, कोणी मनुष्य आपल्या शेताभोवती कसल्याही प्रकारचे कुंपण न घालता शेतात बीज पेरून आपल्या बळावर व स्वप्रयत्नाने चांगले पीक घेतो. तर कोणी शेतकरी जंगलातून झाडांच्या फांद्या व काट्या कुट्या तोडून आणतो आणि आपल्या शेताच्या संरक्षणासाठी शेताभोवती कुंपण तयार करतो व त्यानंतरच शेताची पेरणी करून चांगले पीक घेतो. हे जे दुसऱ्या शेतकऱ्याचे शेताभोवती कुंपण टाकण्याचे प्रयत्न आहेत, ते सुद्धा उत्तम पीक घेण्यासाठीच आहेत.''

''महाराज, त्याचप्रमाणे जे भिक्षू आपल्या पूर्वजन्मीच्या वासना (तृष्णा) पासून सर्वतोपरी शुद्ध झालेले आहेत, ते शीघ्रातिशिघ्र आपल्या शेताला कुंपण न करता पीक घेणाऱ्या शेतकऱ्यासमान सर्वच प्रपंचातून आपली सुटका करून घेतात, आणि ज्या भिक्षूत

अजून तृष्णा शिल्लक असेल, ते क्रमाक्रमाने शेताच्या संरक्षणाची सर्वव्यवस्था करून नंतरच पीक घेण्याच्या दुसऱ्या प्रकारच्या शेतकऱ्यासमान समस्त प्रपंचापासून आपली सुटका करून घेऊ शकतात.''

## झाडावरील फळांचा झोक

''महाराज, ज्याप्रमाणे एखाद्या आंब्याच्या झाडावर एक आंब्याचा झोक असावा, आणि एखाद्या बुद्धिमान माणसाने तो सहजपणे वर चढून तोडून घ्यावा, परंतु सर्वसाधारण माणसाला झाडावर चढण्यासाठी लाकडे तोडून शिडीच तयार करावी लागेल. येथेसुद्धा दुसऱ्या प्रकारच्या माणसाला शिडी तयार करावी लागते, ते फळ घेण्यासाठीच आहे.''

''महाराज, त्याचप्रमाणे जे आपल्या पूर्वजन्मीच्या वासना दूर करून शुद्ध झाले आहेत, ते भिक्षू शीघ्रताशिघ्र बुद्धिमान पुरूषांनी फळांचा लाभ करून घेतल्याप्रमाणे सर्वच प्रपंचापासून आपली सुटका करून घेतात, आणि ज्या भिक्षूत अजूनपर्यंत इच्छा शिल्लक असतील, ते भिक्षू शिडी तयार करणाऱ्या समान समजावे.''

## हुशार मनुष्य

''महाराज, कोणी एक हुशार मनुष्य राजाकडे एकटाच जाऊन आपले काम करून घेण्यासाठी आपल्या श्रीमंतीच्या कारणाने एखादे मंडळ घेऊन राजाकडे जातो. येथे जे मंडळ तयार करणे आहे, ते काम करून घेण्यासाठीच आहे.''

''महाराज, त्याचप्रमाणे जे आपल्या पूर्वजन्मीच्या वासनापासून शुध्द झालेले आहेत, ते तात्काळ त्या हुशार माणसाप्रमाणे सर्वच प्रपंचापासून मुक्त होऊन जातात. आणि ज्या भिक्षूत अजूनपर्यंत राग (विषय) कायम असते ते याच उपायाने क्रमाक्रमाने त्या श्रीमंत मनुष्यासमान प्रपंचापासून आपली सुटका करून घेतात.''

''महाराज, धर्मग्रंथ पाठ करणे उत्तम आहे, धर्मचर्चा करणे उत्तम आहे, नवीन नवीन विहारांचे निर्माण करणे उत्तम कर्तव्य होय, तसेच दान व पूजा अर्चा करणे, हेही अत्युत्तम कर्तव्य होय. या कर्तव्यांनी फार मोठा उपकार होतो.''

''महाराज, अधिकारी, शिपाई, दूत, चौकीदार, शरीररक्षक आणि सभासद इत्यादी अनेक नोकर राजाच्या दरबारी असतात. राजाला आवश्यकता पडली असता ते सर्वच काहीना काही उपकार करीत असतात. महाराज, त्याचप्रमाणे धर्मग्रंथाचा पाठ करणे, धर्मचर्चा करणे, नवीन विहार बांधणे आणि दान व पूजा- अर्चा करणे इत्यादी सर्व उप[illegible] [illegible] [illegible]राज, जर कोणी स्वतःच शुद्ध होतील, तर उपदेश करणारांची

"महाराज, परंतु अशी बाब प्रत्यक्षात तरी नाही. शिष्य होणे ही अत्यंत आवश्यक आहे. स्थवीर सारिपुत्रांनी अनंत कल्पापासून पुष्कळ पुण्य संपादन केले होते आणि प्रज्ञेची चरम सीमा गाठली होती. तरीपण अर्हतपद प्राप्त करण्यासाठी त्यानांही गुरू करावा लागला. महाराज, याप्रमाणेच शिष्य बनणे हे महान उपकारक आहे. धर्म ग्रंथाचा उपदेश ऐकणे, त्यांचा पाठ करणे आणि त्याच विषयावर चर्चा करणे या सर्वच कर्तव्याने महान उपकारा सिद्ध होतो. यामुळेच जे भिक्षू या कार्यात रत राहतात ते हळूहळू प्रपंचापासून मुक्त होतात."

"ठीक आहे, भंत नागसेन, आपण केलेले विश्लेषण अगदी बरोबर आहे. हे मी मान्य करतो."

## ६३. गृहस्थाची अर्हतपद प्राप्ती

"भंते नागसेन, तुम्ही लोक सांगत असता की, 'गृहस्थ जीवन व्यतीत करीत असता तर त्याने अर्हतपद प्राप्त करून घेतले, तर त्याच्या जीवनात दोनच गोष्ट घडू शकतात. तिसरी नाही.' त्या म्हणजे एक तर तो तात्काळ प्रवर्जित तरी होईल किंवा त्याचे परिनिर्वाण तरी होईल. याशिवाय पुढील जीवन तो जगूच शकत नाही."

"भंते, अशा अवस्थेत जर त्याला आचार्य, उपाध्याय, भिक्षापात्र आणि चीवर मिळाले नाही तर तो काय करील? तो अर्हत होऊन उपाध्यायावाचून स्वतःच स्वतःला प्रवर्जित करू शकेल की, दुसरा कोणी बुद्धिमान अर्हत येऊन त्याला प्रवर्जित करील की, त्याचवेळी त्याचे परिनिर्वाण होईल?"

"महाराज, उपाध्यायाशिवाय त्याला स्वतःलाच प्रवर्जित करून घेता येणार नाही. स्वतःच स्वतःला प्रवर्जित करून घेतल्यामुळे त्याच्यावर चोरीचा आरोप सिद्ध होईल. तो एक किंवा एकाहून अधिक दिवससुद्धा प्रतीक्षा करू शकणार नाही. याशिवाय दुसरे कोणी अर्हत तेथे येवोते अथवा न येवोत पण त्याचदिवशी त्याला परिनिर्वाणाचा लाभ होईल."

"भंते नागसेन, असे असेल तर अर्हतपदाचा शांतभाव येथेच संपला, असे म्हणावे लागेल. कारण त्यातच त्याच्या जीवनाचे हरण केले जाते."

"महाराज, गृहस्थांचे जीवन जगणे हे अर्हताला अनुकूल नाही. म्हणूनच कोणी गृहस्थाला अर्हतपदाचा लाभ होताच तात्काळ तो प्रवर्जित होऊन भिक्षू तरी होतो किंवा परिनिर्वाण तरी पावतो. अर्हतांच्या शांत भावात काहीच दोष नाही, ते पद गृहस्थ जीवन व्यतीत करावयास अनुकूल नाही. एवढेच एक कारण आहे. गृहस्थांच्या परिवेषात ती

शक्ती नाही, की, ते पवित्र अर्हतपद सांभाळू शकेल.''

**शक्तिहीन पोटात भोजन**

''महाराज, भोजन हे सर्वच जीवांचे पालन करणारे आहे, सर्वच जीवितांचे प्राणरक्षण करीत असते, परंतु तेच भोजन उदररोग झाला असता किंवा अग्नीमांद्य झाले असता जीवसुद्धा घेऊ शकते. महाराज, यात त्या अन्नाचा काही दोष नसून उदररोग किंवा अग्नीमांद्याचा हा दोष आहे. महाराज, त्याचप्रमाणे गृहस्थ राहणे हे अर्हतांच्या अनुकूल नाही. म्हणून कोणी गृहस्थ अर्हतपद प्राप्त होताच प्रवर्जित तरी होऊन जातो किंवा परिनिर्वाण तरी प्राप्त करून घेत असतो. त्यात अर्हतपदाच्या शांतभाव स्थितीचा मुळीच दोष नाही. गृहस्थ राहणे हे अर्हताकरीता अनुकूल न होणे हेच यातील मूळ कारण आहे. गृहस्थ जीवनात इतकी शक्ती नाही की, ते अर्हतपदाचा भार सांभाळू शकेल.''

लहान गवताच्या काडीवरील मोठा दगड

''महाराज, तर एखाद्या लहान बारीक गवताच्या काडीवर मोठा दगड ठेवला तर ती काडी एकदमच लहान व बारीक असल्यामुळे मोडून चुरगळून जाईल. महाराज, त्याचप्रमाणे गृहस्थाचा वेश अर्हतपदाचा भार मुळीच सांभाळू शकत नाही.''

**गादीवर बसलेला मूर्ख माणूस**

''महाराज, एखाद्या गरीब आणि मूर्ख माणसाला एक मोठ्या राजाच्या गादीवर बसविले, तर तो ते राज्य सांभाळू शकत नाही. तसेच महाराज, अर्हतपदाचा भार कधीच गृहस्थ परिवेषात सांभाळू शकत नाही.''

''बरोबर आहे. भंते नागसेन, तुम्ही केलेला खुलासा मला एकदम मान्य आहे.''

## ६४. अर्हतांचे दोष

''भंते नागसेन, अर्हत कधी तरी आपल्या उद्देशापासून विचलीत होऊन खालच्या थरावर उतरू शकतो काय?''

''महाराज, अर्हत कधीही आपल्या उद्देशापासून विचलीत करून खालच्या थरावर येत नाही. त्याचे चित्त कधीच अन्विहीत होत नाही.''

''भंते, अर्हताकडून कधीतरी काही अपराध घडू शकतो काय?''

''होय महाराज, घडू शकतो.''

"भंते ते कसे काय?"

"कुटी बनवताना, सच्चारित्र्यात, विकाळास उचितकाळ समजण्यात, प्रवारितास अप्रवारित समजून घेताना, ते अतिरिक्त नाही, त्यास अतिरिक्त समजतांना अर्हताकडून अपराध घडू शकतो."

"भंते नागसेन, कोणाकडून अपराध घडण्याची दोन कारणे असू शकतात- १) बेसावधपणा किंवा २) अज्ञान. तर बेसावधपणामुळे अर्हताकडून असा अपराध घडतो काय?"

"नाही महाराज. जरी त्याच्याकडून अपराध घडत असला तरी त्याचे चित्त जागृत राहते."

"भंते हे कसे होऊ शकते? कृपाकरून एखादे उदाहरण देऊन समजावून सांगा."

"महाराज, अपराध दोन प्रकारचे असतात - १) वाईट काम करणे आणि २) भिक्षूंच्या विनयाविरूद्ध आचरण करणे."

**१) वाईट काम कोणते आहे?**

"दहा प्रकारची पापे ही होत - १) जीवहिंसा, २) चोरी करणे, ३) व्यभिचार करणे, ४) खोटे बोलणे, ५) चुगली सांगणे, ६) कठोर बोलणे, ७) थापा मारणे, ८) लोभ धरणे, ९) द्वेष करणे आणि १०) मिथ्यादृष्टी (खोटी धारणा) ही कामे वाईट होत."

**२) भिक्षूनियमांविरूद्ध आचरण करणे म्हणजे काय?**

"भगवान बुद्धांनी जन्मभर भिक्षू लोकांनी आचरण करावे म्हणून काही नियम तयार केलेले आहेत. त्या नियमाविरूद्ध भिक्षूंनी आचरण केले असता वाईट समजण्यात येते. परंतु सर्वसाधारण उपासकांकरिता असे बंधन नाही. महाराज, गृहस्थ उपासकांनी दुपार टाळून गेल्यानंतरही भोजन केले, तरी त्यात कोणताच अपराध मानला जात नाही. परंतु भिक्षू लोक मात्र असे करू शकत नाही. फुलेपाने गृहस्थ उपासकांनी तोडले असता त्यांना काहीच दोष लागत नाही, परंतु भिक्षू लोक तसे करू शकत नाही. जलक्रिडा करण्यात गृहस्थ उपासकांना काहीच दोष लागत नाही, पण भिक्षू लोक तसे करू शकत नाही. महाराज, याप्रमाणे अशा कितीतरी गोष्टी आहेत की, ज्या गृहस्थ उपासकांनी केल्या असता त्यांना काहीच दोष लागत नाही, परंतु त्याच गोष्टी भिक्षू लोकांना जन्मभर कधी करता येत नाही. महाराज, हेच भिक्षूंच्या नियमाविरूध्द आचरण करणे होय."

"महाराज, जी काही वाईट कामे म्हणून समजली जातात, ती अर्हत कधीही

आमरण करू शकत नाही. तथापि कधी-कधी अजाणता भिक्षू नियमाविरूध्द त्यांच्याकडून आचरण घडू शकते. सर्वच अर्हतांना सर्वच नियमांचे ज्ञान नसते. सर्वकाही जाणून घेण्याइतपत त्यांच्यात शक्ती नसते. स्त्री-पुरूषांची नावे किंवा गोत्र अर्हत जाणून घेऊ शकत नाहीत. एखाद्या विशिष्ट रस्त्याचीसुद्धा त्यांना माहिती नसते. तरीपण अर्हतांना मुक्ती काय आहे? याची जाणीव अवश्य असते. सहा अभिज्ञांतील सर्वच विषयांची त्यांना पुरेपूर माहिती असते महाराज सर्वज्ञ बुद्धांनाच सर्व काही जाणून घेण्याचे ज्ञान असते.''

''ठीक आहे, भंते नागसेन, तुम्ही केलेला खुलासा मला मान्य आहे.''

## ६५. अस्तित्वात नसलेली वस्तू

''भंते नागसेन, संसारात प्रत्यक्ष बुद्ध पाहण्यात येतात, बुद्ध श्रावक पाहण्यात येतात, चक्रवर्ती राजा पाहण्यात येतो, लहान मोठे राजेही पाहण्यात येतात, देवता आणि मनुष्यही पाहण्यात येतात, श्रीमंत आणि गरीब लोकही पाहण्यात येतात, प्रगतीशील लोकही पाहण्यात येतात, अधोगतीला जाणारे लोक पाहण्यात येतात. पुरूषाचे पुरूष लिंग नष्ट होऊन स्त्रीलिंग उत्पन्न होत असलेले तसेच स्त्रीचे स्त्रीलिंग नष्ट होऊन पुरूष लिंग उत्पन्न होताना पाहण्यात येतात, चांगली कामे बिघडताना दिसतात, पाप आणि पुण्याची फळे भोगत असलेले लोकही पाहण्यात येतात.''

''संसारात कितीतरी अंडज, जरायुज, संस्वेदज आणि कितीतरी औपपातिक प्राणीही दिसून येतात, पाय नसलेलेही प्राणी पाहण्यात येतात, दोन पाय असलेले, चार पाय असलेले आणि कित्येक अनेक पाय असेलेले प्राणीसुद्धा पाहण्यात येतात, संसारात यक्ष, राक्षस, कुंभांड, असूर, दानव, गंधर्व, प्रेत, पिशाच्च, किन्नर, मोठमोठे साप, नागलोक, गरूड, सिद्ध आणि विद्याधर हे सर्वच आहेत. हत्ती, घोडे, गाय, म्हैस, उंट, गाढव, बकरे, मंढे, लांडगे, मृग, डुकर, सिंह, वाघ, चित्ते, अस्वल, जंगलची कुत्रे, तडस कुत्रे, कोल्हे तसेच अनेक प्रकारचे पक्षीही पाहण्यात येतात. सोने, चांदी, मोती, शंख, उत्तमोत्तम दगडी रत्ने, मुंगा, लालमणी, मसार गल्ल, (उत्तम मणीरत्न), वैदूर्य (हिरा), वज्र, स्फटिक, लोखंड, तांबे पितळ आणि कांसे इत्यादी धातू दिसून येतात. या भूतलावावर क्षोमवस्त्र, काषायवस्त्र, सुतीवस्त्र, गोणपाट, आणि कांबळेही पाहण्यात येतात. शाली, धान, जौ, कुटकी (प्रियंगु) कोदो (कुटूस) बरका, गहू, मुंग, उडीद, तिळ, कुळथा इत्यादी अनेक प्रकारची धान्यही दिसून येतात. मूळ, गंध, सार (हिर) गंध, पापडी गंध, साल गंध, पानाचा सुगंध, फूल गंध आणि असेच कितीतरी सुगंध आहेत. गवत, वेली, झाडे, मोठे वृक्ष, औषधी आणि अशा अनेक वनस्पतीसुद्धा आहेत.

नद्या, पर्वत, समुद्र आणि कासवे इत्यादी संसारात सर्व काही आहे.''

''भंते, परंतु संसारात कोणती वस्तू नाही. ते कृपाकरून आपण सांगू शकाल काय?''

''महाराज, संसारात तीन गोष्टी नाहीत. त्या येणेप्रमाणे - १) संसारात अजर, अमर असे सचेतन किंवा अचेतन काहीही नाही, २) कोणतेही संस्कार नित्य नाहीत आणि ३) परमार्थतः जीव किंवा आत्मा नावाची अशी कोणतीही वस्तू अस्तित्वात नाही. महाराज. या जगात या तीन वस्तूंचा पुर्णतः अभाव आहे.''

''ठीक आहे. भंते नागसेन, तुम्ही अगदी अचूक असेच सांगितले.''

## ६६. निर्वाणाचे निर्गुणत्व

''भंते नागसेन, जगात काही तर कर्मफळामुळे उत्पन्न होतात, असे पाहण्यात येते. काही हेतूमूळे आणि काही ऋतूमुळे उत्पन्न होत असल्याचे दिसून येतात. परंतु हे भंते, जे काही कर्मफळामुळे, हेतूमुळे किंवा ऋतूमुळे उत्पन्न होत नाही, असे काय आहे? ते सांगावे.''

''महाराज, अशा दोन वस्तू आहेत की, त्या कर्मफळामुळे, हेतुमुळे किंवा ऋतूमुळे उत्पन्न होत नाहीत. त्या दोन वस्तू म्हणजे - १) आकाश हे कर्मफळामुळे, हेतूमुळे किंवा ऋतूमुळे उत्पन्न होत नाही आणि २) निर्वाण. हे कर्मफळामुळे, हेतूमुळे किंवा ऋतूमुळे उत्पन्न होत नाही. महाराज, याच दोन वस्तू कर्मफळामुळे, हेतूमुळे किंवा ऋतूमुळे उत्पन्न होत नाहीत.''

''भंते नागसेन, बुद्ध वचनाचा विषय बदलू नका, आणि विचार न करता उत्तर देऊ नका.''

''महाराज, विषय सोडून मी आपणास असे काय सांगितले, तर मला आपण अशी समज देत आहात?''

''भंते नागसेन, आकाश हे कर्मफळामुळे नाही, की हेतूमुळे नाही किंवा ऋतूमुळेही उत्पन्न होत नाही. हे आपले म्हणणे तर बरोबर आहे, परंतु भंते नागसेन, निर्वाणाचा साक्षात्कार करून घेण्यासाठी भगवान बुद्धांनी आपल्या श्रावकांना शेकडो प्रकारचे मार्ग सांगितले आहेत. तेव्हा आपण असे कसे म्हणता की, निर्वाण हेतूवाचून उत्पन्न होते?''

''महाराज, आपले म्हणणे खरे असले तरीपण भगवान बुद्धांनी निर्वाणाच्या उत्पत्तीचे कोणतेही हेतू कधी सांगितले नाही.''

''भंते नागसेन, यामुळे तर प्रश्न अधिकच गुंतागुंतीचा बनला आणि घोटाळ्यात पडला. निर्वाणाचा साक्षात्कार करावयाचे हेतू आहेत. तर निर्वाण उत्पन्न करावयाचे हेतू नाहीत. असे कसे होईल ? जर निर्वाणाचा साक्षात्कार करून घेण्याचे हेतू आहेत तर निर्वाण उत्पन्न करावयाचे सुद्धा हेतू असलेच पाहिजेत.''

''भंते नागसेन, पुत्राचा पिता असतो. तेव्हा त्या पित्याचा सुद्धा पिता असलाच पाहिजे. शिष्याला गुरू असतो, तेव्हा त्या गुरूला देखील कोणी गुरू असलाच पाहिजे. अंकुराचे बीज असते म्हणूनच या बीजाचे सुध्दा बीच असले पाहिजे. भंते नागसेन, त्याचप्रमाणे निर्वाणाचा साक्षात्कार करून घेण्याचे हेतू (मार्ग) आहेत. तर निर्वाण उत्पन्न करून घ्यावयाचे सुद्धा हेतू असणे शक्य आहे.''

''भंते नागसेन, वृक्षाचा किंवा वेलीचा वाढणारा जर शेंडा असतो, तर त्याचे खोड व मूळही असलेच पाहिजे. भंते, त्याचप्रमाणे जर निर्वाणाचा साक्षात्कार करावयाचे हेतू (मार्ग) असतील. तर त्याच्या उत्पत्तीचेसुद्धा हेतू असणे साहजिक आहे.''

''महाराज, निर्वाण कधी उत्पन्न केले जात नाही. म्हणूनच त्याचे हेतूही मुळीच नसतात. असे म्हटले आहे.''

''भंतजे नागसेन, ठीक आहे, तर निर्वाणाचा साक्षात्कार करून घेण्याचे हेतू तर असू शकतात परंतु ते उत्पन्न करावयाचे हेतू असू शकत नाही. याचे कारण काय? ते उदाहरण देऊन सांगावे.''

### हिमालयास कुणीच बोलावू शकत नाही

''ठीक आहे, तर मी त्याचे कारण काय ते आता स्पष्ट करणार आहे. तेव्हा आपण कान देऊन ऐकावे. महाराज, कोणी मनुष्य आपल्या नैसर्गिक शक्तीद्वारे या ठिकाणाहून पर्वतराज हिमालयावर जाऊ शकेल की नाही?''

''होय भंते, निश्चितच जाऊ शकेल.''

''महाराज, पण तो मनुष्य आपल्या नैसर्गिक शक्तीद्वारा पर्वतराज हिमालयास येथे आणू शकेल काय?''

''नाही भंते, पर्वतराज हिमालय येथे आणूच शकत नाही.''

"महाराज, याप्रमाणेच निर्वाणाचा साक्षात्कार करण्याचे हेतू (मार्ग) सांगितले असले तरी निर्वाणपद उत्पन्न करावयाचे कोणते हेतू (मार्ग) आहेत, हे कोणालाही दाखवून देत येणार नाही."

**पैलतीरास अलीकडे आणता येत नाही**

"महराज, कोणी मनुष्य नावेवर बसून आपल्या नैसर्गिक शक्तीच्या जोरावर एखादा समुद्र पार करून पलीकडच्या तटावर जाऊ शकेल काय?"

"होय भंते, निश्चितच जाऊ शकेल."

"महाराज, पण तो आपल्या नैसर्गिक शक्तीच्या जोरावर समुद्राचे पलीकडील तट अलीकडे आणू शकेल काय?"

"भंते नागसेन, असे करणे शक्य नाही."

"बस करा अगदी त्याप्रमाणे निर्वाणाचा साक्षात्कार करावयास शेकडो मार्ग सांगितले असले तरी पण ते उत्पन्न करावयाचे मार्ग कोणीही सांगू शकत नाही."

"कां नाही?"

"कारण, निर्वाण हे निर्गूण आहे."

"निर्वाण हे निर्गूण कसे आहे?"

"होय महाराज, निर्वाण हे निर्गूण आहे. कोणीही हे बनवलेले नाही. जेव्हा निर्वाणाच्या संबंधात ते उत्पन्न होण्याचा किंवा उत्पन्न न होण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. तद्वतच निर्वाण उत्पन्न केले जाऊ शकते की नाही, हा सुद्धा प्रश्न उद्भवत नाही. निर्वाण हे वर्तमान, भूत आणि भविष्य या तिन्ही काळाच्या पलीकडे आहे. निर्वाण असे आहे की, ते डोळ्यांनी पाहणे शक्य नाही, कानानी ऐकणे शक्य नाही, नाकांनी त्याचा वास घेणे शक्यच नाही, जीभेने त्याचा स्वाद घेणे शक्य नाही आणि शरीराने त्याला स्पर्श सुद्धा करता येत नाही."

"भंते याप्रमाणे तुम्ही तर निर्वाण नाही. हेच सोगत आहात. खऱ्या अर्थाने निर्वाण नावाची कोणतीच वस्तू अस्तित्वात नाही, हेच यावरून दिसून येते."

"महाराज, निर्वाण आहे आणि ते सत्य आहे. मनाने ते जाणून घेता येते. अर्हत पद प्राप्त करून भिक्षू परमविशुद्ध, परमप्रणित ऋजू बनतो. आवरणे तसेच सांसारिक

कामातून मुक्त होऊन तो मनाने निर्वाणाचे आकलन करून घेतो.''

''भंते, ते निर्वाण कसे आहे? उपमा आणि कारणे देऊन स्पष्टपणे समजावून सांगावे.''

**हवेची उपमा**

''महाराज, हवा नावाची कोणती वस्तू आहे काय?''

''होय भंते, आहे.''

''महाराज, कृपाकरून ती मला दाखवून द्या. त्याचा रंग आणि आकार कसा आहे? ती बारीक आहे की जाड आहे, लहान आहे की मोठी?''

''भंते, नागसेन, याप्रमाणे हवा दाखवता येत नाही. हातामध्ये घेऊन ती दाखवण्यासाठी वस्तू नाही. तरीपण तिचे अस्तित्व निश्चितच आहे.''

''महाराज, जर तुम्ही ज्याप्रमाणे हवा दाखवत नसाल, तर असेच म्हणावे लागेल की, हवा नावाची कोणती वस्तू असूच शकत नाही.''

''भंते नागसेन, मला माहीत आहे की, हवा नावाची वस्तू खास अस्तित्वात आहे आणि तसा मला विश्वासही आहे, परंतु तो आपणास मी दाखवू शकत नाही.''

''महाराज, त्याचप्रमाणे निर्वाण आहे. परंतु त्याच्या रंग किंवा रूपाची ओळख करून देऊन ती दाखवता येणे शक्य नाही.''

''ठीक आहे. भंते नागसेन, मला समजले.''

**६७. उत्पत्तीची कारणे**

''भंते नागसेन, कर्मामुळे काय उत्पन्न होते, हेतूमुळे आणि ऋतूमुळे काय उत्पन्न होते? तसेच कर्मावाचून काय उत्पन्न होते, हेतूवाचून काय आणि ऋतूवाचून काय उत्पन्न होते?''

''महाराज, जेवढे काही सचेतन प्राणी आहेत, ते सर्वच कर्मामुळे उत्पन्न होतात, अग्नी आणि बीजापासून उत्पन्न होणाऱ्या सर्व वस्तू हेतूमुळे आणि पृथ्वी, पर्वत, पाणी, वायू इत्यादी सर्व ऋतूमुळे उत्पन्न होतात. आकाश आणि निर्वाण हे कर्मामुळे, हेतूमुळे किंवा ऋतूमुळेही उत्पन्न होत नाही.''

''महाराज, निर्वाण कर्मामुळे, हेतूमुळे आणि ऋतूमुळे उत्पन्न होतो, असेही म्हणता

येत नाही. निर्वाण उत्पन्न होतो असेही म्हणता येत नाही. निर्वाण उत्पन्न होत नाही, असेही म्हणता येत नाही. निर्वाण उत्पन्न केले जाऊ शकते, असेही म्हणता येत नाही. निर्वाण भूतकाळात होते, वर्तमानकाळात आहे आणि भविष्यकाळात राहील असेही म्हणता येत नाही. निर्वाण डोळ्यांनी पाहणे शक्य नाही, कानांनी ऐकणे शक्य नाही, नाकांनी त्याचा वास घेणेही शक्य नाही, जीभेने त्याचा स्वाद घेता येत नाही आणि शरीराने त्याला स्पर्शसुद्धा करता येत नाही. महाराज, निर्वाणाचे आकलन केवळ मनानेच करून घेता येते. अर्हतपद प्राप्त केलेले आर्यश्रावक विशुद्ध ज्ञानाच्याद्वारे निर्वाण स्पष्टपणे पाहत असतात.''

''भंते, या क्लिष्ट प्रश्नाचा आपण उत्तमरीतीने उकल केला आहे. शंकेचे निराकरण केले. गुंतागुंत अगदी साफ करून टाकली. आपणासारख्या गणाचार्यात श्रेष्ठ असलेल्या आचार्याकडे आल्यामुळे माझी शंका दूर झाली.''

## ६८. यक्षांची प्रेते

''भंते नागसेन, खरोखरच यक्षाची जात असते काय?''

''होय महाराज, यक्षाची जात असते, हे सत्य आहे.''

''भंते, त्या योनीत त्यांना मरण येत असेल ना?''

''होय महाराज, यक्ष लोकांना त्या योनीत मरणसुद्धा येत असते.''

''भंते नागसेन, मग त्याची प्रेते कां दिसत नाहीत? त्यांच्या प्रेतांची दुर्गंधी सुद्धा येत नाही.''

''महाराज, त्यांची प्रेतेही दिसतात आणि त्याचा दुर्गंधसुद्धा येतो. महाराज, किड्यांच्या, पिल्यांच्या, मुंग्याच्या, फुलपाखरांच्या, सापांच्या, विचवांच्या, कान्याच्या, पक्षांच्या आणि जंगली जनावरांच्या रूपात यक्षाची प्रेते पाहता येतात.''

''भंते नागसेन, आपल्यासारख्या बुद्धिमानाशिवाय दुसरा कोण बरे या प्रश्नाचे उत्तर देऊ शकेल?''

## ६९. सर्व शिक्षापद भगवंतानी एकाचवेळी कां तयार केले नाही?

''भंते नागसेन, वैद्यशास्त्रातील नारद, धन्वंतरी, अंगिरस, कपिल, कंडरग्गीसाम, अतुल आणि पूर्व कात्यायन इत्यादी जे काही आचार्य पूर्वी होऊन गेलेत, त्यासर्वांनी प्रथमतः या विद्येचा स्वतः अनुभव घेऊन नंतरच शास्त्रे लिहिली होती. कारण ते सर्वज्ञ नव्हते. परंतु भंते, भगवान बुद्ध हे सर्वज्ञ होते. ते आपल्या सर्वज्ञशक्तीच्या बळावर

मागच्या पुढच्या सर्वच गोष्टी अगदी अचूक समजून घेऊ शकत होते. तेव्हा त्यांनी सर्वच विनय एकाचवेळी तयार करून कां ठेवले नाही? जे की, योग्यस्थळी भविष्यात लागू करण्यात आले असते. क्रमाक्रमाने जेव्हा-जेव्हा आवश्यकता भासली तेव्हा तेव्हा ते कां तयार केले ? याप्रमाणे आधी भिक्षूंची पापे वाढण्याची ते कां बरे प्रतीक्षा करीत बसले? त्यांनी लोकांना चिडण्याची आणि भिक्षूविषयी शंका घेण्याची संधी कां बरे दिली?''

''महाराज, हळूहळू जशी वेळी येईल, तसे मला अडीचशे (स्थवीर वादात २२७) नियम तयार करावे लागतील, हे भगवान बुद्धांना पूर्वीच माहीत होते. त्यांनी जर सुरूवातीलाच या सर्वनियमांची एकाचवेळी निर्मिती करून ते लागू केले असते तर ते पाहून लोक घाबरतील. भिक्षू बनू इच्छिणाऱ्या लोकांची एवढे विनय पाहूनच तारांबळ उडेल व भिक्षू बनण्याकरिता मागे पुढे पाहतील आणि म्हणतील की, अरे बापरे ! आम्हांला इतक्या नियमाचे पालन करावे लागणार ! श्रमण गौतमाच्या शासनातील भिक्षू जीवन किती कठोर आहे. असा त्यांचा समज होऊन ते भिक्षू व्हावयास धजले नसते. त्यामुळे ते हा धर्मग्रहण न करता पुन्हा-पुन्हा जन्मग्रहण करून दुःखच दुःख भोगत राहणार, यामुळे समयानुसार काही प्रगट होताच त्यांना सन्मार्गावर आणण्यासाठी उपदेश करून नंतर ते नियम लागू करीन. असा त्यानी विचार केला होता.''

''भंते किती आश्चर्य आहे ! किती अद्भूत आहे !! भगवान बुद्धाच्या सर्व गोष्टी या अशाच असतात. बुद्धाची सर्वज्ञता किती उच्च प्रतिची असते ! भंते नागसेन, खरोखर गोष्ट अशीच आहे. मला आता कळून आले. आधीच सर्व विनय ऐकून लोक घाबरून गेले असते. आणि कुणालाही भिक्षू बनण्याचे धाडस झाले नसते. हे मला मान्य आहे.''

## ७०. सूर्याचे तापमान कमी होणे

''भंते नागसेन, नेहमी सूर्य तापतच राहतो काय ? कधी-कधी त्याचे तापमान कमी सुद्धा होते?''

''महाराज, सूर्य नेहमीच तापत राहतो. कधीही त्याचे तापमान कमी होत नाही.''

''भंते, सूर्य नेहमीच तापत असता, त्याची उष्णता कमी अधिक कशी काय होते?''

''महाराज, यात चार बाधा आड येणाऱ्या आहेत. त्यांतील एक बाधा तरी आड आली तरी सूर्याचे स्वाभाविक तापमान कमी होत असते. त्या चार बाधा अश्या-''

''महाराज, १) आकाश अभ्राच्छादित होणे, २) धुके पडणे, ३) धुळीचे कण आकाशात उडणे, ४) राहू चंद्रासारखा ग्रह आड येणे. वरील चार कारणांपैकी एखादे कारण घडले तरी सूर्याचे तापमान कमी होतो. महाराज, सूर्याचे तापमान की होण्यास ह्याच याच बाधा आड येत असतात.''

''भंते नागसेन, हे किती आश्चर्य आहे! किती अद्भूत आहे!! सूर्यासारख्याच्या तेजातसुद्धा अशा बाधा निर्माण होतात, तेव्हा इतर जीवांची गोष्टच काय सांगावी? भंते, आपणासारख्या बुद्धीमानाशिवाय हा प्रश्न कुणीही समजावून सांगू शकत नाही.''

**७१. ग्रीष्मऋतूपेक्षा हेमंतऋतूत सूर्य तेज का ?**

''भंते नागसेन, ग्रीष्म ऋतूपेक्षा हेमंत ऋतूत अत्यंत सूर्याचे तेज अधिक कां असते?''

''महाराज, ग्रीष्म काळात आकाश धूळ कणांनी भरलेले असते, पृथ्वीवर वारे अधिक वाहतात, आकाश ढगाळलेले असते, रात्रंदिवस वारे वाहतात. या सर्व बाबी एकाचवेळी घडत असल्यामुळे सूर्याची किरणे मध्येच अडवली जातात. महाराज, यामुळेच ग्रीष्मकाळात सूर्याचे तेज कमी असते.''

''महाराज, हेमंतऋतूत पृथ्वी शांत राहते, आकाशातील ढग दूर झालेले असतात. धुळकण नष्ट झालेले असतात, गर्दपणा लुप्त होतो, रेणू कण उडून गेलेले असतात, आकाश स्वच्छ असते, वारे मंद गतीने वाहत असतात. महाराज, यामुळेच सूर्य किरणात तेज असते आणि गर्मीची अधिकता असते. महाराज, हेच कारण आहे की, ग्रीष्मंऋतूपेक्षा हेमंतऋतूत सूर्याचे तेज अधिक असते.''

''बरोबर आहे. भंते नागसेन, समस्त बाधारहित वातावरण असल्याकारणाने हेमंतऋतूतील सूर्यतेज अधिक राहते आणि धूळ, ढग इत्यादींनी आकाश भरून राहत असल्यामुळे ग्रीष्मकाळातील सूर्यतेज कमी असते.''

**(प्रकरण सातवे समाप्त)**

# प्रकरण आठवे

# (ख) योगी कथा (पुढे चालू)

## ७२. वेस्संतर राजाचे दान

''भंते नागसेन, पत्नी व मुलांचे दान देण्याइतपत सर्वच बोधिसत्वांचे मन उदार होत असते की, केवळ वेस्संतर राजानेच हे कार्य केले होते?''

''महाराज, केवळ वेस्संतर राजाचेच मन स्त्री व मुलांचे दान देण्याइतपत उदार झालेले नव्हते तर सर्वच बोधिसत्वांचे मन इतके उदार झालेले असते.''

''भंते, असे दान करीत असता ते आधीच आपल्या पत्नी व मुलांची सहमती घेत असतात की, त्यांच्या सहमतीवाचून तसे करतात?''

''महाराज, त्यांच्या पत्नीला वेस्संतराच्या उदार मनाची पूर्ण जाणीव असल्यामुळे तिचा काही प्रश्नच नव्हता. मुले मात्र अबोध असल्यामुळे वडीलास बिलगून उडू लागली होती. पण ते जर समजदार असते, तर त्यांनी सुद्धा सहमती प्रकट केली असती.''

''भंते नागसेन, बोधिसघत्व राजा वेस्सतरांनी आपल्या प्रियपुत्रांचे एका ब्राह्मणास गुलाम बनवण्याकरिता दान केले, हे मोठे कठीण काम केले. तसेच याहीपेक्षा कठीण काम त्यांनी केले ते असे की, त्यांच्या स्वतःच्या सुकुमार मुलांना त्यांनी स्वतः वेलीने बांधून त्या ब्राह्मणाच्या हवाली केले आणि तो ब्राह्मण ती वेल धरून मुलांना ओढत नेत आहे, असे प्रत्यक्ष पाहत असून देखील आपल्या मनात त्याने थोडासुद्धा लोभाचा विकार येऊ दिला नाही.''

''याहीपेक्षा तिसरे कठीण कार्य म्हणजे अर्ध्यावाटेवरून ती वेल तोडून जेव्हा मुले पळत आली. तेव्हा पुन्हाही त्यांना पक्के बांधून त्या ब्राह्मणाकडे सोपवले.''

''याहीपेक्षा चवथे कठीण कार्य म्हणजे 'बाबा, हा यक्ष आम्हाला खाण्यासाठी नेत आहे हो.' असे म्हणून रडत असणाऱ्या मुलांना 'बाळांनो घाबरू नका,' एवढेसुद्धा बोलून त्या मुलांना समजावले नाही.''

''याहीपेक्षा कठीण काम म्हणजे जाली कुमार पाय धरून रडत असता म्हणत होता की, 'बाबा, मी या यक्षासोबत जाण्यास तयार आहे, यांनी मला खाऊन टाकले तरी चालेल. परंतु कृष्णाजिनाची तरी आपण सोडवणूक करा.' तरीपण वेस्संतरांनी

यावरसुद्धा आपल्या मनात पुत्रस्नेहाची मलिनता येऊ दिली नाही, हे पाचवे कठीण काम त्यांनी केले.''

''याहीपेक्षा कठीण काम म्हणजे जालीकुमार रडूनरडून म्हणता होता की, 'बाबा, हा यक्ष आम्हाला ओढत ओढत जंगलात घेऊन जात असतानासुद्धा तुमच्या मनाला थोडा देखील पाझर फुटत नाही. तुमचे मन दगडाचे किंवा लोखंडाचे तर नाही ना? तरी पण वेस्संतर बोधिसत्वाच्या मनात मोह निर्माण झाला नाही. हे सहावे कठीण काम त्यांनी केले होते.''

''याहीपेक्षा सातवे कठीण काम त्यांनी केले की, तो ब्राह्मण अगदी निर्दयतापूर्वक जालीकुमार व कृष्णाजीना कुमारी यांना वेस्संतराच्या डोळ्यादेखत ओढत ओढत बळजबरीने नेत असतांना देखील त्याचे हृदय शंभर किंवा हजार तुकड्यात दुभंग पावले नाही.''

''भंते, अशाप्रकारे स्वतःच्या पुण्यासाठी दुसऱ्यांना दुःख देणे कितपत योगय आहे? यापेक्षा त्यांनी स्वतःचेच दान केले असते तर बरे झाले असते.''

''महाराज, बोधिसत्वाने असे भयंकर कठीण कार्य केल्यामुळेच त्यांचे वश व कीर्ती दहा हजार लोकांतील देवता आणि मनुष्यांत पसरली होती. देवता लोक देवलोकी, असूरलोक असूरलोकी, गरूडलोक गरूडलोकी, नागलोक नागलोकी, यक्षलोक यक्षलोकी, त्याचे कीर्ती पोवाडे गात होते. त्यामुळेच त्यांच्या यशोदुंदूभीचा आवाज आज आम्हा लोकांपर्यंत येऊन पोचला. जेणेकरून त्याचे ते दान देणे योग्य होते. किंवा नाही यावर आज आपण चर्चा करत आहोत.''

''महाराज, याच कीर्तीमुळे त्या निपूण, विज्ञ आणि शांतचित्त बोधिसत्वाच्या दहा गुणांची ओळख होते. ते दहा गुण असे-''

''महाराज, १) निर्लोभ, २) सांसारिक वस्तूप्रती अनासक्तभाव, ३) त्याग, ४) वैराग्य, ५) संकल्पापासून विचलीत न होणे, ६) सूक्ष्मता, ७) महानता, ८) दुरनुबोधता, ९) दुर्लभता आणि १०) बुद्धधर्माची अदृष्यता याच कीर्तीमुळे त्या महानप्रतापी, विज्ञ आणि शांतचित्त बोधिसत्वाच्या या दहा गुणांची ओळख पटते.''

''भंते नागसेन, दुसऱ्यांना त्रस्त्र करून जे दान दिले जाते, त्याचे फळ चांगले होते काय? त्यामुळे सुगतीचा लाभ होतो काय?''

''होय महाराज, यात शंकाच नाही.''

''भंते नागसेन, ते कसे तर कृपाकरून उदाहरण देऊन स्पष्ट करून सांगावे.''

**रोग्याला गाडीवर बसवून घेऊन जाणे**

''महाराज, कोणी एक धार्मिक श्रमण किंवा ब्राह्मण फारच शीलवान (सदाचारी) आहे. पण त्याला लकवा झाला असून त्याचे अंग लुळे पडले आहे, किंवा असाच त्याला कोणता तरी आजार झालेला आहे. आणि तो रस्त्यातच पडला आहे. तेव्हा कोणी एक पुण्यवान मनुष्य त्याच रस्त्याने आपली बैलगाडी घेऊन जात असता त्याने त्या रोग्यास पाहून त्याला तो म्हणेल तेथे पोहचवून देतो. अशा स्थितीत त्या पुण्यवान गाडीवानास सुगतीसारख्या उत्तम फळाचा लाभ होईल की नाही?''

''हाये भंते, यात शंका घेण्यासारखी बाबच नाही. या पुण्यकाळाने जन्मोजन्मी त्याचे कल्याणच होईल. त्याच कर्मफळाने त्याला महान सुखाचा लाभ होईल. त्याच्या सर्व ईच्छा पूर्ण होतील आणि त्याच कर्मफळाचा फलस्वरूप तो सर्वांनीच कामना केलेल्या निर्वाणरूपी नगरात जाऊन पोहचेल.''

''महाराज, पण यावरून असेच दिसून येते की, दुसऱ्यांना दुःख दिल्यामुळेच सुगतीदायक उत्तमफळाचा लाभ होतो, त्या पुण्यवान गाडीवानाने त्या बैलांना दुःख देऊनच असे पुण्यफळ पदरी पाडून घेतले आणि स्वतःकरिता सुखाचीद्वारे खुली केली.''

''महाराज, अजून एक कारण ऐकावे, जेणेकरून दुसऱ्याला दुःख दिले असले, तरी त्याचे सुगतीदायक उत्तमफळ कसे मिळते हे समजून येईल.''

**राजांचे दान**

''महाराज, कोणी राजा आपल्या अधिकारक्षेत्रातील लोकांकडून उचित कर घेतो आणि त्यानंतर तो लोकांना दान करतो महाराज, तेव्हा याचे उत्तम फळ त्या राजास मिळेले की नाही ? या दानामुळे त्याला सुगती प्राप्त होईल की नाही?''

''होय भंते, यात म्हणण्यासारखे काय आहे ! त्याच्या या पुण्यामुळे त्याला शंभर काय पण हजारपट अधिक लाभ होऊ शकतो. तो राजांमध्ये महाराज, देवा मध्ये महानदेव, ब्रम्हांमध्ये महाब्रम्हा, श्रमणांत श्रेष्ठश्रमण, ब्राम्हणांत उत्तम ब्राम्हण आणि अर्हतात महानअर्हत सुद्धा होऊ शकतो.''

''महाराज, पण हे दुसऱ्यांना दिलेल्या दुःखामुळेच अशा उत्तम फळाचा लाभ होतो हे सिद्ध झाले की नाही. राजा आपल्या प्रजेकडून कराच्या रूपाने घेतलेल्या संपत्तीच्या योगानेच यश आणि सुख प्राप्त करून घेतो की नाही?''

''भंते नागसेन, वेस्संतर राजाने दान देण्यासंबंधी अति केली होती. आपल्या पत्नीलासुद्धा दुसऱ्याची पत्नी होण्याकरिता दान दिले होते. तसेच आपल्या मुलांना दुसऱ्याचे गुलाम बनण्याकरिता दान दिले होते. भंते, नागसेन दान संबंधाने अति करणारांची बुद्धिमान लोक निंदा करीत असतात.''

## अधिकाराने नुकसान होते

''भंते नागसेन, अधिक सामान भरल्याने बैलगाडीचे धुरे मोडून जातात, अधिक सामान भरल्याने नाव बुडून जाते, अधिक अन्न खाल्यामुळे अपचन होते, अधिक पाणी पडल्यामुळे धानाची रोपे सडून जातात, अधिक दान दिल्याने दारिद्रय येते, अधिक उष्णतेमुळे जळून जातो, अधिक प्रेमामुळे पागल होतो, अधिक द्वेशापायी भयंकर अपराध घडतो, अधिक मोहामुळे वाईट अवस्थेला पोचतो, अधिक लोभामुळे चोर सापडला जातो, अधिक भयामुळे घाबरून जातो, अधिक पाणी आल्याने नदीला पूर येतो, अधिक वारे चालत असल्याने वीज पडते, अधिक धावपळ केल्याने आयुष्य कमी होते. भंते नागसेन, याप्रमाणेच दान देण्यातसुद्धा अति केली असता बुद्धिमान लोक निंदा करतात. भंते, वेस्संतरराजाने सुद्धा दान देण्यात अति केली होती. त्याचे फळ काही चांगले होणार नाही, असे मला वाटते.''

## अधिकाने लाभ

''महाराज, अधिकशक्ती असलेली दिव्य बुटी हातात चांगल्याप्रकारे धरून ठेवली असता अगदी जवळ बसलेला मनुष्यसुद्धा पाहू शकत नाही. अधिक शक्ती असलेल्या बुटिमुळे भयंकर पीडा दूर होतात आणि रोग नष्ट होतो. अधिक उष्ण असल्यामुळेच अग्नी पेटत असतो. आणि अधिक थंड असल्यामुळेच पाणी अग्नीला विझवू शकतो. मणीरत्नात अधिक गुण असल्यामुळेच पाहिजे तेवढी किंमत येते, वज्र अधिक तीक्ष्ण असल्या कारणानेच हिरा, मोती आणि दगड कापू शकते. पृथ्वीचा विस्तार अधिक असल्यामुळेच मनुष्य, सांप, मृग, पक्षी, जल, मोठमोठे खडक आणि वृक्ष इत्यादी सर्वांचे ओझे सांभाळू शकते. सुमेरू पर्वत अति विशाल असल्याकारणाने अचल आहे. आकाश अधिक पसरले असल्याकारणानेच अनंत आहे. सूर्याचे तेज अधिक असल्याकारणानेच तो अंधार दूर करू शकतो. सिंह उच्च जातीचा प्राणी असल्यामुळेच निर्भय राहतो. पहेलवानात अधिकशक्ती असल्याकारणानेच दुसऱ्या पहेलवानास आव्हान करतो, राजा आपल्या अधिक पुण्याच्या बळावरच सर्वांचा स्वामी होऊन राहतो. भिक्षू अधिक असल्याकारणानेच नाग, यक्ष, मनुष्य आणि मार इत्यादी सर्वांच्या अभिवादनास पात्र

असतो. बुद्ध सर्वश्रेष्ठ असल्यामुळेच श्रेष्ट आणि पूज्य आहेत.''

''महाराज, याप्रमाणे बुद्धिमान लोक अधिक दान देणाराची स्तुति करतात, त्यांचे कीर्तीपोवाडे गातात, आणि त्याला उत्तम पुरूष मानतात. कोणी कोणत्याही प्रकारचे दान करू शकतो, परंतु तो अधिकात अधिक दान देणारा यश कीर्तीचा भागीदार होतो. महाराज, अधिक दान दिल्याकारणानेच वेस्संतर राजा दहा हजार लोकांत प्रशंसित झाला आणि त्यांची यशदुंदूभी चहूफेर गाजली. त्याच दानाच्या पुण्यप्रतापाने वेस्संतर राजा बुद्ध होऊ शकला, देवता आणि मनुष्यसहित या सर्व लोकांत तो श्रेष्ठ ठरू शकला.''

''महाराज, दान देण्यास सत्पात्र असूनसुद्धा त्यांना देऊ नये अशीही काही वस्तू आहे कां?''

''होय भंते, अशा दहा वस्तू आहेत की, ज्यांचे कधी दान करू नये, आणि जो करील तो नरकवास भोगेल. त्या दहा वस्तू ह्या आहेत.''

**दान न करण्यायोग्य वस्तू**

''भंते, १) दारू व ताडीचे कधी दान करू नये. २) नाच, वाद्यांत दान करू नये, ३) पत्नीचे कधी दान करू नये, ४) बैल (कापण्याकरिता) दान करू नये, ५) चित्राचे (कामेत्तजक) दान कधी करू नये, ६) शस्त्रांचे दान कधी करू नये, ७) विषाचे दान कधी करू नये, ८) साखळी दान कधी करू नये, ९) कोंबडे, डुकर (कापण्यासाठी) कधी दान करू नये, १०) खोटे वजन वा तराजू दान करू नये, जो हे दान करील, त्याला नरकवास भोगावा लागेल. ''भंते नागसेन, या दहा वस्तूंचे कधी दान करू नये. जो यांचे दान करणार त्याला नरकवास भोगावा लागेल.''

''महाराज, कोणते दान देऊ नये, असे मी विचारात नाही महाराज, संसारात अशी कोणती तरी वस्तू आहे काय की, जी दानास सत्पात्र असून देखील त्यांना ती देऊच नये.''

''नाही भंते, दानास सत्पात्र असून देखील त्यास दान करू नये, अशी संसारात कोणतीही वस्तू नाही. संतुष्ट होऊन कोणी सत्पात्र व्यक्तीस भोजन दान देतात, कोणी चटई दान देतात, कोणी चारपाई दान देतात, कोणी घरदार सुद्धा दान देतात, कोणी वस्त्र दान देतात, कोणी सेवक दान देतात, कोणी जमीन दान देतात, कोणी पक्षी दान देतात, आणि चतुष्पाद प्राणी दान देतात. कोणी शंभर, हजार, लाख रूपये सुद्धा दान देतात, कोणी राजपाट व कोणी स्वतःच्या जीवनाचेसुद्धा दान देत असतात.''

''महाराज, कोणी कोणी स्वतःचेच दान करू शकतात, तेव्हा तुम्ही त्या महान

दानपती वेस्संतर राजाने स्त्रीपुत्रांचे दान केले असता, यावर आक्षेप कां घेत आहात, हेच मला कळत नाही ? महाराज, कधीकधी पिता देखील असलेले ऋण फेडण्यासाठी किंवा जीविका चालविण्यासाठी स्वतःच्या पुत्रास कोणाकडे नोकर ठेवतो किंवा विकूनही टाकतो. अशा घटनासुद्धा घडत असल्याचे या जगात पाहण्यात येतात.''

''होय भंते, बरोबर आहे आपले म्हणणे- अगदी त्याचप्रमाणे वेस्संतर राजा सर्वज्ञता प्राप्त करून घेण्यासाठी चिंतीत आणि दुःखी होता. म्हणूनच त्यांनी धर्मलाभ करून घेण्यासाठी आपली पत्नी व पुत्र दानात देऊन टाकले. महाराज, याप्रमाणे जे लोकांना देता येण्यासारखे व करता येण्यासारखे तेच वेस्संतर राजाने दिले व केले होते. महाराज, असे असता आपण त्या दानपती वेस्संतर राजावर व्यर्थच आक्षेप घेत आहात.''

''नाही भंते, मी त्यांना दोषी ठरवले नाही. परंतु त्यांनी आपली पत्नी व मुलांना न देता त्या मोबदल्यात स्वतःलाच दानात द्यायला पाहिजे होते. एवढे माझे म्हणणे आहे.''

''महाराज, मागणारांनी स्त्री आणि मुलांना मागितले, तेव्हा ते न देता स्वतःला त्यांनी देणे उचित नव्हते. मागणारांनी जे मागितले असेल, तेच दिले पाहिजे. चांगले लोक असेच करत असतात. महाराज, कोणी जर पाणी मागितले असेल, आणि त्याला भोजन वाढले, तर हे त्याची इच्छापूर्ती करणे ठरेल काय?''

''नाही भंते, मागणारांनी जे मागितले असेल, तेच त्यास दिले असता त्याची इच्छापूर्ती होऊ शकेल.''

''महाराज, म्हणूनच जेव्हा याचकांनी त्याची स्त्री व मुले मागितली तेव्हा वेस्संतर राजांनी आपली स्त्री व मुलेच याचकाला देऊन टाकली. महाराज, याचकांनी जर त्याचे स्वतःचे शरीर मागितले असते, तर न कापता व न मोह धरता स्वतःचे शरीर देखील त्यांनी याचकाला द्यावयास मागेपुढे पाहिले नसते व स्वतःस देऊन टाकले असते. महाराज, जर कोणी वेस्संतर राजाला म्हटले असते की, 'तू माझा सेवक हो' तर त्यांनी त्याची सेवाही पत्करली असती.''

''महाराज, यथार्थदृष्टीने पाहता वेस्संतर राजाने आपले शरीरसुद्धा लोकांना वाटून दिले होते. घरात काही मांस पकवले जाते, तेव्हा घरातील सर्वच लोक ते वाटून खातात. एखाद्या वृक्षावर फुले येतात, तेव्हा सर्वच पक्षी त्याचा उपभोग घेत असतात. महाराज, त्याचप्रमाणे वेस्संतर राजांना आपल्या शरीराप्रती थोडीसुद्धा ममता राहिली नव्हती. त्यांनी आपले शरीर लोकांना वाटून दिले होते. सर्वांना सुख प्रदान करण्याकरिता ते सदैव तत्पर राहत असत.''

''असे कां?''

''तर याप्रमाणे मी उदारतापूर्वक कार्य केले तर याच पुण्याच्या योगाने मी बुद्धत्व प्राप्त करू शकेन. असा त्यांनी विचार केला होता.''

''महाराज, निर्धन मनुष्य धनसंग्रह करण्याकरिता कुठला प्रवास करीत नाही? कशारीतीने भयंकर रस्त्याचा प्रवास करतो ! जल, स्थल सर्वत्र प्रवास करून व्यापार करतो. काया, वाचा व मनात फक्त धनाचाच शोध चाललेला असतो. महाराज, याप्रमाणेच महान दानपत्ती वेस्संतरांनी बुद्धधनाच्या अभावात निर्धन असल्याकारणाने सर्वज्ञतारत्नांच्या प्रापतीसाठी याचकांना धनधान्य, दासदासी, नोकरी, गाडी, स्वतःची सर्वसंपत्ती, आपसी पत्नी आणि मुले, एवढेच नव्हे तर स्वतःचे शरीर देखील देऊन टाकले. बुद्धत्वाच्या प्राप्तीकरताच हे सर्व त्यांनी केले होते.''

''महाराज, एखाद्या अधिकाऱ्यास उन्नती दिसून आली असता, आपली सर्व धन संपत्ती देऊ शकतो. त्यापेक्षा उच्च पद प्राप्त करून घेण्याकरिता तो सर्व प्रयत्न करू शकतो. याप्रमाणेच वेस्संतर राजा आपली अंतरबाह्य सर्वसंपत्ती आणि स्वतःचे सुद्धा दान देऊन बुद्धत्व या श्रेष्ठ संपत्तीचा शोध करीत होते.''

''महाराज, याशिवाय त्या महान दानपत्ती वेस्संतर राजाच्या मनात असा विचार आला की, 'हा याचक ज्याची मागणी करीत आहे, तेच देऊन मी आज याची इच्छा पूर्ण करीन.' असा विचार करूनच त्यांनी आपली स्त्री व मुले दान देऊन टाकली महाराज, स्त्री व मुलांच्याप्रती मत्सर होता म्हणून नव्हे, डोळ्यात ते सलत होते म्हणून नव्हे, ते आपणावर केवळ ओझे आहेत, असे समजूनही नव्हे किंवा ते आता त्याला अप्रिय बनले होते, म्हणून ही त्यांनी त्याचे दान केले नव्हते. तर सर्वज्ञतारत्नाचा लाभ करून घेऊन केवळ बुद्ध बनण्याच्या इच्छेनेच वेस्संतर राजाने आपल्या त्या अतुल्य, अलौकिक, परमप्रिय आणि स्वतःच्या प्राणाहून अधिक प्रेम असलेल्या, त्या लाडक्या मुलांना देखील दानात देऊन टाकले.''

''महाराज, देवाधिदेव भगवान बुद्धाने चर्यापिटकात म्हणले आहे की, 'माझ्या पत्नीविषयी किंवा मुलांविषयी माझ्या मनात मुळीच मत्सर नव्हता. परंतु सर्वज्ञता प्राप्त करून घेण्याचा मार्ग त्याहीपेक्षा परमप्रिय असल्याकारणाने मी त्या प्राणप्रिय स्त्री-पुत्रांचे दान केले.''

''महाराज, हे दान केल्यानंतर वेस्संतर राजा आपल्या पर्णकुटीत जाऊन बसला.

एकदा त्यांची आठवण होऊन त्याचे हृदय अत्यंत दुःखी झाले. अंतःकरण सुकून गेले. नाकात उष्ण श्वास वाढून शेवटी ते तोंडावाटे बाहेर पडू लागला. डोळ्यातून रक्ताचे अश्रू गळू लागले. महाराज, दिलेल्या दानाचा संकल्प तुटू नये, म्हणून राजांनी हे सर्व दुःख सहन केले.''

''महाराज, आणखी दोन गोष्टींचा विचार करून त्यांनी आपली मुल दानात दिली होती. त्या दोन गोष्टी या - १) माझे दानव्रत भंग पावणार नाही आणि २) येथे जंगलातील कंदमूळ व फळ खात असल्यामुळे माझ्या मुलांना अत्यंत दुःख भोगावे लागत आहे, त्या दुःखाहून ते मुक्त होतील.''

''महाराज वेस्संतर राजाला हे माहीत होते की, माझ्या मुलांना कोणीही गुलाम तर बनूवन ठेवू शकणार नाही. इथून बाहेर पडताच त्यांचे आजोबा त्यांना सोडूवन घेतील. तेव्हा ते माझ्याकडे तर येणारच आहेत. महाराज, याच दोन कारणामुळे त्यांनी आपल्या मुलांचे दान केले होते. महाराज, वेस्संतर राजाला हे सुद्धा माहीत होते की, हा याचक फारच म्हातारा आणि कमजोर आहे, याच्या नसा नि नसा अगदी खिळखिळ्या झालेल्या आहेत, काठीच्या आधाराशिवाय याला चालता फिरता येत नाही, यांचे पुण्य फारच थोडे बाकी राहिले असून आयुर्मान पूर्ण होत आलेले आहे. तेव्हा हा काही आपल्या मुलांना गुलाम करू शकत नाही.''

''महाराज, एवढ्या तेजस्वी आणि प्रतापी व चंद्रसूर्याला पकडून कुणी तरी एखाद्या पेटीत बंद करून त्याचे तेज नष्ट करून ताटासमान त्याचा उपयोग करू शकेल काय?''

''नाही भंते !''

''महाराज, याप्रमाणेच चंद्रसूर्या समान प्रतिष्ठित अशा वेस्संतर राजांच्या मुलांना कुणीही गुलाम करून ठेऊ शकत नाही.''

''यासंबंधी आणखी एक कारण ऐकावे-महाराज, चक्रवर्ती राजाचे चार हात परिघ असलेले, गाडीच्या चाकाएवढे, उज्वल, चांगल्या जातीचे, अष्टपैलू आणि चांगल्याप्रकारे कापलेले मणिरत्न कुणी कुऱ्हाड किंवा वासला तेज करण्याकरिता वस्त्राच्या चिंध्यांनी गुंडाळून लपवून ठेवता म्हणेल, तर ते शक्य नाही. महाराज, त्याचप्रमाणे चक्रवर्ती राजाच्या मणिरत्नासमान तेजस्वी वेस्संतर राजाच्या मुलांना कुणीही गुलाम करून ठेऊ शकत नाही.''

''याविषयी आणखी एक कारण ऐकावे, महाराज, एकदम पांढरा असणारा हत्तीराज उपोसथ, तिन्ही स्थानावर हळूहळू पावले टाकीत चालत असतो, सात प्रकाराने

सुप्रतिष्ठित असतो, आठ हात उंच, नऊ हात लांब, सुंदर आणि दर्शनीय असतो. त्याला कोणी सुपाने किंवा ताटाने झाकून ठेऊ शकत नाही, त्याचप्रमाणे महाराज, हत्तीराज उपोसथासमान महानप्रतापी वेस्संतर राजाच्या मुलांना कुणीही गुलाम करून ठेऊ शकत नाही.''

''यासंबंधी आणखी एक कारण ऐकावे, माहराज, हा समुद्र फारच लांब, रूंद असा पसरला आहे. अत्यंत गंभीर, अनंत, अपरंपार, अथांग आणि अगदी खुला आहे. याला कुणीही चारही बाजूंनी बांधून आपल्या कामात आणण्यासाठी त्याला केवळ एकच घाट करू पहात असेल, तर तो असे मुळीच करू शकत नाही. महाराज, याप्रमाणेच त्या महासमुद्रासमान गौरवशीली वेस्संतर राजाच्या मुलांना कुणीही गुलाम करून ठेऊ शकत नाही.''

''यासंबंधी आणखी एक कारण ऐकावे. महाराज, पर्वतराज हिमालय, पाचशे योजन उंच आहे, तीन हजार योजनाच्या परिघात पसरलेला चौऱ्यांशी हजार शिखरांनी सजलेला आहे. यातून मोठमोठ्या पाचशे नद्या उगम पावल्या आहेत, हा मोठमोठ्या जीवाचे निवासस्थान बनला आहे, याच्या कुसव्यात अनेकप्रकारचे ग्रंथ आश्रयास आहेत, शेकडो प्रकारच्या औषधांनी पुरेपुर भरलेला आहे. आणि आकाशात गोळा झालेल्या ढगासमान उंचचउंच असा दिसणारा आहे. महाराज, याप्रमाणे हिमालय पर्वतराजासमान गौरवशाली वेस्संतर राजाच्या मुलांना कुणीही गुलाम करून ठेऊ शकत नाही.''

''महाराज, वेस्संतर राजाच्या मुलांना कुणीही गुलाम करून ठेऊ शकत नाही, याबद्दल आणखी एक कारण ऐका. महाराज, रात्रीच्या गडद अंधारात उंच अशा पहाडावर जळणारा अग्नी फार दुरून देखील पाहता येतो. त्याचप्रमाणे वेस्संतर राजाची कीर्ती फार दूरदूर पर्यंत पसरली होती. त्यांच्या मुलांना कुणीही गुलाम करून ठेऊ शकत नाही.''

''महाराज, आणखी एक कारण ऐकावे, हिमालयपर्वतावर जेव्हा नागफूल फुलत असतो, तेव्हा ते क्रमाक्रमाने दहा बारा योजनाच्या टापूला अत्यंत सुगंधित करून सोडतो. महाराज, याप्रमाणेच वेस्संतर राजाची यश व कीर्ती हजारो योजनांच्या परिसरात असुरलोक, गरूडलोक, गंधर्वलोक, यक्षलोक, राक्षसलोक, नागलोक, किन्नरलोक आणि इंद्रलोकांपलिकडे अकनिष्ठ लोकांपर्यंत पसरली होती. त्या सर्व लोकांत त्यांच्या शीलाचा सुगंध भरून गेला होता. तेव्हा त्यांच्या मुलांना गुलाम बनवून ठेवण्याची कोणाची प्रज्ञा आहे?''

''महाराज, वेस्संतर राजांनी आपला पुत्र जाली कुमारास सांगितले होते की, बाळ,

तुझे आजोबा जर याचकाला संपत्ती देऊन तुम्हाला मुक्त करू इच्छित असल्यास तुझ्याकरिता एक हजार निष्क (त्यावेळचे नाणे) आणि कृष्णाजिना कुमारीकरिता शंभर दास, शंभर हत्ती, शंभर घोडे, शंभर गाई, शंभर म्हशी आणि शंभर निष्क त्या याचकास देऊन त्यांनी तुमची मुक्तता करावी. परंतु बाळ, तुझ्या आजोबांनी जर त्या याचकाला काही मोबदला न देता, आपल्या अधिकाराचा उपयोग करून बळजबरीने तुम्हाला घेऊन जाऊ इच्छित असल्यास तुम्ही त्यांचे बरोबर न जाता त्या याचकासोबतच राहावे. एवढा निरोप देऊन राजा वेस्संतरांनी त्यांना याचकासोबत पाठवले होते. त्याचप्रमाणे जालीकुमारची त्याच्या आजोबासोबत भेट होऊन आजोबांनी त्यास विचारले असता, जालीकुमारांनी सांगितले की, ''बाबा, एक हजार किंमत लावून माझ्या वडिलांनी मला या ब्राम्हणास दान दिले होते आणि शंभर हत्तींची किंमत लावून कृष्णाजिनाकुमारीस दान दिले होते.''

''भंते नागसेन, तुम्ही उत्तमरीतीने समजावून सांगितले. खोट्या मतांच्या लोकांचा सिद्धांत तोडून टाकला, त्यावर आपले वजन टाकून दाबून टाकले. आपले मत समजून घेण्यासाठी रस्ता मोकळा करून दिला. उदाहरणातील खरे भाव निदर्शनास आणून दिले. सुंदर प्रकारे प्रश्नाचे विश्लेषण करून सांगितले. तुम्ही जे सांगितले ते मी मान्य करतो.''

## ७३. गौतम बुद्धाची दुःखचर्या

''भंते, सर्वच बोधिसत्व दुःखचर्या करत असतात की, केवळ गौतमानेच केली होती.''

''महाराज, सर्वच बोधिसत्व दुःखचर्या करत असतात. केवळ गौतमानेच केली असे नाही.''

''भंते, जर असे असेल तर बोधिसत्व एक दुसऱ्यापासून भिन्न असणे, बरोबर वाटत नाही.''

''महाराज, चार बाबींमध्ये बोधिसत्व परस्परांपासून भिन्न असतात.''

### त्या चार बाबी

''महाराज १) कुळामध्ये स्थान २) आणि काळामध्ये, ३) वय आणि उंचीमध्ये, या चार बाबींमध्ये बोधिसत्व परस्परापासून भिन्न असतात- तथापि रूप, शील, समाधी, प्रज्ञा, विमुक्ती, ज्ञानाचा साक्षात्कार, चार वैशारद, दहा बुद्ध बळ[२], सहा प्रकारचे असाधारण ज्ञान, चौदा प्रकारचे बुद्धज्ञान, अठरा प्रकारचे बुद्ध गुण आणि बुद्धाच्या दुसऱ्या काही बाबतीत समानता असते. सर्वच बुद्ध गुणामध्ये समान असतात.''

"भंते, जर सर्वच बुद्ध गुणात समान असतात, तर एकट्या बोधिसत्व गौतमांनीच दुःखचर्या कशी काय केली?"

"महाराज, बोधिसत्व गौतमाने चार आर्यसत्याचे ज्ञान आणि प्रज्ञा प्राप्त करण्यापूर्वीच गृहत्याग केला होता. त्यांनी आपले अर्धवट ज्ञान पूर्ण करून घेण्याच्या धुंदीत दुःखचर्या केली होती."

"भंते, बोधिसत्वांनी आपले ज्ञान आधीच परिपक्व करून नंतर गृहत्याग कां केला नाही?"

"महाराज, नर्तिकांची[१] किळसवाणी अवस्था पाहून बोधिस्वाचे मन उबगून गेले होते. मनांत उदासीनता आल्यामुळे मनात वैराग्य संचरले, हे पाहून कोणी मारकार्याक देवपुत्राने विचार केला की, याचे वैराग्य नष्ट करण्याची हीच एक उत्तम संधी आहे. या विचाराने आकाशात प्रकट होऊन तो म्हणाला – 'हे मार्ष ! मार्ष !!' आपण असे घाबरून जाऊ नका. आहे, आजपासून सात दिवसांनी आपणास एक हजार आर असलेले नेमी, नाभी इत्यादींनी परिपूर्ण आणि इतर सर्वच गुणांनीयुक्त अशा दिव्य च्रक रत्नाचा[१] लाभ होणार आहे. पृथ्वी आणि आकाशात जी काही उत्तम रत्ने आहेत, ती सर्वच तुम्हाला प्राप्त होणार आहेत. लहान मोठ्या दोन हजार द्वीपांसोबतच चार महाद्वीपांवर आपले अधिपत्ये प्रस्थापित होणार आहे. शूर, वीर, शक्तिशाली आणि शत्रूंचे हालहाल करून सोडणारे एक हजारापर्यंत मुले आपणास होणार आहेत. त्या वीरपुत्रांसह सात चक्रवर्ती रत्नांनी युक्त होऊन तुम्ही चारही महाद्वीपांवर राज्यशासन चालवणार."

"महाराज, दिवसभर जळत्या अग्नीत टाकून लाल झालेली लोखंडाची सळई

---

*१. चतुवेसरज्ज– कोणीही श्रमण, ब्राम्हण, देव किंवा मार का असेन पण तो आपल्याकडे या बाबतीत बोटसुद्धा दाखवू शकत नाही – १) आपण सांगितलेले बुद्धात दिसून येणारे गुण आपण प्राप्त केले नाहीत, २) अर्हतातील क्लेश क्षीण झाले असे जे आपण म्हणता, ते आपले अजून क्षीण पावले नाहीत, ३) वरच्या स्थितीत ज्या गोष्टी अंतराय आणतात असे आपण म्हणता, त्यांचा अभ्यास करणारास त्या तशा दिसून येत नाही. आणि ४) ज्या उद्देशाने आपण धर्मोपदेश करीत असता, त्याधर्मानुसर चालणारास मुक्तीचा लाभ होऊ शकत नाही. अंगुत्तर निकाय, ४-८*

*२. १) स्थानास्थान-ज्ञानबळ, २) कर्मविपाक-ज्ञानबळ, ३) नानाधिमुक्ती ज्ञान बळ, ४) नानाधातु-ज्ञानबळ, ५) इन्द्रियपरापर-ज्ञानबळ, ६) सर्वत्र गामिनी प्रतिपद, ७) संक्लेशव्यवदान उत्थान, ८) पूर्व निवासानुस्मृती, ९) च्युती उत्पत्ती, १०) आश्रवक्षय.*

कोणी एखाद्याने कानात टाकावी, तसेच हे शब्द ऐकनू बोधिसत्वाला वाटले. बोधिसत्वाचे मन पूर्वीच वैराग्याने प्रभावित झाले होते. त्यातच माराचे हे शब्द ऐकून त्यांचे मन वैराग्याच्या आवेगाने भरून गेले. महाराज, ज्याप्रमाणे धगधगत्या अग्नीत लाकडे टाकून दाबनू टाकण्याचा प्रयत्न करीत असता त्याचा पून्हा भडका होतो, त्याचप्रमाणे माराचे शब्द ऐकनू बोधिसत्वाच्या मनात वैराग्याचा भडका उठला. महाराज, ज्याप्रमाणे गवत व पाण्यानी दलदल झालेली जमीन आणखी वृष्टीवर्षाव झाला असता चिखलानी व्यापून जाते, त्याचप्रमाणे माराचे शब्द ऐकून बोधिसत्वाचे वैराग्य अधिकच उफाळून आले.''

''भंते नागसेन, पण खरोखरच जर सातव्या दिवशी दिव्यचक्ररत्न त्यांच्या समोर प्रगट झाले असते, तर त्यांनी त्याचा अव्हेर केला असता काय?''

''नाही महाराज, बोधिसत्वासमोर तसे दिव्य चक्ररत्न प्रकट होणे शक्यच नव्हते, तर केवळ बोधिसत्वासमोर दिव्यरत्न प्रकट झाले असते. तथापि त्याचा अव्हेर केला असता पण आपल्या विचारापासून ते परत फिरले नसते.''

''महाराज, याचे कारण, संसार अनित्य आहे. याच विचाराचा प्रभाव त्यांच्या मनावर सखोल झाला होता. संसारात दुःख आहे, आणि संसारात नित्य राहणारे कोणतेच सार (आत्मा) तत्व नाही, हे विचार पूर्णतः यांच्या मनावर बिंबले होते. याप्रमाणे त्यांची संसाराप्रती असलेली संपूर्ण आसक्ती नष्ट झाली होती.''

''महाराज, अनोतत्तदहाचे पाणी गंगा नदीत वाहत जाते, गंगा नदीद्वारा ते समुद्राला जाऊन मिळते, आणि समुद्रातून नंतर ते पाताळात जाते. महाराज, आता तेच पाणी परतून समुद्रात, समुद्रातून गंगा नदीत, गंगानदीतून अनतत्तदह सरोवरात येईल काय?''

''मुळीच नाही भंते !''

''याप्रमाणे महाराज, या अंतिमजन्मापर्यंत पोहचण्यासाठीच बोधिसत्व चार असंख्य एक लाख कल्पापासून पुण्यसंचय करीत राहिले. म्हणूनच ते तेथे पोहचले. परम ज्ञानाची चरमसीमा आता त्यांनी गाठली होती. सहा वर्षात ते बुद्ध सर्वज्ञ आणि नरोत्तम होणार होते. अशा स्थितीत ते चक्ररत्नासाठी पुन्हा आसक्तीकडे परत फिरणार होते काय?''

''नाही भंते !''

---

*१) चक्रवर्ती राजांची सातरत्ने असतात. लक्षणसूत्र दीघ्घनिकाय पहा.*

*२) पहा जातक १-६१ हीच कथा महावग्ग (वनयपिगक) १-७ कुलपूत्राच्याविषयी सांगितली आहे.*

"महाराज, ही महापृथ्वी मोठमोठी जंगल आणि उचं च उंच पर्वत कड्यांसह उलटून गेली असती, तरी त्यांची पर्वा न करता सम्यकसंबोधी (पूर्ण ज्ञान) प्राप्त करू न घेतल्याशिवाय बोधिसत्व परत फिरणार नव्हते. महाराज, गंगा नदी उगमाकडे वाहू लागली असती तरीपण सम्यंकसंबोधी प्राप्त केल्याशिवाय बोधिसत्व परत फिरू शकत नव्हते. महाराज, गोपद चिन्हातील पाण्याप्रमाणे हे अथांग आणि अगाध महासागर आटून गेला असता, तरीही सम्यकसंबोधी प्राप्त केल्याशिवाय बोधिसत्व कधीही परत फिरू शकत नव्हते. महाराज, जरी सुमेरू पर्वाच शेकडो हजारो तुकडे होऊन पडले असते तरीही सम्यक संबोधी प्राप्त केल्याशिवाय बोधिसत्व परत फिरणारे नव्हते. महाराज, चंद्र, सूर्य आणि तारे सर्वच आकाशातून निखळून पडले असते, तरीही सम्यकसंबोधी प्राप्त केल्याशिवाय बोधिसत्व परत फिरणारे नव्हते. महाराज, एखाद्या चटईप्रमाणे कोणी आकाश गुंडाळून ठेवले असते तरी पण सम्यकसंबोधी प्राप्त केल्याशिवाय बोधिसत्व परत फिरणार नव्हते."

"याचे कारण काय ?"

"भंते नागसेन, संसाराची किती बंधने आहेत?"

"महाराज, ज्याच्यात अडकून पडल्यावर कधी मनुष्य मुक्त होऊ शकत नाही किंवा मुक्त झाला तरी पुन्हा त्यातच अडकून जातो, अशा संसाराची दहा बंधने आहेत."

**ती दहा बंधने अशी–**

"महाराज, १) मातृबंधन, २) पितृबंधन, ३) स्त्रीबंधन, ४) पुत्रबंधन, ५) भ्रातृबंधन, ६) मित्रबंधन, ७) धनबंधन, ८) लाभसत्कारबंधन, ९) सत्ता बंधन आणि १०) पाच कामगुण बंधन. ज्या बंधनात एकदा अडकून पडलेला मनुष्य कधी मुक्त होऊ शकत नाही किंवा मुक्त झाला तरीही पुन्हा त्याच बंधनात अडकला जातो, अशी ही दहा बंधने आहेत. बोधिसत्वाने ती सर्व बंधने तोडून टाकली होती. पूर्णतः तोडफोड करून बाजूला सारली होती. यामुळेच महाराज, बोधिसत्व पुन्हा परतून येऊ शकत नव्हते."

"भंते नागसेन, बोधिसत्वाचे ज्ञान परीपक्व झाले नव्हते तरीसुद्धा देवतांचे शब्द ऐकून बोधिसत्वाचे वैराग्य अधिकच तीव्र झाले आणि त्यामुळे ते घर सोडून निघून गेले. तेव्हा त्यांना एवढी दुःखचर्या आवरण्याचा काय संबंध होता? त्यांनी तर आपले

---

१. *गाईच्या खुरापासून बनलेला खड्डा.*

ज्ञान परिपक्व होण्याच्या प्रतीक्षेत खाण्यापिण्यात व चैनीत काळ घालवला पाहिजे होता.''

''महाराज, जे अपमानित समजले जातात, ज्यांची निंदा होते, जे नीच समजले जातात, ज्यांना वाईट मानले जातात, ज्यांची प्रतिष्ठा धुळीला मिळविली जाते. नेहमी ज्यांच्यावर दबाव आणला जातो आणि ज्यांची कोणीही चर्चा करीत नाही. संसारात असे दहा प्रकारचे लोक आहेत.''

''ते कोणते दहा प्रकारचे लोक आहेत?''

''महाराज, १) विधवास्त्री, २) कमजोरमाणूस, ३) ज्याचे कोणी आप्तमित्र नाहीत, ४) खादाड, ५) कनिष्ठ कुळातील मनुष्य, ६) कुसंगतीत राहणारा, ७) दरिद्री मनुष्य, ८) सारासार विचार न करणारा, ९) बेरोजगार माणूस आणि १०) नालायक मनुष्य, महाराज, जेथे जेथे अपमानित होणारे, सर्वत्र निंदीत होणारे, नीच समजले जाणारे, वाईट समजले जाणार, जेथे जेथे अप्रतिष्ठित होणारे, नेहमी ज्यांच्यावर दबाव टाकला जातो आणि ज्यांची कुणीही पर्वा करीत नाही. असे हे दहा प्रकारचे लोक आहेत.''

''महाराज, या दहा गोष्टीचे स्मरण करून बोधिसत्वाने असा विचार केला की, 'देवता आणि मनुष्य लोकात मी कोठेही बेकार व नालायक ठरून निंदेस पात्र न व्हावे!' म्हणून मला कार्यशील आणि कर्मपरायण राहिले पाहिजे. असावधान नाही. महाराज, म्हणूनच बोधिसत्वाने आपले ज्ञान परिपक्व करीत असता दुःखचर्याही चालूच ठेवली होती.''

''भंते नागसेन, बोधिसत्व दुःखाची चर्चा आचरीत असता म्हणाले होते की, 'या दुःखचर्येच्या कठोर आचरणाने त्या अलौकिक अशा परमज्ञानाचा मी साक्षात्कार करू शकणार नाही. बुद्धत्वप्राप्तीचा एखादा दुसरा मार्ग असावा काय?' अशा स्थिती मार्ग निश्चित करीत असता बोधिसत्वाची बुद्धी चळली होती काय?''

''महाराज, चित्ताला कमजोर करणाऱ्या पंचवीस बाबी आहेत. त्यामुळेच आश्रवांचा क्षय करण्याकरिता चित्त स्थिर होत नाही.''

''महाराज, १) क्रोध, २) मत्सर, ३) बढाई, ४) घमेंड, ५) इर्ष्या, ६) लोलुपता, ७) दिखाऊपणा, ८) दुष्टपणा, ९) हट्ट, १०) भांडखोरेपणा, ११) अभिमान, १२) इतरांना स्वतःपेक्षा कमी लेखणे, १३) मंद, १४) प्रमोद, १५) निष्काळजीपणा, १६) तंद्री, १७) आळस, १८) वाईटाची संगत, १९) रूप, २०) शब्द, २१) गंध, २२) स्पर्श,

२३) भूक, २४) तहान आणि २५) असंतोष. महाराज, चित्ताला कमजोर करून सोडणाऱ्या या पंचवीस बाबी आहेत, त्यामुळे आश्रवाचा क्षय करण्याच्या कामी चित्त स्थिर होत नसते. महाराज, त्यावेळी यापैकी भूक व तहानेने बोधिसत्वाच्या शरीरावर प्रभुत्व कायम केले होते. भूक व तहानेच्या सत्तेखाली बोधिसत्वाचे शरीर दबून गेल्यामुळे आश्रवांचा नाश करण्याचे प्रयत्न चालले असता चित्त स्थिर होत नव्हते. महाराज, चार असंख्य एक लाख कल्पापासून बोधिसत्व जन्मोजन्मी चार आर्यसत्यांचा साक्षात्कार करून घेण्यासाठी सतत प्रयत्नशील होते. तेव्हा अशा अंतीम स्थितीत आल्यावर चार आर्य सत्यांचे ज्ञान संपादन करावयाची वेळ येऊन ठेपली असता ते आपल्या मार्गापासून विचलीत हो शकतील काय? महाराज, यावरून तर बोधिसत्वाला असा संकेत मिळाला की, आर्य सत्याच्या ज्ञानप्राप्तीचा कोणता ना कोणता दुसराच एखादा मार्ग असलाच पाहिजे.''

''महाराज, यापूर्वीच जेव्हा बोधिसत्व एक अबोध बालक होते. त्यावेळी त्यांचे पिता शाक्यराजा शुद्धोदन आपल्या कामात मग्न झालेले आहेत, असे पाहून जांभळीच्या झाडाखाली थंडगार सावलीत सुंदर सुशोभित अशा पाळण्यावर पालथी मारून बसले. आणि काम व अकुशल विचार बाजूला सारून, वितर्क आणि विचारांनीयुक्त, विवेकाने उत्पन्न होणारे, प्रीती सुखाची खाण अशा प्रथम ध्यानाचा त्यांनी साक्षात्कार केला होता. त्याचप्रमाणे त्यांनी तिसरे, चवथे याप्रमाणे क्रमाक्रमाने ध्यानप्राप्ती करून घेतली होती.''

''बरोबर आहे. भंते नागसेन, हीच खरी बाब आहे असे मी मानतो. आपले ज्ञान परिपक्व करीत असता, बोधिसत्वांनी दुःखचर्येनी व्यथा भोगली होती.''

## ७४. पाप आणि पुण्यात कोण शक्तिशाली व कोण कमजोर

''भंते नागसेन, पाप आणि पुण्य यात अधिक बलवान कोण आहे?''

''महाराज, पापापेक्षा पुण्य हेच अधिक बलवान असते.''

''भंते नागसेन, असे कितीतरी लोक आहेत की, ते हिंसा करतात, चोरी करतात, व्यभिचार करतात, खोटे बोलतात, गावात लूटमार करतात, वाटमारी करतात, कपट करतात व लोकांचा छळी करतात. या पापाकरिता हात कापले जातात, पाय कापले जातात, हात व पाय दोन्ही कापले जातात. कान कापले जातात, कान कापले जातात, कान व नाक दोन्ही कापले जातात, आणि त्यांना बिलंगथालिक वगैरे कठोर दंड देण्यात

---

१- पाच इंद्रियांचे विषय

येतो. काही लोक ज्या रात्री पाप करतात, त्याच रात्री त्याचे त्यांना फळ मिळते. ज्या दिवशी पाप करतात त्याचदिवशी त्यांना त्याचे फळ मिळते, त्या सर्वांना यथाक्षणीच केलेल्या पापाचे फळ मिळते. भंते नागसेन, याप्रमाणेच एखाद्याने परिष्कारासोबतच, एक, दोन, तीन, चार, पाच, दहा, शंभर, हजार किंवा लाखाचे दान भिक्षू लोकांना केले असता, यथाक्षणीच याच जन्मी त्याला धन, संपत्ती यश किंवा सुखाचा लाभ झाला आहे. असा कोणी आहे काय? किंवा शीलपालन करीत असल्यामुळे किंवा उपोसथव्रताचे पालन करीत असल्यामुळे त्यास याचजन्मी यथाक्षणीच धनसंपत्ती किंवा यश व सुखाचा लाभ झाला आहे, असे कुणी आहेत काय?''

''होय महाराज, दान देऊन, शीलपालन करून व उपोसथव्रत ठेऊन याच जन्मी यथाक्षणीच देवलोकीसुद्धा प्रतिष्ठा मिळवली, असे चार लोक आहेत.''

''भंते, ते कोण ?''

''महाराज, १) राजा मान्धाता, २) राजा निमी, ३) राजा साधीन आणि, ४) गुत्तिल गंधर्व.''

''भंते, ही तर आमच्या पूर्वी हजारो पिढ्यांची गोष्ट आपण सांगत आहात. त्यांना तुम्हीही पाहिले नाही आणि मी सुद्धा पाहिले नाही. प्रत्यक्ष भगवान बुद्धाच्या काळातील असे एखादे उदाहरण आपण सांगू शकाल काय?''

''महाराज, या युगात पुष्पक नावाचा दास स्थवीर सारिपुत्रांना भोजनदान दिल्या कारणाने त्याच दिवशी मोठा सावकार बनला होता. तो आजपर्यंत पुष्पक शेठ या नावानेच प्रसिद्ध आहे. महाराणी गोपालमाता (सुकेशीनी) हिने आपल्या डोक्याचे केश विकून आलेल्या कार्षापणाने (त्यावेळचा पैसा) महाकात्यापन आणि त्यांच्या सात सहचारी भिक्षूंना दान दिल्यामुळे ती चंद्रप्रद्योत राजाची महाराणी बनली होती. सुप्रिया नावाची उपासिका हिने एका आजारी भिक्षूला आपल्या जांघेच्या मासाचे इच्छित भोजन दिल्यामुळे तात्काळ तीची जखम तर भरून निघालीच परंतु ती एकदम निरोगीही झाली. मल्लिकादेवी हिने भगवान बुद्धांना श्रद्धापूर्वक शिळेताक दिल्यामुळे त्याचदिवशी ती कोसल राजाची पट्टराणी बनली. सुमन नावाचा माळी याने आठमुठी फुलांनी श्रद्धापूर्वक तथागत बुद्धाची पूजा केल्यामुळे तो त्याचदिवशी गर्भश्रीमंत बनला. महाराज, हे सर्व यथाक्षणीच याच जन्मात व तात्काळ पुण्य कार्य केल्याकारणाने भोग, यश व ऐश्वर्यशाली बनले.''

''भंते नागसेन, आपण शोधाशोध करून या सहा लोकांची उदाहरणे दिलीत.''

''होय महाराज !''

“भंते नागसेन, यावरून तर हेच सिद्ध होते की, पुण्यापेक्षा पाप अधिक शक्तिशाली आहे, पुण्य नाही. भंते नागसेन, मी तर केवळ एक दिवसात दहा, वीस, तीस, चाळीस, पन्नास, शंभर, हजार लोकांना त्यांनी केलेल्या पापामुळे सुळावर चढवतांना पाहिले आहे.”

“भंते नागसेन, नंद वंशाच्या सेनापतीला भद्रशाल नावाचा एक मुलगा होता. त्यची सम्राट चंद्रगुप्ताशी लढाई झाली, तेव्हा त्या लढाईत दोन्हीकडील सैन्यातील ऐंशी लोकांना जीवंतपणीच जमिनीत पुरण्यात आले. हे सर्व आपल्या पापामुळेच एवढे कठोर दुःख भोगत होते. भंते नागसेन, म्हणूनच मी म्हणतो की, पुण्यापेक्षा पापच बलवान आहे, पुण्य नव्हे.”

“भंते नागसेन, आणखी असेही ऐकण्यात येते की, कोशल राजाने अद्वितीय असे दान दिले होते.”

“होय महाराज ! असे ऐकले आहे.”

“भंते नागसेन, तेव्हा त्या कोशलाधिपतीला ते अद्वितीय दान दिल्यानंतर यथाक्षणी याज जन्मी ऐश्वर्य, यश आणि सुखाचा लाभ मिळाला होता काय?”

“नाही महाराज !”

“भंते नागसेन, जर कोशलाधिपतीला असे अलौकिक दान दिल्यानंतरही यथाक्षणी याच जन्मी ऐश्वर्य यश आणि सुखाचा लाभ मिळू शकला नाही, तर पुण्यापेक्षा पापच बलवान ठरते.”

## कुमुद भंडिका आणि शाली

“महाराज, पाप हे क्षुद्र असल्यामुळे लवकरच आपले फळ देते; परंतु पुण्य श्रेष्ठ असल्याकारणाने ते उशिरा फळ प्रदान करते. महाराज, हे उपमेने सुद्धा स्पष्ट करता येईल. महाराज, अपरात देशात कुमुदभंडिका नामक धान आहे. त्याचे पीक एक महिन्यातच तयार होऊन घरी आणले जाते. तसेच शालीधानाचे पीक तयार होण्यासाठी सहा महिन्याचा अवधी लागतो. महाराज, आता आपणच सांगा की कुमुदभंडिका आणि शालीधानात असा फरक कां?”

“भंते, कुमुदभंडिका धान हलका असून साळीधान उच्चप्रतीचा आहे. याच कारणाने एक लवकरच तयार होतो तर दुसरा उशिरा तयार होतो. भंते, साळी तांदूळ हा राजभोग असून तो राजेलोक खात असतात. आणि कुमुद भंडिकातांदूळ नोकर चाकर खातात.”

''महाराज, म्हणूनच क्षुद्र असल्याकारणाने पाप ताबडतोब फळत असते. तर पुण्याचे फळ पदरी पडावयास उशिर लागतो.''

''भंते नागसेन, हे ठीक आहे. पण संसारात ज्यांचे फळ ताबडतोब मिळते, तोच अधिक शक्तिशाली समजला जातो. यावरून पुण्यापेक्षा पापच अधिक बलवान सिद्ध होते, पुण्य नाही.''

''भंते नागसेन, जो शिपाई घनघोर चाललेल्या लढाईत शत्रूंची फळी फोडून आत जातो व शत्रूला पकडून आपल्या वरिष्ठाकडे घेऊन येतो, त्यालाच वीर व बहादूर समजण्यात येते, जो वैद्य धैर्याने शस्त्रक्रिया करून आजाऱ्यास दुरूस्त करतो, त्यालाच हुशार वैद्य समजण्यात येते, जो कारकून ताबडतोब हिशोब करून खाते मिळवणी करतो. जो पहेलवान आपल्या प्रतिस्पर्ध्याला स्फुर्तीने आपटून चित्त करतो, लोक त्याचीच वाहवा करीत असतात. भंते नागसेन, त्याचप्रमाणे पाप आणि पुण्याचे आहे. यापैकी जो ताबडतोब आपले फळ प्रदान करतो तोच अधिक बलवान होय.''

''महाराज, दोन्ही प्रकारच्या कर्माची फळे तर मिळतातच परंतु पाप वाईट असल्याकारणाने त्याचा परिणाम तात्काळसुद्धा दिसून येतो. महाराज, पूर्वीच्या राजे लोकांनीच असा नियम तयार करून ठेवला होता की, जो हत्या करील त्याला दंड देण्यात येईल. जो चोरीकडील, व्यभिचवार करील, खोटे बोलेल, गावात लूटमार करील, दादागिरी करील, धोका देईल आणि छळवणूक करील, त्याला दंड देण्यात येईल, शीलांचे पालन करील, उपोसथव्रताचे पालन करील, त्याला बक्षिस दिले जाईल आणि त्याला किताब देऊन त्याचा बहुमान केला जाईल, असा काही एखादा नियम बनविण्यात आला आहे काय? ज्याप्रमाणे चोरी करणारास दंड दिला जातो त्याचप्रमाणे पुण्य करणारास कुणी पुरस्कार देतात काय?''

''नाही भंते!''

''महाराज, जर पुण्यकार्य करणारांना पुरस्कार देण्याचा एखादा नियम तयार केला तर पुण्यसुद्धा पापासारखे तात्काळ फळ देणारे झाल्यावाजून राहणार नाही. महाराज, पुण्य करणारांना पुरस्कार देण्याचा नियम नसल्याकारणानेच पुण्य तात्काळ याच जन्मी फळ देत नाही व पाप याचजन्मी तात्काळ फळ देते, परंतु पुण्य मात्र पुढच्या जन्मात आपले जबरदस्त फळ दाखवीत असते.''

''ठीक आहे. भंते नागसेन, आपणासारख्या बुद्धिवानावाचून दुसरा कुणीही या प्रश्नाचे उत्तर देऊ शकत नाही. भंते, जो प्रश्न मी केवळ लौकिकदृष्टीने विचारला होता,

त्यास आपण लोकोत्तरदृष्टीने समजावून सांगितले.''

## ७५. मृतकाच्या नावाने दान देणे

''भंते नागसेन, कित्येक लोक दान देऊन त्याचे पुण्य मरण पावलेल्या आपल्या नातेवाईकांना मिळावे असा अंदाज करतात. त्यामुळे खरोखरच त्यांना काळी फळ मिळते काय?''

''महाराज, कित्येकांना मिळते आणि कित्येकांना मिळत नाही.''

''भंते, कोणाला मिळते व कोणाला मिळत नाही?''

''महाराज, जे नरकवासात पडतात त्यांना मिळत नाही, जे स्वर्गाला जातात त्यांनाही मिळत नाही, ते पशुपक्षी इत्यादी योनीत जातात किंवा जे तीन प्रकारच्या प्रेत योनीत जन्म घेतात त्यांना सुद्धा मिळत नाही – १) वंतासिक (वमन केलेले अन्न खाणारे), २) खुप्पिपासी (जे भूक व तहानेने तळमळत असतात), ३) निज्झामतण्हिक (तहानेने व्याकुळलेले), त्यांना त्या दानाचे मुळीच फळ मिळत नाही. परंतु 'परदत्तोपजीवी' प्रेत योनीतील आहेत त्यांना अवश्य त्या दानाचे फळ मिळत असते, ते सुद्धा त्याचे स्मरण केले तरच मिळत असते.''

''भंते नागसेन असे असेल तर त्याचे दान निरर्थकच होते. कारण, त्यांचे फळ मिळत नाही, ज्यांच्या नावाने दान दिले जाते त्यांना त्याचे काहीच पुण्य लाभत नाही तर दान देणे व्यर्थच सिद्ध होते.''

''नाही महाराज, ते दान फळ न देणारे किंवा व्यर्थ कधीच सिद्ध होत नाही. तर त्याचे फळ देणारांनाही मिळत असते.''

''भंते, कृपाकरून याचे कारण सांगावे.''

### वापस केलेले

''महाराज, एखाद्याने मासे, मास, सुप, भात किंवा इतर खाण्यासाठी तयार केलेले जिन्नस एखाद्या आपल्या परिवारातील संबंधिताच्या घरी पोहचवले. परंतु त्याने त्याचा स्वीकार केला नाही. तर ते जिन्नस व्यर्थ जातील काय?''

''नाही भंते, ते ज्याचे आहेत, त्यालाच परत मिळतील.''

''महाराज, याप्रमाणेच मृतकाच्या नावाने दिलेल्या दानाचे फळसुद्धा देणारालाच प्राप्त होते.''

## एक दरवाजा असलेली कोठडी

"महाराज, एकच दरवाजा असलेल्या कोठडीत कोणी एक माणूस गेला असता बाहेर येतांना तो कोणत्या वाटेने येईल."

"भंते, ज्या दरवाजातून तो आत गेला त्याच दरवाजातून तो बाहेर पडेल."

"महाराज, याप्रमाणेच आपल्या मृत बांधवांच्या नावाने दिलेल्या दानाचे फळसुद्धा देणारालाच प्राप्त होते."

"भंते, असो ! हे मी मान्य करतो आणि त्याचे फळ देणारांनाच लाभते, असेही मी मान्य करतो. याबद्दल आता मी अधिक वाद घालू इच्छित नाही. परंतु भंते, जर दिलेल्या दानाचे पुण्य देणारांच्या मृतक संबंधितांना मिळाले आणि त्यांची फळे ती चाखतात, तर कोणी हत्या करणारा, खूनी, क्रूरमनुष्य अविचाराने कोणाचा खून करून त्या पापकर्माचे फळ आपल्या मृत पावलेल्या संबंधितांना देण्याचा असा संकल्प करू लागला. "मी या माझ्या घोरपापाचे फळ माझ्या अमक्या अमक्या संबंधितास प्राप्त होवो." तर खरोखरच त्याचे फळ त्या पूर्वजांना मिळेल काय?"

"नाही महाराज !"

"भंते नागसेन, पुण्य कर्माची फळे तर त्या मृत ज्ञाती बांधवांना मिळतात पण पापकर्माची फळे मात्र त्यांना मिळत नाही. याचे कारण काय?"

"महाराज, हा प्रश्नच विचारण्यासारखा नव्हता. महाराज, कोणताही प्रश्न विचारला असता आपणास त्याचे काही ना काही उत्तर मिळेलच अशा विचाराने आपण "ज्याला ना शेंडाना बूड" असे प्रश्न विचारू नये. कदाचित यानंतर आपण असेही विचाराल की, 'आकाश आधाराशिवाय कसे वरच्यावर अडकून आहे? मनुष्य आणि पक्षांना दोनच पाय का?' हरणांना चार पाय कां आहेत?"

"भंते नागसेन, आपला उपहास करावा या हेतूने नव्हे, तर माझी शंका दूर करण्याकरिताच मी हा प्रश्न विचारत आहे. भंते या संसारातील कित्येक लोक उलट्या डोक्याचे आणि विकृत विचाराचे असतात. त्यांनीही आपले उत्तर ऐकून स्वतःचा सुधार करून घ्यावा, याच एकमात्र उद्देशाने मी आपणास हा प्रश्न विचारत आहे."

## नळाद्वारे पाणी जाते, दगड नाही

"महाराज, ज्यांनी पाप कर्म केलेच नाहीत किंवा एखाद्याने स्वतः केलेल्या पापाची फळे या न करणारालाच प्राप्त होवोत असे म्हटल्याने पाप न करणाराला ती लागत

नाही. महाराज, नळाद्वारे पाणी तर दूरपर्यंतच नेता येते परंतु नळाद्वारे मोठमोठे दगड व पर्वतसुद्धा नेता येतील काय?''

''मुळीच नाही, भंते !''

''महाराज, याचप्रमाणे पुण्यकर्माची फळे तर पूर्वजांना दिले जाऊ शकतात. परंतू पापाची फळे नाही.''

**तेलाचा दिवा जाळता येतो, पाण्याचा नाही**

''महाराज, तेलाने दिवा तर जळू शकतो. तसाच तो पाण्यानेसुद्धा जाळता येईल काय?''

''मुळीच नाही, भंते !''

''महाराज, त्याचप्रमाणे पुण्याची फळे तर मृतक पूर्वजांना दिली जाऊ शकतात, परंतु पापकर्माची नाही.''

''महाराज, शेतकरी लोक तलावाचे पाणी आणून धानाच्या शेतांना ओले करतात, तसेच समुद्राचे पाणी आणून शेतात सिचंन करू शकतील काय?''

''नाही भंते !''

''महाराज, त्याचप्रमाणे पुण्यफळाचा वाटा तर मृत पूर्वजांना दिला जाऊ शकतो. परंतु पापकर्माचा वाटा दिला जाऊ शकत नाही.''

''भंते नागसेन ! परंतु असे कां? कृपाकरून कारण सांगून स्पष्ट करावे. भंते, मी आंधळा किंवा मूर्ख नाही. जोरदार पुरावा ऐकनूच मी अवश्य समजून शकेन.''

''महाराज, पाप हे क्षुद्र आहे आणि पुण्य हे महान आहे. क्षुद्र असल्याकारणाने ते करणारानांच फळ देऊ शकते. परंतु पुण्य महान असल्यामुळे ते देवता आणि मनुष्यासह जगाला गवसणी घालू शकते.''

''कृपाकरून उपमा देऊन समजावून सांगा.''

''महाराज, पृथ्वीवर पडलेला पाण्याचा एक थेंब दहा बारा योजनांच्या टापूत पसरू शकेल काय?''

''नाही भंते, तो तिथे पडला तिथेच सुकून जाईल.''

''महाराज, याप्रमाणेच पाप अत्यंत क्षुद्र आहे. क्षुद्र असल्याकारणाने ते

करणारांनाच फळ देऊ शकते, दुसऱ्यांना त्याचा वाटा दिला जाऊ शकत नाही.''

''महाराज, समजा कधी जोराचा मुसळधार पाऊस पडला, तर त्याचे पाणी चोहीकडे पसरेल की नाही?''

''भंते, निश्चितच पसरेल ! दहा बारा योजनांतील खड्डे, तलाव, नद्या, उपनद्या, गुहा, नाले, उपनाले, लहानतळे, मोठे तळे, विहीरी आणि बावळ्या सर्वच पाण्याने तुडूंब भरून जातील.''

''महाराज, असे कां होते?''

''भंते, वृष्टीवर्षाव करणारा ढग महान आहे.''

''महाराज, याप्रमाणेच पुण्य महान आहे, ते महान असल्याकारणाने देवता आणि मनुष्यांमध्येसुद्धा त्याची विभागणी केल्या जाऊ शकते.''

''भंते नागसेन, पाप क्षुद्र आणि पुण्य महान असते, असे कां नाही?''

''महाराज, जे कोणी दान देतात, शीलपालन करतात, उपोसथव्रताचे पालन करतात, ते आनंदित, प्रसन्न आणि प्रफुल्लित राहतात. त्यांच्या मनात अगाध प्रीती निर्माण होते, याप्रमाणे त्याचे मन प्रीतीने ओतप्रोत भरल्याकारणाने ते आणखी पुण्यकर्माकडे धाव होते.''

## पाझर असलेली विहीर

''महाराज, भरपूर पाणी असलेली एक विहीर आहे. तिला भरपूर झरे असल्यामुळे पाण्याचा पाझर चालूच आहे. आणि दुसऱ्या बाजूने वरून पाणी जाणेही सुरूच आहे. परंतु झरे इतके आहेत की, पाणी कितीही वाहून गेले तरी ते कमी होतच नाही. महाराज, याप्रमाणेच पुण्य अधिकाधिक वाढतच जाते. शंभर वर्षेपर्यंत जरी कोणी सतत वाटत राहिला तरी सुद्धा ते वाढतच जाते. ते वाटेल तेवढ्या लोकांना पुण्य वाटू शकतात. महाराज, याच कारणामुळे पापापेक्षा पुण्य एवढे महान आहे.''

''महाराज, पाप केल्यानंतर पश्चाताप होतो. पश्चातापाने मनाची पातळी खालावते. आणि त्याचा फल पापाकडे वळतो. त्याला कधी शांती लाभत नाही. त्यामुळे ते शोकाकुल होते, मन तळमळते, भ्रष्ट होते. आणि कायमचे दडपल्या गेल्यामुळे ते कधी पुन्हा उचल करू शकत नाही. तेथल्या तेथेच कायमचे राहते.''

## वाळूची नदी

"महाराज, उंच सखल वाकडेतिकडे पात्र असलेली एक अगदी सुकून गेलेली जिकडेतिकडे वाळूच वाळू असलेली नदी आहे, तेव्हा तेथे थोडा पाऊस पडला, तर जागच्याजागीच ते पावसाचे पाणी जीर्ण आहे. महाराज, याप्रमाणेच पाप करणारांचे चित्त एकदम कोरडे होते."

"महाराज, याच कारणामुळे पाप अतिशय लघू असते."

"ठीक आहे. भंते, आपण उत्तमरीतीने प्रश्न समजावून सांगितला. माझे समाधान करून दिले."

## ७६. स्वप्नासंबंधी

"भंते नागसेन, सर्वच स्त्री पुरूषांना चांगली किंवा वाईट स्वप्ने पडत असतात. काही प्रत्यख पाहिलेल्या घटनासंबंधी तर काही न पाहिलेल्या घटनासंबंधी प्रत्यक्ष केलेल्या गोष्टीसंबंधी, तर काही न केलेल्या गोष्टीसंबंधी, काही शांतीदायक तर काही घाबरून सोडणारी भयानक, काही दूरची तर काही अगदी जवळची. आणि अशीच अनेक प्रकारची हजारो स्वप्ने पडत असतात. तेव्हा ही स्वप्ने म्हणजे कोणती वस्तू आहे आणि ही स्वप्ने पाहणारा कोण आहे?"

"महाराज, ही स्वप्ने म्हणजे चित्तासमोर येणारे एक निमित्तमात्र आहेत. महाराज, सहा प्रकारची स्वप्ने पडत असता - १) वायुभरल्यामुळे, २) पित्तप्रकोपामुळे, ३) कफवृद्धीमुळे, ४) देवताच्या प्रभावाखाली आल्यामुळे, ५) नेहमी तेच ते काम करीत असल्यामुळे, ६) भविष्यात घडणाऱ्या घटनासंबंधी कधी कधी स्वप्न पडतात. महाराज, या सहा प्रकारचया स्वप्नांपैकी शेवटचे म्हणजे भविष्यात घटणाऱ्या घटनासंबंधी पडणारे जे स्वप्न आहे, तेच खरे ठरणारे आहे व बाकीची सर्व खोटी असतात."

"भंते नागसेन, पण भविष्यात घडणाऱ्या घटनेसंबंधी कसे काय स्वप्न पडते? त्याचे चित्त बाहेर जाऊन घडणाऱ्या घटनेसंबंधीची माहिती घेऊन येते की, काय? की भविष्यात घडणाऱ्या घटनाच स्वतः त्यांच्या चित्तात येत असतात. की, कुणी दुसराच येऊन त्याला त्या घटनेसंबंधी सांगून जातो."

"महाराज, त्याचे चित्त बाहेर जाऊन भविष्यात घडणाऱ्या घटनासंबंधीची माहिती घेऊन येत नाही किंवा दुसरा कोणीही येऊन त्याला ही बातमी सांगून जात नाही,

---

*१. निमित्त- ऱ्हीस डेविडस् याचा अनुभव 'Suggestion' करतात. हे मनोविज्ञानाच्या अगदी जवळ आहे.*

तर भविष्यात घडणाऱ्या घटनाच स्वतः त्याच्या चित्तात येत असतात.''

## आरसा

''महाराज, आरसा कधी बाहेरच्या प्रतिबिंबाचा शोध करून आणत नाही. आणि दुसराही कुणी ते प्रतिबिंब आरशात आणून सोडत नाही. परंतु बाहेरील वस्तूंची छाया स्वतःच जाऊन त्या आरशात आपले प्रतिबिंब तयार करत असते. महाराज, याप्रमाणेच भविष्यात घडणाऱ्या घटना स्वतःच येऊन त्याच्या चित्तात प्रतिबिंबीत होत असतात.''

''भंते नागसेन, जे चित्त स्वप्न पाहते, त्याला त्याचे फळ शांतीदायक आहे की, भयकारक आहे याची जाणीव असते काय?''

''महाराज त्या स्वप्नाचे फळ शांतीप्रद किंवा भयानक आहे, याची चित्ताला मुळीच जाणीव नसते. परंतु तसे विचित्र स्वप्न पाहून तो दुसऱ्यांना सांगतो आणि दुसरे मग तर्काने त्याचा अर्थ लावतात.''

''भंते नागसेन, फारच छान. पण कृपाकरून एखादे उदाहरण देऊन समजावून सांगावे.''

''महाराज, एखाद्या माणसाच्या शरीरावर तीळ, मास किंवा दाद होत असतात. तेव्हा त्या तिळाला, मसी (Mole) ला किंवा दादाला हे माहीत असते काय की, 'माझे याच्या शरीरावर निर्माण होणे याच्या लाभासाठी आहे की, हानीसाठी आहे. कीर्तीसाठी आहे की, अपकीर्तीसाठी आहे, स्तुतीसाठी आहे की, निंदेसाठी आहे, सुखासाठी आहे की, दुःखासाठी आहे. याची जाणीव त्यास असते काय?''

''नाही भंते, केवळ ज्योतिष्य जाणणारे लोकच मस असलेल्या स्थानाचे परिक्षण करून त्याचे फळ काय असेल, ते सांगत असतात.''

''महाराज, याप्रमाणेच पडलेल्या स्वप्नाचे फळ शांतीदायक होणार की, भयप्रद होणार हे त्यास माहीत नसते. तर तसे विचित्र स्वप्न पाहिल्यानंतर तो दुसऱ्यास सांगतो आणि ते मग तर्काने त्याचा अर्थ लावत असतात.''

''भंते नागसेन, स्वप्न पाहणारा माणूस तो झोपेत असतांना स्वप्न पाहतो की, जागृतावस्थेत पाहतो ?''

''महाराज, जो कोणी स्वप्न पाहतो, तो झोपेत असतांनाही स्वप्न पाहत नाही व जागृत असतांनाही पाहत नाही. परंतु झोप हलकी झाल्यावर जी मधली एक अवस्था असते, त्याच अवस्थेत स्वप्न पडत असतात. महाराज, गाढ निद्रेत चित् विस्मृत

(भवंगगत) होत असते. अशा विस्मृत अवस्थेत चित्त कार्यरत नसते. अशा अवस्थेत त्याला सुख-दुखःची जाणीव नसते. अशा चित्ताच्या सुप्तावस्थेत कधीच स्वप्न पडत नाही. तर चित्त कार्यक्षम असतानाच स्वप्ने पडत असतात.''

''महाराज, काळ्याकुट्ट अंधारात अगदी स्वच्छ आरसा असून देखील प्रतिबिंब त्यात पडत नाही. महाराज, तसेच गाढ निद्रेत जेव्हा चित्त विस्मृत होऊन जाते, तेव्हा शरीर कायम असून देखील चित्त काहीच काम करीत नाही. आणि चित्त काम करीत नाही म्हणून स्वप्नेही पडत नाहीत. महाराज, जसा आरसा आहे तसेच शरीर समजावे, जसा अंधार आहे तसेच गाढ निद्रेस समजले पाहिजे आणि जसा प्रकाश तसेच चित्तास समजावे.''

''महाराज, गडद धुके पडले असता सूर्यतेज निष्क्रिय ठरते. सूर्याची किरणे अस्तित्वात असूनसुद्धा ते झाकून गेल्यामुळे प्रकाश पडत नाही. महाराज, याप्रमाणेच गाढ झोपेत चित्त विस्मृत होऊन जात असते; त्यामुळे ते निष्क्रिय होते आणि अशा अवस्थेत स्वप्नसुद्धा पडत नाही. महाराज, जसा सूर्य तसेच शरीर समजावे; जसे धुके तसेच गाढ झोप समजावी आणि जशी सूर्यकिरणे असतात तशीच चित्ताची अवस्था समजावी.''

''महाराज, दोन अवस्थेत शरीर कार्यशील असून देखील चित्त काम करणे सोडून देत असते - १) गाढ निद्रेत चित्त विस्मृत (भवंगगत) झाल्यामुळे शरीर कार्यशील असून देखील चित्त निष्क्रिय होत असते आणि २) निरोध अवस्थेत शरीर असून देखील चित्त निष्क्रिय होत असते.''

''महाराज, जागृत अवस्थेमध्ये चित्त चंचल, उघड, प्रगट, आणि स्वच्छंद असते. या अवस्थेत कोणतेही निमित्त (Pretext) त्याच्यासमोर येऊ शकत नाही.''

''महाराज, जसे स्वतःला इतरांच्या दृष्टीपासून लपवून ठेऊ इच्छिणारा माणूस सभेमध्ये कोणाच्या तरी आड लपून बसतो. महाराज, तसेच जागृत चित्तापुढे दिव्य अर्थ येऊ शकत नाही. म्हणूनच जागृत असलेला मनुष्य स्वप्न पाहू शकत नाही.''

''महाराज, ज्याप्रमाणे वाईट मार्गाने उपजीविका करणाऱ्या, दुराचारी, दुष्टांच्या संगतीत राहणाऱ्या, शीलभ्रष्ट, भेकड आणि निरूत्साही भिक्षूंच्या अंगी ज्ञानी लोकांचे सद्गुण येऊ शकत नाहीत, त्याचप्रमाणे जागृत माणसाच्या मनात दिव्य अर्थ येऊ शकत नाहीत. म्हणूनच जागृत असलेल्या माणसाला स्वप्न पडू शकत नाही.''

''भंते नागसेन, गाढ निद्रेलासुद्धा आदी, मध्य आणि अंत असतो काय?''

''होय महाराज, गाढ निद्रेलासुद्धा आदी, मध्य आणि अंत असतो.''

''तर तिचा आदी काय आहे, मध्य काय आहे आणि अंत म्हणजे शेवट काय आहे?''

''महाराज, शरीर थकलेले व तुटल्यासारखे वाटते, शक्तीहीन वाटते, ढिले पडलेले आणि त्यात त्राण नाही असे वाटते, हिच त्याची आदी अवस्था होय. महाराज, माकडाच्या निद्रेसमान अर्ध झोपेत व अर्धजागृत अवस्था तिची मध्यावस्था समजावी आणि महाराज, स्वतःला एकदमच विसरून जातो, विस्मृत (भवंगत) होऊन जातो, हिच अंत्यअवस्था होय. महाराज, यातील जी मध्यावस्था आहे, त्याच अवस्थेत कधीही स्वप्ने पडत असतात.''

''महाराज, कोणी एक मनुष्य संयमशील, स्वतःला आपल्या वंश करून घेणारा, शांतचित्त, धर्मरत, दृढनिश्चय आहे. तो लोकांच्या कोलाहलापासून फार दूर जंगलात जाऊन अत्यंत गूढ अशा तत्वाचे चिंतन करतो, तेथे तो झेप न घेता ते गूढ तत्व समजून घेण्यासाठी, ते शोधून काढण्यासाठी एकचित्त होऊन एकांतात मग्न राहतो. महाराज, याप्रमाणेच वानराप्रमाणे अर्धझोपेत तो पुरूष स्वप्न पाहतो. महाराज, जो लोकांचा कोलाहल आहे, तशीच त्याची जागृत अवस्था समजावी, जसे एकांत जंगल आहे, तशीच माकडाची झोप समजावी, कोलाहलापासून दूर जाऊन, झोपेला सारून मधल्या अवस्थेमध्ये गहन विचारात मग्न होऊन जाणे आहे, तशाच माकडझोपेत स्वप्न पडत असतात.''

''बरोबर आहे. भंते नागसेन, हे तर मी मान्य करतो.''

## ७७. काळ, मृत्यू आणि अकाळमृत्यू

''भंते नागसेन, मरणारे प्राणी काळ मृत्यूमुळेच (आयुष्य भरल्यामुळे) मरतात की, काही अकाळ मृत्यूमुळेही (आयुष्य न भरताही) मरतात ?''

''महाराज, मरणारे प्राणी काळमृत्यूमुळे व अकाळमृत्यूमुळे सुद्धा मरतात.''

''भंते नागसेन, काळमृत्यूमुळे कोण मरतात आणि अकाळ मृत्यूमुळे कोण मरतात?''

### पिकलेले आणि परिपक्व फळेही पडतात

''महाराज, आंब्याची, जांभळाची किंवा कोणत्या इतर झाडांची काळी फळे पिकल्यावर पडतात. तर काही फळे पिकण्यापूर्वीच पडत असतात. असे तुम्ही पाहिले आहे काय?''

''होय भंते, पाहिले आहे.''

''महाराज, जी पडणारी फळे पूर्णकाळ भरल्यामुळे पडतात की, काही अकालीही पडतात?''

''भंते, ज्या फळाची पूर्ण वाढ होऊन पक्व झाल्यानंतर पडतात, ती फळे काळ भरल्यावर पडणारे असून जी फळे कीड लागल्यामुळे, काठीने पाडल्यामुळे वादळ, वाऱ्यामुळे किंवा आतल्या आतच कीड लागनू सडल्यामुळे पडतात, ती अकालीच पडत असतात.''

''महाराज याप्रमाणे जे म्हातारे होऊन मरतात, ते आयु पूर्ण झाल्यामुळे, काळ मृत्यूने मरत असतात आणि जे आपल्या दुष्टकर्मामुळे, अधिक धावपळ केल्यामुळे किंवा अधिक कामाच्या दगदगीमुळे मरतात, त्यांच्यावर अकालीच मरण ओढवले असे समजावे.''

''भंते, जे दुष्टकर्मामुळे, अधिक धावपळ केल्यामुळे, म्हातारपणामुळे मृत्यू पावतात, त्या सर्वाचा काळमृत्यूच ठरतो. कारण त्याचे आयुष्य पूर्ण भरते आणि ते मृत्यू पावतात, जे आईच्या उदरातच मरतात, त्यांच्या तेवढाच काळ समजला पाहिजे. याप्रमाणे त्यांचा सुद्धा काळमृत्यूच ठरतो, जे प्रसुतिगृहातच मरतात, त्यांचीही तीच आयुष्य मर्यादा समजली पाहिजे. जे एक महिन्यानंतर मरतात, त्यांचीही तीच आयुष्य मर्यादा मानली पाहिजे. जे शंभर वर्षाचे होऊन मरतात, त्यांचे तेच आयुष्य समजले पाहिजे. भंते नागसेन, याप्रमाणे पाहिले असता कधीच कोणी अकाळमृत्यूने मरत नसतात. जे कोणी मरतात ते सर्व काळ मृत्यूनेच मरत असतात.''

''महाराज, सात प्रकारचे लोक आयुपूर्ण होण्यापूर्वीच अकालीमृत्यू पावतात.''

''कोणते सात प्रकार ?''

(१) उपवाशी माणूस अन्न न मिळाल्यामुळे पोटाचा अग्नी भडकून अकालीच मरतो, (२) तहानेने व्याकुळलेला माणूस पाणी न मिळाल्याकारणाने हृदय सुकून गेल्यामुळे अकालीच मरतो, (३) साप चावलेला माणूस योग्य औषध न मिळाल्यामुळे अकालीच मरतो, (४) विष प्यालेला माणूस योग्य औषध न मिळाल्यामुळे सर्वांगाचा दाह होऊन तडफडून मरतो, (५) अग्नित सापडलेला माणूस कोणी आग न विझविल्यामुळे अकालीच मरतो, (६) पाण्यात बुडालेला माणूस वाचवणारा न मिळाल्यामुळे गुदमरून अकालीच मरतो आणि (७) शस्त्राने घायाळ झालेला माणूस चांगला निष्णात वैद्य न मिळाल्यामुळे अकालीच मृत्यू पावतो.

''महाराज, हे सात प्रकारचे लोक आयुष्य पूर्ण न भरताच अकाली मृत्यू पावतात. या सर्वांना मी एकाच पातळीचे मानतो.''

## मृत्यूची आठ कारणे

''महाराज, प्राणी आठ कारणाने मरतात – १) वायु भडकल्यामुळे, २) पित्त बिघडल्यामुळे, ३) कफवृद्धीमुळे, ४) सन्निपात झाल्यामुळे, ५) हवामान बिघडल्यामुळे, ६) आचारविचारात फरक पडल्यामुळे, ७) एखाद्या बाह्यकारणामुळे आणि ८) कर्मफळामुळे. महाराज, यापैकी कर्मफळापासून होणारा मृत्यू तो काळमृत्यू योग्य वेळी आलेला मृत्यू होय. बाकीचे वेळेपूर्वीच अकाली येणारे मरण समजावे. म्हटले सुद्धा आहे की, 'भूक, तहान, सर्पदंश, विष, अग्नी, पाणि आणि शस्त्राने अकालीच मरण ओढवते. वायू, पित्त, कफ, सन्निपात आणि हवामानात विषम झाल्यामुळे, अविचारामुळे, बाह्यकारणामुळे, कर्मफळामुळे अकालीच मरण येते.''

''महाराज, कित्येक लोक आपल्या पूर्वजन्मी केलेल्या अनेक पापकर्मांच्या फलस्वरूप मृत्यू पावतात. महाराज, जे लोक या जन्मी इतरांना उपवासी ठेवून मारतात, ते अनेक वर्षेपर्यंत म्हातारपणात, तारूण्यात किंवा बालपणीसुद्धा भुकेमुळे त्राहीत्राही होऊन तडफडत पोटाच्या अग्निमुळे आतल्या आत काळीज सुकून गेल्या कारणाने तळमळत प्राण सोडतात. ते त्यांचे काळमरण होय.''

## काळमृत्यू

''महाराज, जे या जन्मी दुसऱ्यांना पाण्यावाचून, तहानेने व्याकूळ करून मारतात, ते लाखो वर्षेपर्यंत तहानेने व्याकूळ होऊन अगदी प्रेताप्रमाणे कृश, शक्तिहीन आणि ह्दय सुकून गेल्यामुळे म्हातारपणी, तरूणपणास किंवा बालपणीच प्राण सोडतात. महाराज, हे त्यांचे फळ मरणच होय.''

''महाराज, जे कोणी या जन्मी दुसऱ्यांना सर्पदंश करून मारतात, ते अनेक वर्षेपर्यंत एका अजगराच्या मुखातून दुसऱ्या अजगराच्या मुखात, एका काळ्या नागाच्या मुखातून दुसऱ्या काळ्या नागाच्या मुखात पडून त्यांच्या दंशाने तडफडून मरत असतात. महाराज, हा त्यांचा काळमृत्यूच होय.''

''महाराज, जे कोणी दुसऱ्यांना विष देऊन मारतात, ते अनेक वर्षेपर्यंत विष बांधेने तळमळत मरत असतात. त्या विषामुळे त्यांचे सर्वांग जळू लागते, शरीर काळेनिळे पडून मास गळून पडते आणि मृत्यूनंतरसुद्धा त्यांच्या प्रेतांचा दुर्गंध सुटतो महाराज हा

त्यांचा काळमृत्यूच होय.''

''महाराज, जे कोणी या जन्मी दुसऱ्यांना अग्निमध्ये जाळून ठार करतात, ते अनेक वर्षेपर्यंत एका अग्निच्या पर्वताहून दुसऱ्या अग्निच्या पर्वतावर तसेच या यम लोकातून त्या यम लोकात त्यांचे शरीर जाळून भाजून टाकल्यामुळे तडफडत प्राण सोडतात. महाराज, हा त्यांचा काळमृत्यूच होय.''

''महाराज, दुसऱ्यांना याजन्मी पाण्यात बुडवून ठार मारतात, त्यांना अनेक वर्षेपर्यंत आजाराने दुर्बल अशक्त, पीडित व चिंतेने हैराण होऊन पाण्यातच बुडून मरावे लागते, महाराज, हा सुद्धा त्याचा काळमृत्यूच होय.''

''महाराज, या जन्मी दुसऱ्यांना भाला वगैरे शस्त्रांनी ठार मारतात. त्यांना लाखो वर्षेपर्यंत दुसऱ्यांकडून तसेच कापले जाते, मारले जाते आणि भाल्यासारख्या शस्त्राने भोसकून हालहाल करून मारले जाते. हा ही त्यांचा काळमृत्यूच होय.''

''भंते, आता आपण ज्याला अकालमृत्यू म्हणता तो कोणता आहे? याविषयी कृपाकरून उदाहरण देऊन सांगावे.''

**अग्नी**

''महाराज, वाळलेले गवत, पाने, झाडे, लाकडे इत्यादीमध्ये भडकलेली आग त्यांना जाळूनच शांत होत असते. तेव्हा लोक म्हणतात की, 'गवतादी सर्व जाळून भस्म करून राखरांगोळी केली. तिला कोणत्याच प्रकारे अडथळा आला नाही. सर्व जळल्यानंतरच ती आपोआप विझून गेली.' महाराज, याप्रमाणेच जे हजारो दिवसपर्यंत जिवंत राहून, म्हातारपण आले आणि आयुष्य पूर्ण होताच कोणत्याही प्रकारची बाधा किंवा अपघात न होता ज्याला मरण येते त्याचा मृत्यू योग्य समयी झाला, असे म्हटले जाते.''

''महाराज, गवत, पाने, झाडे, लाकडे इत्यादीमध्ये अग्नी भडकला असता मध्येच जोराचा पाऊस आला आणि तो अग्नी विझून गेला. महाराज, अशा वेळी तो योग्य वेळी विझला असे आपण समजाल काय?''

''नाही भंते,''

''महाराज, ते कां बरे? पहिला अग्नी आणि नंतरचा अग्नी समान का समजल्या जात नाही?''

''भंते, मध्येच पाऊस पडल्यामुळे नंतरचा अग्नी योग्य वेळापूर्वीच विझून गेला.''

''महाराज, याप्रमाणेच वायुत बिघाड झाल्यामुळे, पित्त बिघडल्यामुळे, कफ वृद्धिमुळे, सन्निपातामुळे, विषम हवामानामुळे, आचारविचारात गडबड झाल्यामुळे, कोणत्यातरी दुर्घटनेमुळे, भूकेमुळे, तहानेमुळे, सर्पदंशामुळे, विषामुळे, पाण्यात बुडून, अग्नित जळून, भाला वगैरे शस्त्र भोसकून ज्याला मरण येते, त्यांचे ते अकाल मरण होय. महाराज, यालाच अकालमृत्यू असे म्हणतात.''

**भयंकर पाऊस**

''महाराज, जर एखादा ढग जोरदार वृष्टिवर्षाव करून लागला आणि जमीन खड्डे सर्व पाण्याने भरून गेलेत. तेव्हा लोक म्हणतात की, येथेच्छ पाऊस पडला. याप्रमाणेच जो पूर्ण म्हातारा होईपर्यंत पूर्ण आयुष्य जगतो व नंतर मध्येच कोणत्याही प्रकारची बाधा किंवा आकस्मिकपणे घात न होता मृत्यू पावतो. त्याचा मृत्यू योग्यवेळी झाला असे म्हणतात.''

''महाराज, आकाशात खूप मेघ गोळा झाले परंतु ते जोरदार वाऱ्यामुळे जिकडे तिकडे विखरून गेले, तर महाराज, तुम्ही हे ढग योग्यवेळी नष्ट झाले असे समजाल काय?''

''नाही भंते !''

''महाराज आता जोरदार पाऊस पाडून गेलेला मेघ आणि वाऱ्यामुळे विखरून गेलेला मेघ यात समानता कां नाही?''

''भंते अनायास वारा आल्यामुळे तो दुसरा मेघ अवेळीच उडून गेला.''

''महाराज, याप्रमाणेच ज्यांना अकाली मृत्यू येतो, ते एकाएकी वायू, पित्त, कफ यांच्या बिघाडामुळे सन्निपातामुळे, हवामान बिघडल्यामुळे, खाण्यापिण्यात गडबड झाल्यामुळे, दुर्घटनेमुळे, भूक, तहान व पाण्यात बुडाल्यामुळे अचानक मृत्यू पावतात.''

**सर्पाचे विष**

''महाराज, एखाद्या माणसाला क्रोधीत झालेला विषारी साप चावला असता व कोणताही अडथळा न येता त्याचे विष सर्व अंगात पसरून त्या माणसाला मरण आले. तर लोक असेच म्हणतील की, ते विष उतरविण्याचे प्रयत्न न झाल्यामुळे सर्व अंगात पसरले व त्यांनी आपले काम करून टाकले. याप्रमाणेच जो पूर्ण म्हातारा होईपर्यंत पूर्ण आयुष्य जगला आणि त्यानंतर कोणत्याही प्रकारची बाधा न येता किंवा कोणताही अपघात न होता मृत्यू पावला तर त्याला आलेले मरण, योग्यवेळी आले असे म्हणतात.''

"महाराज, एखाद्या क्रोधीत झालेल्या विषारी सापाने कोणाला दंश केला असला तरीपण सर्वविद्येत पारंगत असलेल्या एखाद्या माणसाने ते विष उतरून टाकले तर महाराज, ते विष आपले काम करून नष्ट झाले. असे तुम्ही म्हणाल काय?"

"नाही भंते !"

"महाराज, या दोन्ही विषात सारखेपण कां नाही?"

"भंते, दुसरे विष अंगात पूर्णपणे पसरण्यापूर्वीच ते आलेल्या वैद्याने उतरून टाकले."

"महाराज, याप्रमाणेच ज्यांचा अकालमृत्यू होतो, तो वातपित्तादी बिघडल्यामुळे आयुष्य पूर्ण होण्यापूर्वीच मृत्यू पावतो. महाराज, याप्रमाणे अकालमरण ओढवते."

**बाणाचे निशाण**

"महाराज, एखाद्या तिरंदाजाने बाण मारला असता तो धरलेल्या निशाणावर जाऊन लागला म्हणजेच तो कोणत्याही अडथळ्याशिवाय सरळ केलेल्या खुणेपर्यंत गेला असे लोक म्हणतात. महाराज याप्रमाणेच जो म्हातारा होईपर्यंत पूर्ण आयुष्यभर जगून कोणत्याच प्रकारे अपघात न होता मृत्यू पावतो, त्याला असेच म्हणतात की, याचे दिवस पूर्ण भरलेले होते."

"महाराज, एखाद्या तिरंदाजाने बाण मारला असता मध्येच कोणी दुसऱ्याने तो अडवला तर तो बाण अडथळ्यापासून आपल्या निशाणापर्यंत अचूक गेला, असे तुम्ही म्हणाल काय?"

"नाही भंते !"

"महाराज, पाहिला तरि व त्यानंतरचा तीर सारखेच समजण्यात का आले नाही."

"भंते, नंतरचा तीर मध्येच कोणीतरी अडवला होता."

"महाराज याप्रमाणेच ज्यांचे अकालीमृत्यू होतो तो वायू, कफादी बिघडल्यामुळेच मरण पावतो, महाराज, याप्रमाणे अकाली मृत्यू होत असतो."

**ताटाचा आवाज**

"महाराज, कोणी काशाच्या ताटावर टोला मारला असता त्याचा आवाज दूरपर्यंत पोहचेल. तेव्हा लोक म्हणतील की, कोणत्याही प्रकारचा अडथळा न आल्याने

त्याचा आवाज दूरवर गेला. महाराज, याप्रमाणे जख्खड (decrepit) म्हातारपण येईपर्यंत पूर्ण आयुष्य जगून मध्ये कोणती बाधा न येता आणि कोणताही अपघात न होता मरण आले, तर त्याचा मृत्यू योग्य समयी झाला असे म्हणतात.''

''महाराज, कोणी काशाच्या ताटावर टोला मारताच त्याचा आवाज निघतो तेव्हा कोणीतरी मध्येच येऊन तो ताट पकडतो. त्यामुळे तो आवाज त्वरीत बंद पडतो. तेव्हा अशा स्थितीत त्या ताटाच्या आवाजाला कोणताच अडथळा न येता तो दूरपर्यंत गेला आहे. असे तुम्ही म्हणाल काय?''

''नाही भंते !''

''महाराज, ते कां नाही? नंतरच्या आवाजासमान तो कां मानला जात नाही?''

''भंते, मध्येच येऊन कोणीतरी एखाद्याने ते ताट धरून तो आवाज बंद केला.''

''महाराज, याप्रमाणेच ज्यांच्यावर अकाली मरण ओढवते ते वायु. पित्तादी बिघडल्यामुळे होय महाराज, यालाच अकाली मरण म्हणतात.''

### धानाचे पीक

''महाराज, शेतात चांगल्याप्रकारे पेरणी केलेले धान वेळेवर पाऊस आल्यामुळे उत्तम प्रकारे वाढून त्याला भरभरून लोंब येतात, कापणी होईपर्यंत तो पूर्णपणे तयार होऊन जातो. तेव्हा लोक म्हणतात की, कोणत्याच प्रकारे विघ्न किंवा बाधा न आल्यामुळे या वर्षीचे पीक चांगले व पूर्णपणे उतरले. महाराज, याप्रमाणेच जख्खड म्हातारा होऊन पूर्णजीवन जो जगत असतो आणि कोणत्याही प्रकारची विषबाधा न येता किंवा अपघात न होता मृत्यू पावतो, त्याचा मृत्यू अगदी वेळेवर झाला. असे मानण्यात येते.''

''महाराज, समजा शेतात वेळेवर धानाची पेरणी होऊन त्यांची चांगली वाढ झाली असली परंतु मध्ये पाऊस न पडल्यामुळे ते धान वाळून गेले व धान पूर्णपणे न भरता फोल झाले, तर तुम्ही असे म्हणाल काय की, पीक चांगले आले?''

''नाही भंते !''

''महाराज, ते कां ? मागील पीक पहिल्या पीकासमान का मानण्यात येत नाही?''

''भंते, उन्हामुळे मध्येच ते पीक वाळून गेले.''

''महाराज, याप्रमाणेच ज्याचे अकाली मरण होते, तो वायू, कफादी

बिघडल्याकारणाने मृत्यू पावतो.''

''महाराज, हिरवागार उत्तमप्रकारे वाढलेला धान किड पडल्यामुळे एकदम नष्ट होऊन जातो असे तुम्ही ऐकले आहे काय?''

''होय भंते, ऐकले तर आहे आणि पाहिलेसुद्धा आहे.''

''महाराज, तर मग तो धान योग्य काळी सुकून जातो की, अकाली?''

''भंते, अकाली, जर त्यावर किडा पडला नसता तर तो कापणीपर्यंत पूर्ण वाढून चांगल्याप्रकारे भरला असता.''

''महाराज, यावरून हेच सिद्ध होते की, कोणत्याही प्रकारची विघ्न किंवा बाधा उत्पन्न झाली नाही, तर पीक चांगले येते आणि मध्येच जर विघ्न आले, तर नष्टसुद्धा होत असते.''

''होय भंते ! खरे आहे.''

''महाराज, याप्रमाणेच ज्याचा अकाली मृत्यू होतो, तो एक तर वायू बिघाड झाल्यामुळे किंवा कफ, पित्तादी बिघाड झाल्यामुळे होत असतो. महाराज, याप्रमाणे त्याच्यावर अकाली मरण ओढवते.''

''महाराज, उत्तम पीक तयार होऊन लोंबाच्या भाराने धान वाकून गेला व कापणी करतांना मध्येच गारांचा वर्षाव झाला, तर हाती येणारे पीक नष्ट होते. असे तुम्ही ऐकले आहे काय?''

''होय भंते, ऐकले आणि पाहिलेही आहे.''

''महाराज, तर मग हा धान योग्य वेळी नष्ट झाला की, अकाली नष्ट गेला?''

''भंते, अकालीच नष्ट झाला, जर त्यावर गारांचा पाऊस पडला नसता, तर कापणीपर्यंत त्याचे चांगले पीक तयार झाले असते.''

''महाराज, यावरून हाच निष्कर्ष निघतो की, कोणत्याप्रकारे मध्येच गारा पडण्यावची बाधा आली नसती, तर पीक चांगले आले असते आणि या अकस्मात आलेल्या दुर्घटनेमुळे ते नष्ट झाले नसते.''

''होय भंते ! खरे आहे.''

''महाराज, याप्रमाणेच ज्यांचा अकाल मृत्यू होत असते, ते वात, पित्त, कफ यांच्या बिघडण्यामुळेच, सन्निपातामुळे, हवामानात विषम झाल्यामुळे, आहारविहारात

कमी जास्त झाल्यामुळे, कोणत्यातरी अपघातामुळे, भूक, तहानेमुळे, सर्पदंशाने, विषामुळे, अग्नित भाजल्यामुळे, पाण्यात बुडाल्यामुळे, तीरभाल्या सारख्या तीक्ष्ण शस्त्राच्या गंभीर मारामुळे कोणावर अकाली मरणाची पाळी येते. महाराज, जर अशा घटना मध्येच घडून आल्या आहेत; तर निश्चित वेळेवरच कोणालाही मृत्यू आल्यावाचून राहणार नाही.''

''भंते नागसेन! किती आश्चर्य आहे !! किती अद्भूत आहे !!! आपण अनेक कारणांचे उत्तम प्रकारे विश्लेषण करून समजावून सांगितले. अकाल मृत्यू होतो, हे सिद्ध करण्याकरिता कितीतरी उपमा देऊन करून सत्य सिद्ध केले. अकाल मृत्यूही होत असते, हे आता स्पष्ट झाले, उघड झाले आणि पक्के झाले. भंते नागसेन, अज्ञानी आणि दुर्बुध्दी माणूस देखील आपली एकच उपमा ऐकून अकाली मृत्यू होतो हे मान्य करील. तेव्हा बुद्धिमानाचा प्रश्नच काय ? भंते, तुमची पहिली उपमा ऐकूनच मला समजले होते की, अकालमृत्यू होत असते. तथापि तुमच्याकडून दुसऱ्या गोष्टी ऐकण्यासाठी माझा उत्साह अधिकच वाढत गेला. म्हणूनच मी थांबलो नाही.''

## ७८. चैत्यांचा अलौकिकपणा

''भंते नागसेन, निर्वाणाचा साक्षात्कार केलेल्या सर्वच लोकांच्या चैत्यामध्ये अलौकिकपणा असतो की, काही लोकांच्या चैत्यामध्येच असतो?''

''महाराज, कुणाच्या चैत्यात असतो आणि कुणाच्या चैत्यात नसतो.''

''भंते, कुणाच्या चैत्यामध्ये असतो आणि कुणाच्या चैत्यामध्ये नसतो?''

''महाराज, तीन अधिष्ठानांपैकी निदान एकाचेतरी अधिष्ठान करून निर्वाणांचा साक्षात्कार करून घेतात, अशाच भिक्षूंच्या चैत्यामध्ये अलौकिकपणा असतो. ते तीन अधिष्ठान असे-''

(१) ''महाराज, कोणी अर्हत आपल्या जिवंतपणी देवता आणि मनुष्यावर अनुकंपा करून असे अधिष्ठान करतो की, ''माझ्या चैत्यामध्ये अलौकिकपणा यावा.'' त्यांनी असे अधिष्ठान करतांना संकल्प केल्यामुळे त्यांच्यात चैत्यात अलौकिकपणाचा असा गुण येत असतो. याप्रमाणे अर्हतांनी अधिष्ठान करून निर्वाणाचा साक्षात्कार करून घेतल्यामुळे त्यांच्या चैत्यामध्ये अलौकिक शक्ती दिसून येते.''

(२) ''महाराज, देवता आणि मनुष्य यांच्यावर अनुकंपावरून ज्या भिक्षूंनी निर्वाणाचा साक्षात्कार करून घेतला आहे. त्यांच्या चैत्यामध्ये अलौकिक चमत्कार

दिसून येत असतात, त्यामुळे साक्षात्कार पाहून लोकांत धर्मश्रद्धा कायम राहावी आणि इतर लोकांनी सुद्धा आपल्या मनात श्रद्धा जागवून अधिकाधिक पुण्यकार्य करावे. याप्रमाणे देवतांचे अधिष्ठान करून निर्वाणाचा साक्षात्कार करून घेणाऱ्या अर्हतांच्या चैत्यामध्ये अलौकिक चमत्कार दिसून येतो.''

(३) ''महाराज, कुणी श्रद्धावान, भक्त, पंडित, समजदार आणि बुद्धिमान पुरूष असो की, स्त्री असो निर्मळ व पवित्रमनाने गंध, माळा, वस्त्र किंवा अन्य दुसऱ्या वस्तू परिधान करून'' असे होवो असा संकल्प करून अधिष्ठान करतो. त्यामुळे तसेच घडून येते. याप्रमाणे अधिष्ठान केल्यामुळे निर्वाणाचा साक्षात्कार करून घेणाऱ्या अर्हत भिक्षूंच्या चैत्यांत अलौकिक गोष्टी दिसून येतात.''

''महाराज, याच तीन अधिष्ठातापैकी कोणते ना कोणते एक अधिष्ठान करून निर्वाणाचा साक्षात्कार करून घेणाऱ्या अर्हत भिक्षूंच्या चैत्यामध्ये अलौकिकशक्ती येत असते. महाराज, ज्यांच्या निर्वाणाच्या साक्षात्कारात या अधिष्ठानांपैकी कोणतेही अधिष्ठान नसेल, तर सहा अभिज्ञाप्राप्त क्षीणाश्रयाच्या, पूर्णपणे आपल्या चित्ताला वश करून घेणाऱ्या भिक्षूच्याही चैत्यामध्ये अलौकिक गोष्टी दिसून येत नाही. महाराज, अशा जरी अलौकिक गोष्टी त्यांच्या चैत्यात दिसून येत नसल्या तरीपण त्यांच्या पवित्र जीवनाकडे पाहून त्यांच्या चैत्यांची पूजा अर्चा करावयास गेले पाहिजे, या बुद्धपुत्रांनी निर्वाणाचा साक्षात्कार केला आहे, हे धन्य होत, असे स्मरण करून त्यांच्याप्रती गौरवभाव मनात ठेवला पहिजे.''

''बरोबर आहे, भंते नागसेन, बाब अशीच आहे. हे मी स्वीकार करतो.''

## ७९. ज्ञान कोणाला होत नाही

''भंते नागसेन, सन्मार्गावर चालणाऱ्या सर्वच लोकांना ज्ञानाच साक्षात्कार होतो, की काही लोकांना होत नाही?''

''महाराज, काहींना होतो आणि काहींना होत नाही.''

''भंते, कोणाला होतो आणि कोणाला नाही?''

**ज्ञानाचा साक्षात्कार कोणाला होत नाही.**

''महाराज, (१) पशुसारख्या कनिष्ठ योनीत जन्मास आलेल्या प्राण्यांना ते सन्मार्गावर चालत असले तरी त्यांना ज्ञानाचा साक्षात्कार होत नाही, (२) प्रेतयोनीत जन्मलेल्या प्राण्यांना होत नाही. (३) खोट्या सिद्धांतानुसार आचरण करणारांना होत

नाही, (४) उलटरीतीने दुसऱ्याची फसवणूक करणारांना होत नाही, (५-६) माता पित्याची हत्या करणारांना होत नाही. (७) अर्हतांची हत्या करणारांना होत नाही, (८) संघात फूट पाडणारांना होत नाही, (९) बुद्धाच्या शरीरावर घाव करून रक्त काढणारांना होत नाही, (१०) चोरांच्या संगतीत राहणारांना होत नाही, (११) खोटे तत्वज्ञान प्रतिपादन करणाऱ्या आचार्यांच्या मतास मानणाऱ्या लोकांना होत नाही, (१२) भिक्षूणीशी व्यभिचार करणारानांही होत नाही, (१३) तेरा प्रकारची (संधादिसेस) मोठी पापे करून त्यांचे प्रायश्चित न भोगणारानांही होत नाही, (१४) नपूंसकालासुद्धा होत नाही, (१५) उभतो व्यज्जकांना (स्त्री पुरूषांची दोन्ही लिंग असणारांना) चांगल्या मार्गावर चालत असून सुद्धा ज्ञानाचा साक्षात्कार होत नाही. (१६) सात वर्षापेक्षा कमी वयाच्या मुलांनासुद्धा ज्ञानाचा साक्षात्कार होऊ शकत नाही. महाराज, हे सोळा प्रकारचे लोक सन्मार्गावर चालत असले, तरिपण त्यांना ज्ञानाचा साक्षात्कार होत नाही.''

''भंते नागसेन वर सांगितल्याप्रमाणे पंधरा प्रकारच्या लोकांना ज्ञानाचा साक्षात्कार होणार नसेल तर न होवो. मला त्यासंबंधी काही म्हणावयाचे नाही. परंतु सात वर्षाच्या वयाखालील मुलांना सन्मार्गावर चालत असूनही ज्ञानाचा साक्षात्कारा होऊ शकत नाही. याचे कारण काय ? याविषयी माझ्या मनात शंका आहे.''

''मुलांना राग, द्वेष, मोह, मानसन्मान इत्यादी भाव नसतात, खोटे सिद्धांतही माहीत नसतात. तसेच असंतोष व कामवितर्क सुद्धा माहीत नसतात. ही सर्वमान्य बाब नाही काय ? मुलगा म्हणजे पापापासून अगदी मुक्त असतो. मला वाटते तो एकाच वाचनामध्ये चारही आर्यसत्याचे गूढज्ञान पूर्णपणे समजून घेऊ शकतो.''

''महाराज, याच कारणामुळे मी म्हणतो की, सात वर्षापेक्षा कमी वयाच्या मुलांना ज्ञानाचा साक्षात्कार होऊ शकत नाही. महाराज जर सात वर्षापेक्षा कमी वयाच्या मुलांना ज्या गोष्टीचा राग मानावा, त्याचा राग आला असता, द्वेषाच्या ठिकाणी द्वेष आला असता, मोहात पाडणारे विषय आकर्षित करू शकले असते, मद उत्पन्न करणाऱ्या विषयांत मद चढला असता, खोटे सिद्धांत फसवू शकले असते, संतोष आणि असंतोष याची जाणीव असती किंवा पाप वा पुण्य कोणते हे समजले असते तर निश्चितच त्यांना ज्ञानाचा साक्षात्कार घडून आला असता.''

''महाराज, सात वर्षाच्या आतील मुलांचे मन असमर्थ, दुर्बळ, संकुचित, मंद व अजाण असते आणि ज्याची व्याख्या करण्यासाठी शब्दही अपुरे पडतात, ते निर्गूण निर्वाण निरानगस निष्पाप अत्यंत महान आहे. महाराज, अशाप्रकारचे ते महान तत्व अशा अबोध मुलांना कधी समजू शकत नाही.''

## सुमेरूपर्वतास कुणी उपटून फेकू शकत नाही

"महाराज, सुमेरू पर्वत फारच मोठा आहे, अमर्याद, विशाल व महान आहे. त्याला कोणी आपल्या नैसर्गिक शक्तीने उपटून फेकू शकेल काय?"

"विशाल सुमेरू पर्वत अतिशय विशाल व महान आणि त्या माणसाची नैसर्गिकशक्ती त्या मानाने अत्यंत क्षुल्लक आहे."

"महाराज, याप्रमाणेच सात वर्षापेक्षा कमी वर्षाच्या मुलांचे मन एवढे महानतत्व आकलन करून घेण्यात असमर्थ असते."

## महापृथ्वी

"महाराज, ही महापृथ्वी अतिशय लांब, रूंद, विस्तृत, विशाल, विपूल आणि महान आहे. तेव्हा हे महाराज, एखादा पाण्याचा क्षुल्लक थेंब या भव्य महापृथ्वीला विरघळून घेऊ शकत नाही."

"भंते, खरे आहे, पाण्याचा थेंब अतिशय क्षुल्लक असून महापृथ्वी अतिशय मोठी आहे."

"महाराज, याप्रमाणेच सात वर्षापेक्षा कमी वयाच्या मुलांचे मन एवढे महान तत्व आकलन करून घेण्यास असमर्थ असते."

## दिव्याचाप्रकाश

"महाराज, मंद जळणारा एक लहानसा दिवा आहे. तेव्हा त्या मंद जळणाऱ्या लहानशा दिव्याचा प्रकाश देवता आणि मनुष्यासहित सर्व लोकांपर्यंत पसरू शकत नाही. कारण, जग हे अतिशय विशाल आणि दिव्याचा प्रकाश अगदी क्षुद्र आहे हेच याचे कारण आहे."

"महाराज, याप्रमाणेच सात वर्षापेक्षा कमी वयाच्या मुलांचे मन दुबळे असल्यामुळे एवढे महान तत्व आकलन करून घेऊ शकत नाही."

## सालक किडा

"महाराज सालक जातीचा रोग पसरवणारा बारीक आणि अगदी लहान किडा तिन्ही प्रकारच्या मदाचा आस्वाद घेत आपल्या जागी बसला असता नऊ हात लांब, तीन हात रूंद, दहा हात गोलाईत व आठ हात उंच उसा एखादा गजराज आपल्या स्थानाकडे आलेला पाहून त्यास गिळण्यासाठीत तो किडा त्याच्यावर चालून येऊ शकत

नाही.''

''सालक, किडा अत्यंत लहान प्राणी असून तो गजराज धिप्पाड व विशाल आहे.''

''महाराज, याप्रमाणेच सात वर्षापेक्षा कमी वयाच्या मुलाचे मन एवढे महान तत्व आकलन करून घेण्यास असमर्थ असते.''

''महाराज, म्हणूनच सन्मार्गावर चालत असून सुद्धा सात वर्षापेक्षा लहान मुलांना ज्ञानाचा अधिक साक्षात्कार घडू शकत नाही.''

''बरोबर आहे. भंते, आता मला कळून आले.''

## ८०. निर्वाणाची अवस्था

''भंते नागसेन, निर्वाणामध्ये केवळ सुख असते की, काही दुःख सुद्धा असते?''

''महाराज, निर्वाणामध्ये सुखच सुख असते. दुःखाचा लवलेशासुद्धा नसतो.''

''भंते नागसेन, निर्वाणामध्ये केवळ सुखच सुख असते, दुःखाचा लवलेश सुद्धा नसतो, ही गोष्ट मी मान्य करू शकत नाही. भंते नागसेन, मी, तर या निष्कर्षावर पोहचलो की, निर्वाणामध्येसुद्धा काही ना काही दुःख निश्चितच असले पाहिजे. यासंबंधी माझ्याकडे एक भक्कम असे कारण आहे.''

''कोणते कारण ?''

''भंते नागसेन, निर्वाण प्राप्तीसाठी परिश्रम करणारे साधक शरीर व मन या दोन्ही अंगाने तप साधना करीत असतांना दिसून येतात. ते नित्य चक्रमण करीत असतात. आसन लावून बसून राहतात, निव्वळ जमिनीवर पडूत राहतात, भोजनात संयम बाळगतात, निद्रेच्या आहारी जात नाही (झोपेला ठार करतात), नेहमी इंद्रियावर नियंत्रण ठेवतात तसेच आपल्या धनधान्याचा त्याग करून स्नेही, बंधूबांधव आणि मित्रांशी असलेले नाते पूर्णपणे तोडून टाकतात. परंतु सुख भोगणारे व ऐश आरामाचे जीवन जगणारे लोक पांचही इंद्रियाद्वारे सर्वच प्रकारच्या सौंदर्याचा आस्वाद घेऊन आनंद भोगतात आणि मस्त राहतात, नाना प्रकारच्या मनपसंत सौंदर्याचा आपल्या डोळ्यांनी आस्वाद घेतात. फूले, फळे, पाने, साल, मुळे किंवा अनेक प्रकारच्या अत्तरांचा सुगंध घेऊन प्रसन्न राहतात. नाना प्रकारच्या खाण्यापिण्यांच्या वस्तूंचा आस्वाद घेऊन आनंद उपभोगतात, विविध कोमल, नाजूक, पातळ आणि पारदर्शक वस्तूंच्या स्पर्शाने आनंदित होतात आणि हे लोक अनेक प्रकारच्या चांगल्या किंवा वाईट, पाप किंवा पुण्याच्या

आठवणीनेच मनातल्या मनात सुखावतात व मनसोक्त त्यांचा उपभोग घेतात.''

''आणि याउलट तुम्ही लोक डोळे, कान, नाक, जीभ, शरीर आणि मनाच्या इच्छा मारून टाकता, कापून काढता, उपटून काढता, रोकून ठेवता आणि कायमच्या बंद करून ठेवता. त्यामुळे शरीर व मनालासुद्धा कष्टी करता, शारिरीक आणि मानसिक दोन्ही प्रकारचे दुःख भोगता.''

''म्हणून मांगदिय परिव्राजकांनी – 'श्रमण गौतम हे लोकांचा जीव घेणारे आहेत[१]' या शब्दात भगवान बुद्धाची निंदा केली होती. याच कारणाच्या बळावर मी म्हणतो की, निर्वाणसुद्धा दुःखाने भरलेले आहे.''

''नाही महाराज, तुम्ही समजता तसे नाही. निर्वाणामध्ये दुःखाचा अंशपात्रही आढळून येत नाही, तर केवळ सुखचसुख आहे. महाराज, तुम्ही समजात ते दुःख निर्वाणामध्ये नसून निर्वाणाचा साक्षात्कार करण्यापूर्वीची ती बाब आहे. ती तर निर्वाणाचा साक्षात्कार करून घेण्याकरिता प्रयत्नशील राहण्याची अवस्था आहे. महाराज, खरोखरच निर्वाणात सुखचसुख असते. निर्वाणामध्ये दुःखाचा अंशपात्रही नसतो, यासंबंधी एक कारण सांगतो–''

**राजाचे राज्यसुख**

''महाराज, राजे लोकांना राज्यसुख नावाची एखादी वस्तू मिळते काय?''

''होय भंते, राजांना राज्यसुख मिळत असते.''

''महाराज, त्याचे हे राज्यसुख दुःखाने भरले असते काय?''

''नाही भंते !''

''महाराज, कधी सीमेवरील प्रांताचे लोक बंडाळी माजवीत असतात, तेव्हा त्यांचे दमन करण्यासाठी राजाला आपले घरदार सोडून अधिकारी, मंत्री, सेनापती आणि सैनिक या सर्वांना आपल्या सोबत घेऊन किड्याकिटकांचे दुःख सहन करीत ऊन-वाऱ्यात, उंच सखल अशा जमिनीवर भयंकर लढाई करावी लागते. अशाप्रसंगी कधी-कधी आपला जीवसुद्धा धोक्यात घालावा लागतो ते कां ?''

''भंते नागसेन, हे राज्यसुख नव्हे. तर राज्य सुख मिळवून घेण्यासाठी केल्या जाणारे राज्यसुखा पूर्वीचे प्रयत्न मात्र होत. भंते नागसेन, अत्यंत कष्टाने राजे लोकांना राज्याचा लाभ मिळतो आणि त्यानंतरच ते सुखाचा उपभोग घेतात. भंते नागसेन, याप्रमाणे राज्य सुखात दुःख मिसळलेले नसते, राज्यसुख ही दुसरी वस्तू असून दुःख ही दुसरी

वस्तू आहे.''

''महाराज, त्याचप्रमाणे निर्वाण म्हणजे सुखच सुख आहे. निर्वाणात दुःखाचा अंशपात्रही नसतो. परंतु जे कोणी निर्वाण लाभ करून घेण्यासाठी प्रयत्नशील असतात, त्यांना शरीर व मनाने तप करावाच लागतो. त्यासाठी त्यांना उभे राहणे, चक्रमण करणे, आसन लावून बसणे, पडून राहणे, भोजनात संयम पाळणे, निद्रेवर, नियंत्रण ठेवणे; इंद्रियांचे दमन करणे आणि आपल्या साधनसंपत्तीचा त्याग करून, प्रियजन, बंधूबांधन, आणि स्नेहीलोकांशी असलेले नाते तोडणे आवश्यकच असते. इतके कठीण तप (दुःख) भोगल्यानंतर निर्वाणचा साक्षात्कार होताच त्यांना सुखच सुख लाभत असते. शत्रूंशी झुंज देवून त्याचे पराभव केल्यानंतरच राजे लोकांना राज्यसुखाचा उपभोग घ्यावयास मिळतो. त्याचप्रमाणे निर्वाण ही दुसरी बाब आहे.''

''महाराज, निर्वाणात सुखच सुख असते त्यात दुःखाचा अंशपात्रही नसतो, तर दुःखही दुसरी बाब असून निर्वाणही दुसरी बाब आहे. यासंबंधी आणखी एक कारण ऐका–

**कलावंतांना कलेतच आनंद वाटतो**

''महाराज, मोठमोठ्या कलावंतांना त्यांच्या कलेमुळे आनंद होतो काय?''

''होय भंते, मोठमोठ्या कलावंतांना त्यांच्या कलेमुळे आनंद होतो.''

''महाराज, त्यांच्या आनंदात सुखदुःखे मिळाली असतात काय?''

''नाही भंते !''

''महाराज, तर मग आपल्या गुरूच्या सेवेत इतके कष्ट ते का करतात? त्यांना ते प्रणाम कां म्हणून करतात ? उभे राहून त्यांचे स्वागत कां करतात ? पिण्याचे पाणी आणून देणे घरात झाडू मारून घर साफ करणे, दातवन आणून देणे आणि तोंड धुण्यासाठी त्यांना पाणी आणून देणे इत्यादी सेवा ते कां करतात ? त्याचे उष्टे खाणे, त्याची मालीश करून देणे, त्यांना आंघोळ घालून देणे आणि त्यांनी अंग मालीश करून देणे, हे काय दर्शविते? आपल्या इच्छेनुसार काही न करता दुसऱ्याच्या इच्छेनुसार ते सर्व कामे कां करतात ? कठोर अंथरूणारवर का झोपतात. शिळे, उष्टे अन्न खाऊन ते आपला निर्वाह का चालवितात?''

''भंते नागसेन, हा कलेमुळे मिळणारा आनंद नसून कला शिकून घेण्याकरिताच

१. *मज्झिमनिकाय – 'मागन्दिय' सूत्त – ७५*

हे सर्व करत असतात. भंते, अत्यंत कठोर परिश्रमाने कलावंत कला संपादन करून नंतर त्यापासून मिळणार आनंद उपभोगत असतो. याला असे म्हणता येणार नाही की, कलेत दुःख मिसळलेले आहे. महाराज कला ही एक विशेष बाब असून दुःख ही दुसरी बाब आहे.''

''महाराज, त्याचप्रमाणे निर्वाणात सुखचसुख सामावले नाही. निर्वाणात दुःखाचा थोडासुद्धा अंश नसतो. ते निर्वाण प्राप्त करून घेण्यासाठी परिश्रम करतात. त्यांना शरीर व मनाने तपाचरण करावेच लागतात. त्यासाठी त्यांना उभे राहणे, चंक्रमण करणे, आसन मारून बसून राहणे, जमिनीवर पडून राहणे, भोजनासंबंधी संयम पाळणे, झोपेस मारणे, इंद्रियावर नियंत्रण ठेवणे तसेच आपल्या धनसंपत्तीचा त्याग करणे आणि प्रियजन, बंधूबांधव आणि मित्रस्नेहादीकांसोबत असलेले नाते तोडून टाकणे.'' ''इत्यादी गोष्टी कराव्याच लागतात. एवढ्या कठोर परिश्रमाने निर्वाण प्राप्त करून नंतर ते त्याचे सुख उपभोगात असतात. जसे कलावंत आपल्या कलेमुळे मिळणारा आनंद उपभोगतात.''

''महाराज, याचप्रमाणे निर्वाणात सुखच सुख सामावलेले असते. निर्वाणात दुःखाचा लवलेश मुळीच नसतो. दुःख ही एक बाब असून निर्वाण ही दुसरीच बाब आहे.''

''ठीक आहे. भंते, आता मला समजले.''

## ८१. निर्वाणाचे बाह्यस्वरूप

''भंते नागसेन, आपण एवढा जोर देऊन 'निर्वाण' असे नेहमी म्हणत असता. तर ते निर्वाण आहे तरी काय? उपमा देऊन स्पष्टीकरण करून, तर्काद्वारे आणि कारणे दाखवून निर्वाणाचे रूप, स्थान, काळ किंवा त्याची लक्षणे आपण समजावून सांगू शकाल काय?''

''महाराज, उपमा देऊन, स्पष्टीकरण करून, तर्काद्वारे किंवा कारणे दाखवून निर्वाणाचे रूप, स्थान, काळ किंवा त्याची लक्षणे दाखवली जाऊ शकतील, अशी निर्वाणात कोणतीच गोष्ट नाही.''

''भंते नागसेन, असे कसे म्हणता येईल की, निर्वाणाचे अस्तित्व आहे परंतु त्याचे रूप, स्थान, काळ किंवा त्याची लक्षणे उपमांच्याद्वारे, स्पष्टीकरणाने, तर्काच्या साहाय्याने किंवा कारणानेसुद्धा समजावले जाणे अशक्य आहे. कृपाकरून मला ही गोष्ट समजावून सांगा.''

## महासमुद्र

''ठीक आहे महाराज हे मी आपणास समजावून सांगतो. परंतु प्रथम तुम्हीच सांगा की, महासमुद्र नावाची कोणती एखादी वस्तू आहे काय?''

''होय भंते, आहे महासमुद्र कोणाला माहीत नाही बरें !''

''महाराज, समजा, कुणी तुम्हाला विचारले की, महाराज, महासमुद्र अस्तितवात आहे. तर त्या महासमुद्रात पाणी किती आहे ? महासमुद्रात वास्तव्य करणारे जीवजंतू किती आहेत ? ते सांगा, तर तुम्ही काय उत्तर देणार ?''

''भंते नागसेन, असे जर मला कुणी विचारले, तर मी म्हणेन, हे भल्या माणसा, जो प्रश्न विचारण्यासारखा नाही तो प्रश्न तू कां विचारतोस ? असा प्रश्न विचारूच नये. तो तसाच राहू दिला पाहिजे. भूगर्भशास्त्रातील विद्वान लोकांनी सुद्धा या प्रश्नावर अजून विचार केला नाही. महासमुद्रात किती पाणी आहे. याचा हिशोब कोण करू शकेल आणि त्यांत किती जीवजंतू आहेत. हे कोण बरे मोजून काढू शकतो ?''

''महाराज, सहा समुद्र अस्तित्वात असूनसुद्धा असे कसे आपण उत्तर द्याल ? तुम्ही तर त्याचा हिशोब लावून बरोबर सांगितले पाहिजे की, महासमुद्रात इतके पाणी असून त्यात इतके जलचर प्राणी वास्तव्य करून राहतात.''

''भंते, ही अशक्य बाब आहे. असा प्रश्न उचलून धरल्याने काहीच साध्य होणारे नाही.''

''महाराज, ज्याप्रमाणे महासमुद्र अस्तित्वात असूनसुद्धा त्यात किती पाणी आहे व किती जलचर प्राणी तेथे वास्तव्य करून राहतात, हे मात्र सांगितले जाऊ शकत नाही. त्याचप्रमाणे निर्वाण अस्तित्वात असले तरी त्याचे स्वरूप, स्थान, काळ किंवा त्याची लक्षणऐ उपमा देऊन, स्पष्टीकरणारने, तर्काच्या साह्याने किंवा कारणे दाखवून समजावून सांगणे देखील तितकेच अशक्य आहे. महाराज, ज्यांचे चित्तवश झालेले आहे, असा ऋद्धिमान पुरूष महासमुद्रात पाणी किती आहे व त्यात किती जीवजंतू वास्तव्य करून राहतात हे सांगू शकेल. परंतु तो सुद्धा निर्वाणाचे स्वरूप, स्थान, काळ किंवा याची लक्षणे कधीही समजावून सांगू शकणार नाही.''

''महाराज, निर्वाण अस्तित्वात असूनसुद्धा त्याचे स्वरूप, स्थान, काळ आणि त्याची लक्षणे उपमा देऊन समजावून सांगता येत नाही. यासंबंधी आणखी एक कारण ऐका.''

**'अरूपकायिक' देवता**

''महाराज, देवगणात 'अरूपकायिक' नावाच्या देवता आहेत की नाही ?''

''होय भंते, 'अरूपकायिक' नावाच्या देवता आहेत असे मी ऐकले आहे.''

''महाराज, त्या 'अरूपकायिक' देवताचे रूप, स्थान, काळ आणि लक्षणे, उपमेद्वारा, स्पष्टीकरणाने, तर्काद्वारे आणि कारणाने स्पष्ट करून समजावून सांगता येईल काय?''

''नाही भंते, तसे समजावून सांगता येणे शक्य नाही.''

''महाराज, तर मग असेच म्हणावे लागेल की, 'अरूपकायिक' देवताच अस्तित्वात नाहीत.''

''भंते, 'अरूपकायिक' देवता अस्तित्वात आहेत, हे खरे आहे परंतु त्यांचे रूप, स्थान, काळ व त्यांची लक्षणे, उपमाद्वारे, स्पष्टीकरणाने, तर्कलावून आणि कारणानेसुद्धास समजावून सांगितले जाऊ शकत नाही.''

''महाराज, ज्याप्रमाणे 'अरूपकायिक' देवतांचे अस्तित्व असूनही त्यांचे रूपादी, काळ, स्थान आणि लक्षणे उपमेद्वारा समजावून सांगितले जाऊ शकत नाही. त्याचप्रमाणे निर्वाण अस्तित्वात असूनही ते समजावून सांगितले जाणे अशक्य आहे.''

''भंते नागसेन, ठीक आहे. निर्वाण म्हणजे सुखच सुख आहे; आणि त्याचे रूप, स्थान, काळ किंवा त्याची लक्षणे, उपमाद्वारे, स्पष्टीकरणारने तर्कसाह्याने आणि कारण देऊन समजवून सांगता येत नाही. हे मी मान्य करतो. पण भंते, उपमांच्या साह्याने निदान निर्वाणाच्या गुणाबद्दल तरी काही संकेत कुणी तरी केले आहेत काय?''

''महाराज, निर्वाणाला तर रूप नाहीच परंतु उपमांच्या आधाराने त्यावर थोडाफार प्रकाश टाकता येण्यासारखा आहे. जेणेकरून हे समजून येते की, ते कसे आहे.''

''ठीक आहे. भंते, यामुळे निर्वाण कसे आहे यावर प्रकाश पडेल. त्वरा करा आणि आपल्या मंद, शीतल आणि मधूर भाषणरूपी वायूने माझ्या हृदयातील उत्सुकतारूपी आग शांत करावी.''

**निर्वाण काय आहे याकडे संकेत**

''महाराज, कमळाचा एक गुण निर्वाणात पहावयास मिळतो, पाण्याचे दोन गुण, औषधाचे तीन गुण, महासागराचे चार गुण, भोजनाचे पाच गुण, आकाशाचे दहा गुण,

मणीरत्नाचे तीन गुण, लाल चंदनाचे तीन गुण, लोण्याचे तीन गुण, आणि पर्वत शिखराचे पाच गुण निर्वाणात पहावयास मिळतात.''

**कमळाचा एक गुण**

''भंते नागसेन, कमळाचा एक गुण निर्वाणात पहावयास मिळतो. असे जे आपण म्हणाले तर तो एक गुण कोणता आहे?''

''महाराज, कमळ हे पाण्यात राहूनही पाण्यापासून सर्वथा अलिप्त असेच राहत असते. त्याचप्रमाणे निर्वाण हे सुद्धा सर्वच क्लेशापासून अलिप्त असते. महाराज, कमळाचा हाच एक गुण निर्वाणात असतो.''

**पाण्याचे दोन गुण**

''भंते नागसेन, पाण्याचे दोन गुण निर्वाणात मिळतात असे जे आपण म्हणाले तर ते दोन गुण कोणते आहेत ?''

''महाराज, (१) पाणी ज्याप्रमाणे शीतल असते आणि ते उष्णतेला दूर करते त्याचप्रमाणे निर्वाण देखील सर्वच क्लेशाच्या उष्णतेची आग विझवून टाकते. (२) तसेच ज्याप्रमाणे पाणी थकून चूर झालेल्या, तहानेने व्याकुळलेल्या आणि उन्हाने त्रस्त अशा मनुष्य किंवा प्राण्याची तृषा भागवून त्याला शांत करते, त्याचप्रमाणे निर्वाणसुद्धा लोकांची कामतृष्णा, भयतृष्णा आणि विभवतृष्णा यामुळे सुकलेला कंठ निर्वाणरूपी जलाने भिजवून त्यांची तृषा दूर करते.''

**औषधाचे तीन गुण**

''भंते नागसेन, आपण म्हणता की, औषधाचे तीन गुण निर्वाणात पहावयास मिळतात. ते तीन गुण कोणते आहेत ?''

''महाराज, (१) ज्याप्रमाणे विषबाधेने तळमळणाऱ्या लोकांना वाचवण्यासाठी औषधावाचून दुसरा मार्ग नाही. आणि (२) ज्याप्रमाणे औषध सर्वच प्रकारच्या आजाराचा अंत करून टाकते. त्याचप्रमाणे निर्वाण हे समस्त दुःखाचा अंत करण्यास समर्थ आहे. (३) याशिवाय ज्याप्रमाणे औषध हे अमृत ठरणारे आहे. त्याचप्रमाणे निर्वाणसुद्धा अमृतच आहे.''

**महासागराचे चार गुण**

''भंते नागसेन, आपण म्हणाले की, महासागराचे चार गुण निर्वाणात पहावयास

मिळतात ते कोणते चार गुण आहेत ?''

''महाराज, (१) ज्याप्रमाणे महासागर स्वतःमध्ये कोणत्याही मृत शरीरास राहू देत नाही. त्याचप्रमाणे निर्वाणादेखील क्लेश राहू शकत नाहीत. महाराज, (२) ज्याप्रमाणे महासागर महान आणि अमर्यादा आहे, सर्वच नद्या त्यात येऊन मिळाल्या तरी तो कधी भरू शकत नाही. त्याचप्रमाणे निर्वाण हे सुद्धा महान आणि अमर्याद आहे. सर्वच जीव त्यात येऊन मिळाले तरी त्याची भरती कधीच होऊ शकत नाही. (३) आणखी ज्याप्रमाणे महासागतरात मोठमोठ्या जीवांचे वास्तव्य आहे, त्याचप्रमाणे निर्वाणामध्येही मोठमोठे क्षीणाश्रव, परमविशुद्ध बलशाली आणि आत्मसंयमी अर्हताचे वास्तव्य आहे. (४) आणखी ज्याप्रमाणे महासागर नाना प्रकारच्या लाटारूपी लहान मोठ्या फुलांनी फुललेला राहतो. त्याचप्रमाणे निर्वाणसुद्धा नाना प्रकारच्या शक्ती, विद्या आणि विमुक्तीरूपी फुलांनी नेहमीच परिपूर्ण राहतो. महाराज, महासागराचे हेच चार गुण निर्वाणात दिसून येतात.''

### आहाराचे पाच गुण

''भंते नागसेन, आपण म्हणता की, आहाराचे पाच गुण निर्वाणात दिसून येतात, तर ते पाच गुण कोणते आहेत ?''

''महाराज, (१) ज्याप्रमाणे आहार सर्वच जीवांच्या प्राण्याचे रक्षण करते. त्याचप्रमाणे साक्षात केलेले निर्वाण वृद्धत्वापासून व मृत्यूपासून सर्वांचे रक्षण करते. (२) याशिवाय ज्याप्रमाणे आहार सर्वांच्याच शक्तीची वृद्धी करते, त्याचप्रमाणे निर्वाण साक्षात करून घेताच ऋद्धिशक्तीची वृद्धी होते. (३) पुन्हा ज्याप्रमाणे आहार सर्वच जीवांचे सौंदर्य कायम ठेवते. त्याचप्रमाणे साक्षात केलेले निर्वाण सर्वांनीच सद्गुण सौंदर्य कायम ठेवते. (४) याशिवाय ज्याप्रमाणे आहार सर्वच प्राण्याचे कष्ट हरण करते, त्याचप्रमाणे निर्वाण हे सर्वांच्याच कष्टाचे हरण करते. (५) आणखी ज्याप्रमाणे आहार सर्वच प्राण्यांची भूकेची व्यथा व अशक्ततेचा नाश करते, त्याचप्रमाणे निर्वाणसुद्धा सर्वच जीवांची दुःख, व्यथा व अशक्तता नाश करते.''

''महाराज, आहाराचे हेच पाच गुण निर्वाणाचा साक्षात्कार केला असता त्यात पहाण्यास मिळतात.''

### आकाशाचे दहा गुण

''भंते नागसेन, आपण सांगितले की, आकाशाचे दहा गुण निर्वाणात पहावयास मिळतात. तर ते दहा गुण कोणते आहेत?''

''महाराज, ज्याप्रमाणे आकाश (१) उत्पन्न होत नाही, (२) जुने होते नाही, (३) मरत नाही, (४) आवागमन करीत नाही,(५) दूर्ज्ञेय आहे, (६) चोरल्या जाऊ शकत नाही, (७) दुसऱ्या कोणावरही अवलंबून राहत नाही, (८) स्वच्छंद आहे, (९) मुक्त आहे आणि (१०) अनंत आहे. त्याचप्रमाणे निर्वाणसुद्धा उत्पन्न होत नाही, जुने होत नाही, मरत नाही, आवागमन करीत नाही, अत्यंत दुज्ञेय आहे, चोरले जाऊ शकत नाही, दुसऱ्यावर अवलंबून राहत नाही, स्वच्छंद आहे, मुक्त आहे आणि अनंत आहे. महाराज, आकाशाचे हेच दहा गुण निर्वाणात उपलब्ध आहेत.''

## मणीरत्नाचे तीन गुण

''भंते नागसेन, आपण म्हणता की, मणीरत्नाचे तीन गुण निर्वाणा उपलब्ध आहेत. तर ते तीन गुण कोणते बरे ?''

''महाराज, (१) ज्याप्रमाणे मणीरत्न सर्व इच्छा पूर्ण करते, त्याचप्रमाणे निर्वाण देखील सर्व इच्छांची पूर्तीक करीत असते. (२) याशिवाय ज्याप्रमाणे मणीरत्न अतिशय मनोहर असते. त्याचप्रमाणे निर्वाणसुद्धा अतिशय मनाहेर असते, प्रकाशमान व उपयुक्त असते त्याचप्रमाणे निर्वाणसुद्धा प्रकाशमान व उपयुक्त असेच आहे. महाराज, मणीरत्नाचे हेच तीन गुण निर्वाणात पहावयास मिळतात.''

## लाल चंदनाचे तीन गुण

''भंते नागसेन, निर्वाणात दिसून येणारे लाल चंदनाचे तीन गुण सांगितले होते. तर ते तीन गुण कोणते आहेत ?''

''महाराज, (१) ज्याप्रमाणे लाल चंदन दुर्मिळ असते, त्याचप्रमाणे निर्वाणाचा साक्षात्कार करून घेणे सुद्धा अत्यंत कठीण आहे. (२) आणखी ज्याप्रमाणे लाल चंदनाचा सुगंध जसा वैशिष्टपूर्ण असतो. त्याचप्रमाणे निर्वाणाचा सुगंधसुद्धा वैशिष्टपूर्ण असतो. (३) याशिवाय आणखी ज्याप्रमाणे सज्जन लोकात लाल चंदनाची प्रशंसा होते त्याचप्रमाणे निर्वाणाचीसुद्धा सज्जन लोकात मुक्तपणे प्रशंसा होत असते. महाराज, लाल चंदनाचे हेच तीन गुण निर्वाणात पहाण्यात येतात.''

## लोण्याचे तीन गुण

''भंते नागसेन, लोण्याचे तीन गुण निर्वाणात उपलब्ध असलेले कोणते बरे ?''

''महाराज, (१) ज्याप्रमाणे लोणी हे पहाण्यसात अत्यंत सुंदर असते त्याचप्रमाणे निर्वाण देखील सद्गुणाने अत्यंत सुंदर असते. (२) ज्याप्रमाणे लोण्याचा सुगंध फारच

सुंदर असतो. त्याचप्रमाणे निर्वाणामध्ये सुद्धा फारच सुंदर अशा शीलांचा सुगंध असतो. (३) ज्याप्रमाणे लोण्याची चव अत्यंत मधूर असते. त्याचप्रमाणे निर्वाणाचा सुद्धा आस्वाद माधुर्यपूर्ण असतो. महाराज, लोण्यांचे हे तीन गुण निर्वाणात दिसून येतात.''

### पर्वत शिखराचे पाच गुण

''भंते नागसेन, पर्वताच्या शिखराचे पाच गुण निर्वाणात पहावयास मिळतात असे आपण म्हणता, ते पाच गुण कोणते आहेत?''

''महाराज, (१) ज्याप्रमाणे पर्वताचे शिखर फारच उंच असते, त्याचप्रमाणे निर्वाणसुद्धा फारच उंचस्तराचे आहे. (२) तसेच ज्याप्रमाणे पर्वताचे शिखर अचल असते. त्याचप्रमाणे निर्वाणसुद्धा अचल असते. (३) याशिवाय पर्वताच्या शिखरावर चढून जाणे मोठे कठीण कार्य असते. त्याचप्रमाणे निर्वाणाचे शिखर चढून जाणेही मोठे कठीण आहे. (४) याशिवाय पर्वताच्या शिखरावर कोणत्याच प्रकारचे बीज रूजू शकत नाही. त्याचप्रमाणे निर्वाणाच्या शिखरावर सुद्धा क्लेशांचे बीज कधीच मूळ धरू शकत नाही. (५) आणखी ज्याप्रमाणे पर्वत शिखराला कधी कोणाविषयी प्रेम किंवा द्वेष मुळीच नसतो. निर्वाणसुद्धा कोणावर प्रेम किंवा द्वेष करीत नाही. महाराज पर्वताच्या शिखराचे हेच पाच गुण निर्वाणात पहावयास मिळतात. बरोबर आहे. भंते नागसेन, गोष्ट अशीच आहे.''

## ८२. निर्वाणाची कालमर्यादा

''भंते नागसेन, आपण लोक म्हणता की, निर्वाण भूत, भविष्य आणि वर्तमान या तिन्ही काळाच्या पलिकडील वस्तू आहे. निर्वाण उत्पन्न होत नाही, निर्वाण उत्पन्न होत नाही असेही नाही, आणि निर्वाण उत्पन्न होऊ शकते असेही नाही.''

''भंते नागसेन, तेव्हा कोणी योग्यमार्गाने वाटचाल करून निर्वाणाचा साक्षात्कार करून घेतात, ते आधीच उत्पन्न झाले असलेल्या निर्वाणाचा साक्षात्कार करतात की, निर्वाणास स्वतःच उत्पन्न करून घेऊन नंतर त्याचा साक्षात्कार करतात?''

''महाराज, जे कुणी उचित मार्गाने वाटचाल करून निर्वाणाचा साक्षात्कार करून घेतात, ते त्या उत्पन्न झालेल्या निर्वाणाचा साक्षात्कार करून घेत नाहीत आणि स्वतःच नवीन सुरवातीपासून निर्वाण उत्पन्न करूनही त्याचा साक्षात्कार करत नाही. महाराज, असे असले तरी निर्वाण अस्तित्वात असलेले यथार्थसत्य आहे व कोणीही उचित मार्गाने वाटचाल करणारा, त्याचा साक्षात्कार करून घेऊ शकतात.''

''भंते नागसेन, माझ्या प्रश्नाला अधिक क्लिष्ट करून उत्तर देऊ नका. तर चांगल्या तऱ्हेने त्याची उकल करून, स्पष्ट करून सांगावे. कोणत्याही प्रकारचा संकोच न बाळगता

आपण जे काही शिकलात ते सर्व उत्साहपूर्वक सांगावे. याविषयाच्या बाबतीत मी पूर्णपणे अज्ञानी आहे, वाट चुकलो आहे आणि संकटात पडलो आहे. माझ्या मनात आतल्याआत सलणारा हा दोष आपण काढून दूर करावा.''

''महाराज, निर्वाण शांतीदायक, सुखमय आणि अप्रतिम आहे. उचित मार्गावर वाटचाल करीत असता बुद्धोपदेशानुसार संसारातील सर्व संस्कारांचे (अनित्य, दुःख व अनात्मरून) अवलोकन करून कुणी प्रज्ञेद्वारा निर्वाणाचा साक्षात्कार करून घेतात. महाराज, जसा एखादा शिष्य गुरूजवळ विद्या शिकून आपल्या बुद्धी कौशल्यानुसार त्या विद्येचा साक्षात्कार करून घेतात. तद्वतच कुणी उचित मार्गाने वाटचाल करीत असता बुद्धाच्या उपदेशानुसार संसारातील सर्वच संस्काराचे (अनत्य दुःख व अनात्म रूप) अवलोकन करून आपल्या प्रज्ञेद्वारा निर्वाणाचा साक्षात्कार करून घेतात.''

''निर्वाणाचे दर्शन कसे होऊ शकते ?''

''समस्त विघ्नापासून मुक्त, उपद्रवरहित, निर्भय, कुशल, शांत, समाधानी, प्रसन्न, नम्र, परिशुद्ध होऊन शीलापालन करणारांना निर्वाणाचे दर्शन होऊ शकते.''

## अग्नितून बाहेर पडणे

''महाराज, एखादा माणूस धगधगत्या अग्निमध्ये सापडल्यामुळे वाटेल ती धडपड करून उड्या मारीत, धावत पळत अग्निबाहेर निघून येतो. तेव्हा त्याला अतिशय आनंद वाटतो. त्याचप्रमाणे कुणी योग्यमार्गाने वाटचाल करून मनाला उत्तम प्रकारे वळण लावून तीन प्रकारच्या अग्निच्या दुःखापासून आपली सुटका करून घेऊन परम सुख निर्वाणाचा साक्षात्कार करून घेतो. महाराज, राग, द्वेष व मोह ह्याच तीन प्रकारच्या अग्निबाहेर पडून उचितमार्गाने वाटचाल करून निर्वाणाचा साक्षात्कार करून घेणारा होय असे समजले पाहिजे.''

## घाणीतून बाहेर पडणे

''महाराज, मेलेले साप, कुत्री आणि माणसे यांनी भरलेला एखादा खड्डा आहे व त्यातून असह्य करणारी दुर्गंधी बाहेर पडत आहे. याच प्रेतांच्या खड्यात पडलेला एखादा जिवंत मनुष्य कशीतरी धडपड करून खड्याबाहेर येतो तेव्हा त्याला अतिशय आनंद होतो. त्याचप्रमाणे हे महाराज, कुणी उचित मार्गाने वाटचाल करून आपल्या मनास उत्तम दिशेला वळवून क्लेशरूपीप्रेत साचलेल्या घाणीच्या खड्याबाहेर पडतो आणि निर्वाणाचा साक्षात्कार करून घेतो. महाराज, येथे जी प्रेते सांगितली आहेत, त्या पांच प्रकारच्या कामवासना समजाव्यात, आणि प्रेताच्या खड्यातून निघण्यासाठी धडपड करणारा माणूस योग्यवाटेने वाटचाल करणारा समजावा. खड्याबाहेर येणे म्हणजे

निर्वाणपद गाठणे होय, असे समजावे.''

**संकटातून बाहेर पडणे**

''महाराज, एखादा माणूस भयंकर संकटात सापडल्यामुळे अतिशय भयभीत झालेला आहे. घाबरून गेला आहे, थरथर कापत आहे, बेशुध्द झाला आहे, मतिभ्रष्ट झाला आहे. तो पूर्णपणे सुरक्षित व भयमुक्त अशा स्थानावर आपल्या प्रयत्नाने व परिश्रमाने आला आहे. तेव्हा त्याला तेथे खूप आनंद होतो. महाराज, त्याचप्रमाणे कुणी योग्य वाटेने वाटचाल करून आपल्या मनाला योग्य वळण लावून तो भयमुक्त आणि परमसुखमय अशा निर्वाणाचा साक्षात्कार करून घेतो. महाराज, येथे जे संकटाचे भय आहे त्यालाच जन्म घेणे, वृद्ध होणे, आजारी पडण मृत्यू पावणे इत्यादीमुळे उद्‌भवणारे संसारातील हे भय समजले पाहिजे आणि संकटातून बाहेर पडून सुरक्षित व निर्भय अशी भूमी गाठणे आहे, त्यालाच निर्वाणप्रत करणे होय असे समजले पाहिजे.''

**चिखलातून बाहेर पडणे**

''महाराज, कोणी एक माणूस घाणेरड्या व दुर्गंधीयुक्त चिखलात फसला असता उडी मारून चांगल्या स्वच्छ जागेवर येतो, तेव्हा त्याला समाधान वाटते. त्याचप्रमाणे योग्यमार्गाने चालत असता आपल्या मनाला उत्तम दिशेला लावून क्लेश रूपी दुर्गंधीतून बाहेर पडल्यानंतर परमसुख निर्वाणाचा साक्षात्कार करून घेतो. महाराज, येथे जसा चिखल आहे. तसेच संसारातील लाभ, सत्कार आणि स्तुती समजावी. चिखलात पडलेला माणूस, योग्यमार्गाने वाटचाल करणारा समजावे आणि येथे जी चांगली स्वच्छ जागा आहे त्याला निर्वाण समजावे.''

''सन्मार्गाने चालणारा कोणी माणूस निर्वाणाचा साक्षात्कार कसा काय करून शकतो?''

''महाराज, जो कोणी सन्मार्गाने चालतो, तो मनुष्य संसारातील सर्वच संस्कसार प्रवृत्तीचे अवलोकन करून त्यावर विचार करतो. त्यात त्याला जन्म दिसून येतो, खंगत जाणे दिसून येते, आजार दिसून येतो आणि मरण दिसून येतो, तेथे त्याला थोडे सुद्धा सुख किंवा आराम दिसत नाही. कोणतीही वस्तू सुरवातीपासून तर अगदी शेवट पर्यंत कुठेच धरून ठेवण्यासाठी नाही असेच त्याला दिसून येते.''

**संसार म्हणजे अग्निमध्ये भाजून निघालेला लोखंडाचा लाल गोळा**

''महाराज, ज्याप्रमाणे दिवसभर अग्निमध्ये तापवून लाल केलेला लोखंडाचा गोळा कोणत्याच बाजूने हातात धरून ठेवण्यात योग्य नसतो. त्याचप्रमाणे महाराज,

जो संसारातील सर्वच प्रवृत्तीचे अवलोकन करतो, तेव्हा त्याला तेथे जन्म दिसून येतो, म्हातारपण दिसून येते, आजार दिसून येतो आणि मरण दिसून येते. सुख आणि आरामाचा लवलेशासुद्धा तेथे दिसत नाही. अगदी सुरवातीपासून तर शेवटपर्यंत या संसारातील कोणतीच वस्तू धरून ठेवण्यालायक नाही. या निष्कर्षाला तो शेवटी येऊन पोहचतो. त्यामुळे त्याचा मनात संसाराप्रती विरक्ती निर्माण होते. मन बेचैन होऊन जाते. जन्मास त्याला कोणत्याच प्रकारचे सारभूत तत्व किंवा आपला सहाय्यक दिसून येत नाही. पूर्वीच्या आवागमनामुळे थकलेला आता त्यातून आपली सुटका करून घेण्यासाठी सारखी धडपड करीत असतो.''

''महाराज, एखादा माणूस ज्वाला भडकलेल्या अग्नीत सापडला असता तेथे आपण पूर्णपणे असहाय्य आहोत, आपणास येथून कुणीच वाचवू शकत नाही असे त्याला दिसून येते.''

''महाराज, याप्रमाणे सांसारिक विषयासंबंधी त्याच्या मनात उदासी निर्माण होते. त्याच्या मनात एक प्रकारचा किळस निर्माण होतो. तो पूर्वीच आवागमनात थकलेला असतो. परंतु त्याला जन्ममृत्यूत काहीच सारभूततत्व दिसून येत नाही, किंवा कोणी सहाय्यकाही दिसत नाही.''

**संसार म्हणजे भयागार**

''जगात सर्व बाजूला भीती आहे असे पाहून त्याच्या मनात असा विचार येतो- 'अरे ! हे सर्व जग पेटत आहे !! धगधगून पेटत आहे !!! दुःखाने भरले आहे! त्रासावाचून तेथे दुसरे काही दिसून येत नाही !! या यातायातीतून कोणाला आपली सुटका करून घ्यावयाची असेल, तर त्यासाठी त्याला परमशांत आणि प्रणित निर्वाण हेच एकमात्र सुरक्षित आश्रयाचे स्थान आहे. तेथे ना संस्कारांची मात्रा चालत, ना उपाधीची, तृष्णेचे तर नावही ऐकावयास मिळत नाही. रागाचा अंतल झालेलाच असतो. परंतु आवागमनाचासुद्धा तेथे निरोध होतो. याप्रमाणे आवागमनापासून सूटका करून घेण्यासाठी त्याचे चित्त प्रयत्नशील बनले असते. आणि श्रद्धा व विश्वास दृढ होतो. तो आनंदाने उद्‌गारतो ! वा !! मला चांगले आश्रयस्थान मिळाले आहे.''

**वाट चुकलेल्यास वाट गवसली**

''महाराज, ज्याप्रमाणे अपरिचीत जंगलात वाट चुकलेला वाटसरू रस्ता सापडताच आनंदित होतो आणि स्वतःशीच उद्‌गारतो - 'वा ! वा !! मला आता योग्य वाट गवसली.' त्याचप्रमाणे या जगाच्या यातायातीत केवळ दुःखच दुःख आहेत,

असे पाहून सांसारिक आवागमनातून आपली सुटका करून घेण्यासाठी त्याचे मन प्रयत्नशील असते. तेथेच त्याची श्रद्धा व विश्वास बसतो. आणि आनंदित होऊन उद्गारतो – 'अरे वा! मला आधार मिळाला.' तो निर्वाणप्राप्त करावयाच्या वाटा मोकळ्या करून घेतो. त्याचे सर्व लक्ष निर्वाणावर केंद्रित होतो. त्याचीच तो भावना करतो आणि त्याचेच चिंतन व मनन करतो. त्यावर तो दृढ राहतो. त्यासाठीच तो प्रयत्नांची पराकाष्ठा करतो. आपले सर्व विचार तिकडेच वळवतो. याप्रमाणे सतत त्याचेच चिंतन व ध्यास धरल्याकारणाने त्याचे चित्तास सांसारिक विषयाचा तिटकारा वाटून पूर्णपणे ते वैराग्याकडे वळलेले असते. महाराज, वैराग्यपूर्ण होताच सन्मार्गाने चालत असता तो निर्वाणाचा साक्षात्कार करून घेतो.''

''ठीक आहे. भंते नागसेन, मला आता पूर्णपणे समजून आले आहे.''

## ८३. निर्वाण कोणत्या बाजूला आणि कुठे आहे ?

''भंते नागसेन, निर्वाण हे पूर्वेकडे की पश्चिमेकडे आहे ? उत्तरेकडे की दक्षिणेकडे आहे ? वर आहे की खाली आहे ? की, तिरप्या दिशेला आहे ? ते कुठे दडलेले आहे? ती जागा कोठे आहे ?''

''महाराज, ती जागा पूर्वेकडे नाही की पश्चिमेकडे नाही, उत्तरेकडे नाही की दक्षिणेकडे नाही. खाली, वर किंवा तिरप्या कोणत्याही दिशेला नाही. की जेथे निर्वाण दडलेले असेल.''

''भंते, निर्वाण जर कोठेच नसेल, तर ते अस्तित्वातच नाही. निर्वाण नावाची कोणतीच वस्तू नाही. तर मग निर्वाणाचा साक्षात्कार केला जातो, ही गोष्ट एकदा खोटी ठरते. यासंबंधी मी आपणास एक कारण सांगतो.''

''भंते नागसेन, अन्न पिकविण्यासाठी जगात शेते आहेत, सुगंधासाठी फुले आहेत, फूले उगविण्यासाठी फुलबागा आहेत, फळांसाठी झाडे आहेत, आणि रत्नांसाठी मोठमोठ्या खाणी आहेत. ज्या कोणाला ज्या ज्या वस्तूंची आवश्यकता असते, त्या वस्तू तो तेथे जाऊन उत्तन्न करून घेतो. भंते नागसेन, याप्रमाणेच जर निर्वाण अस्तित्वात आहे, तर त्याच्या उत्पत्तीचे स्थान कोठे ना कोठे असलेच पाहिजे. भंते, निर्वाणाच्या उत्तत्तीचे जर कोठेच स्थान नसेल, तर निर्वाण नावाची कोणतीच वस्तू अस्तित्वात नाही. असेच मला म्हणावे लागेल. अशा स्थितीत निर्वाणाचा साक्षात्कार केला जातो ही गोष्ट एकदम खोटी ठरते.''

''महाराज, निर्वाण प्रात करून घेण्याचे जरी असे कोणतेच निश्चित स्थान नसले

तरी पण निर्वाणाचे अस्तित्व आहे, हे खरे आहे. आणि सन्मार्गावर वाटचाल करून मनाला योग्य दिशेकडे वळवून निर्वाणाचा साक्षात्कार केला जातो.''

''महाराज, अग्नीचे अस्तित्व असले तरी ती कुठे राहतो, ह्यासाठी मात्र त्याचे निश्चित असे स्थान सांगता येत नाही. लाकडांचे दोन तुकड्यांचे घर्षण केले असता अग्नी उत्पन्न होते. महाराज, त्याचप्रमाणे निर्वाण आहे हे खरे आहे. परंतु त्याचे थांबण्याचे निश्चित असे स्थान कुठेच सापडत नाही. सन्मार्गावर चालणारास आपल्या मनास योगय दिशेला लावून मात्र निर्वाणाचा साक्षात्कार करून घेता येते.''

''महाराज, १) चक्ररत्न, २) हस्तीरत्न, ३) अश्वरत्न, ४) मणीरत्न, ५) स्त्रीरत्न, ६) गृहरत्न आणि ७) परिणायकरत्न (चक्रवर्तीराजाचे रत्न) अशी ही सात रत्ने असतात[१] परंतु ही रत्ने प्राप्त करण्याचे कुठेच निश्चित असे स्थान नाही, तर त्यांच्या व्रताचे पालन केल्याने ती प्राप्त होत असतात. महाराज, त्याचप्रमाणे निर्वाण अस्तित्वात आहे, हे खरे आहे. परंतु ते प्राप्त करून घेण्याचे निश्चित असे स्थान आढळणार नाही. सन्मार्गाने वाटचाल करणारास आपल्या मनास योगय दिशेला वळवून निर्वाणाचा साक्षात्कार करून घेता येते.''

''भंते नागसेन, बरे असो, निर्वाण प्राप्तीचे निश्चित स्थान कुठेही नसेल तर नसो. परंतु जेथे उभे राहून सन्मार्गावर वाटचाल करीत असता निर्वाणाचा साक्षात्कार केला जाऊ शकतो असे तरी एखादे स्थान आहे काय?''

''होय महाराज, जेथे उभे राहून सन्मार्गाने वाटचाल करीत असता निर्वाणाचा साक्षात्कार केला जाऊ शकतो असे निश्चित स्थान खरोखरच आहे.''

''भंते, असे ते स्थान कोणते ?''

''महाराज, असे स्थान 'शील' हे होय. शीलावर प्रतिष्ठित होऊन आपल्या मनाला वश करून घेऊन कुठेही राहिले असता मनुष्य निर्वाणाचा साक्षात्कार करून घेऊ शकतो. यवनदेशात, शकभूमीत, चीनदेशात, विलायतमध्ये, अलसंदमध्ये, निकुंबमध्ये, काशीमध्ये, कोशलमध्ये, काश्मीरमध्ये, गांधारमध्ये, पर्वतशिखरावरसुद्धा, ब्रह्मलोकात किंवा इतर कोणत्याही देशात राहत असता शीलावर प्रतिष्ठित होऊन मनावर अनुशासन जमवून मनुष्य निर्वाणाचा साक्षात्कार करून घेऊ शकतो.''

''महाराज, ज्याप्रमाणे डोळस मनुष्य शकभूमी असतो की यवनभूमी असो, चीन देश असो की परदेश असो, अलसंद असो की निकुंभदेश असो, काशी असो की, कोशल असो, काश्मीरभूमी असो की गांधारभूमी असो, पर्वतशिखर असो की ब्रह्मलोक

असो, किंवा याशिवाय आणखीही दुसऱ्या कोणत्या देशात राहत असला, तरी आकाश तर सर्वत्रच पाहू शकतो. त्याचप्रमाणे शीलावर प्रतिष्ठीत होऊन मनावर अनुशासन जमवून कोठेही राहत असला, तरी मनुष्य निर्वाणाचा साक्षात्कार करून घेऊ शकतो.''

''महाराज, ज्याप्रमाणे कोणी मनुष्य कोठेही राहत असला तरी पूर्व दिशा कायमच राहते. त्याचप्रमाणे शीलावर प्रतिष्ठित होऊन मनोनिग्रह करून मनुष्य निर्वाणाचा साक्षात्कार करून घेऊ शकतो.''

''ठीक आहे. भंते नागसेन, आपण निर्वाणाचे सुंदर प्रकारे विश्लेषण करून सांगितले. निर्वाणाचा साक्षात्कार कसा होतो हे स्पष्ट करून दिले. शालांचे गुण आपण प्रत्यक्ष दाखवून दिले. सत्यमार्ग दाखवून दिला. धर्माचाध्वज फडकवला. आपण धर्मचक्षू उघडून दिले. प्रांजळ अंतःकरणाने प्रयत्न करणाराचे कष्ट कधीच व्यर्थ जात नाही. आपण सर्वश्रेष्ठ गणाचार्य आहात हे आता मला कळून आले.''

**मेंडक प्रश्न समाप्त**

**(प्रकरण आठवे)**

# खण्ड ५

# अनुमान प्रश्न

## १. भगवान बुद्धांचे धर्मनगर

"तेव्हा राजा मिलिंद आयुष्यमान नागसेनाकडे गेला आणि त्यांना प्रणाम करून बाजूला बसला. त्यावेळी त्यांच्या मनात आणखी काही गोष्टी जाणून घेण्याबद्दल उत्सुकता निर्माण झाली होती. नागसेन ज्या गोष्टी सांगतील. त्या समजून घेण्याची इच्छा त्याच्या मनात उत्पन्न झाली होती. ज्ञानप्रकाश पाहण्यासाठी त्याचे मन उत्सुक झाले होते. आपले अज्ञान नष्ट करून घेण्यासाठी त्यांच्या मनात उत्कंठा निर्माण झाली होती. तेव्हा मोठ्या धैर्याने आणि उत्साहाने आपले मन शांत ठेवून राजा मिलिंद शांततापूर्वक आयुष्मान नागसेनाकडे जाऊन म्हणाला–"

"भंते नागसेन, तुम्ही भगवान बुद्धाला पाहिले आहे काय ?"

"नाही महाराज!"

"तुमच्या आचार्यांनी तरी भगवान बुद्धाला पाहिले आहे काय?"

"नाही महाराज,"

"भंते नागसेन, तुम्ही भगवान बुद्धाला पाहिले नाही आणि तुमच्या आचार्यांनी सुद्धा भगवान बुद्धाला पाहिले नाही. यावरून असे दिसून येते की, बुद्ध झालेच नाहीत. कारण, बुद्ध झाले असल्याचा कोणताच पुरावा मिळत नाही."

"महाराज, तुमचे पूर्वज असलेले पूर्वीचे राजे खरोखरच होऊन गेले काय?"

"होय भंते, यात काय शंका ! माझे पूर्वज असलेले पूर्वी होऊन गेलेले राजे निश्चितच झालेत."

"महाराज, पूर्वी होऊन गेलेल्या त्या राजांना तुम्ही पाहिले आहे काय?"

"नाही भंते!"

"महाराज, तुम्हाला मार्गदर्शन करणारे पुरोहित, सेनापती, वैद्य, अंगरक्षक किंवा मंत्र्यांनी तरी त्यापूर्वी होऊन गेलेल्या राजे लोकांना पाहिले आहे काय?"

"नाही भंते!"

“महाराज, जर तुम्ही स्वतः किंवा तुमच्या मार्गदर्शन करणाऱ्यांना त्या पूर्वी होऊन गेलेल्या राजे लोकांना पाहिले नाही. तर काय माहित ते होऊन गेलेत की नाही ? ते होऊन गेले असल्याचे काहीच प्रमाण सापडत नाही.”

“भंते नागसेन, परंतु त्यांनी उपयोगात आणलेल्या अनेक वस्तू अजून शिल्लक आहेत. त्यांचे श्वेतछत्र, राजमुकूट, जोडे, चिवर, तलवार, किंमती पलंग इत्यादी वस्तू पहावयास मिळतात. यावरून समजून घेता येते आणि विश्वासपूर्वक म्हणता येते की, ते पूर्वी होऊन गेलेले राजे निश्चित झालेले आहेत.”

“महाराज, याप्रमाणेच भगवान बुद्धांसंबंधी सुद्धा आम्ही समजू शकतो व विश्वासपूर्वक सांगू शकतो की, भगवान बुद्ध निश्चित होऊन गेले आहेत. त्यांचे प्रमाण सुद्धा आहे.”

“ते कोणते प्रमाण आहे ?”

“महाराज, भगवान बुद्धांनी आपल्या उपयोगात आणलेल्या वस्तू अजूनही शिल्लक आहेत. त्या सर्वज्ञ, सर्वद्दष्टा, अर्हत आणि सम्यकसंबुद्धांनी या वस्तू आपल्या उपयोगात आणल्या होत्या- १) चार स्मृती प्रस्थान, २) चार सम्यक प्रधान, ३) चार ऋद्धीपाद, ४) पाच इंद्रिय, ५) पाच बळ, ६) सात संबोधांग आणि ७) अष्टांगिक मार्ग. या वस्तू पाहून कोणीही समजू शकेल आणि विश्वास करू शकेल की, भगवान बुद्ध अवश्य पूर्वी होऊन गेलेत. महाराज या कारणामुळे, या हेतूमुळे, या प्रमाणामुळे आणि या अनुमानामुळे, समजून घेता येते की, भगवान बुद्ध होऊन गेले.”

“भगवान बुद्धांनी अनेक लोकांचे उद्धार करून सर्व व्याधी नष्ट झाल्याकारणाने निर्वाण प्राप्त करून घेतले. या प्रमाणावरून ते पुरूषोत्तम निश्चित होऊन गेलेत, असे समजून घेतले पाहिजे.”

“भंते नागसेन, एखादे उदाहरण देऊन समजावून सांगावे.”

## शहर बसवण्याचे उदाहरण

“महाराज, एखादे नवीन शहर बसवण्याची इच्छा बाळगणारा इंजिनियर प्रथम उंच, सखल, दगडधोंडे नसलेले स्थान निवडतो. असे स्थान निवडतांना तो कोणता उपद्रव (पूर, अग्नी, चोर किंवा शत्रूंचे आक्रमण इत्यादी) पोहचणार नाही, याशिवाय आणखी इतरही दोषांपासून मुक्त असेल व रमणीय असेल असे स्थान तो पाहतो. त्यानंतर तेथे असलेली झाडेझुडपे तोडून घेऊन, उंचसखल असलेली नवीन अगदी बरोबर समतोल

करून घेतो. तेव्हा शहराचा नकाशा तयार करतो व प्रत्येक भाग मोजूनमापून वेगवेगळे करतो. शहराभोवती खंदक खोदून घेतो. याशिवाय मजबूत फाटक, चौकस, मिनार, किलेबंदी मध्ये खुली मैदाने, चौरस्ते, चौक, राजमार्ग, मध्यभागी दुकान ओळी, बागबगिचे, तलाव, बावळ्या, विहीरी, देवस्थान इत्यादींची व्यवस्था करतो. तसेच सुंदर व दोषमुक्त अशा शहराची वसाहत तयार करतो. ते शहर पूर्णपणे बसल्यानंतर आणि नीट आबादी झाल्यानंतर तो कुठे तरी परदेशात निघून जातो.''

''त्यानंतर काळानुरूप त्या शहराचा विस्तार फार मोठा वाढला. ते दर्शनीय बनले, धनाढ्य बनले, निर्भय, समृद्धशाली, सुंदर आणि सुरक्षित झाले, कशाचाही उपद्रव राहिला नाही. लोकसंख्येत खूप वाढ झाली. तेथे क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य, शूद्र, माऊत, घोडेस्वार, गाडीवान, छकडे व पायी चालणारे तीरंदाज, साधुसंत, दान देणारे, युद्धप्रिय, राजपुत्र, मोठमोठे शूरवीर, मृगचर्म धारण करणारे, योध्ये, नोकर, चाकर, मजूर, पहलवान, स्वयंपाकी, न्हावी, लोहार, माळी, सोनार, काचकाम करणारे, पितळीभांडी बनवणारे आणि इतर धातूंची काम करणारे, जोहरी, दूत, कुंभार, मिठाचे काम करणारे, चर्मकार, सुतार, हस्तिदंताचे काम करणारे, दोरी तयार करणे, सूत कातणारे, तीर बनविणारे, कारागिर, चित्रकार, रंगारी, विणकर, शिंपी, सोन्याचे व्यापारी, कापडाचे व्यापारी, सुगंधी अत्तराचे व्यापारी, गवताचे व्यापारी, लाकडे फोडणारे मजूर, फळव्यापारी, जडीबुटी विकणारे, तांदळाचे व्यापारी, मालपुआ विकणारे, कोळी, खाटिक, भट्टी चालवणारे, नाटके करणारे, नर्तक, नट, मदारी, भाट, प्रेतेजाळणारे, फुलारी, वीणा वगैरे वाद्य बनवणारे, निशाद, वेश्या, रास करणाऱ्या स्त्रिया, बाजारू बायका तसेच शक, चीन, यवन, विलायत, उज्जैन, भरूकच्छ (भडोच) काशी, कोसल, सामीप्रदेश, मगध, साकेत (अयोध्य) सौराष्ट्र, पाठा अदुंबर, मथुरा, अलसंदा, काश्मीर आणि गांधार देशाचे लोक तेथे येऊन राहिले. आणि ते इतके सुंदर वसलेले शहर पाहून मनातल्या मनातच म्हणू लागले की, 'अरे ! ज्यांनी हे शहर वसवले, तो इंजिनीयर किती हुशार असला पाहिजे?''

''महाराज, त्याचप्रमाणे भगवान बुद्ध अद्वितीय, अतुल्य, असदृश्य, अनंत गुणांनीयुक्त, अप्रमेय, अलौकिक अशा सर्वगुणाच्या सीमेपर्यंत पोहचलेले, सर्वज्ञ अनंत तेजाने तेजायमान असलेले, अनंत विर्यशाली, बलशाली, बुद्धीबळाची उच्च सीमा गाठलेले असे हे भगवान होऊन गेले आहेत. त्यांनी माराला त्यांच्या अफाट सेनेसह पराजित करून, खोट्या सिद्धांताचे आपल्या बुद्धीबळाने तुकडे तुकडे करून अविद्या नष्ट केली. आणि विद्या उत्पन्न करून धर्मरूपी राज्यशासनाची स्थापना केली. याप्रमाणे सर्वज्ञता प्राप्त करून श्रेष्ठसंग्राम विजयी बनवून त्यांनी धर्मनगराची स्थापना केली.''

## भगवान बुद्धाचे धर्मनगर

"महाराज, भगवान बुद्धाने स्थापन केलेल्या धर्मनगराच्या सभावेती शीलाचा परकोट घातला आहे. तिथे (पाप कर्म करण्यापासून भीती बाळगण्याचा) खंदक खोदलेला आहे. त्यांच्या फाटकावर ज्ञानाची चौकशी केली जाते, विर्याचे सुंदर बुरूज आहेत, श्रद्धेचा पाया घातला आहे, स्मृतीचा द्वारपाल सतत पहारा करणारा आहे, प्रज्ञेचे मोठमोठे भवन उभारलेले आहेत, धर्माचे विस्तीर्ण असे चौक बनविलेले आहेत, विनयाची भव्य न्यायालये असून स्मृतीप्रस्थानांच्या रस्ते आहेत. महाराज, अशा त्या रस्त्याच्या कडेला पुढीलप्रमाणे दुकाने सुंदर प्रकारे थाटलेली आहेत – १) फुलांची, २) सुगंधाची, ३) फळांची, ४) औषधांची, ५) जड्याबुट्यांची, ६) अमृतांची, ७) रत्नांची आणि ८) आवश्यक अशा सर्वच वस्तूंची ती दुकाने आहेत."

१– "भंते नागसेन, हे फुलांचे दुकान म्हणजे काय?"

## फुलांचे दुकान

"महाराज, सर्वज्ञ, सर्वद्रष्टज्ञ, अर्हत, भगवान सम्यकसम्बुद्धांनी ध्यान भावना करावयास योग्य अशा पुढील गोष्टी सांगितल्या आहेत. अनित्यसंज्ञा, अनात्मसंज्ञा, अशुभसंज्ञा, आदीनवसंज्ञा, प्रहाणसंज्ञा, विरागसंज्ञा, निरोधसंज्ञा, संसार विरक्तीसंज्ञा, सर्व संस्कार अनित्यसंज्ञा, आनापान स्मृती, उद्धुमातसंज्ञा विनिलकसंज्ञा, विपुब्बकसंज्ञा, पुळुवकसंज्ञा, विक्खायिकसंज्ञा, विक्खित्तकसंज्ञा, हतविक्खितकसंज्ञा, लोहितकसंज्ञा, पुळुवकसंज्ञा, अट्टीकसंज्ञा, मैत्रीसंज्ञा, करूणासंज्ञा, मुदितासंज्ञा, उपेक्षासंज्ञा, मरणानुस्मृती व कायागता स्मृती. महाराज, ध्यान भावना करण्यासाठी भगवान बुद्धांनी हेच विषय सांगितले आहेत."

"जो कोणी म्हातारपण आणि मरण यापासून आपली सुटका करून घेऊ इच्छितो, त्यांनी आपल्या अभ्यासासाठी यातील एका विषयाची निवड करावी. त्या विषयावर अभ्यास करून साधकराग, द्वेष, मोह, अभिमान आणि खोटे सिद्धांत यापासून मुक्त होतो तो संसाररूपी सागर तरून जातो, तृष्णेची धार बंद करतो, तीन प्रकारचे मळ धुवून टाकतो आणि सर्व क्लेशांचा नाश करून निर्मळ, रागरहित, शुद्ध, स्वच्छ, आवागमनापासून मुक्त होतो, म्हातारा होण्यापासून वाचलेला, सुखपूर्ण, शीतल आणि अभय अशा सर्वश्रेष्ठ निर्वाण नगरात प्रवेश करतो. अर्हत होऊन चित्तधारा बंद करतो. महाराज, भगवान बुद्धाचे हेच फुलांचे दुकान आहे."

"कर्मरूपी पैसे घेऊन धर्माच्या दुकानात जावे आणि आपल्या अभ्यासासाठी

आवश्यक विषय विकत घेऊन आणावा आणि मुक्त व्हावे.''

२- ''भंते नागसेन, सुगंधाचे दुकान कोणते ?''

## सुगंधाचे दुकान

''महाराज, भगवान बुद्धांनी पालन करावयास काही आवश्यक असे शील सांगितले आहेत. बुद्धपुत्र (बौद्ध भिक्षू) आपल्या शीलाच्या सुगंधाने देवता आणि मनुष्यासहित सर्व जगाला सुगंधमय करून सोडतात. दिशा विरूद्धदिशा, हवेच्या झोताबरोबर व हवेच्या जगदी विरूद्ध अशा सर्वच दिशांना दर्वळत त्यांच्या शीलांचा सुगंध पसरत असतो.''

''ते शील कोणते?''

''महाराज, १) शरणशील, २) पंचशील, ३) अष्टांगशील, ४) दशांगशील, ५) प्रत्युपदेशात येणारे प्रातिमोक्ष संवरशील. महाराज, हेच आहे भगवान बुद्धाचे सुगंधाचे दुकान.''

''महाराज, देवाधिदेव भगवान बुद्धांनी स्वतःच सांगितले आहे की, 'चंदन, तगर किंवा मल्लिका वगैरे फुलांचा सुगंध कधीही हवेच्या विरूद्ध दिशेने जात नाही. परंतु सत्पुरूषांचा सुगंध हवेच्या विरूत्र दिशेने देखील वाहू लागतो. सत्पपुरूष सर्वत्र पोहचून प्रभाविित करीत असतात. चंदन, तगर, कमळ किंवा जुही वगैरे पुष्पांच्या सुगंधापेक्षा शीलांचा सुगंध अलौकिक आहे. तगर व चंदनाचा सुगंध अत्यंत साधारण असून शीलवंताचा उत्तम सुगंध देवतामध्ये सुद्धा वाहत असतो.''

३- ''भंते नागसेन, भगवान बुद्धाच्या धर्मनगरातील फळाचे दुकान कोणते?''

''महाराज, भगवान बुद्धांनी हे फळ सांगितले आहेत – श्रोतापत्तीफळ, सकृदागामीफळ, अरहतफळ, शून्यता (निर्वाण) समापत्तीफ़ळ, अनिमीत समापत्ती फळ, अप्पणिहीतफळ, समपत्ती; हेच ते फळ होत. यातील जे फळ कोणी घेऊ इच्छितो तो, आपल्या जवळील कर्मरूपी पैसे देऊन खरेदी करु शकतो.''

## बारमाशी आंबे

''महाराज, एखाद्या माणसाच्या बगिच्यात एखादे बारमाशी आंब्याचे झाड आहे. तर तो जोपर्यंत कुणी दुसरा आंबे घेणारा त्याचेकडे येत नाही, तोपर्यंत त्या झाडाचे आंबे तो तोडत नाही. खरेदी करणारा कुणी आला की, तो त्याला म्हणतो, 'हे बघा, हे बारमाशी आंब्याचे झाड आहे. तुम्हाला किती आंबे पाहिजे आहेत, ते या भावाने तुम्ही कधीही विकत घेऊन जाऊ शकता. तुम्हाला कसे आंबे पाहिजे आहेत ? कैऱ्या

की साधारण पिकले ? कच्चे की एकदम पिकले ?' तेव्हा खरेदी करणारास जसे आंबे हवे असतील, तसेच तो किंमत देऊन खरेदी करतो व घेऊन जातो.''

''महाराज, याप्रमाणे ज्या कोणाला जसे फळ हवे असेल, तसे तो कर्माचे दाम देवून विकत घेत असतो. मग ते स्त्रोतापत्ती फळ असो की सकृदागामी फळ असो, की आणखी कोणते फळ असो. हेच आहे महाराज, भगवान बुद्धाच्या धर्म नगरातील फळांचे दुकान.''

''कर्मरूपी पैसे देवून लोक अमृतफळ (अर्हतपद) विकत घेतात. आणि त्यामुळे ते सुखी होतात.''

४- ''भंते नागसेन, त्यांचे औषधांचे दुकान कोणते आहे ?''

## औषधांचे दुकान

''महाराज, जे औषध देऊन भगवान बुद्धांनी देवता आणि मनुष्यासहित सर्व जगाला क्लेशाच्या आजारातून मुक्त केले. तेच औषध सांगितले आहे.''

''ते औषध कोणते ?''

''महाराज, भगवान बुद्धांनी हे चार आर्यसत्य सांगितले आहेत - १) दुःख आर्यसत्य, २) दुःखसमुदाय सत्य, ३) दुःखनिरोध आर्यसत्य आणि ४) दुःख निरोधगामीमार्ग आर्यसत्य.''

''ज्या बुद्ध धर्मात चार आर्यसत्य आहेत, असा हा धर्म जो कोणी इच्छूक ऐकून घेतो, तो जन्म, म्हातारपण, मरण, शोक, रडणे-छाती ठोकणे, दुःख, चिंता आणि त्रासातून एकदम आपली सुटका करून घेत असतो. महाराज, हेच आहे भगवान बुद्धाचे औषधांचे दुकान.''

''विष उतरवण्याकरीत जगात ज्या काही औषधी आहेत, त्यात धर्मरूपी औषधाची बरोबरी करणारी एकही औषध अस्तित्वात नाही. हे भिक्षूहो, याचे सेवन करावे.''

५- ''भंते नागसेन, त्यांच्या जडीबुटीचे दुकान कोणते आहे ?''

## जडीबुटीचे दुकान

''महाराज, ज्या जडीबुटीचा काढा पाजून भगवान बुद्धाने देवता आणि मनुष्यांना रोगमुक्त केले होते. त्या या जडीबुटी होत. जसे - चार स्मृतिप्रस्थान, चार सम्यकप्रधान, चार ऋद्धीपाद, पांच इंद्रिय, पांच बळ, सात संबोध्यंग आणि आर्य अष्टांगिक मार्ग,

याच जड्याबुट्यांचा काढा पाजून भगवान बुद्धाने मिथ्यादृष्टी (खोटे सिद्धांत), मिथ्यासंकल्प, मिथ्यावचन, मिथ्याकर्मात, मिथ्याआजीविका, मिथ्याव्यायाम, मिथ्यास्मृती आणि मिथ्यासमाधी. या रोगांना शरीरातून एकदमच काढून टाकले होते. लोभ, द्वेष, मोह, अभिमान, आत्मदृष्टी, विचिकित्सा, औद्धत्य, आळस, निर्लज्जता, अनवत्रपा आणि अशाच प्रकारच्या सर्वच क्लेशापासून मुक्ती मिळवली होती महाराज, भगवान बुद्धाचे जडीबुटीचे हेच दुकान आहे.''

''संसारात अनेक प्रकारची जडीबुटी असली तरी धर्मरूपी जडीबुटी समान गुणकारी कोणतीच जडीबुटी नाही. हे भिक्षूहो, याचाच काढा करून किंवा उगाळून प्या आणि अजरामर व्हा. धर्माचे चिंतन करून सर्व व्याधीचा नाश करून परमज्ञान निर्वाणांचा साक्षात्कार करून घ्या.''

६- ''भंते नागसेन, त्यांचे अमृताचे दुकान कोणते आहे?''

## अमृताचे दुकान

''महाराज, भगवान बुद्धांनी सर्वश्रेष्ठ अमृत प्यावयास सांगितले आहे. देवता आणि मनुष्यांनी युक्त अशा या संसारात भगवान बुद्धांनी तेच तर अमृत भरून ठेवले होते. त्यामुळे समस्त देवता आणि मनुष्यजन्म, म्हातारपण, आजार, मरण, शोक हृदय पिळून रडणे, दुःख, चिंता आणि त्रस्तता या सर्व दुःखापासून मुक्त झाले.''

''ते अमृत कोणते?''

''तर हिच कायागता स्मृती, महाराज, देवाधिदेव भगवान बुद्धांनी सांगितले आहे की, 'हे भिक्षूंनो, जे कायागता स्मृतीचा अभ्यास करत असतात, ते जणू काही अमृताचेच रसपान करत असतात.' महाराज, भगवान बुद्धाचे हेच अमृताचे दुकान आहे.''

''रोगाने त्रस्त झालेल्या लोकांना पाहून त्यांनी अमृताचे दुकान उघडले होते. कर्मरूपी दाम देवून हे भिक्षूंनो, अशाच प्रकारचे अमृत विकत घ्यावे.'

७- ''भंते नागसेन, त्यांचे रत्नांचे दुकान कोणते आहे?''

## रत्नाचे दुकान

''महाराज, बुद्ध पुत्र (बौद्ध भिक्षू) ज्या रत्नांच्या श्रृंगाराने स्वतःचे शरीर श्रृंगारले असता देवता आणि मनुष्यासही समस्त जगाला प्रकाशमय करून सोडतात, प्रकाशमान करतात, वर आणि खाली तसेच मध्यभागी अशा सर्वच ठिकाणी प्रज्वलीत होऊन प्रकाश भरून देतात. अशी सर्वश्रेष्ठ रत्ने भगवान बुद्धांनी सांगितली आहेत.''

"ती रत्ने कोणती आहेत ?"

"१) शीलरत्न, २) समाधीरत्न, ३) प्रज्ञारत्न, ४) विमुक्तीरत्न, ५) विमुक्ती ज्ञानदर्शनरत्न, ६) प्रतिसंविदरत्न आणि ७) बोधांगरत्न."

१) "भगवान बुद्धाचे शीलरत्न कोणते आहे?"

## (१) शीलरत्न

(१) प्रतिमोक्ष संवरशील, (२) इंद्रिय संवरशील, (३) आजीव पारिशुद्धीशील, (४) प्रत्यय सन्निस्मृतशील, (५) लघुशील, (६) मध्यमशील, (७) महाशील, (८) मार्गशील आणि फळशील. महाराज, जे लोक शीलरत्नाच्या आभूषणाने विभूषित असतात, त्यांच्या प्रती देवता, मनुष्य, मार, ब्रह्मा, श्रमण व ब्राह्मण हे सारेच त्यांची आकांक्षा आणि अभिलाषा करतात. महाराज, भिक्षूशीलरत्नांनी सुसज्जीत होऊन आपल्या शोभेमुळे दिशा, अनुदिशा, वरखाली आणि मधल्यादिशांना शोभायमान करत असतात. सर्वात खाली अविची नरकापासून तर सर्वात वर स्वर्ग लोकापर्यंत जितकी काही इतररत्ने आहेत, त्या सर्वापेक्षा हे शीलरत्न उत्तम, श्रेष्ठ आणि अद्वितीय असे सर्वावर मात करणारे आहे. महाराज, भगवान बुद्धाच्या दुकानात या प्रकारची शीलरत्न आहेत. महाराज, हीच भगवान बुद्धाची शीलरत्ने होत.

"अशी शीलरत्ने भगवान बुद्धाच्या दुकानात मिळतात कर्माचे दाम देऊन अशी रत्ने खरेदी करून तुमच्या शरीरास श्रृंगारीत करा."

(२) "भगवान बुद्धाचे समाधीरत्न कोणते आहे?"

## (२) समाधीरत्न

"महाराज, सवितर्क सविचार समाधी, (२) अवितर्क विचार- मात्रसमाधी, (३) अवितर्क अविचारसमाधी (शून्यता समाधी), (४) अनिमित्तसमाधी, (५) अप्रणिहितसमाधी. महाराज, समाधीरत्नानी सुसज्जीत झालेल्या भिक्षूंचे कायवितर्क, व्यापादवितर्क, विहिसावितर्क, मान, औद्धत्य, आत्मदृष्टी, विचिकित्सा, क्लेश, पाप आणि जे काही इतर कुवितर्क आहेत, ते सर्वच समाधी लागताच विलीन होऊन जातात, नाश पावतात, काही एक त्यांच्यात शिल्लक राहत नाही."

"महाराज, पवनाच्या पानांवर पडलेले पाणी तत्काळ घसरून खाली पडते, त्यावर ते थांबून राहत नाही. असे कां ? तर पवनाचे पान शुद्ध व चिकन असते. महाराज, याप्रमाणेच कामवितर्क, व्यापादवितर्क विहिंसावितर्क, मान, औद्धत्य, आत्मदृष्टी, विचिकित्सा,

क्लेश, पाप आणि अशाच प्रकारचे अन्य कुवितर्क हे सर्वच समाधी लागताच विनाश पावतात, नष्ट होतात. ते कां ? तर समाधी अत्यंत विशुध्द आहे. महाराज, यालाच भगवान बुद्धाचे समाधीरत्न असे म्हणतात. महाराज, याप्रकारची समाधीरत्ने भगवान बुद्धाच्याच रत्नाच्या दुकानात मिळतात.''

''ज्यांनी आपल्या मुकुटावर समाधीरत्ने जडवली आहेत, त्यांना कधीही कुवितर्काचा त्रास होऊ शकत नाही, त्यांचे चित्त कधी चंचल होऊ शकत नाही. हे भिक्षूंनो तुम्ही आपल्या मुकुटावर अशाच प्रकारची रत्ने जडवत जावे.''

(३) ''भगवान बुद्धाचे प्रज्ञारत्न कोणते आहे?''

## (३) प्रज्ञारत्न

''महाराज, ज्या प्रज्ञेमुळे भिक्षू 'हे पुण्य आहे, हे पाप आहे, हे वाईट आहे, हे योग्य आहे, हे चांगले आहे, हे अयोग्य आहे, हे कमीप्रतिचे आहे, हे सुंदर आहे, हे स्वच्छ आहे, हे साधारण खरे आहे, हे दुःख आहे, हा दुःख समुदाय आहे, हो दुःख निरोध होय आणि हा दुःख निरोधाचा मार्ग होय' असे निश्चितपणे समजू शकते. महाराज, यालाच भगवान बुद्धाचे प्रज्ञारत्न असे म्हणतात.''

''ज्यांनी आपल्या डोक्यावरील मुकुटावर प्रज्ञारत्न खोचले आहे. त्याला अधिककाळ आवागमनाच्या चक्रात पडावे लागत नाही. तो शीघ्रतापूर्वक अमृतपद प्राप्त करून घेतो. जन्मघेण्यात त्याला मुळीच आनंद वाटत नाही.''

(४) ''भगवान बुद्धाचे विमुक्तीरत्न कोणते आहे?''

## (४) विमुक्तीरत्न

''महाराज, विमुक्तीरत्न म्हणतात अर्हतपदास. अर्हतपद प्राप्त करून भिक्षू विमुक्तीरत्नाने सुशोभित होत असतो.''

''महाराज, कुणी एखादा माणूस मोती, माळा, मणी, सोने आणि मुंग्याची आभूषणे अंगावर घालून सुशोभित होत असतो. अगर, तगर, तालिसक, लालचंदन इत्यादी अत्तराने आपले शरीर सुगंधित करून घेतो. नाग, पुन्नाग, साल, सलल, चंपक, जुही, अतिमुक्तक, गुलाब, कमळ, मालती, मल्लिका इत्यादी पुष्पहार घालून स्वतःचे शरीर सजवत असतो. तेव्हा तो पुरूष इतरांपेक्षा अधिकच शोभायमान दिसून येतो, सुंदर दिसतो. आकर्षक वाटतो आणि मनमोहक वाटतो. महाराज, याप्रमाणेच अर्हत पद प्राप्त केलेला क्षीणाश्रव भिक्षू विमुक्तीरत्नानी आपले शरीर सजवल्यामुळे इतर भिक्षूपेक्षा अधिकच शोभून दिसतो,

चमकतो आणि आकर्षक वाटतो. ते कां ? तर सर्व आभूषणात हीच त्यांनी घातलेली आभूषणे उत्कृष्ट आहेत. महाराज, हेच भगवान बुद्धाचे विमुक्तीरत्न होय.''

''मणीरत्नाचा मुकुट घातल्यानंतर सर्वच घरातील लोक कुटूंब प्रमुख स्वामीकडे पाहू लागतात, याचप्रमाणे विमुक्तीरत्नाचा मुकुट डोक्यावर धारण केलेल्या भिक्षूकडे देवतालोक सुद्‌धा आसुसलेल्या नजरेने पाहू लागतात.''

(५) ''महाराज, भगवान बुद्धाचे विमुक्ती- ज्ञानदर्शनरत्न कोणते आहे?''

## (५) विमुक्तीज्ञान- दर्शनरत्न

''महाराज, प्रत्यवेक्षण- ज्ञानालाच भगवान बुद्धाचे विमुक्तीज्ञान- दर्शनरत्न असे म्हणतात. याच ज्ञानामुळे चांगल्या भिक्षूंना मार्गफळ निर्वाणाची प्राप्ती होत असते. सर्व क्लेश क्षीण झाले असल्यामुळे उरलेल्या क्लेशाचे ते प्रत्यवेक्षण करत असतात.''

''याच ज्ञानामुळे त्यांना असे कळून येते की, जीवनात जे काही करावयाचे होते, ते आपण सर्वच पूर्ण केले आहे. आता आपल्यासाठी करण्याकरिता काहीच शिल्लक राहिले नाही. हे भिक्षूंनो, या विमुक्तीज्ञानदर्शनरत्नाच्या प्राप्तीसाठी उद्योग करा.''

## (६) प्रतिसंविदरत्न

''महाराज, प्रतिसंविद चार आहेत - (१) अर्थप्रतिसंविद, (२) धर्मप्रतिसंविद, (३) निरूक्तीप्रतिसंविद आणि (४) प्रतिभानप्रतिसंविद. महाराज, याच चार प्रतिसंविदरत्नांनी सुसज्जित होऊन भिक्षू कोणत्याही सभेत जात असता मग ती क्षत्रियसभा, ब्राम्हणसभा, वैश्यसभा, भिक्षूसभा असो की आणखी कोणती सभा असो, पण मुळीच संकाचे न बाळगता व न घाबरता जात असतो. तेथेही तो केवळ गप्प बसून राहत नाही, भयभीत होत नाही. घाबरत नाही, आश्चर्यचकीत होत नाही किंवा तो रोमांचितही होत नाही. तर तो तेथे निर्भयपणे बसतो व बोलतो.''

## कोणी लढवैय्या शिपाई

''महाराज, ज्याप्रमाणे एखादा लढवैय्या सैनिक पाचंही आयुद्धांनी सज्ज होऊन लढाईच्या मैदानात उतरतो. तेव्हा तो आपल्या मनाशी ठरवतो की, शत्रू जर दूर असेल, तर त्याच्या वर बाणाचा मारा करीन, जर कां थोडा जवळ आला तर भाल्याचा मारा करीन, त्याहीपेक्षा जवळ आला तर फच्र्याचा मारा करीन, आणखी जवळ आला तर तलवारीचा मारा करीन आणि एकदमच जवळ आला तर त्याच्यावर जांबीयाचा मारा करीन. पण मागे सरणार नाही.''

''महाराज, याप्रमाणेच चारही प्रतिसंविदानी सुसज्जित भिक्षू निर्भयपणेच कोणत्याही सभेत जात असतो. स्वतःचा त्याला आत्मविश्वास असतो. त्याला वाटते की, जो कोणी मला अर्थ प्रतिसंविदासंबंधी प्रश्न विचारील, त्याला अर्थातूनच अर्थ काढून उत्तर देईन, कारणाच्या माध्यमानेच कारण स्पष्ट करून सांगेन, तर्क तर्काशी मिळवून सांगेन आणि त्याच्या युक्तिवादाला युक्तिवादानेच समजावून सांगेन, त्याच्या सर्व शंका दूर करीन, त्याचा भ्रम मिटवून टाकीन, त्याच्या सर्व प्रश्नांची उत्तरे देऊन त्याला संतुष्ट करीन. जो कोणी मला धर्मप्रतिसंविदासंबंधी प्रश्न विचारील, त्याला धर्मातील उत्तम धर्माचा गाभा उकलून दाखवी, अमृतातूनही उत्तम अमृत काढून अनिर्वचनीयातील अनिर्वचनीयता समजावून सांगेन, निर्वाण मार्गानेच निर्वाणाचे दर्शन घडवून देईन, शून्यातीलही सुक्ष्म शून्य दाखवून देईन, अनिमित्तातील अनिमित्त काढून दाखवीन, अप्रणिहिताचे विश्लेषण करून सांगे अनिमित्तातील अनिमित काढून दाखवीन, अप्रणिहिताचे विश्लेषण करून सांगेन, शांतीतूनही परमशांती पिळून दाखवीन आणि त्याचा संदेह दूर करीन, सर्व शंका नष्ट करीन, त्याचा भ्रम मातीमोल करून टाकीन त्याच्या सर्व प्रश्नाची उत्तरे देऊन त्याला गप्प बसावयास भाग पाडीन. जो कोणी मला निरूक्ति प्रतिसंविदाविषयी प्रश्न विचारील, त्याला निरूक्तीतूनही गंभीर निरूक्तीचा बोध करून देईन, पदातूनही उत्तमपद निरूपण करून सांगेन, अनुपदातून अनुपदाचे दर्शन घडवून देईन, अक्षरातील सुक्ष्म अक्षरे दाखवून देईन संधीमधील सुक्ष्मसंबंधी कशा साधल्या जातात याविषयी समजावून सांगेन, व्यंजनोच व्यंजनाची फोड करून सांगेन, अनुवयंजनाच्याच सहाय्याने अनुव्यंजनाचा अर्थ समजावून देईन, वर्णातील सुप्तवर्ण व स्वरातील सुप्तस्वराची ओळख करून देईन, प्रत्येक व्यवहार याचे ज्ञान घडवून देईन आणि त्याचे सर्वसंदेह दूर करीन. सर्व शंका नष्ट करीन, त्याच्या सर्वच प्रश्नांची उत्तरे देऊन त्याचे समाधान करीन जो कोणी मला प्रतिभान प्रतिसंविदा बाबतीत प्रश्न विचारील, त्याला प्रतिभानातील प्रतिभान दाखवून देईन, उपमेतूनच उपमांचा अर्थ समजावून सांगेन, लक्षणातून लक्षणाची फोड करून सांगेन, रसातूनच रस पिळून त्याची गोडी चाखावयास लावेन आणि त्याला सर्व संदेदातून मुक्त करेन, शंकाचा फुगा फोडून टाकेन, त्याच्या सर्व प्रश्नांची उत्तरे देऊन त्याला संतुष्ट करेन. महाराज, हेच होय भगवान बुद्धाचे प्रतिसंविदरत्न.''

''जो ज्ञानाच्या माध्यमाने प्रतिसंविदज्ञान प्राप्त करून घेतो, तो देवता आणि मनुष्यांनी युक्त असलेल्या या जगात अगदी निर्भय होऊन राहत असतो आणि तो कधीही उद्विग्न होऊन निराशेचे जीवन जगत नाही.''

(७) ''भगवान बुद्धाचे बोधांगरत्न कोणते आहे?''

## (७-८) बोधांगरत्न

"महाराज, बोध्यंग सात आहेत - (१) स्मृती संबोध्यंग, (२) धर्मविचय संबोध्यंग, (३) वीर्यसंबोध्यंग, (४) प्रीतीसंबोध्यंग, (५) प्रश्रब्दी संबोध्यंग, (६) समाधी संबोध्यंग आणि (७) उपेक्षासंबोध्यंग. महाराज, या सात संबोध्यंग रत्नाच्या श्रृंगारानी स्वतः श्रृंगारून भिक्षू सर्वच देवता आणि मनुष्यासहित या लोकांतील अंधकार दूर सारतो आणि समस्त वातावरण आपल्या अपूर्व तेजाने लखलखीत प्रकाशमय करतो. महाराज, यालाच म्हणतात. भगवान बुद्धाचे बोध्यंगरत्न."

"ज्यांनी आपल्यसा डोक्यावर बोध्यंगरत्न धारण केले आहे, त्याची प्रतिष्ठा देवता आणि मनुष्य सारेच तो आला असता त्याच्या स्वागतार्थ उभे राहून करीत असतात. कर्माचे दाम देऊन अशी रत्ने घ्यावी आणि आपल्या मस्तकी धारण करावे."

(७) "भंते, भगवान बुद्धाचे सर्वच वस्तू मिळण्याचे दूकान कोणते? जेथे आंबे सुद्धा मिळत असतात?"

## ९. निरनिराळ्या वस्तूंचे दुकान

"महाराज, भगवान बुद्धाचे हे आहे निरनिराळ्या अनेक प्रकार्च्या वस्तूचे दुकान. जेथे आंबे सुद्धा मिळतात. जसे - (१) नऊ अंगानीयुक्त अशी बुद्धाची वचने, (२) शरीरधातु (भगवंताच्या शरीराची राख), (३) भगवान बुद्धांनी आपल्या उपयोगात आणलेल्या वस्तू, (४) चैत्य, (५) संघरत्न, महाराज, या दुकानात जातीसंपत्ती, भोग संपत्ती, आयुसंपत्ती, आरोग्यसंपत्ती, सौदर्यसंपत्ती, प्रज्ञासंपत्ती, सांसारिकसंपत्ती, दिव्यसंपत्ती आणि निर्वाणसंपत्ती. इत्यादी अनेक वस्तू कर्माचे दाम देऊन कोणीही खरेदी करू शकतो. कित्येक शीलपालन रूपी दान देऊन विकत घेतात तर कित्येक थोडे थोडे पुण्य जोडून त्याद्वारा संपत्ती खरेदी करतात. महाराज, ज्याप्रमाणे धान्याच्या दुकानात थोड्या पैशांनीही थोडे धान्य विकत घेतात आणि अधिक पैशांनी अधिक धान्य विकत घेता येतात, त्याचप्रमाणे या दुकानातसुद्धा थोड्या पुण्यांनीही त्यानुसार संपत्ती खरेदी करता येते आणि अधिक पुण्यांनीही अधिक संपत्ती खरेदी करता येते. महाराज, हेच आहे भगवान बुद्धाचे अनेक वस्तू मिळत असलेले आंब्याचे दुकान."

"आयु, आरोग्य सौंदर्य, स्वर्ग, उच्चकुळात जन्म घेणे, अनिर्वचनीय, अमृत निर्वाण इत्यादी सर्वच वस्तू भगवान बुद्धाच्या या आंब्याच्या दुकानात मिळतात. कर्माचे थोडे किंवा अधिक दाम देऊन त्यानुसार लोक येथे वस्तू खरेदी करतात. हे भिक्षूंनो, श्रद्धेचे दाम देऊन उत्तम संपत्ती खरेदी करा व श्रीमंत व्हा."

## १०. धर्मनगरात राहणारे नागरिक

"महाराज, भगवान बुद्धाच्या धर्मनगरात असे लोक वास्तव्य करून राहतात. सुत्र जाणणारे, पारंगत असणारे विनयघर, अभिधर्माचे विद्वान- अभिधार्मिक; धर्माचे उपदेशक, जातककथा सांगणारे, दीघ्य- निकायाचा पाठ करणारे, मज्झिम निकायाचे विद्वान, संयुक्त निकायाचा अभ्यास करणारे, अंगुत्तर निकायाचा अभ्यास करणारे, खुद्दक निकायाचा अभ्यास करणारे, शीलसंपन्न, समाधीसंपन्न, प्रज्ञासंपन्न बोध्यंगाच्या चिंतनात मग्न असणारे, विदर्शना करणारे, उत्तमकार्यात मग्न असलेले, ध्यानसाधनेसाठी अरण्यात राहणारे, वृक्षाखाली आसन लावून बसणारे, मोकळ्या मैदानातच राहणारे, काट्यावर झोपणारे, स्मशानात राहणारे, श्रेष्ठमार्गावर आरूढ असलेले, चार फळांपैकी कोणत्या ना कोणत्या एकातरी फळाचा साक्षात्कार करून घेतलेले, शैक्ष (निर्वाण प्राप्त करावयस अजून काही बाकी असलेले), श्रोतापत्र, सकृदागामी, अनागामी, अर्हत, तीन विद्यासंपन्न, सहाअभिाा धारण करणारे, ऋद्धिमान, प्रज्ञेचे अंतिम शिखर गाठलेले, आणि स्मृतीप्रस्थान, सम्यकप्रधान ऋद्धिपाद, इंद्रिय, बल, बोध्यंग, मार्ग, ध्यान, विमोक्ष, रूप, अरूप, शांत, सुखी आणि समापत्तीमध्ये पारंगत, असे ते धर्मनगर बासाच्या किंवा बेताच्या राजीप्रमाणे अर्हतानी खचाखच नेहमी भरलेले असते."

"रागरहित, द्वेषरहित, मोहरहित, क्षीणाश्रव, तृष्णामुक्त तसेच उपादानाचा नाश केलेले लोक त्या धर्मनगरात राहतात. जंगलात राहणारे, धुतांगधारी, ध्यानभावना करणारे, रूक्षचीवर धारण करणारे, विवेकशील धीर लोक त्या धर्म नगरात राहतात."

"आसन मारून बसणारे, अल्पनिद्रा घेणारे, नेमाने चंक्रमण, ध्यान करणारे, मोठे रूक्षचीवर धारण करणारे असे सर्वच लोक त्या धर्मनगरात राहतात. तीन चीवरच उपयोगत आणणारे शांत, चर्मासन बाळगणारे, केवळ दिवसा एकच वेळ (दिवसा बारा वाजण्यापूर्वी) भोजन करून संतुष्ट राहणारे विज्ञ, पुरूष या धर्मनगरात राहतात."

"अल्पेच्छ, ज्ञानी, धीर, अल्पाहारी आणि निर्लोभी जे काही पात्रात मिळेल त्यावर संतुष्ट राहणारे लोक त्या धर्मनगरात राहतात. ध्यान भावना करणारे, ध्यान भावनेत मग्न राहणारे, धीर, शांतचित्त आणि समाधी लावून बसणारे, निर्वाणाची इच्छा बाळगणारे लोक त्या धर्मनगरात वास्तव्य करतात."

"सन्मार्गावर आलेले फळ प्राप्त करून घेतलेले शैक्ष्य आणि निर्वाणपद प्राप्त करून घेतलेले तसेच उत्तम पदाचा साक्षात्कार करून घेण्यासाठी आतूर असलेले लोक त्या धर्मनगरात राहतात."

"सर्वमळ दूर सारून श्रोतापतीपद, सकृदागामीपद, अनागामीपद आणि अर्हतपद मिळवून घेतलेले लोक त्या धर्मनगरात वास्तव्य करतात. स्मृतीप्रस्थानात कुशल असलेले, बोध्यंगाच्या भावनेत रत असलेले, ज्ञानी, धर्मधर त्या धर्मनगरात राहतात. ऋद्धिपादाच्या भावनेत कुशलसमाधी आधि चिंतनात मग्न सम्यकप्रधानाच्या चिंतनात लागलेले, असे हे लोक धर्मनगरात वास्तव्य करीत आहेत, अभिज्ञेची चरम सीमा गाठणारे आपल्या पैतृक संपत्तीचा आनंद लुटणारे, आकाशात भ्रमण करणारे, या धर्मनगरात राहणारे नागरिक आहेत."

"खाली दृष्टी ठेवून चालणारे, अल्पभाषी इंद्रियांना ताब्यात ठेवणारे, संयमी, उत्तम धर्मात आल्यामुळे जे नम्र होऊन गेलेले आहेत, असे लोक या धर्मनगरात राहतात. तीन विद्या आणि सहा अभिज्ञा धारण करणारे तसेच ऋद्धिबळाच्या अंतिम शिखरापर्यंत, प्रज्ञेची सीमा ओलांडणारे लोक त्या धर्मनगरात निवास करतात."

## धर्मनगराचे सेनापती व पुरोहित

"महाराज, जे भिक्षू अनंतज्ञानी कोणत्याही प्रकारच्या सांसारिक वस्तूंवर भाळून न जाणारे, अतुल्य गुणसंपन्न, अतुल्य यश संपादन केलेले, अतुल्यबळ प्राप्त करून घेतलेले, धर्मचक्र फिरविणारे आणि प्रज्ञेच्या अंतिम सीमेपर्यंत, पोहचलेले आहेत. अशाच प्रकारच्या भिक्षूंना भगवान बुद्धाच्या धर्मनगररातील धर्मसेनापती पदावर पोहचता येते."

"महाराज, जे भिक्षू ऋद्धिमान आहेत, प्रतिसंविद ग्रहण केलेले आहेत, वैशारद्यात पारंगत आहेत, अंतराळात भ्रमण करणारे आहेत, ज्यांना कोणी पराजित करू शकत नाही, असे धर्मवीर आहेत, अतुलनीय आहेत, दुसऱ्यसा कोणावरही अवलंबून राहणारे नाहीत, समुद्र आणि पर्वतासहित समस्त पृथ्वीला कंपायमान करून सोडणारे शक्तिशाली आहेत, चंद्रसूर्यावर आपल्या शक्तीने भ्रमण करणारे आहेत, स्वतःचे रूप बदलू शकणारे दृढसंकल्पी आणि उच्च उद्देशाची पूर्ती करून घेणारे आहेत आणि ऋद्धिमध्ये जे पूर्णत्व संपादन केलेले आहेत, तेच भिक्षू धर्मनगररातील पुरोहित होत."

## धर्मनगरचे वैद्य

"महराज, जे भिक्षू धुतांग धारण करतात, अल्पेच्छ आहेत, संतुष्ट राहणारे आहेत, दुसऱ्याकडून काही मागून घेणे किंवा स्वतःच कोणत्यातरी वस्तूच्या मागे फिरण्याची घृणा करणारे आहेत, ज्याप्रमाणे भुंगा फुलाफुलावर बसून त्याचा रस घेत असतो. त्याचप्रमाणे एकही घर न सोडता अनुक्रमाणे प्रत्येक घरी पिंडपात करणारे आहेत. आणि त्यानंतर एकांत जंगलात जाऊन ध्यानरत होणारे आहेत, आपल्या जीवनाची किंवा शरीराची काळजी

घेणे ज्यांनी सोडून दिले आहे, ज्यांनी अर्हतपद प्राप्त करून घेतले आहे आणि जे धुतांग पालन करणे हिच गोष्ट अत्युत्तम मानतात, तेच भिक्षू भगवान बुद्धाच्या धर्मनगररातील श्रेष्ठ वैद्य समजले जातात.''

## धर्मनगरातील दिवे लावणारे

''महाराज, जे भिक्षू परमपरिशुद्ध, निर्मळ क्लेशमुक्त आणि अतीमदिव्य चक्षूंचा साक्षात्कार करून घेतलेले आहेत. त्याच भिक्षूंना भगवान बुद्धाच्या धर्मनगरातील दिवे लावणारे समजतात.''

## धर्मनगरातील चौकीदार

''महाराज, जे भिक्षू मोठे विद्वान आहेत, आगमशास्त्राचे पंडित आहेत, धर्मज्ञ आहेत, विनय समजून घेणारे आहेत, मातृकाचा अभ्यास करणारे, त्याचे उच्चारण स्पष्ट आहेत, नऊ अंगानीयुक्त असलेल्या धर्मशासनाला पूर्णतः जाणणारे आहेत. असेच भिक्षू भगवान बुद्धाच्या धर्मनगरातील चौकीदार समजले जातात.''

## धर्मनगरातील चित्रपटगृह चालवणारे (रूपदक्ष)

''महाराज, जे भिक्षू विनयाचे विद्वान आहेत, विनयातील गूढ ज्यांना समजनू आले आहे, नदी नाल्याच्या अभ्यासात कुशल आहेत, विनयाची सर्व कामे चांगल्या प्रकारे अचूकपणे करू शकणारे आणि विनयातील जाणून घेण्यायोग्य सर्वच गोष्टी ज्यांनी जाणून घेतल्या आहेत. तेच भिक्षू भगवान बुद्धाचया धर्मनगरातील चित्रपटगृह चालवणारे रूपदक्ष होत. असे समजले जातात.''

## धर्मनगरातील माळी

''महाराज, ज्या भिक्षूंनो, आपल्या डोक्यावर विमुक्तीचे गजरे बांधलेले आहेत, त्या अतुल्य आणि श्रेष्ठ अवस्थेचे अवगाहन केले आहे. तसेच लोका प्रिय आणि जे आदरणीय आहेत, त्याच भिक्षूंना भगवान बुद्धाच्या धर्मनगरातील फूले विकणारे माळी म्हणतात.''

## धर्मनगरचे फळे विकणारे

''महाराज, जे भिक्षूचार आर्यसत्यांच्या रहस्यापर्यंत पोहचलेले असते, ज्यांना सत्याचा साक्षात्कार झाला आहे. ज्यांनी बुद्धधर्म पूर्णपणे समजून घेतला आहे. ज्यांच्या बद्दल चारही श्रामण्यफळासंबंधी शंका करण्यासारखे काहीच उरले नाही, जे त्या फळापासून मिळणारे सुख उपभोगणारे आहेत, तसेच सन्मार्गावर आलेल्या दुसऱ्या लोकामध्येसुद्धा

ते फळ वाटणारे आहेत. तेच भिक्षू भगवान बुद्धाच्या धर्मनगरातील फळे विकणारे होत, असे समजण्यात येते.''

## धर्मनगरातील सुगंधी अत्तरे व तेल विकणारे

''महाराज, जे भिक्षू शिलाच्या सर्वश्रेष्ठ अशा सुगंधाने स्वतःचे शरीर सुगंधीत करून अनेक प्रकारच्या सद्गुणाने संपन्न आहेत, तसेच क्लेशरूपी दुर्गंध मळ धुवून टाकणारे आहेत. असेच भिक्षू भगवान बुद्धाच्या धर्मनगरातील सुगंधी अत्तरे किंवा तेल विकणारे होत. असे समजण्यात येते.''

## धर्मनगरातील अट्टल दारूडे

''महाराज, जे भिक्षू केवळ धर्माचे चाहते आहेत, गोड बोलणारे आहेत, अभिधर्म आणि विनयात आंनद मानणारे आहेत, जंगलात असो की, एखाद्या वृक्षाखाली असो किंवा अगदी एकांत घरात आसन बसले असता केवळ धर्माचेच रसपान करीत असतात. काया, वाचा आणि मनाने केवळ धर्माच्या चरणात नित्यनेमाने बुडून राहतात, धर्माच्या विषयात ज्यांनी मोठी उपलब्धी मिळवली आहे, जे सदैव धर्मकार्यात मग्न राहतात, सर्वत्र अल्पच्छतेची प्रशंसा करतात, संतुष्टपणाचे गुणगान करतात, विवेकाचे कीर्तीपवाडे गातात, सांसारिक पाशापासून दूर राहण्याचा उपदेश देतात, उत्तमकार्य करण्याचे सदैव प्रयत्न करावे असा उपदेश देतात, शिल, समाधी आणि प्रज्ञेचा उपदेश करीत असतात. विमुक्ती आणि विमुक्ती-ज्ञानदर्शनाचा नेहमी उपदेश करतात, ज्यांच्याकडे जाऊन दुसरे लोक अनेक प्रकरचा धर्मोपदेश ऐकतात, असेच भिक्षू भगवान बुद्धाच्या धर्मनगररातील अट्टल दारूडे (स्वच्छंदी) होत, असे समजण्यात येते.''

## धर्मनगरातील पहारेदार

''महाराज, जे भिक्षू रात्रीच्या पहिल्या प्रहरापासून तर शेवटच्या प्रहरापर्यंत केवळ बसल्या जागेवर जागे राहून काढतात. केवळ शांतपणे उभे राहून किंवा चंक्रमण करीत रात्रंदिवस ध्यानभावना करत असतात, सतत चिंतनात मग्न राहतात, आपले क्लेश दूर करण्यासाठी सतत प्रयत्नशील असतात. तेच भिक्षू भगवान बुद्धाचया धर्म नगरातील पहारा देणारे पहारेदार आहेत. असे समजण्यात येते.''

## धर्मनगरातील वकील

''महाराज जे भिक्षू भगवान बुद्धाच्या नऊ अंगीनीयुक्त असे धर्म अर्थाद्वारे [illegible] आणि उदाहरणाद्वारे समजावून सांगतात, असेच

## धर्मनगरातील सेठ (सावकार)

‘‘महाराज, जे भिक्षू धर्मरत्नांनी समृद्ध आहेत, परंपरागत विद्याधनाने श्रीमंत बनलेले आहेत आणि धर्माचे निर्देश, स्वर, व्यंजन, लक्षण आणि गूढ अशा तत्वज्ञानांनी ज्यांचा कोष भरपूर भरलेला आहे, असे भिक्षू भगवान बुद्धाच्या धर्म नगरातील मोठमोठे सेठ सावकार होत.’’

## धर्मनगराचे बॅरिष्टर

‘‘महाराज, जे भिक्षू धर्मदेशनेच्या रहस्यापर्यंत पोहोचले आहेत, ध्यान भावनेच्या अभ्यासासाठी जे विषय सांगितले आहेत, त्याचे विभाग आणि तात्पर्य ज्यांना कळले आहे, सूक्ष्मातील अतिसूक्ष्म विषय ज्यांनी पचविला आहे, असे भिक्षू भगवान बुद्धाच्या धर्मनगरातील विख्यात बॅरिष्टर म्हणून ओळखले जातात.’’

‘‘महाराज, भगवान बुद्धाचे धर्मनगर इतक्या चांगल्या तऱ्हेने वसले आहे, इतक्या सुंदर प्रकारे त्याचे मोज़माप करून तयार केलेले आहे, या धर्मनगराची वसाहत अत्यंत रहस्यमय ढंगाने बांधली गेली आहे, ज्यांच्यामुळे नगराच्या सर्वबाबी परिपूर्ण झालेल्या आहेत. इतकी सुंदर व्यवस्था करून ठेवली आहे की, कोणत्याही बाजूने शत्रू या शहरावर हल्ला करू शकत नाही. असे हे नगर सुरक्षित आहे.’’

‘‘महाराज, याच सर्ववस्तू पाहून भगवान बुद्ध निश्चित होऊन गेले. असे समजनू घ्यावयास पाहिजे.’’

‘‘ज्याप्रमाणे उत्तम प्रकारे निरनिराळ्या विभागात विभागल्या गेलेल्या नगरास पाहून त्या नगराची वसाहत बसविणाऱ्या इंजिनीयर व कारागिराचे कौशल्य दिसून येते. त्याचप्रमाणे लोकनाथ बुद्धाचया या सर्वश्रेष्ठ अशा धर्मनगरास पाहून ते भगवान कसे असतील, यांची जाणीव लोकांना झाल्यावाचून राहत नाही. समुद्राची खाडी पाहून समुद्र किती महान आहे, असे लोक समजून घेतात, त्याचप्रमाणे देवता आणि मनुष्यातील त्यांच्या धर्मसागरातील लाटा पाहून समजून घ्यावयास पाहिजे की, ते तृष्णा नष्ट करून टाकणारे, शोकसंतप्त लोकातील शोक दूर करणारे, भवसागरापलिकडे सुरक्षित जागी समस्त देवता आणि मनुष्यांना पोहोचविणारे, अपराजेय भगवान बुद्ध किती महान असतील ! एखादे उंचशिखर पाहून लोकांना समजून येते की एवढे उंच शिखर हिमालयाचेच असू शकते. त्याचप्रमाणे धर्मशिखर पाहून असे समजून घ्यावयास पाहिजे की, तृष्णेच्या अग्नीचा जेथे पत्ताही लागत नाही, अगदी थंडगार आणि व्याधी रहित असलेले भव्य आणि प्रचंड असे हे भगवंताचे धर्मपर्वत आहे, तर ते महावीर भगवान बुद्ध कसे असले

पाहिजेत? ज्याप्रमाणे गजराजाच्या पाऊलखुणा पाहून लोकांना माहीत होते तो गजराज फार मोठा प्राणी असावा. त्याचप्रमाणे बुद्ध गजराजाच्या पाऊलखुणा पाहून बुद्धिमान लोकांना लगेच जाणिव होते की, भगवान बुद्ध किती महान असतील. जंगलातील लहान मोठ्या प्राण्यांना भयभित झालेले पाहून लोकांना समजून येते की, सिंहाचा आवाज ऐकूनच हे प्राणी भयभित झालेले आहेत. त्याचप्रमाणे दुसऱ्या मतांच्या लोकांना भयभित होऊन पळतांना पाहून समजले जाऊ शकते की, निश्चितच धर्मराज शाक्यसिंहाने (बुद्धाने) डरकाळी फोडली असेल. भिजलेली आणि हिरवळीने सुशोभित जमीन पाहून समजनू येते की, पावसाची वृष्टी झाली असावी. त्याचप्रमाणे संसारतील लोकांना संतोषयुक्त व आनंदित असलेले पाहून समजून घ्यावयास पाहिजे की, धर्ममेघ बुद्धांनी वर्षाव केला असला पाहिजे. ठिकठिकाणी साचलेले पाणी व चिखलाने झाकलेली जमीन पाहून समजले जाते की, येथून निश्चितच पाण्याचा मोठा लोंडा वाहत गेला असेल. त्याचप्रमाणे पाप रजापासून व पाप पंकापासून मुक्त झालेल्या लोकांना पाहून तसेच जगातील समस्त देवता आणि मनुष्यांना धर्मामृत पिऊन संतुष्ट झालेले पाहून समजून घ्यावयास पाहिजे की, निश्चितच येथून धर्मनदी धर्मसागराकडे जाऊन मिळाली असली पाहिजे. अशी धर्मामृताची मोठी धार येथून वाहत गेली असली पाहिजे. अशी धर्मामृताची मोठी धार येथून वाहत गेली असली पाहिजे. उत्तम गंधाचा सुगंध पाहून लोक समजून घेतात की, असा गंध वाहत आहे, यावरून फूल फूलले असले पाहिजे. त्याचप्रमाणे शीलांचा सुगंध समस्त देवता आणि मनुष्यात वाहत आहे, यावरून समजून घ्यावयास पाहिजे की, त्या महान अलौकिक असे बुद्धरूप धर्मफूल फुलले असले पाहिजे.''

''महाराज, याप्रमाणे असे शेकडो, हजारो कारण, तर्क आणि उपमा देऊन भगवान बुद्धाच्या शक्तीची जाणीव करून देता येणे शक्य आहे. महाराज, ज्याप्रमाणे एखादा चतुर माळी गुरूचया शिकवणुकीनुसार आपली बुद्धी चालवून नानाप्रकारची फूले गुंफून सुंदर माळा तयार करून उत्तम साज सजवितो. त्याचप्रमाणे मी बुद्ध मंदिरात त्यांच्या अनंत सद्गुणांच्या पुष्पमाळा गुंफत आहे. यात माझ्या गुरूची शिकवण असून माझीही हुशारी आहे. तेव्हाच मी शेकडो, हजारो उपमा देवून त्या अलौकिक भगवान बुद्धाचे बळ दाखवून देऊ शकतो. पण आपणच ऐकावयास तयार असले पाहिजे.''

''भंते नागसेन, कदाचित दुसरे लोक याप्रमाणे कारणे आणि अनुमान ऐकून भगवान बुद्धाचे बळ समजू शकणार नाहीत. परंतु माझा तर पूर्ण विश्वास बसला असून मी अगदी शांत झालो आहे. आपली उत्तरेच अतिशय प्रभावशाली होती.''

(अनुमानप्रश्न समाप्त)

## २. धुतांगाचा उपयोग

"घनदाट अशा अरण्यात धुतांगव्रत आचरित असलेल्या भिक्षूंना राजा मिलिंदाने पाहिले होते तसेच त्यांनी अनागामी फळावर प्रतिष्ठित झालेले काही गृहस्थही पाहिले होते. या दोघांची साधना व फळप्राप्ती पाहून राजाचया मनात मोठा भ्रम उत्पन्न झाला आणि तो मनातच विचार करू लागला की, 'गृहस्थजीवनाचा आस्वाद घेत, सर्व भोग्यवस्तूंचा उपभोग घेणाऱ्या गृहस्थांना जर ज्ञानप्राप्त करून घेता येते, तर या धुतांगव्रताचे पालन करणे व्यर्थ आहे, निष्फळ आहेत, ठीक आहे ! दुसऱ्या मताचया तर्कांचे खंडण करणाऱ्या त्रिपिटकाचार्य आणि श्रेष्ठवक्ता अशा स्थवीर नागसेनास याविषयी जाऊन विचारले पाहिजे. आणि आपल्या शंकाचे निरसन करून घेतले पाहिजेत. ते निश्चित समाधान करतील."

"तेव्हा राजा मिलिंद आयुष्मान नागसेन राहत होते तेथे आणि त्यांना प्रणाम करून ऐके बाजूस बसला. त्यानंतर ते आयुष्मान नागसेनास म्हणाला – 'भंते नागसेन, एखादा गृहस्थ आपल्या मुलाबाळासोबत राहून, सर्व प्रकारचे भोग भोगत असता, काशीच्या सुगंधित चंदनाचे उटणे करून आंघोळ करीत असता, निरनिराळ्या सुंदर माळा धारण करीत असता, अनेक सुगंधी पदाथार्घचे उटणे करीत असता, रूपये पैशाच्या व्यवहाराच्याच च्रकात पडून आणि मणीमोत्याचे, सोन्याचे किमती आभूषण आपल्या शरीरावर व्यवस्थित सजवून आनंदात जीवन घालविणाररा परमशांत पद निर्वाणाचा साक्षात्कार करून घेऊ शकेल काय?"

"महाराज, ज्यांनी निर्वाणाचा साक्षात्कार करून घेतला असे गृहस्थ शंभर, दोनशे, तीनशे, चारशे, पाचशे, हजार, लाख, कोटी, अरब, खरबच नव्हे तर कित्येक पहावयास मिळतील ! महाराज, दहा वीस तर सोडाच पण ज्ञानप्राप्त केलेल्या गृहस्थ लोकांची गणती करणे सुद्धा अवघड आहे. हे मी तुम्हाला कसे समजावून सांगू ?"

"हे भंते, तेच मला समजावून सांगा की, ते कसे ज्ञान प्राप्त करून घेतात."

"महाराज, आपण मन लावून ऐका, मी सांगतो. जऊ अंगानीयुक्त असलेल्या बुद्ध वचनात जो पवित्र सदाचार सांगितला आहे, सन्मार्गावर चालावयास आणि धुतांगातील जे काही चांगले गुण आहेत, या सर्व गोष्टी या प्रकरणात येतात."

"महाराज, खाली, वर, समतल जागेत, खड्डयात, जल, स्थळ अशा सर्व ठिकाणी पाणी पडून ते वाहत जाऊन शेवटी समुद्रालाच मिळते. महाराज, त्याचप्रमाणे या प्रकरणाचा खुलासा करून सांगितला असता, नऊ अंगानीयुक्त असलेल्या बुद्धवजनात

जो पवित्र आचार सांगितला आहे. सन्मार्गावर येण्यासाठी आग्रह धरला जातो आणि धुतांगातील जे काही चांगले गुणधर्म आहेत. या सर्व गोष्टी यात येतात, महाराज वरील तत्वांच्या आधाराने तुम्हाला समजावून सांगत असता मला काही गोष्टी आपल्या बुद्धी सामर्थ्यानेसुद्धा दाखवून द्यावा लागतील. याप्रमाणे तुम्हाला समजावून सांगितलेला विषय तुम्हाला समजला तर तो मोठा, अर्थपूर्ण, रोचक आणि प्रतिष्ठित असा सर्वोपयोगी सिद्धांत ठरेल.''

''महाराज, जे कुशली लेखक असतात. ते आपल्या बुद्धीकौशल्याने एखादा लेख पूर्ण लिहून घेतात व पूर्ण उपयोगी करून घेतात. याप्रमाणे तो लेख सुंदर, परिपूर्ण आणि दोषरहित सिद्ध होतो. महाराज, त्याचप्रमाणे मला स्वतःच्या बुद्धीकौशल्याने सुद्धा काही गोष्टी दाखवून द्याव्या लागतील. आणि जेव्हा हा विषय तुम्हाला समजला, तर तो मोठा अर्थपूर्ण, परिपूर्ण व रोचक आणि प्रतिष्ठित असा सर्वोपयोगी सिद्धांत ठरेल.''

''महाराज, श्रावस्थी नगरात भगवंताचे पाच कोटी आर्य श्रावक उपासक आणि उपासिंका राहत असत. त्यातील एक लाख सत्तावन्न हजार उपासक, उपासिका अनागामी फळावर प्रतिष्ठित झाले होते. ते सर्व गृहस्थच होते प्रवर्जित नाही.''

''याशिवाय कंडबवृक्षाखाली भगवान बुद्धांनी यमक प्रतिहार्य (अलौकिक सिद्धी) दाखवली असता वीस कोटी देवता आणि मनुष्यांना सत्यज्ञान प्राप्त झाले होते. ते सर्व गृहस्थच होते, प्रवर्जित नाही.''

''याशिवाय महाराहुलोवाद, महामंगलसूत्र, समचित परियाय, पराभवसूत्र, पुराभेदसूत्र, कलहविवादसूत्र, चुलव्यूहसूत्र, महाव्यूहसूत्र, तुवरकसूत्र आणि सारिपुत्र सूत्र इत्यादी सूत्रांचा उपदेश केल्यानंतर अनंत देवगणाना धर्मज्ञान झाले होते.''

''याशिवाय राजगृह नगरात तीन लाख पन्नास हजार भगवान बुद्धाचे उपासक उपासिका आर्यश्रावक होते. त्याठिकाणी धनपाल नावाच्या हत्तीचे दमन केल्यानंतर नववद कोटी देवगणांना, धर्मज्ञानांच्या साक्षात्कार झाला होता. इंद्रशालगृहेत ऐंशी कोटी देवतांना, बनारसाच्या ऋषिपतन मृगदाय येथे प्रथम धर्मचक्र प्रवर्तनसुत्राचा उपदेश केल्यानंतर अठरा कोटी ब्रह्मा आणि अगणित देवतांना, तसेच तावसिंस भवनात (देवगृहात) पांडूकंबल शीलसनावर बसून अभिधर्माचा उपदेश केल्यानंतर देवगणांना आणि देवभवनातून उतरत असता संकनगराच्या द्वारावर लोक विवरण प्रतिहार्य (सिद्धी) मुळे प्रसन्न होऊन तीस कोटी देवता आणि मनुष्यांना ज्ञानचक्षू उत्पन्न झाले होते.''

''याशिवाय शाक्याच्या कपिलवस्तू नगरातील न्यग्रोधारामात बुद्धवंश देशना आणि

महासमय सुत्राची देशना केल्यानंतर अनंत देवतांना धर्माचे ज्ञान लाभले होते.''

''याशिवाय सुमन नावाचा माळी, गरहदिन्न, आनंदसेठ, जंबूकाजीवक, मेंडूकदेवपुत्र, मट्टकंडलजीकदेवपुत्र, सुलसा नावाची वेश्या, सिरीमानावाची वेश्या, कोष्टकाची मुलगी, लहान सुभद्रा, सांकेल ब्राह्मणाच्या अंतेष्टीकरता आलेले लोक, सुनापरंगत आणि शुक्राशी भेट घेऊन तिरोकुड्डसूत्र आणि रतनसूत्राचा उपदेश केल्यानंतर चौऱ्याऐंशी हजार देवता अणि मनुष्यांना भगवान बुद्धानी धर्मज्ञान करवून दिले होते.''

''महाराज, भगवान बुद्ध आपल्या जीवन काळात तीन मंडळ आणि सोळा महाहनपथात जेथे जेथे गेलेत, तेथे तेथे अनेक देवता आणि मनुष्यांना निर्वाण पदापर्यंत पोहोचवल्याचा दाखला आहे.''

''महाराज, हे सर्व देवता आणि माणसे गृहस्थच होते, प्रवर्जित नव्हते. महाराज, या कोटीच्या संख्येने असणारे देवता आणि मनुष्य या सर्वांनी गृहस्थी जीवनाचा उपभोग घेत असतांनाच निर्वाणलाभ करून घेतला होता.''

''भंते नागसेन, जगातील सर्व कामभोगांचा उपभोग करणारे गृहस्थी मनुष्य सुद्धा परमशांत निर्वाणपदाचा साक्षात्कार करून घेत असतात, जर असे असेल तर भिक्षू लोक धुतांग साधना करण्याच्या चक्रात व्यर्थच कां बरे पडून राहतात ? वरील गोष्टी खऱ्या आहेत, तर हे धुतांगव्रत निरर्थक ठरत नाही काय?''

''भंते नागसेन, औषध घेतल्या वाचूनच जर रोग बरे होतात, तर उल्टी करवून जुलाब देऊन शरीरास अशक्त करून घेण्यात कोणते शहाणपण आहे. जर बुक्क्यांनी इोसे मारूनच शत्रूला पराजित करता येते तर तलवार, भाला, तीरधनुष्य, काठ्या आणि गदा यांचे काय प्रयोजन ? जर एखाद्या झाडावर गाठी, आडव्या किंवा तिरपट फांद्या, खोड, वाळल्या फांद्या आणि वेलीचया साह्याने चढता येत असेल तर भल्या मोठ्या शिडीसाठी शोधाशोध करीत फिरण्याची गरज काय ? कठोर भूमीवर पडता क्षणिच जर शांतपणे झोप येत असेल, तर गादी व उशींची काय आवश्यकता ? जर कोणी एखादा माणूस भयानक धोकादायक आणि घनदाट जंगलातून एकटाच प्रवास करू शकत असेल, तर सजूनधजून हत्यारबंध सेनांची वाट पहात बसून वेळेचा अपव्यय करण्यांत कोणते स्वारस्य आहे ? एखादी दुथडी भरून वाहत जाणारी नदी जर पोहचून पार करता येत असेल, तर नाव किंवा पुलासाठी नदीकाठाने व्यर्थ फिरण्यात काय अर्थ? जर कोणी आपल्याजवळ असलेल्या संपत्तीवरच आपल्या कुटुंबाचा उदरनिर्वाह चालवू शकत असेल, तर दुसऱ्याची नौकरी करीत इकडेतिकडे गुलामी करीत फिरण्याचे काय काम ? जर

नैसर्गिक झऱ्याचे शुद्ध व निर्मळ पाणी मिळत असेल, तर व्यर्थच मोठमोठे तलाव, विहीरी किंवा बावळ्या खोदण्याचे कामच काय आहे ? भंते नागसेन, याप्रमाणे काम भोगावे सुखमय जीवन जगणाऱ्या संसारी लोकांना जर परमशांत अशा निर्वाणपदाचा साक्षात्कार करून घेता येतो तर धुतांग साधनेचे कठोर आचरण करण्यात अर्थ काय?''

''महाराज, यथार्थाने पाहिले असता धुतांगाचे अट्ठावीस गुण आहेत. त्यामुळेच सर्वबुद्धांनी त्यांची प्रशंसा केली आहे.''

''भंते, ते अठ्ठावीस गुण कोणते बरे?''

## धुतांग पालन करावयाचे २८ गुण

''महाराज, १) धुतांग पाल करणारांची जिवीका शुद्ध असते, २) धुतांग पालन करणारांना सुखदफळाचा लाभ होतो, ३) धुतांग पाल करणारात कोणताही दोष राहत नाही, ४) तो कोणालाही कष्ट देत नाही, ५) तो निर्भय राहतो, ६) धुतांग पालन करीत असता दुसऱ्या कोणालाही कष्ट होत नाहीत, ७) धुतांगाचे साधन धर्माकडे घेऊन जाणणारे असते, ८) धुतांग पालन करणाराचे कधी अधःपतन होत नाही, ९) धुतांग पालन करणारास कधी अपयश येत नाही, १०) धुतांग माणसाचे रक्षण करते, ११) धुतांग पालन करणार इच्छित वस्तूचा तात्काळ लाभ करून घेऊ शकतो, १२) धुतांगाचे पालन करणारा सर्व प्राण्यांना आपल्या वश करू शकतो, १३) धुतांगाचे पालन करून मनुष्य आत्मसंयम करणे शिकतो, १४) धुतांगाचे जीवन भिक्षूंच्या अनुकूल असते, १५) धुतांगाचे पालन करणारा कोणारवर भार व्यर्थ ठरत नाही, १६) धुतांग पालन करणारा मुक्त आणि स्वतंत्र राहतो, १७) धुतांग सांसारिक तृष्णेचा नाश करते, १८) द्वेष दूर करतो, १९) मोहाचे पाश तोडते, २०) धुतांग पालन करणारात अभिमान राहत नाही, २१) धुतांग पालन करणाराचे वाईट विचार नष्ट होतात, २२) शंका दूर होतात, २३) आळस नष्ट होतो, २४) असंतोष नाहीसा होता, २५) सहन शक्तीची वाढ होते, २६) त्याचे पुण्य अतुल्य आहे, २७) त्याचे पुण्य अनंत आहे आणि २८) धुतांग सर्व दुःखाचा नाश करून निर्वाणापर्यंत नेऊन पोहोचवतो. महाराज, हेच धुतांगाचे यथार्थात २८ गुण आहेत. म्हणूनच सर्व बुद्धांनी यांची भरपूर प्रशंसा केली आहे.''

''महाराज, धुतांगाचे पालन करणारास अठरा गुणांचा साक्षात्कार होतो.''

''भंते, अठरा गुण कोणते बरे ?''

## धुतांग पालन करणारातील १८ गुण

“महाराज, १) त्याचा आचार पवित्र आणि शुध्द असतो, २) त्याच्यासमोर मार्ग निश्चित असतो, ३) त्याचे शरीर व वचन संयमित असते, ४) त्याचे मन पवित्र राहते, ५) त्याचा उत्साह कायम राहतो, ६) ते निर्भय राहतो, ७) त्याची आतम्दृती नष्ट होते, ८) त्याच्यातील हिंसक प्रवृत्ती एकदमच शांत होते, ९) त्याच्यात मैत्री भावना सतत जागृत राहते, १०) त्याचा आहार प्रमणबध्द असतो, ११) सर्वच प्राणायात तो प्रतिष्ठित होतो, १२) विचारपूर्वक तो भोजन करतो, १३) तो सदैव जागृत असतो, १४) तो गृहत्यागी असतो, १५) चांगल्या देवताच्या वासस्थानीच त्याचे वास्तव्य असते, १६) तो पापाची घृणा करतो, १७) त्याला विवेकात आनंद वाटतो आणि १८) सदा सर्वकाळ तो सावध असतो. महाराज, जे धुतांगाचे चांगल्याप्रकारे पालन करतात, त्यांच्या अंगी वरील अठरा गुण येत असतात.”

“महाराज, दहा प्रकारचे लोक धुतांग पालन करण्यास योग्य असतात.”

“भंते, दहा प्रकारचे लोक कोणते बरे?”

## धुतांग पालन करण्यायोग्य १० व्यक्ती

“१) जो श्रद्धावान आहे, २) पापभिरू, ३) धैर्यवान, ४) खोटा दिखावा न करणारा, ५) ध्येयवादी, ६) निर्लोभी, ७) जिज्ञासू, ८) दृढसंकल्पी, ९) चिडखोर नसलेला आणि १०) मैत्रीभाव जागृत ठेवणारा. महाराज, हेच दहा प्रकारचे व्यक्ती धुतांग पालन करण्यास योग्य असतात.”

“महाराज, ज्या कामभोगी संसारी लोकांना परमशांत असे निर्वाणपद प्राप्त होते, त्यांनी निश्चितच पूर्वजन्मी तेरा धुतांगाचे पालन केले असले पाहिजे. त्यांनी आपल्या पूर्वीच्याजन्मी आपला आचार आणि मार्ग शुद्ध करून घेतल्यामुळे आता ते संसारी गृहस्थ असून देखील त्यांना परमार्थ निर्वाणपदाचा साक्षात्कार घडून आला.”

## धनुर्धराची शिकवण

“महाराज, कोणीही धनुर्धर शिष्यांना प्रथम एखाद्या मैदानात शिकवत असतो की, धनुष्याचे प्रकार किती आहेत, धनुष्य कसे चढवावे, कसे धरावे, मूठ कशी बांधावी, बोटे कशी ठेवावी, पायांचा पवित्रा कसा घ्यावा, दोरीवर तीर कसा चढवावा, तीर चढविल्यानंतर तो कसा ओढावा, कशी निशानावर दृष्टी ठेवावी आणि निशानावर कसा तीर मारावा. प्रथम गवताचा, तनशीचा, मातीचा किंवा पाट्यांचा मनुष्य बनवून त्यावर

निशाना मारावयास शिकवतात. जेव्हा तो शिष्य धनुर्विद्येत पारंगत होतो, तेव्हा त्याला राजाच्या पुढे नेऊन उभा करतो, त्याला पाहून राजा खूष होतो आणि त्याला चांगले घोडे, रथ, हत्ती, धनधान्य, सोने, अशर्फी, दासी, नौकरी, स्त्री आणि शेतीवाडी इत्यादी देवून त्याचा सन्मान करतो. महाराज, याप्रमाणेच जे कामभोगी संसारी गृहस्थ परमशांत निर्वाणपद प्राप्त करून घेतलेले पाहण्यात येतात, त्यांनी निश्चितच पूर्वजन्मी तेरा धुतांगाचे पालन केले असले पाहिजे. त्यांनी आपल्या पूर्वजन्मी आचार आणि मार्ग शुद्ध करून घेतला असल्याकारणानेच सध्य ते संसारी गृहस्थ जीवन जगत असून देखील परमार्थ निर्वाण पदाचा साक्षात्कार करून घेतात.''

''महाराज, ज्यांनी आपाल्या पूर्वजन्मी कधी धुतांगाचे पालन केले नाही, ते लोक येथे केवळ एकाच जन्मात अर्हत बनणे शक्य नाही. महाराज, शुद्ध अंतःकरणारने सन्मार्गावर चालत असल्यामुळे तसेच गुरूच्या सहवासात राहिल्यामुळे आणि सज्जन मित्रांची सोबत घडून आल्यामुळे निर्वाणाचा साक्षात्कार घडून येत असतो.''

**वैद्यकीय शिकवण**

''महाराज, एखाद्या शिष्य प्रथम एखादा चांगला गुरू पाहून त्याच्याकडे जातो. नंतर त्याला काही वेतन किंवा सेवा मान्य करून त्याचेजवळ याप्रमाणे सर्व विद्येचे शिक्षण घेतो की, सुरी कशी धरावी, चिरा कसा मारावा, निशान कसे लावावे, शस्त्रक्रिया कशी करावी, रूतलेली वस्तू कशी धरून ओढावी, जखम कशी धुवावी, ती कशी वाळू द्यावी, त्यावर मलम कसा लावावा, आजाऱ्यास वांती कशी करावयास लावावी, जुलाब कसा द्यावा व औषधी कसे द्यावे इत्यादी सर्व गोष्टी अगोदर शिकाव्या लागतात. महाराज, गुरूकडून या सर्व गोष्टीचे ज्ञान शिकून घेतल्यानंतरच तो स्वतंत्रतापूर्वक एखाद्या आजाऱ्यावर इलाज करू शकतो. महाराज, याप्रमाणेच जे कामभोगी संसारी गृहस्थ परमशांत निर्वाणपद प्राप्त करून घेतलेले दिसून येतात, त्यांनी निश्चितच आपल्या पूर्वजन्मी धुतांग व्रताचे आचरण केले असले पाहिजे. त्यांनी आपल्या पूर्वजन्मी आपला आचार व मार्ग शुध्द करून घेतला असल्या कारणारनेच ते येथे गृहस्थ जीवन व्यतीत करीत असतात सुद्धा परमार्थ निर्वाणपदाचा साक्षात्कार करून घेतात.''

''महाराज, ज्यांनी स्वतःला धुत गुणांनी शुद्ध करून घेतले नाही, त्यांचा कधीही धर्मात प्रवेश होऊ शकत नाही. महाराज, ज्याप्रमाणे पाणी पिल्याशिवाय बीज उगवू शकत नाही. त्याचप्रमाणे धुतगुणांनी स्वतःला शुद्ध करून घेतल्याशिवाय कोणालाही धर्माचे दर्शन घडून येऊ शकत नाही. महाराज, पुण्यकर्माशिवाय चांगली गती मिळू शकत नाही. त्याचप्रमाणे धुतगुणांनी स्वतःला शुद्ध करून घेतल्याशिवाय धर्माचे दर्शन होऊ शकत नाही.''

''महाराज, समस्त जीवांचा आधार महापृथ्वी आहे, तसेच मुमुक्षाकरिता धुतांग आधार आहे. मुमुक्षांना धुतांग म्हणजे पाण्यासमान क्लेशरूपी मळ धुऊन काढण्याकरिता अग्निप्रमाणे; क्लेशरूपी धूळ उडवून टाकण्याकरिता धुतांग म्हणजे वाऱ्यासमान आहे, क्लेशरूपी रोग दूर करण्याकरिता औषधसमान आहे, क्लेशरूपी विष उतरविण्यासाठी अमृतासमान आहे, भिक्षूंना उपयुक्त गुणांचे उत्पन्न घेण्यासाठी शेतासमान आहे. सर्व फळ प्रदान करणारा मणी आहे, भवसागर पार करून जाण्यासाठी नावेसमान आहे, जरामरणापासून घाबरलेल्या लोकांना सुरक्षित राहण्यासाठी नावेसमान आहे, जरामरणापासून घाबरलेल्या लोकांना सुरक्षित राहण्यासाठी जागेसमान आहे, क्लेशांनी त्रस्त झालेल्या लोकांना ममतेचा हात फिरविणाऱ्या मातेसमान आहे, पुण्य मिळवून घेण्यासाठी सर्वच भिक्षूंचे गुण उत्पन्न करून देण्याकरिता वडीलासमान आहे, भिक्षूंचे उपयुक्त गुण शोधून आणून देणाऱ्या मित्रासमान आहे, क्लेश मळांनी लिप्त न होणाऱ्या कमळासमान आहे, क्लेशांची दुर्गंध दूर करण्यासाठी गुलाब पुष्पासमान आहे, आठही प्रकारच्या हवेमुळे न हलणाऱ्या पर्वताराजसमान आहे, एकदम मुक्त आणि स्वतंत्र करून सोडण्यासाठी अंतराळासमान आहे, क्लेश मळांना वाहून नेण्याकरिता नदीसमान आहे, क्लेशरूपी भयानक जंगल आणि आवागमनाच्या मरूभूमितून बाहेर पडण्याकरिता निर्भय आणि सोबत करणाऱ्या वाटाड्यासमान आहे, निर्वाण नगरापर्यंत पोहचवून देणाऱ्या निर्भय आणि सोबत करणाऱ्या तांड्यासमान आहे, संस्काराचा वास्तव स्वभावगुण दाखवून देणाऱ्या स्वच्छ आरशासमान आहे, क्लेशरूपी तलवार आणि काठीचे वार झेलून घेण्यासाठी ढालीसमान आहे, तिन्ही प्रकारच्या तापास थंड करण्यासाठी शित चंद्रमासमान आहे, मोहरूपी अंधकाराचा नाश करण्याकरिता सूर्यासमान आहे, श्रामण्य गुणरूपी रत्नाकरिता महासागरासमान आहे. म्हणूनच धुतांग इतके अनंत, गंभीर आणि महान आहेत.''

''महाराज, याप्रमाणेच विशुद्धीची (निर्वाण) कामना करणाऱ्याकरिता धुतांग व्रत अत्यंत उपकारक सिद्ध होणारे आहे, सर्व प्रकारेच कष्ट, संताप, असंतोष, भय, भव (संसाराची यातायात) नष्ट करण्याचे सामर्थ्य धुतांगातच आहे. मनातील किल्मीष दूर करणारे, सर्व मळ नाहीसा करणारे, शोकाचा विनाश करणारे, दुःख दूर करणारे, रागाला थारा न देणारे, द्वेष, मोह तसेच अभिमानास पळवून लावणारे, आत्मदृष्टी श्रम घालवून समस्त पापंची मूळे कापून टाकणारे असे धुतांगच आहे. धुतांग यशाची वृद्धी करते, हित व सुखदायक, आराम देणारे, प्रीती निर्माण करून कृशलमंगल घेऊन येणारे आहे. आणि निर्दोष व उत्तम फळ प्रदान करणारे धुतांग सद्‌गुणाची खाण असून अनंत आणि अगाध श्रेष्ठ गुण प्रदान करणारे आहे.''

''महाराज, ज्याप्रमाणे लोक शरीर धारण करण्याकरिता भोजन करतात, शक्तीवर्धनाकरिता औषध घेतात, परस्पर उपकारासाठी मित्र जोडतात, पलिकडे जाण्यासाठी नावेत बसतात, सुगंधासाठी पुष्पकळ्या धारण करतात किंवा अत्तर लावतात, भयमुक्त होण्याकरिता सुरक्षित जागेवर जातात, आधारासाठी पृथ्वीवर उभे राहतात, कला शिकण्याकरिता गुरूकडे जातात, यशासाठी राजाची सेवा करतात, मागेल तेवढी किंमत घेण्यासाठी मणिरत्न जवळ बाळगतात, त्याचप्रमाणे उत्तम लोक भिक्षू जीवन सार्थक करून घेण्याकरिता धुतांगाचे पालन करतात.''

''महाराज, जसे बीज रूजविण्यासाठी पाणी, जाळण्यासाठी अग्नी, शरीरात शक्ती येण्यासाठी भोजन, बांधण्यासाठी वेल, कापून काढण्यासाठी कोयता, तहान शमवण्यासाठी पाणी, धैर्य वाढवण्यासाठी पैशाचे भांडार, नदीच्या पलीकडे जाण्यासाठी नाव, रोग नष्ट करण्यासाठी औषध, आरामात प्रवास करण्यासाठी वाहन, भयापासून बचावासाठी सुरक्षित स्थळ, रक्षणासाठी राजा, लाठी, दगड, तीर व भाल्याचा वार रोखण्यासाठी ढाल, शिकण्यासाठी गुरू, पालन करण्यासाठी आई, रूप पाहण्यासाठी आरसा, शोभेसाठी अलंकार, शरीर झाकण्यासाठी वस्त्र, छतावर चढण्यासाठी शिडी, तोलून घेण्यासाठी तराजू, जप करण्यासाठी मंत्र, दुसऱ्यांनी दिलेल्या धमकीपासून स्वतःला वाचवण्यासाठी शस्त्र, अंधार दूर करण्यासाठी प्रदीप, उष्णता दूर करण्यासाठी हवा, पैसा मिळवण्यासाठी कौशल्य, जीव वाचवण्यासाठी औषध, रत्नासाठी खाण, अलंकारासाठी रत्ने, सोने इत्यादी पालन करण्यासाठी आज्ञा आणि दुसऱ्यांना वशकरण्यासाठी सद्‌गुण आहेत. त्याप्रमाणे श्रामण्यरूपी बीज रूजवण्यासाठी धुतांगव्रत आहे. तसेच क्लेशरूपी मळ जाळून टाकण्यासाठी, ऋद्धिबळ प्राप्त करून घेण्यासाठी, स्मृती आणि संयम दृढ करण्यासाठी, भ्रम आणि शंका निराकरण करण्यासाठी, तृष्णेची व्याकुळता नष्ट करण्यासाठी, ज्ञानाचा साक्षात्कार करून घेण्यासाठी, पूर्ण विश्वसनीय स्थान, चारही भयंकर नद्यांची धार पार करण्यासाठी, क्लेशरूपी रोग शांत करण्यासाठी, निर्वाण सुख प्राप्त करण्यासाठी, जन्म, जरा, व्याधी, मरण, शोक, हृदय पिळून रडणे, दुःख बेचैनी, आणि संतापाच्या भयापासून वाचण्यासाठी, श्रामण्य गुणांच्या रक्षणासाठी, श्रमण जीवनातील सर्व बाबी शिकून घेण्यासाठी; त्याचे पालन करण्यासाठी समर्थ विदर्शना, मार्गफळ आणि निर्वाणाचे दर्शन घेण्यासाठी, सर्व जगात शोभा वाढवण्यासाठी, सर्व नरकांना झाकून टाकण्यासाठी, श्रामण्य फळाचे उच्च शिखर गाठण्यासाठी, वक्र आणि नीच चित्तास तोलण्यासाठी, उत्तम धर्माच्या चिंतनात काळ घालवण्यासाठी, क्लेशरूपी जिंकण्यासाठी, अविद्येचा अंधकार नष्ट करण्यासाठी. तीन प्रकारच्या अग्नितापास थंड करण्यासाठी, उच्च, सुक्ष्म आणि शांत समापत्ती मिळून

घेण्यासाठी, सर्वच श्रामण्य गुणांच्या रक्षणासाठी, श्रेष्ठ अशा बोध्यंग रत्नाच्या प्राप्तीसाठी, योगी जनांच्या अलंकारासाठी, निर्दोष, निपूण, सुक्ष्म-शांतीपद गाठण्यासाठी, श्रामण्यभाव आर्यधर्म वश करून घेण्यासाठी धुतांगव्रताचे आचरण आवश्यक आहे. महाराज, एक-एक धुतांग या सर्व गुणांच्या वृद्धिसाठीच आहे. महाराज याप्रमाणे धुतांगाचे गुण अतुल्य, अनंत, अजोड, अद्वितीय, श्रेष्ठ आणि महान आहेत.''

## पापी माणसाच्या धुतांगाचे वाईट फळ

''महाराज, जो पापी, इच्छेचा गुलाम, दिखाऊ, लोभी, खादाड, स्वार्थामागे धावणारा, कीर्तीमागे धावणारा, नावासाठी हपापलेला, अपात्र, अनुचित व्यवहार करणारा, चांगले सोडून वाईटाकडे जाणारा, नालायक आणि आडमुठ्ठा मनुष्य धुतांग व्रत ग्रहण करतो, तो कर्मामुळे मिळणाऱ्या शिक्षेच्या दुप्पट शिक्षा भोगत असतो. आणि त्याच्यातील जे काही चांगल सद्गुण शिल्लक असतात ते सुद्धा तो गमावून बसतो. त्यांची लोकात असलेली प्रतिष्ठा नष्ट होते, लोक त्याचे टर्र उडवितात, निंदा करतात, त्याच्यावर बहिष्कार घालतात आणि हाकलून देतात. एवढेच नव्हे तर दुसऱ्या जन्मातसुद्धा शंभर योजनेपर्यंत पसरलेल्या अविची नरकात तापलेल्या अग्नीच्या लाटात लाखो, कोटी वर्षेपर्यंत वर खाली, आजूबाजूला फेसाप्रमाणे उकडत-पक्व होत राहतो. जेव्हा तेथून त्याची सुटका होते, तेव्हा तो एखाद्या प्रेतासारखा वरून दिसण्यात भिक्षूप्रमाणे दिसत असतो. परंतु शरीर प्रत्यंगाने एकदम काळाकुट्ट आणि एकदम कृ डोके मोठे, फुललेला आणि शरीराने भंगलेला दिसतो. नेहमी तो भुकेने व तहानेने व्याकूळ राहतो, पाहण्यात तो अत्यंत कुरूप व भयावह वाटतो. त्याचे कान फाटलेले असतात. त्याचे डोळे अंधूक व खोल गेलेले असतात. त्याच्या सर्व शरीरात रक्त व पू भरलेला असतो व अंगावर किडे पडलेले असतात. हवेने भडकलेल्या अग्निसमान त्याच्या पोटात अग्नी भडकला असतो. तरीपण त्याचे तोंड सुईच्या टोकाप्रमाणे बारीक असल्यामुळे त्याची तहान व भूक कधीच शमत नाही. तो स्वतःच्या बचावासाठी एखाद्या सुरक्षितस्थळी सुद्धा तो पळून जाऊ शकत नाही. त्याला वाचविणारा कोणीही साह्यकर्ता लाभू शकत नाही. अत्यंत दयनीय स्थितीत रडत व हुंदके देत राहतो. याप्रमाणे तो केवळ जगात आक्रंदन व आक्रोश करीत भटकत राहतो.''

''महाराज, जर कोणी बेरोजगार, निकम्मा, वाईट, नालायक आणि नीच मनुष्य राजाच्या गादीवर बसला तर त्याला केवळ यातनाच भोगाव्या लागतात. त्याचे हात, पाय, नाक, कान कापले जातील. बिलंगथालिक, शंकमुंडिक, राहुमुख, ज्योतिमालिका, हस्तप्रद्योतिका, एकवर्तिका, चौरकवासिक, एणेय्यक, बलिसमसिक, हापणक, खाप्पतच्छिलक

पलिधपलिवत्तिक, पलालपीठ इत्यादी राजदंड त्याला दिले जातील. उकडते तेलसुद्धा त्याच्या अंगावर शिंपडण्यात येईल, कुत्र्याद्वारे त्याचे लचके तोडले जातील, सुळावर चढवल्या जाईल आणि असेच नानाप्रकारचे दुःख त्याला भोगावे लागतील. तर हेच की, तो बेरोजगार, बेकार, वाईट, नालायक आणि नीच असूनसुद्धा एवढ्या मोठ्या आणि उच्च राजपदावर चढून बसला होता. त्याने आपल्या मर्यादेचे उल्लंघन केले होते.''

''महाराज, याप्रमाणेच जो पापेच्छू, स्वैर, दिखाऊ, लोभी, खादाड..... मनुष्य धुतांगव्रत धारण करतो, तो आपल्या पूर्वीच्या दुष्टकर्मामुळे भोगाव्या लागणाऱ्या दंडाच्या दुप्पट दंड भोगत असतो. आणि जे काही थोडे सद्गुण त्याच्यात शिल्लक असतात ते सुद्धा तो गमावून बसतो.... तो कोणत्याही सुरक्षित जागी पळूनही जाऊ शकत नाही. त्याच्या साहाय्यार्थ धाऊनही कोणी येऊ शकत नाही. तो अत्यंत दयनीय स्थितीत हुंदके देत रडत असतो. याप्रमाणे तो संसारात आक्रंदन व आक्रोश करीत भटकत राहतो.''

**योग्य व्यक्तीच्या धुतांग पालनाचे उत्तम फळ**

''महाराज, याविरूद्ध जो योग्य, उत्तम, चांगला, लायक, सदाचारी, अल्पेच्छ, संतुष्ट, एकांतप्रिय, संसारिक भागात लिप्त न होणारा, उत्साही, आत्मसंयमी, सज्जन, सरळहृदयी, मिताहारी, निःस्वार्थी, कीर्तीच्या मृगजळामागे न धावणारा, श्रद्धावान, श्रद्धापूर्वक प्रवर्जित झालेला आणि शासनात टिकून राहण्यासाठी दृढसंकल्प करून धुतांगव्रताचे आचरण करणारा, असा पुरूष पुजनीय ठरतो. देवता आणि मनुष्यांना प्रिय होतो. त्यांच्याकडून तो सन्मानित व प्रतिष्ठित होतो. स्नानसंध्या आटोपलेल्या मनुष्यासाठी मल्लिका पुष्पासमान, भुकेल्यास भोजनासमान, तहानेने व्याकूळ झालेल्यास सुगंधित, निर्मळ व शितल जलासमान, विष चढलेल्यासाठी औषधासमान, वेगाने प्रवास करून इच्छिणाऱ्यासाठी अश्वरथासमान, धनलोभी माणसाला मणिरत्नासमान, अभिषेक करून घेणारास श्वेतछत्रासमान आणि धर्मप्रेमी मनुष्याला अनुत्तर अशा अर्हत फळ प्राप्तीसमान धुतांगाचे आचरण आहे. त्याला चार स्मृती प्रस्थानाची भावना सिद्ध होते, चार सम्यक प्रधान, चार ऋत्रिपद, पाच इंद्रिय, पाच बळ, सात संबोध्यंग आणि आर्य अष्टांगिक मार्ग सर्वच अवगत करून घेता येतात. तसेच शमथ आणि विपस्सना केल्यामुळे त्याचे अध्ययन सफल होते. चार श्रामण्य फळ, चार प्रतिसंविदा, तीन विद्या, सहा अभिज्ञा आणि श्रमणाच्या सर्व गुणांचा तो अधिकारी होतो. जणूकाय विमुक्तीच्या श्वेत छत्राखाली त्याचा अभिषेक होतो.''

''महाराज, उच्च कुळातील क्षत्रियाचा राज्यभिषेक झाल्यानंतर सर्व नगर आणि खेड्यातील प्रजा, शिपाई आणि चपराशी त्याची सेवा करावयास कटिबद्ध असतात, अडतीस राजांची सभा, नट आणि नर्तक, भाट, स्तुतिपाठक, श्रमण, ब्राह्मण आणि

नानाप्रकारचे लोक त्यांच्यासमोर सदैव हजर असतात. पृथ्वीतलावर जी काही बंदरगावे, रत्नखाणी, प्रजेपासून मिळणारा कर आणि नाक्याचे उत्पन्न या सर्वांचा तो मालक बनतो. परदेशी आणि अपराधी लोकांचा तो एकमात्र भाग्यविधात होतो.''

''महाराज, याप्रमाणे जो पुरूष योग्य, उत्तम, लायक, सदाचारी.... धुतांत व्रताचे आचरण करतो, त्याला दुप्पट पूजेचा सन्मान मिळतो, देवता आणि मनुष्यांचा प्रिय बनतो, त्यांचेकडून, सन्मानित होतो व प्रतिष्ठा पावतो..... चार स्मृती प्रस्थान, चार सम्यक प्रधान, सात संबोध्यंग आणि आर्य अष्टांगिक मार्गावर त्याचा अधिकार होतो. समथ आणि विदर्शनाची त्याला प्राप्ती होते आणि मिळविलेली विद्या सफल होते. चार श्रामण्य फळ, चार प्रतिसंविद, तीन विद्या, सहा अभिज्ञा आणि श्रमण्याचे सर्वच सद्गुण त्याच्या स्वाधीन होतात. विमुक्तीच्या निर्मळ श्वेतछत्राखाली जणू काही त्याचा अभिषेकच होत असतो.''

''महाराज धुतांग तेरा आहेत. त्यांच्या आचरणाने शुद्ध होऊन भिक्षू निर्वाणरूपी महासागरातील उठणाऱ्या नाना प्रकारच्या तरंगाचा तो आनंद उपभोगतो. रूप आणि अरूप अशा आठ प्रकारच्या समाधीचा तो आनंद घेतो; त्याला सर्वच ऋद्धिशक्ती वश होतात. ऐकण्याची दिव्य शक्ती, दुसऱ्याच्या मनातील विचार जाणून घेण्याची शक्ती, पूर्व जन्मातील घडलेल्या घटनांची स्मृती, दिव्यचक्षू प्राप्त होत असते आणि त्याचे सर्वच आश्रव क्षीण पावतात.''

''भंते, ते तेरा धुतांग कोणते?''

## तेरा धुतांग

''महाराज, १) पांसुकूलीक, २) तेचीवरिक, ३) पिंडपातिक, ४) सपदान, चारिक, ५) एकासनिक, ६) पात्रचीवरीक, ७) पच्छाभत्तीक, ८) आरञ्ञक, ९) रुक्खमूलीक, १०) अब्भोकासीक, ११) सोसानिक, १२) यथासन्यतिक आणि १३) नेसज्जिक. महाराज, या तेरा धुतांगाचे पालन केले असता श्रामण्याच्या सर्व फळांचा लाभ होतो. सुखशांती, समापत्ती, निर्वाण यावर त्याचा अधिकार होतो.''

''महाराज, ज्याप्रमाणे किरायाने पैसे गोळा करून कोणी एखादा खलाशी बंदराचा मालक बनतो आणि त्यानंतर महासागरातून वंग, तक्कोल, चीन, सौवीर, सुराष्ट्र, अलसंद, कोलपटन किंवा स्वर्णभूमी (ब्रह्मदेश) इत्यादी ज्या कोणत्या देशात हवे असेल तेथे सहज तो जात असतो. त्याचप्रमाणे तेरा धुतांग व्रताचे पालन करणारे जिज्ञासू भिक्षू श्रामण्याचे फळ प्राप्त करतो आणि सुख, शांती, समापत्ती व निर्वाण यावर तो अधिकार मिळवून

घेतो.''

''महाराज, ज्याप्रमाणे एखादा शेतकरी सर्वप्रथम शेतातील केरकचरा, दगड, आणि दुसरे गवत इत्यादी काढून फेकतो व त्यानंतर नांगरून वखरून त्यांत बीज पेरतो, शेताभोवती कुंपण घालतो, शेताचे रक्षण करतो, भरलेले पीक कापून त्याची मळणी करून नंतर ते धान्य घरी आणून कोठारात भरून ठेवतो. तेव्हा जेवढे काही निर्धन, दरिद्री आणि असहाय लोक असतात, ते सर्व याची दया आपणावर कधी होणार, याची प्रतिक्षा करतात. ते सर्व त्याच्या आधीन होतात. त्याचप्रमाणे या तेरा धुतांग व्रताचे आचरण करणारा भिक्षू सर्वश्रमण फळाची प्राप्ती करून घेतो आणि सुख, शांती, समापत्ती व निर्वाणाचे उत्तम पीक स्वतःच्या पदरी पाडून घेत असतो.''

''महाराज, ज्याप्रमाणे राजपरिवारातील क्षत्रिय राज्यभिषेक झाल्यानंतर अधिकारी वर्गाला सुद्धा दंड देण्यास समर्थ होतो, आपल्या इच्छेनुसार दुसऱ्यावर आपला अधिकार चालवितो तेव्हा सर्वपृथ्वी त्याच्या अधीन होते. त्याचप्रमाणे या तेरा धुतांग व्रताचे आचरण करीत असलेल्या भिक्षूंना सर्वच श्रामण्य फळाचा लाभ होत असतो आणि सुख, शांती, समापत्ती आणि निर्वाण या सर्वच विषयावर त्याचा अधिकार चालतो.''

### स्थविर उपसेनाचे धुतांगपालन

''महाराज, वंगत पुत्र स्थवीर उपसेन धुतांग व्रताने पवित्र झाल्यानंतर श्रावस्थी येथील भगवान बुद्धाच्या सेवक भिक्षूंच्या नियमाची पर्वा न करता थेट भववंतापाशी आपल्या भिक्षूसह गेले. आणि त्या सर्वांनी आदरपूर्वक प्रणाम केल्यानंतर ते एके बाजूस बसले. त्यावेळी भगवान तथागत एकांतवास होते. याप्रमाणे नियंत्रित आणि सुशिक्षित अशा उपसेनाच्या भिक्षूंना पाहून तथागत बुद्ध प्रसन्न व आनंदित झाले व अतिशय प्रेमाने ते म्हणाले होते – ''हे उपसेन, तुझे भिक्षू अत्यंत शिस्तबद्ध, सुशिक्षित दिसतात, तू यांना कसे काय शिकविले ?''

''देवाधिदेव भगवान बुद्धाचा हा प्रश्न ऐकून उपसेनाने सत्य गोष्ट सांगितली की, ''हे भगवान, जो कोणी भिक्षू किंवा गृहस्थ माझ्याकडे माझा शिष्य होण्यासाठी येत असतो, तेव्हा त्याला मी प्रथम असे सांगतो की, ''ऐका, मी जंगलात वास्तव्य करतो, पिंडपात करून भोजन करतो, ओबडधोबड चीवर धारण करतो, याप्रमाणे जर तुम्ही माझ्यासारखेच करायला तयार असाल, तर निश्चितच तुम्ही माझे शिष्य होऊ शकता. यानंतर जर का ते स्वइच्छेने असे करण्यास तयार झाले तर मी त्यांस शिष्य करून घेतो, जर माझ्या सांगण्याप्रमाणे वागायला तयार नसतील तरच त्याला मी प्रेमाने निरोप

देत असतो. भंते भगवान ! याप्रमाणे मी त्यांना शिकवीत असतो. महाराज याप्रमाणे या तेरा धुतांग व्रताचे आचरण करणारा भिक्षू श्रामण्याचे सर्वगुण प्राप्त करून घेतो. आणि सुख व शांती समापत्ती व निर्वाण यावर आपला अधिकार जमवून घेत असतो.''

''महाराज, कमळाची जात अत्यंत शुद्ध आणि उच्च दर्जाची असते. ते सुंदर, कोमल, मोहक, सुगंधित, प्रिय, प्रार्थित, प्रशस्त आणि जाड असून चिखल व पाण्याचा स्वतःला कधीच स्पर्श होऊ देत नाही. त्याचा प्रत्येक दल केशरांनी भरलेला असतो, सदैव भृंगे, त्याच्याभोवती घिरट्या घालीत असता आणि ते स्वच्छ व शीतल जलात उत्पन्न होत असते. महाराज, याप्रमाणेच या तेरा धुतांग व्रताचे पालन करून त्यांना सोबत घेण्यासाठी आर्य श्रावक तीस गुणांनी युक्त होत असतो.''

''भंते, कोणते ते तीस गुण?''

## धुतांगव्रत आचरण करणारांचे ३० गुण

''महाराज, त्याचे चित्त कोमल, स्निग्ध आणि मैत्रिभावाने परिपूर्ण असते, त्याचे सर्व क्लेश पूर्णतः नष्ट झालेले असतात, त्याचा अभिमान आणि गर्व निघून जातो, त्याची श्रद्धा दृढ, बलवान, प्रतिष्ठित आणि अचल असते, तो पूर्ण प्रीतियुक्त, शांत, सुख, समापत्तीचा लाभ करून घेतो, तो शीलाचा उत्तम सुगंध पसरविणारा असतो, देवता आणि मनुष्यांना तो प्रिय व आवडता बनतो, क्षिणाश्रव आणि संतलोक त्याची प्रशंसा करतात, देवता आणि मनुष्य त्यास प्रार्थना व वंदना करतात, बुद्धिमान आणि पंडित लोक त्याची स्तुति करतात, तो सांसारिक किंवा स्वर्गीय अशा, सर्व भोगापासून अलिप्त राहतो, तो पापभीरू असतो, निर्वाण प्राप्त करून घेण्यासाठी ज्या मार्ग फळाचा शोध करीत लोक फिरत असतात, त्या मार्गफळाचे भरपूर धन त्याचेजवळ असते, तो सर्वप्रत्यय सहज मिळवून घेतो, गृहत्यागी असतो, ध्यान व अभ्यास त्याला सर्वश्रेष्ठ वाटतो, क्लेशांच्या जाळातून तो मुक्त झालेला असतो, आवागमनाची सर्व बंधने त्याची तुटली असतात, सद्धधर्माचे द्वार त्यांच्यासाठी पूर्णपणे उघडे असते, मुक्तीकडे तो पूर्णतः झुकलेला असतो, याचजन्मी त्याने अचल आणि दृढ असे सुरक्षिततेचे शिखर गाठले असते, मरणाचे भय पूर्णतः त्याच्या मनातून निघून गेले असते, त्याचे सर्वच आश्रण क्षीण झालेले असतात, तो सुख, शांती आणि ध्यानाचा अधिकारी बनलेला असतो, आणि श्रमणाचे सर्वच गुण त्याच्या अंकित झालेले असतात. या तीस गुणांनी तो युक्त होतो.''

''महाराज, धर्मसेनापती स्थवीर सारिपुत्र हे, दहा हजार लोकधातुमध्ये दशबल लोक गुरू बुद्धाला वगळता संसारात सर्वश्रेष्ठ असे अग्रपुरूष होते. अनंत कल्पापासून

त्यांनी भव्य असे पुण्य संचय करून ठेवले होते. उच्च ब्राह्मण कुळात त्यांचा जन्म झाला होता. आपल्या फार मोठ्या धन आणि ऐश्वर्याला लात मारून त्यांनी भगवान बुद्धाचया शासनांत प्रव्रजा ग्रहण केली होती, प्रवर्जित झाल्यानंतर त्यांनी याच तेरा धुतांग व्रताचे पालन करून आत्मसंयम करून घेतला होता, त्या कारणानेच आज ते एवढे मोठे आणि भगवान बुद्धाच्या धर्माचे चक्रप्रवर्तक मानले जातात. त्यांची स्तुती करतांना प्रत्यक्ष देवाधिदेव भगवान बुद्धांनीच अंगुत्तर निकायात सांगितले आहे की, ''हे भिक्षूंनो, सारिपुत्राला वगळता मी स्वतः चालू केलेले धर्मचक्र पुढे चालू ठेवील, असा दुसरा कोणीही मला दिसत नाही. हे भिक्षूंनो, प्रवर्तित केलेले धर्मचक्र योग्यपणे केवळ सारिपुत्रच पुढे नेऊ शकतो.''

''ठीक आहे, भंते नागसेन, जे नऊ अंगांनी युक्त असलेले बुद्धवचन आहे, ज्या लोकोत्तर क्रिया आहे, या संसारात करण्यासारख्या ज्या उत्तमोत्तम वस्तू आहेत, त्या समस्त धुतांग व्रताचे आचरण केल्यानेच प्राप्त होऊ शकतात. हे मला आता समजले आहे.''

**मेंडक प्रश्न समाप्त**

# खंड ६ (प्रकरण पहिले)

# उपमा कथा प्रश्न

''भंते नागसेन, कोणते गुण अंगिकार केल्यामुळे भिक्षूला अर्हतपदाचा साक्षात्कार घडून येतो?''

''महाराज, अर्हतपद प्राप्त करून घेण्यासाठी भिक्षूमध्ये खालील गुण असले पाहिजे. ते असे -

''१) गाढवाचा एक गुण, २) कोंबड्याचे पाच गुण, ३) खारीचा एक गुण, ४) चित्त्याच्या मादीचा एक गुण, ५) नरचित्त्याचे दोन गुण, ६) कासवाचे पाच गुण, ७) वेळवाचा एक गुण, ८) धनुष्याचा एक गुण, ९) कावळ्याचे दोन गुण, १०) वानराचे दोन गुण, ११) अधरवेलीचा एक गुण, १२) कमळाचे तीन गुण, १३) बीजाचे दोन गुण, १४) शालवृक्षाचा एक गुण, १५) नावेचे तीन गुण, १६) जहाजाचे दोन गुण, १७) सुकाणुचा एक गुण, १८) कर्णधाराचे तीन गुण, १९) नावाड्याचा एक गुण, २०) समुद्राचे पाच गुण, २१) पृथ्वीचे पाच गुण, २२) पाण्याचे पाच गुण, २३) अग्निचे पाच गुण, २४) हवेचे पाच गुण, २५) पर्वताचे पाच गुण, २६) अंतरराळाचे पाच गुण, २७) चंद्राचे पाच गुण, २८) सूर्याच आठ गुण, २९) इंद्राचे तीन गुण, ३०) चक्रवर्ती राजाचे चार गुण, ३१) वाळवीचा एक गुण, ३२) मांजरीचे दोन गुण, ३३) उंदराचा एक गुण, ३४) विंचवाचा एक गुण, ३५) मुंगसाचा एक गुण, ३६) वृद्ध कोल्ह्याचे दोन गुण, ३७) हरणाचे तीन गुण, ३८) बैलाचे चार गुण, ३९) डुकराचे दोन गुण, ४०) हत्त्याचे पाच गुण, ४१) सिंहाचे सात गुण, ४२) चक्रवाकाचे तीन गुण, ४३) कोकिळाचे दोन गुण, ४४) कबुतराचा एक गुण, ४५) घुबडाचे दोन गुण, ४६) सारस पक्षाचा एक गुण, ४७) भुंग्याचे दोन गुण, ४८) जळवाचा एक गुण, ४९) सापाचे तीन गुण, ५०) अजगराचा एक गुण, ५१) कोळ्याचा एक गुण, ५२) दूध पिणाऱ्या मुलाचा एक गुण, ५३) स्थळ कासवाचा एक गुण, ५४) जंगलाचे पाच गुण, ५५) वृक्षाचे तीन गुण, ५६) वर्षाव करणाऱ्या ढगांचे पाच गुण, ५७) मण्याचे तीन गुण, ५८) शिकाऱ्याचे चार गुण, ५९) मासे पकडणाऱ्या कोळ्याचे दोन गुण, ६०) सुताराचे दोन गुण, ६१) पाण्याच्या घड्याचा एक गुण, ६२) लोखंडाचे दोन गुण, ६३) छत्रीचे तीन गुण, ६४) धानाच्या शेताचे तीन गुण, ६५) औषधाचे दोन गुण, ६६) भोजनाचे

*यांना मातृका म्हणतात*

तीन गुण, ६७) धनुर्धराचे चार गुण, ६८) राजाचे चार गुण, ६९) द्वारपालाचे दोन गुण, ७०) चक्कीचा एक गुण, ७१) दिव्याचे दोन गुण, ७२) मोराचे दोन गुण, ७३) घोड्याचे दोन गुण, ७४) स्वैर माणसाचे दोन गुण, ७५) खांबाचे दोन गुण, ७६) तराजूचा एक गुण, ७७) तलवारीचे दोन गुण, ७८) माशाचे दोन गुण, ७९) ऋणकोचा एक गुण, ८०) रोग्याचे दोन गुण, ८१) प्रेताचे दोन गुण, ८२) नदीचे दोन गुण, ८३) म्हशीचा एक गुण, ८४) रस्त्याचे दोन गुण, ८५) कर्ज मागणाराचा एक गुण, ८६) चोराचे तीन गुण, ८७) शिकारी पक्षाचा एक गुण, ८८) कुत्र्याचे एक गुण, ८९) वैद्याचे तीन गुण, ९०) गर्भवती स्त्रीचे दोन गुण, ९१) सांबराचा एक गुण, ९२) करकोचाचे दोन गुण, ९३) कबुतराच्या मादीचे तीन गुण, ९४) एकाक्षाचे दोन गुण, ९५) गृहस्थाचे तीन गुण, ९६) कोल्हीचा एक गुण, ९७) चमचाचा एक गुण, ९८) महाजनाचे तीन गुण, ९९) परिक्षकाचा एक गुण, १००) कोचवानाचे दोन गुण, १०१) गावप्रमुखाचे दोन गुण, १०२) शिंप्याचा एक गुण, १०३) नाविकाचा एक गुण, १०४) भोवऱ्याचे दोन गुण.''

''महाराज, भिक्षुला अर्हतपदाचा साक्षात्कार करून घेण्यासाठी एवढे गुण त्याच्या अंगी असणे आवश्यक आहे.''

**(मातृका समाप्त)**

# उपमा-कथा

## १. गाढवाचा एक गुण

''भंते नागसेन, भिक्षूच्या अंगी रेहकणाऱ्या गाढवाचा एक गुण आवश्यक आहे, असे आपण म्हणता, तर तो एक गुण कोणता?''

१- ''महाराज, काडीकचऱ्यात, चौकात, चौरस्त्यावर, गावाबाहेरील मैदानात, भुशाच्या ढिगाऱ्यावर कोणतीही जागा असो, गाढव तेथे लोळत असते. पण ते तेथे निश्चितपणे झोपत नाही. त्याचप्रमाणे साधनारत भिक्षू चटई असो की, पानाची चटई असो; लाकडी तक्तपोस असो की, चार असो, निश्चितपणे झोप घेत पडून राहू नये. महाराज, हाच एक रेहकणाऱ्या गाढवाचा गुण भिक्षूमध्ये असावयास पाहिजे.''

''महाराज, देवाधिदेव भगवान बुद्धांनी सांगितलेली आहे की, 'हे भिक्षूंनो, माझे श्रावक उशाखाली लाकूड घेऊन काम भागवतात. ते जागरूकतापूर्वक संयमशील होऊन सदैव उत्साही असतात.''

''महाराज, धर्मसेनापसती सारिपुत्रांनी सुद्धा म्हटले आहे की, ''आसन मांडून शांतपणे बसलेल्या भिक्षूवर पावसाचा वर्षाव होऊन जरी कमरेपर्यंत पाणी चढेल, तरीही ध्यानरत भिक्षूला त्याची पर्वा नसते?''

## २. कोंबड्याचे पाच गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, कोंबड्याचे पाच गुण असले पाहिजेत, तर ते पाच गुण कोणते ?''

१- ''महाराज, कोंबडा वेळेवर झोपतो. त्याचप्रमाणे भिक्षू साधकाने वेळेवर चैत्याभोवतीची जागा झाडून काढली पाहिजे. वेळेवर पाणी आणि भोजन घेतले पाहिजे. वेळेवरच स्नानादी शारिरीक कार्य आटोपले पाहिजे. वेळेवरच स्नान आटोपून चैत्याची वंदना केली पाहिजे, आणि वेळेवरच वृद्ध भिक्षूंच्या भेटीगाठी घेऊन आपल्या एकांतातील खोलीत जाऊन चिंतनासाठी बसले पाहिजे. कोंबड्याचा हात पहिला गुण भिक्षूंच्या अंगी बसला पाहिजे.''

२- ''महाराज, कोंबडा वेळेवरच जागा होतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी योग्य वेळी उठले पाहिजे. वेळेवरच चैत्याच्या सभोवतालची जागा झाडून काढली पाहिजे, वेळेवरच पाणी आणि भोजन घेतले पाहिजे, वेळेवरच आपले शारिरीक कृत्य आटोपले पाहिजे, वेळेवरच स्नान आटोपून चैत्याची वंदना केली पाहिजे आणि वेळेवरच आपल्या एकांतातील खोलीत जाऊन चिंतनासाठी बसले पाहिजे. कोंबड्याचा हा दुसरा गुण भिक्षूंच्या अंगी असला पाहिजे.''

३- ''महाराज, कोंबडा आपल्या पायांनी जमीन उकरून दाणे टिपतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी सतर्कतापूर्वक दक्ष राहून काही खाल्ले पाहिजे. असे की, ''मी हे भोजन मौजेसाठी घेत नाही, चैनीसाठीही नाही, शारिरीक सौंदर्यासाठीही नाही तर केवळ आपल्या शरीराची स्थिती कायम राखण्यासाठी, जिवंत राहण्यासाठी, पोटातील आग विझवण्यासाठी आणि असे करून मी आपल्या पूर्वीच्या वेदना दूर करीत आहे आणि नवीन देवता उत्पन्न होण्यासाठी मुळीच संधी देत नाही. याप्रमाणे माझे जीवन मी पवित्र व दोषरहित करीत आहे.[२]'' महाराज, कोंबड्याचा हाच तिसरा गुण भिक्षूंच्या अंगी असणे आवश्यक आहे. देवाधिदेव भगवान बुद्धांनी म्हटले सुद्धा आहे की, ''निर्जन जंगलात प्रवास करीत असता उपवासामुळे आपल्या मुलाचे मास खाण्याची पाळी येते

१. *थेरगाथा ९८५.*

२. *प्रत्यवेक्षणगाथा*

तेव्हा हात थरथर कापू लागतात किंवा गाडीच्या धुऱ्यास बांधलेल्या चामड्याच्या दोऱ्या भुकेपायी खाण्याची वेळ आली असता शंभर वेळा विचार करावा लागतो. त्याचप्रमाणे पोटाची आग विझवण्यासाठी जीवनाच्या रक्षणासाठी आहार घ्यावा लागतो.''

४- ''महाराज, कोंबडा डोळे असून सुद्धा रात्रीच्यावेळी आंधळा बनतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी जंगलात राहत असता, गावात गेले असता, भिक्षाटन करीत असता, मनाला आकर्षित करून घेणारे रूप, शब्द, गंध, रस आणि स्पर्शाच्याप्रति डोळे असून आंधळे व वाचा असून मुके होऊन राहावयास पाहिजे महाराज, महाकात्यायन स्थवीर म्हणाले होते की, 'सांसारिक विषय समोर आले असता डोळे असून आंधळे, कान असून बहिरे, वाचा असून मुके आणि शक्तिशाली असून दुर्बळ व्हावयास पाहिजे. जणूकाही तो कोणी झोपला आहे किंवा मृत्यूपावला आहे.''

५- ''महाराज, दगड, छडी, काठी किंवा मोगरीने हाकलून लावले तरी कोंबडा अवेळी आपल्या खुराड्यात जात नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी चीवर शिवतांना, विहाराची डागडूजी करीत असता, आपले दुसरे व्रत पूर्ण करीत असता, उपदेश देत असता किंवा उपदेश ऐकत असता कोणत्याही वेळी मानसिक तत्परता सोडून देऊ नये. महाराज, योग्याचे स्वतःचे घर म्हणजे मानसिक तत्परता आहे, हे विसरू नये. कोंबड्याचा हात पांचवा गुण भिक्षूत असणे आवश्यक आहे. महाराज, देवाधिदेव भगवान बुद्धांनी म्हटले सुद्धा आहे की, ''हे भिक्षूंनो, भिक्षूंची उत्तराधिकारांच्या रूपाने मिळालेली जमीन म्हटली म्हणजे चार स्मृतिप्रस्थान होत.'' महाराज धर्मसेनापसती सारिपुत्रांनीसुद्धा म्हटले आहे की, ''हत्ती झोपेत असला तरी तो कधी आपली सोंड आपल्या कोणत्याही अंगाखाली सापडू देत नाही. आपल्यासाठी अनुकूल, प्रतिकूल खाद्य काय. या गोष्टीची त्याला चटकन जाणीव होते, त्याचप्रमाणे भगवान बुद्धाचा महान असा उपदेश कधी त्याला इजा होणार नाही यासाठी बुद्धपुत्रांनी (भिक्षूंनी) नेहमी सावध राहिले पाहिजे.''

### ३. खारीचा एक गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, खारीचा एक गुण भिक्षूच्या अंगी असला पाहिजे तर तो एक गुण कोणता ?''

''महाराज, एखादा शत्रू समोर येताच खार आपले शेपूट जमिनीवर आपटून फुगवत असते आणि अशारीतीने शत्रूला पळवून लावत असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी क्लेशरूपी शत्रूजवळ येताच स्मृती प्रस्थानाची काठी आपटून त्यांना पळवून लावले पाहिजे. महाराज, हाच खारीचा एक गुण असणे आवश्यक आहे. महाराज, स्थवीर चुल्लपंथकांनीसुद्धा म्हटले आहे की, ''जेव्हा श्रमणांच्या गुणांना नष्ट करून टाकणारे

क्लेश शत्रू चढून आलेत तर अशावेळी स्मृती प्रस्थानांच्या काठीने त्यांना झोडपून पळवून लावले पाहिजेत.''

## ४. चित्त्याच्या मादीचा एक गुण

''भंते नागसेन, तुम्ही चित्त्याच्या मादीचा एक गुण असला पाहिजे असे म्हणालेत, तर तो एक गुण कोणता ?''

१- ''महाराज, चित्त्याच्या मादीने एकदा गर्भधारणा केली की, जन्मभर ती कधी पुन्हा नराशी सोबत करीत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी पुनः कधीही जन्म घेण्यापासून, गर्भात येण्यापासून, मृत्यपासून नष्ट होण्यापासून म्हातारे होण्यापासून आणि संसारातील वाईटात वाईट दुर्गतीचे भय पाहून आवागमनापासून कायमचे मुक्त होण्याचा संकल्प केला पहिजे. महाराज, सुत्तनिपात ग्रंथातील धनीय गोपसुत्तात देवाधिदेव भगवाना बुद्धांनी म्हटले आहे की, ''हे मेघा, इच्छा असेल तितका वर्षाव कर, परंतु सांडासमान दोर तोडून आणि हत्यासमान साखळदंड तोडून, दुर्गंधाची झाडी तुडवून एकदा बाहेर पडलो, तेव्हा पुन्हा ती कधीही अशा गर्भात पडणार नाही.''[१]

## ५. नरचित्त्याचे दोन गुण

''भंते नागसेन, नरचित्त्याचे दोन गुण कोणते असले पाहिजेत, असे तुम्ही सांगितले आहे, तर ते दोन गुण कोणते ?''

१- ''महाराज, प्राण्याची शिकार करण्यासाठी चित्ता एखादा गवत किंवा झुडपी जंगलात किंवा दाट झाडीत लपून बसतो आणि प्राणी जवळ येताच त्यावर झडप घालून पकडतो. त्याचप्रमाणे योगसाधक भिक्षूंनी जंगलात, वृक्षाखाली, पहाडात, दरीत, गुहेत, स्मशानांत, निर्जन वनात, मोकळ्या जागेवर, तनस किंवा गवताच्या नरम व शांत जागी, कोलाहल नसलेल्या जागेत, जेथे अधिक वारे चालत नाही, अशास्थळी, रस्ता सोडून, जेथे समाधी लागू शकते अशा एकांत ठिकाणी आसन घालून बसले पाहिजे. महाराज, योगसाधनेत रमून जाणारा योगी एकांतवास पत्करूनच शिघ्रताशिघ्र सहा अभिज्ञा प्राप्त करून घेतो. महाराज, नरचित्त्याच्या हाच पहिला गुण असणे आवश्यक आहे. महाराज, धर्मसंग्राहक स्थवीरांनी म्हटले आहे की, ''ज्याप्रमाणे चित्ता लपून बसतो आणि जवळ आलेल्या प्राण्यावर तेथूनच हल्ला चढवून त्यास पकडतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणारा ज्ञानी बुद्धपुत्र (भिक्षू) जंगलात राहून उत्तम फळांची प्राप्ती करून घेतो.''

२- ''महाराज, याशिवाय शिकार जर डाव्या बाजूला पडली असेल, तर चित्ता

---

१. *सुत्तनिपात, १-२-१२*

ती कधीच खात नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी वेळू, पाने, फूले, फळ दिल्यामुळे, स्नानाची व्यवस्था केल्यामुळे, माती, चुना, दातवन, तोंड धुण्याकरिता पाणी दिल्यामुळे, खुशामत केल्यामुळे, खरेखोटे सांगून, नोकरासारखे वागून, दूतकामे करून, औषध दिल्यामुळे, फायदासाठी निंदाचहाड्या सांगुन अदलबदल करून, काही घेणे देणे करून, जंतरमंतर करून, ज्योतिष्य फळ सांगून, अंगावरील लक्षणांचे फळ सांगून आणि अशाचप्रकारे भगवान बुद्धांनी मनाई केलेल्या मिथ्याप्रयत्नाने जीवन यापन करण्यासाठी भोजन घेऊ नये. जसे की, चित्ता डावीकडे पडलेली शिकार कधी खात नाही. तसेच साधक भिक्षूंनीही डावीकडील शिकार समजली पाहिजे. महाराज, जर, चित्त्याचा हा दुसरा गुण असणे जरूरी आहे. महाराज, धर्मसेनापती सारिपुत्रांनी सुद्धा म्हटले आहे की, 'जर तोंडाने मागून मी गोड खरी खाईन तर त्यामुळे माझी जीविका निंदनीय समजली जाईल. तेव्हा भुकेमुळे माझ्या आतड्या बाहेर पडल्या किंवा प्राण गेला, तरी मी माझी जीविका अशुद्ध होऊ देणार नाही व माझे व्रत तोडणार नाही.''

## ६. कासवाचे पाच गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, कासवाचे पाच गुण असणे आवश्यक आहे, तर ते पाच गुण कोणते ?''

१- ''महाराज, कासव जलचर प्राणी आहे. तो पाण्यातच राहतो. त्याचप्रमाणे योगसाधक भिक्षूंनी सर्वप्राणी आणि मनुष्य कल्याणाची कामना अंतःमनात बाळगून, वैरभावाला आपल्या मनातून बाहेर काढून अनंत आणि व्याप्त अशा मैत्रिभावनेला समस्त जगावर पसरून विहार केला पाहिजे. महाराज, कासवाचा हाच पहिला गुण साधक भिक्षू असला पाहिजे.''

२- ''कासव आपले डोके बाहेर काढून पाण्यात पोहत असतो. जर कोणाची त्याला चाहूल लागली तर लगेच त्याच्या दृष्टीस पडू नये म्हणून तो खोल पाण्यात बुडी मारतो. त्याचप्रमाणे ध्यान भावना करणाऱ्या भिक्षूने क्लेशांची चाहूल लागताच कुणी आपणास पाहू नये म्हणून तात्काळ आपल्या साधनेच्या खोल तलावात बुडी मारली पाहिजे. महाराज, कासवाचा हा दुसरा गुण असला पाहिजे.''

३- ''महाराज, याशिवाय कासव कधीकधी पाण्याबाहेर येऊन आपले शरीर सुकवीत असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूने बसले असता. उभे असता, झोपले असता किंवा फिरत असता आपले ध्यान तोडून आपल्या मनातील क्लेशांना

१. *थेरगाथा - ६७७*

नष्ट करण्यासाठी उत्साहाच्या उन्हात आपले मन सुकवून घ्यावयास पाहिजे. महाराज, कासवाचा हा तिसरा गुण असला पाहिजे.''

४- ''महाराज, याशिवाय कासव जमीन उकरून तेथे एकांत ठिकाणी आपले घर तयार करतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूने लाभ, सत्कार तसेच प्रशंसा यापासून दूर अशा निर्जन व एकांत स्थळी जसे जंगल, पर्वत, दरी, गुहा अशा निःशब्द निर्जन स्थळी आपले वास्तव्य केले पाहिजे. महाराज, कासवाचा हाच चौथा गुण असला पाहिजे. महाराज, वंगतपुत्र स्थवीर उपसेन यांनी म्हटले सुद्धा आहे की, 'भिक्षूंनी समाधी भावनेची साधना करण्याकरिता जंगल पशूपक्षी असणाऱ्या एकांत', निःशब्द निर्जन अशा स्थळी वास करावा.''

५- ''महाराज, आणखी कासव बाहेर फिरत असता जर एखाद्याला पाहून किंवा कोणाची चाहूल लागली तर तो ताबडतोब आपले सर्व अंग चोरून आपल्या कवचात समेटून चुपचाप पडूत राहतो आणि याप्रमाणे आपले रक्षण करतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूने परिस्थिती पाहून सर्व बाजूंनी रूप, शब्द, गंध, रस आणि स्पर्श यांची प्रलोभने आली असता तात्काळ सहाही इंद्रियांच्या द्वारावर संयमाचा पडदा टाकून घेतला पाहिजे आणि आपल्या श्रमणधर्माचे रक्षण करण्यासाठी मनाला ध्यान साधनेत गुंतवनू सावध झाले पाहिजे, हाच कासवाचा पाचवा गुण असला पाहिजे. महाराज, संयुक्तनिकायातील कूर्मोपम सुत्रात देवाधिदेव भगवान बुद्धाने म्हटले आहे की, 'ज्याप्रमाणे कासव आपले जंग आपल्या कवचात लपवून घेत असते, त्याचप्रमाणे भिक्षूंनी आपल्या मनातील कुर्तक दाबून टाकले पाहिजे. दुसऱ्या कोणावरही आपला भार न टाकता, कोणालाही कष्ट न देता संसारातून मुक्त झाले पाहिजे.''

## ७. वेळवाचा एक गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, वेळवाचा एक गुण असला पाहिजे तर तो एक गुण कोणता ?''

''महाराज, जिकडे वारा वाहत असतो तिकडेच वेळू वाकून जातो, दुसऱ्या बाजूला नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करीत असलेल्या भिक्षूने नऊ अंगांनी युक्त असणाऱ्या भगवान बुद्धाच्या उपदेशानुसार आचरण केले पाहिजे, त्याविरूद्ध आचरण करू नये. श्रमणांचा हाच धर्म होय. महाराज, वेळवाचा हाच एक गुण असला पाहिजे. महाराज, स्थवीर राहूल यांनी म्हटले सुद्धा आहे की, 'भगवान बुद्धाच्या नऊ अंगांनी युक्त अशा उपदेशानुसार सदैव दोषरहित असे कार्य करीत असता मी सर्वच उपाय करून सोडले आहेत.''

## ८. धनुष्याचा एक गुण

“भंते नागसेन, धनुष्याचा एक गुण असणे आवश्यक आहे, असे तुम्ही म्हणता तर तो एक गुण कोणता?”

१– “महाराज, उत्तम प्रकारे मोजून मापून सोलून काढलेले धनुष्य ताणल्यानंतर ते दोन्ही टोकाकडून सारखेच वाकत असते. काठीसमान ते एकदम ताठ राहत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करीत असलेल्या भिक्षूंने स्थवीर, नवीन भिक्षू, मध्यम वयाचे भिक्षू आणि समान वयाच्या भिक्षूबरोबर नम्रपणे वागले पाहिजे. उद्धटपणाने वागू नये. महाराज, धनुष्याचा हाच एक गुण असला पाहिजे. महाराज, विधुर पुष्णकजातकात देवाधिदेव भगवान बुद्धाने म्हटले आहे की, धैर्यवान माणसाने धनुष्यासमान नम्र, वेळवासमान कोमलहृदयी आणि कोणाशीही कठोर व्यवहार न करता वागले पाहिजे तो माणूस श्रेष्ठ समजला जातो.”

## ९. कावळ्याचे दोन गुण

“भंते नागसेन, तुम्ही कावळ्याचे दोन गुण असले पाहिजे असे म्हटले होते. ते दोन गुण कोणते ?”

१– “महाराज, कावळा नेहमी एकाग्रचित्त आणि सावध राहतो. त्याचप्रमाणे योगसाधनेत मग्न राहणाऱ्या भिक्षून आपल्या इंद्रियांना वश करून अत्यंत संयमित, शंका बाळगून, एकाग्रचित्त आणि सावध राहिले पाहिजे. कधी गैरसावध राहू नये. महाराज, कावळ्याचा हाच पहिला गुण असला पाहिजे.”

२– “महाराज, याशिवाय कावळ्याला कोणी खाण्याचे पदार्थ मिळाले असता तो आपल्या सर्व जातभाईंना बोलावून मगच खातो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी धर्मविनयपूर्वक मिळालेले भोजन ते केवळ भिक्षापात्रालाच चिकटलेले का असेना, पण आपल्या सहयोगी, सदाचारी गुरूबंधूनशी कोणत्याही प्रकारे भेदभाव न करता वाटून खाल्ले पाहिजे. महाराज, कावळ्याचा हाच दुसरा गुण असला पाहिजे. महाराज, धर्मसेनापती स्थवीर सारिपुत्रांनी म्हटले सुद्धा आहे की, ‘तपस्वी लोकांना अनुकूल असे भोजन जेव्हा लोक मला देत असतात, तेव्हा मी ते आपल्या सहयोगी भिक्षू बांधवात वाटून नंतरच खात असतो.”

## १०. वानराचे दोन गुण

“भंते नागसेन, तुम्ही म्हणाले की, वानराचे दोन गुण असले पाहिजे, तर ते दोन गुण कोणते?”

१- ''महाराज, वानर कोणत्याही प्रकारच्या भयापासून मुक्त असलेल्या घनदाट घनदाट जंगलात शाखा, उपशाखांनी युक्त अशा झाडावरच वास्तव्य करीत असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी लज्जावान, कोमल स्वभावाचा, शीलवान, पुण्यात्मा, पंडित, धर्मज्ञ, प्रिय, गंभीर, आदरणीय, वक्ता, कोणताही विषय स्पष्ट करून सांगण्यात वाक्पटू, चांगला उपदेश देणारा, उत्तम धडे देणारा, सत्यमार्ग दाखवणारा त्याचप्रमाणे धर्मोपदेश करून सुप्त भाव जागवणारा असा उत्तम गुरू पारखून निवडला पाहिजे. महाराज, वानराचा हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, याशिवाय वानर वृक्षावरच राहत असतो. तेथेच चालतो, फिरतो आणि बसतो. झोप आली असता ते तेथेच शांतपणे झोप घेऊन रात्र काढतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी जंगलातच राहिले पाहिजे, तेथेच हिंडले फिरले पाहिजे, तेथेच राहिले पाहिजे, बसले पाहिजे, झोपले वहिजे आणि तेथेच स्मृतीप्रस्थानांचा अभ्यास केला पाहिजे. महाराज, हाच वानराचा दुसरा गुण असला पाहिजे. महाराज, धर्मसेनापती सारिपुत्र यांनी म्हटले सुद्धा होते की, फिरतांना, उभे राहतांना, बसतांना आणि झोपतांनासुद्धा सुंदर रमणीय एकांत अशा जंगलाचीच आपल्या कार्यासाठी निवड करावी. समस्त बुद्धानीही याची स्तुती केली आहे.''

**(प्रकरण पहिले समाप्त)**

## (प्रकरण दुसरे)

# उपमा कथा-प्रश्न (पुढे चालू)

### ११. अधरवेलीचा एक गुण

"भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, अधरवेलीचा एक गुण असला पाहिजे, तर तो गुण कोणता?"

"महाराज, अधरवेल दुसऱ्या कोणत्यातरी गवतावर, झाडावर किंवा वेलीवर आपले अनेक अंकूर पसरून खूप वाढत असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी ध्यान साधना करून अर्हतपद प्राप्तीपर्यंत पोहोचून आपला विकास करून घेतला पाहिजे. महाराज, अधरवेलीचा हाच एक गुण असला पाहिजे. महाराज, धर्मसेनापती सारिपुत्र यांनी म्हटलेही आहे की, "ज्याप्रमाणे अधरवेल मोठ्या गवतावर झाडावर किंवा दुसऱ्या वेलीवर आपले अंकुर पसरून खूप वाढत जाते. त्याचप्रमाणे अर्हतपदाची कामना बाळगणाऱ्या बुद्धपुत्रांनी ध्यान साधना करून अशैक्ष्य (अर्हत) फळापर्यंत जाऊन पोचले पाहिजे."

### १२. कमळाचे तीन गुण

"भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, कमळाचे तीन गुण असले पाहिजे, तर ते तीन गुण कोणते?"

१- "महाराज, कमळ पाण्यातच उत्पन्न होते आणि पाण्यातच वाढते परंतु ते पाण्याला कधीही चिकटून राहत नसते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूने कोणत्याही परिवारजनाशी, गुणांशी, लाभांशी, कीर्तीशी, सत्काराशी, सन्मानाशी किंवा कोणत्याही उपभोगय पदार्थाशी चिकटून राहू नये. महाराज, हाच कमळाचा पहिला गुण असला पाहिजे."

२- "महाराज, याशिवाय कमळ पाण्याच्या वर देठाच्या आधारावर खुल्या वातावरणात उभे राहते. त्याचप्रमाणे योगसाधनेत रत राहणाऱ्या भिक्षूने संसाराचा त्याग करून लोकोत्तर धर्मामध्ये उभे राहिले पाहिजे. महाराज, हाच कमळाचा दुसरा गुण असला पाहिजे."

३- "महाराज, याशिवाय थोडा जरी वारा वाहू लागला की, कमळाचा देठ हलू लागतो. त्याचप्रमाणे योगसाधनेत रत राहणाऱ्या भिक्षूने अल्पक्लेशापासूनही दूर गेले पाहिजे. महाराज, कमळाचा हाच तिसरा गुण असला पाहिजे. महाराज, देवाधिदेव भगवान

बुद्धाने म्हटले सुद्धा आहे की, "जो अल्प दोषात देखील भय पाहून सावध रराहतो, तो उत्तम प्रकारे भिक्षापदाचे ज्ञान शिकू शकतो."[१]

## १३. बीजाचे दोन गुण

"भंते नागसेन, तुम्ही म्हटले आहे की, बीजाचे दोन गुण असले पाहिजे तर ते दोन गु ण कोणते आहेत?"

१- "महाराज, बीज जरी थोडे असले परंतु वेळेवर पाणी पडला असता ते पेरलेले बीज अंकुरल्यानंतर त्याची वाढ होऊन भरपूर पीक देणारे ठरते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूने चांगल्याप्रकारे शीलाचे आचरण केले असता श्रमणाचे समस्त फळ मिळाल्यावाचून राहत नाही. याकरिता त्यांनी श्रद्धापूर्वक शीलाचे पालन केले पाहिजे. महाराज, बीजाचा हाच पहिला गुण असला पाहिजे."

२- "महाराज, याशिवाय चांगल्या रीतीने मशागत केलेल्या शेतात लवरकच बोज वाढीला लागते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूने एकांतामध्ये शुद्ध आणि एकाग्र केलेले चित्त स्मृतिप्रस्थानांच्या शेतात बीजासमान लवकरच वाढला लागते. महाराज, बीजाचा हाच दुसरा गुण असला पाहिजे. महाराज, स्थवीर अरुरूद्धांनी म्हटले सुद्धा आहे की, "ज्याप्रमाणे उत्तम प्रकारे मशागत केलेल्या शेतात बीज पेरले असता उत्तम प्रकारे फळत असते आणि शेतकऱ्याला आनंदित करून सोडते. त्याचप्रमाणे एकांतात शुद्ध केलेले साधकाचे चित्त स्मृतिप्रस्थानांच्या शेतात शीघ्रताशिघ्र वाढून येत असते."२

## १४. शालवृक्षाचा एक गुण

"भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, शालवृक्षाचा एक गुण असला पाहिजे, तर तो एक गुण कोणता?"

१- "महाराज, शालवृक्ष, जसा वर चढतो तसाच तो जमिनीत शंभर हात किमंवा त्याहून अधिकही खोल जातो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूने चारही श्रामण फळ, चार प्रतिसंविद, सहा अभिज्ञा आणि श्रमणांचे सर्वच धर्म शून्यागारातच (एकांतात) पूर्ण केले पाहिजे. महाराज, शालवृक्षाचा हाच एक गुण भिक्षूच्या अंगी असला पाहिजे. महाराज, स्थवीर राहूल यांनी म्हटले सुद्धा आहे की, "जमिनीतून उत्पन्न होणारा शालकल्याणिका नावाचा विशाल वृक्ष जमिनीच्या आतल्या आतच वाढत जाऊन शंभर हात किंवा त्याहून अधिक खोल जातो. हे तथागत, त्याच शालवृक्षाप्रमाणे शून्यागारात राहत असल्यामुळे माझ्यातील गुणांची एवढी मोठी वाढ झाली."

१. *पहा मज्झिमनिकाय १-३३; दिघनिकाय २-४२*

## १५. नावेचे तीन गुण

"भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, नावेचे तीन गुण असले पाहिजे, तर ते तीन गुण कोणते?"

१- "महाराज, अनेक प्रकारच्या लाकडांचे तुकडे जोडून तयार केलेली नाव पुष्कळ लोकांना नदी पार घेऊन जात असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूने आपले आचार, शील, व्रत आणि विनय इत्यादी अनेक धर्म जोडून मजबूत नाव तयार केली पाहिजे आणि भवसागर पार करून गेले पाहिजे. महाराज, हाच नावेचा पहिला गुण असला पाहिजे."

२- "महाराज, याशिवाय नाव आवाज करणाऱ्या समुद्राच्या लाटा आणि मोठमोठ्या भोवऱ्याचा आघात सहन करीत असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूने अनेक प्रकारच्या क्लेश, लाभ, सत्कार, कीर्ती, प्रशंसा, पूजा, वंदना दुसऱ्याची होणारी निंदा किंवा प्रशंसा, सुख, दुःख, सन्मान, अपमान आणि अशाच प्रकारच्या अनेक दोषांच्या लाटांचा मारा सहन केला पाहिजे. महाराज, नावेचा हाच दुसरा गुण असला पाहिजे."

३- "महाराज, याशिवाय नाव अनंत, अपार, गंभीर, खोल, जोरजोराने आवाज करणाऱ्या तसेच तिमी, तिमिगल, घडियाला आणि अशाच प्रकारच्या मोठमोठ्या माशांनी भरलेल्या सागरात अगदी वरच्या वर तरंगत असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूने तीन प्रकाराने स्पष्टीकरण केले असता बारा प्रकार होणाऱ्या चार आर्य सत्यात आपले मन गुंतवून ठेवले पाहिजे. महाराज, नावेचा हा तिसरा गुण असणे आवश्यक आहे. महाराज, संयुक्त निकायातील 'सत्य सुत्रात' देवाधिदेव भगवान बुद्धाने म्हटले आहे की, 'हे भिक्षूंनो, तुम्ळी वितर्क करीत असता असाच वितर्क केला पाहिजे की, हे दुःख आहे, हा दुःखाचा समुदाय आहे, हा दुःखाचा निरोध असून हा दुःख नाशाचा मार्ग आहे.''[१]

## १६. जहाजाच्या नांगराचे दोन गुण

"भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, जहाजाच्या नांगराचे दोन गुण असले पाहिजे, तर ते दोन गुण कोणते?"

१- "महाराज, जहाजाचा नांगर महासागराच्या अत्यंत तेजोमय तरंगाखाली

१. संयुत्तनिकाय ...

रूतून बसतो आणि जहाजांना उभा ठेवतो, इकडे-तिकडे मुळीच जाऊ देत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूने राग, द्वेष व मोहाच्या मोठमोठ्या तरंगाखाली आपल्या चित्ताचा नांगर रूतवून स्वतःला स्थिर ठेवले पाहिजे, इकडे तिकडे विचलीत होऊ देऊ नये. महाराज जहाजाच्या नांगराचा हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, याशिवाय जहाजाचा नांगर तरंगत नाही, पण शेकडो हात खोल पाण्यात खाली जाऊन रूतून बसतो आणि जहाजाला तेथेच एका जागेवर स्थिर ठेवतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूने लाल, सत्कार, यश, प्रतिष्ठा, पूजा, वंदना, आदर हेच नव्हे तर स्वर्गाचे प्रलोभन आले तर हर्ष मानू नये आणि शरीराचे रक्षण करीत चित्त स्थिर ठेवले पाहिजे. महाराज, जहाजाच्या नांगराचा हाच दुसरा, गुण असला पाहिजे. महाराज, धर्मसेनापती स्थवीर सारिपुत्र यांनीही म्हटले आहे की, 'ज्याप्रमाणे महासमुद्रात जहाजाचे नांगर वर तरंगत नाही तर ते खोल पाण्यात जाऊन रूतून असते. त्याचप्रमाणे लाभ व सत्कारांनी अति उल्लासी न होता स्वतःला गंभीर व स्थिर ठेवले पाहिजे.''

## १७. पतवारीचा एक गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, पतवारीचा एक गुण असला पाहिजे, तर तो एक गुण कोणता?''

१- ''महाराज, पतवार रस्सी, चामड्याचे बंधन आणि लड यांना धारण करते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूने सतत जागृत व सावध राहिले पाहिजे. बाहेर जातांना, परत येत असता, पाहत असता, अंथरूण टाकत असता किंवा उचलून ठेवत असता, संघाटी, पात्र आणि चीवर धारण करीत असता, खात असता, पीत असता, चावत असता, काही चव घेत असता, मळमूत्र विसर्जन करीत असता, जात असता, उभे राहत असता, बसले असता, झोपत असता, जागत असता, काही सांगत असता आणि गप्प बसले असता कोणत्याही अवस्थेत कधी बेसावध राहू नये, महाराज, हाच पतवाराचा एक गुण असला पाहिजे. महाराज, देवाधिदेव भगवान बुद्धांनी म्हटले सुद्धा आहे की, 'हे भिक्षूंनो, भिक्षूंनी सदैव जागृत आणि सावधान राहूनच विहार करावा. हाच माझा उपदेश आहे.''[१]

## १८. कर्णधाराचे तीन गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, कर्णधाराचे तीन गुण असले पाहिजे, तर ते तीन गुण कोणते?''

---

१. *दिघनिकाय सूत्र - १६*

१- "महाराज, कर्णधार रात्रंदिवस, अविरत न चुकता मोठ्या तत्परतेने आपले जहाज योग्य दिशेने घेऊन जातो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूने रात्रंदिवस, सदैव अविरत अप्रमादपूर्वक तत्परतेने आपले चित्त योग्यादिशेने वळवून घेतले पाहिजे. महाराज, कर्णधाराचा हाच पहिला गुण असला पाहिजे. महाराज, धम्मपदामध्ये देवाधिदेव भगवान बुद्धांनी म्हटले सुद्धा आहे की, 'हे भिक्षूहो, सतत अप्रमादपूर्वक राहून आपल्या चित्तास वश करा आणि स्वतःला पापपंकजातून मुक्त करा. असा की, एखादा चिखलात फसलेला हत्ती आपली सुटका करून घेत असतो."

२- "महाराज, याशिवाय कर्णधारास कोणत्या ठिकाणी धोका आहे व कोणत्या ठिकाणी नाही, हे माहीत असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूला सुद्धा पाप कोणते, पुण्य कोणते, दोषयुक्त निर्दोष कोणते, वाईट कोणते, चांगले कोणते, अंधःकारमय कोणते व प्रकाशमय कोणते हे माहित असले पाहिजे. महाराज कर्णधाराचा हाच दुसरा गुण असला पाहिजे."

३- "महाराज, याशिवाय कर्णधार आपल्या शास्त्रांच्या पेटीला कोणीही हात लावू नये म्हणून नेहमी कुलूप लावून ठेवतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी कोणत्याही प्रकारचे पाप किंवा वाईट विचारापासून संरक्षण करीत नेहमी आपल्या चित्ताला संयमाचे कुलूप लावून ठेवावे. महाराज, कर्णधाराचा हाच तिसरा गुण असला पाहिजे. महाराज, संयुक्त निकायात देवाधिदेव भगवान बुद्धांनी म्हटले सुद्धा आहे की, 'हे भिक्षूंनो, कामवितर्क, व्यापादवितर्क आणि विहिंसावितर्कासारख्या पापकारक विचारांना आपल्या मनात मुळीच धारा देऊ नका."

## १९. नावाड्याचा एक गुण

"भंते नागसेन, नावाडाचा एक गुण असावयास पाहिजे, असे आपण म्हणाले, तर तो एक गुण कोणता?"

"महाराज, मी शोध घेऊनच नावेवर काम करीत असतो. या नावेमुळे अन्न व अंगावर वस्त्रे मिळतात. तेव्हा काम करण्यात आळशी होऊन चालावयाचे नाही, तर अधिक उत्साहाने काम करावयास पाहिजे, असा नावाडी मनात विचार करतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूने असा नावाडी मनात विचार केला पाहिजे की, 'असे ! माझे शरीर तर निव्वळ चार महाभूतांचे बनले आहे, या गोष्टीचे स्मरण ठेऊनच मला एकाग्रचित्त होऊन राहिले पाहिजे आणि चित्ताची एकाग्रता साधली पाहिजे. मला जन्ममरणादीकापासून सुटका करून घ्यावयाची आहे. तेव्हा प्रमाद करणे बरे नाही.

महाराज, नावाड्याचा हाच एक गुण असला पाहिजे. महाराज, धर्मसेनापती सारीपुत्र यांनी म्हटलेही आहे की, 'आपल्या शरीरावरच चिंतन करावे. हे शरीर किती घाणेरडे आहे याविषयी वेळोवेळी चौकशी करावी. आपल्या शरीराबद्दलचे खरे स्वरूप कळून आले म्हणजे दुःखाचा अंत करून घेणे अवघड जाणार नाही.''

## २०. समुद्राचे पाच गुण

''भंते नागसेन, महासागराचे पाच गुण असले पाहिजे, असे आपण म्हणता, तर ते पाच गुण कोणते?''

१- ''महाराज, महासागर कोणत्याही प्रकारचे प्रेत स्वतःमध्ये राहू देत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपल्या अंगी कोणत्याच प्रकारचे राग द्वेष, माहे, अभिमान आत्मदृष्टी, बढाई, इर्ष्या, मत्सर, फसवेपणा, कुटिलता, रूक्षता, दुराचार आणि क्लेशमळ राहू देऊ नये. महाराज, महासागराचा हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, याशिवाय महासागर आपल्यामध्ये मोती, मणी, वैदुर्य, शंख, शिंपले, मुंगा, स्फटिक इत्यादी अनेक प्रकारची रत्ने दडवून ठेवतो. त्यांना बाहेर पसरवत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपल्यामध्ये मार्ग, फळ, ध्यान, विमोक्ष, समाधी, समापत्ती, विदर्शना, अभिज्ञा इत्यादी विविध गुणरत्ने प्राप्त करून गुप्त ठेवली पाहिजे, ती प्रकट करू नये. महाराज, महासागराचा हाच दुसरा गुण असला पाहिजे.''

३- ''महाराज, याशिवाय महासागर मोठमोठ्या जीवांना आपल्यामध्ये थारा देऊन त्यांच्या संगतीत राहतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी अल्पेच्छ, संतुश्ट, अल्पभज्ञषी, पवित्र, आचरण करणारा, लज्जावान, कोमल स्वभावी, गंभीर, आदरणी, वक्ता, बोलण्यात समर्थ, उत्साही, पापभीर, गुरूंनी शिकवलेले विषय मन लावून शिकणारा, इतरांना उपदेश करणारा, स्पष्ट सांगणारा, खरा मार्ग दाखवणारा, धर्मोपदेश देऊन दुसऱ्याची श्रद्धा जागवणारा आणि उपकारी भिक्षूंच्या संगतीत राहणारा व्हावयास पाहिजे. महाराज, महासागराचा हाच तिसरा गुण असला पाहिजे.''

४- ''महाराज, याशिवाय महासागर गंगा, यमुना, अचिरवती, सरभू, मही आणि अशाच प्रकारच्या हजारो नद्यांनी कितीही पाणी आणून सोडले किंवा आकाशातून कितीही मोठ्या पावसाच्या जलधारा पडल्या तरी पण तो कधी भरत नाही व कधी आपली सीमा ओलांडत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी लाभ, सत्कार, स्तुती,

२. *धम्मपदगाथा - ३२७*

वंदना, प्रतिष्ठा, पूजा इत्यादी किंवा प्राण गेला तरी हेतूपुरस्पर शिक्षापदाचे उल्लंघन करू नये. महाराज, हाच महासागराचा चवथा गुण असला पाहिजे. महाराज, देवाधिदेव भगवान बुद्धाने सांगितले की, 'ज्याप्रमाणे समुद्र स्थिर स्वभावी असून तो कधीच आपली सीमा ओलांडत नाही, त्याचप्रमाणे माझे भिक्षू प्राण गेला तरी मी सांगितलेले शिक्षापद तोडू शकत नाही.''

५- ''महाराज, याशिवाय महासागर गंगा, यमुना, अचिरवती, सरभू, मही आणि जगातील सर्व नद्यांनी मिळून पाणी आणून सोडले किंवा कितीही जोराची आकाशातून पावसाची धार पडली, तरी कधीही पूर्णपणे भरत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी धर्म शिकण्यात, धार्मिक चर्चा करण्यात, इतरांनी शिकवलेला सदाचार ऐकून घेण्यात, त्यांचे मनन करण्यात, त्यांचे परिक्षण करून घेण्यात, अभिधम्म विनय आणि सुत्रातील गंभिर विषयाचा अभ्यास करण्यात, विग्रह, वाक्य विन्यास, संधि, पदाविभक्ती आणि नऊ अंगांनी युक्त असे बुद्धवचन ऐकून घेण्यात कधीही आळस करून घेऊ नये. महाराज, हाच महासागराचा पाचवा गुण असला पाहिजे. महाराज, सुतसोम जातकात देवाधिदेव भगवान बुद्धांनी सांगितले पण आहे की, 'ज्याप्रमाणे अग्नी कितीही गवत किंवा लाकडे आणून टाकले तरी तो ती जाळून टाकतांना कधीच आळस करीत नाही, महासागर कितीही नद्या येऊन मिळाल्या तरी त्यांचे पाणी तो आपल्यामध्ये सामावून घेत असता आळस करीत नाही.' त्याचप्रमाणे हे राजश्रेष्ठा ! जे पंडित लोक आहे, ते कधीच उत्तम ज्ञान ऐकून घेण्यासाठी आळस मानीत नाहीत.''

**(प्रकरण दुसरे समाप्त)**

# (प्रकरण तिसरे)

# उपमा कथा प्रश्न (पुढे चालू)

## २१. पृथ्वीचे पाच गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, पृथ्वीचे पाच गुण असले पाहिजे, तर ते पाच गुण कोणते?''

१- ''महाराज, पृथ्वीवर कोणाचीही चांगली किंवा वाईट वस्तू वस्तू पडली, जसे- कापूर, अगर, तगर, चंदन, कुंकुम किंवा पित्त, कफ, पू, रक्त, घाम, चरबी, थूंकी, नेटा, लसिक, मुत्र, मळ इत्यादी काहीही पडले, तरी ती समान अवस्था धारण करूनच राहते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी इष्ट, अनिष्ट, लाभ, हानी, यश, अपयश, निंदा, प्रशंसा, सुख, दुःख इत्यादी प्रत्येक अवस्थेत समान भावाने एकाग्रचित्त राहिले पाहिजे. महाराज, पृथ्वीचा हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, पृथ्वी कधी कोणता साजश्रृंगार व पोशाख न करता आपल्या नैसर्गिक रूपात संतुष्ट राहते. त्याचप्रामणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी कोणत्याही प्रकारचा साजश्रृंगार न करता अखंड पृष्ठ व स्वच्छ अशा शील स्वभावतच संतुष्ट राहिले पाहिजे. महाराज, पृथ्वीचा हाच दुसरा गुण असला पाहिजे.''

३- ''याशिवाय महाराज, पृथ्वी कोणत्याच ठिकाणी खंडित न होता सलगपणे अनंत होऊन पसरलेली असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्याण भिक्षूने एकदम अखंड, पुष्ट आणि स्वच्छ शीलसंपन्न होऊन राहिले पाहिजे. शीलामध्ये कोठेही खंड असता कामा नये. महाराज, पृथ्वीचा हाच तिसरा गुण असला पाहिजे.''

४- ''महाराज, याशिवाय पृथ्वी, गावे, तालुक, शहरे, जिल्हे, गवताळ प्रदेश, पर्वत, नद्या, तलाव, बावळ्या आणि मृग, पक्षी, मनुष्य, नरनारी इत्यादी सर्वांना धारण करीत असता कधीही थकत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी उपदेश करतांना, शिकवत असतांना, धर्मोपदेश करीत असतांना, सन्मार्ग दाखवित असतांना याशिवाय आणखी इतर लोकात श्रद्धाभाव जागृत करीत असतांना कधीही थकवा मानून घेऊ नये. महाराज, पृथ्वीचा हाच चौथा गुण असला पाहिजे.''

५- ''महाराज, आणखी पृथ्वी कधी कोणाची जी हुजूरी करीत नाही किंवा कधी कोणाचा द्वेषही करीत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी कधी कोणाची

जी हुजूरी करू नये. किंवा कोणाच्याही प्रती द्वेष बाळगू नये. सर्वांच्याच प्रती समभावना ठेवली पाहिजे. महाराज, पृथ्वीला हाच पाचवा गुण असला पाहिजे. महाराज, आपल्या भिक्षूंचे मोठेपण सांगताना लहान सुभद्राने म्हटले होते की, 'असा आमच्या भिक्षूंच्या अंगी गुण आहे की, कोणी क्रोधाने वासल्याने त्यांचा एक हात तोडला किंवा कोणी एखादा प्रसन्न होऊन चंदनाचा लेप करू लागला तरी पण ते यामुळे कधी त्यांचा द्वेष करणार नाहीत किंवा त्यावर प्रेमही करणार नाही. त्या भिक्षूंचे चित्त जणू काही पृथ्वीसमान स्थिर असते.''

## २२. पाण्याचे पाच गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, पाण्याचे पाच गुण असले पाहिजे, तर ते पाच गुण कोणते?''

१- ''महाराज, कोणत्याही भांड्यात ठेवलेले पाणी निश्चल, शांत आणि शुद्ध असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूला कुहन, लपन, नैमित्तिक आणि निप्पेसिकतारहित होऊन स्थिर आणि शांतचित्त होऊन शुद्ध आचरण करावयास पाहिजे. महाराज, पाण्यात हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, आणखी पाणी स्वभावतःच शीतल असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी सर्व प्राणीमात्रांच्याप्रती क्षमाशील, मैत्रीयुक्त, दयाळू, इतरांचे हित साधणारा आणि परपकृपाळू व्हावयास पाहिजे. महाराज, पाण्याचा हाच दुसरा गुण असला पाहिजे.''

३- ''महाराज, आणखी पाणी मळ धूऊन काढते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी गावात, जंगलात असो की, आणखी कोठेही असो, पण आपल्या आचार्य, उपाध्याय किंवा गुरूजनांशी कधी कोणत्याही प्रकारचा कलह करू नये. भांडण करू नये. त्यांच्याप्रती कोणत्याच प्रकारचा अपराध करू नये. महाराज, पाण्याचा हाच तिसरा गुण असला पाहिजे.''

४- ''महाराज, आणखी सर्वांनाच पाण्याची आवश्यकता असते. त्याचप्रमाणे योगसाधना करीत असलेल्या भिक्षूंनी अल्पेच्छी, संतुष्ट, एकांतप्रिय आणि ध्यानभावनेचा अभ्यासी होऊन सदैव सर्वांनाच प्रिय होऊन राहिले पाहिजे. महाराज, पाण्याचा हाच चौथा गुण असला पाहिजे.''

५- ''महाराज, आणखी पाणी कोणाचेही अहित करीत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी कधी कुणाशी भांडण, कलह, तंटा आणि वादविवाद करू

नये. आपल्यापेक्षा कुणालाही हीन किंवा तुच्छ लेखू नये. कोणाच्याही प्रती असंतोष किंवा द्वेष वाटून घेऊ नये. शरीर, वाचा आणि मनाने कधी कोणते पाप करू नये. महाराज, पाण्याचा हाच पाचवा गुण असला पाहिजे. महाराज, कण्ह जातकात देवाधिदेव भगवान बुद्धांनी म्हटले आहे की, 'हे सर्व प्राण्याच्या ईश्वरा ! शुक्रा !! जर मला काही वर देऊ इच्छित असशील तर हे शुक्रा ! मन आणि कर्माद्वारे कुणीही कुणाला दुख देऊ नये. हाच सर्व वरांत श्रेष्ठ असा वर मी तुला मागत आहे.''

## २३. अग्नीचे पाच गुण

''भंते नागसेन, तुम्ही अग्नीचे पाच गुण असले पाहिजे असे म्हणता, तर ते पाच गुण कोणते?''

१- ''महाराज, अग्नी हा गवत, लाकडे, फांद्या आणि पाने ही सर्व जाळून टाकतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आतील आणि बाहेरील विषयावर होणारे इष्ट आणि अनिष्ट अशा सर्व क्लेशांना ज्ञानाच अग्नीत जळून टाकले पाहिजे. महाराज, अग्नीचा हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, अग्नी हा भयंकर निर्दयी आणि कठोर असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी क्लेश दूर करतांना कोणत्याही प्रकारची दया किंवा करूणा दाखवू नये. महाराज, अग्नीचा हाच दुसरा गुण असला पाहिजे.''

३- ''महाराज, अग्नी थंडीचा विनाश करतो, त्याचप्रमाणे योगसाधक भिक्षूंनी आपल्या उत्साहाच्या अग्नीमुळे समस्त क्लेशांची थंडी दूर केली पाहिजे.''

४- ''महाराज, अग्नी कुणावर प्रेमही करीत नाही की, कोणाचा द्वेषही करीत नाही. तर सर्वांना समान रूपाने उष्णता प्रदान करते. त्याचप्रमाणे योगसाधक भिक्षूंनी कुणावरही प्रेम किंवा कोणाचा द्वेषही करू नये. तर सर्वच लोकांमध्ये अग्नीसमान तेजस्वी होऊन राहिले पाहिजे. अग्नीचा हाच चौथा गुण असला पाहिजे.''

५- ''महाराज, पुनः अग्नी अंधःकाराचा नाश करून सर्वत्र प्रकाश पसरवतो. त्याचप्रमाणे योगसाधक भिक्षूंनी जगातील अज्ञान अंधःकार दूर करून ज्ञानाचादिव्य प्रकाश पसरवला पाहिजे. महाराज, अग्नीचा हाच पाचवा गुण असला पाहिजे. महाराज, त्यांचाच पुत्र राहुल यांना शिकवत असता देवाधिदेव भगवान बुद्धांनी सांगितले होते की, 'हे राहुल, अग्नीप्रमाणे ध्यानभावनेचा अभ्यास कर, अग्नीच्या तेजासमान ध्यानसाधना करणाराच्या मनात कधी अंकुशलांची उत्पत्ती होत नाही आणि पुर्वीच उत्पन्न झालेले अकुशल चित्तात

थारा न मिळाल्यामुळे तत्काळ नष्ट होतात.''

## २४. हवेचे पाच गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणाले की, हवेचे पाच गुण असले पाहिजे, तर ते पाच गुण कोणते?''

१- ''महाराज, हवा पुष्पांनी बहरलेल्या जंगल व झाडाझुडूपातून वाहत असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी विमुक्तीच्या पुष्पांनी बहरलेल्या ध्यानभावनेच्या घनदाट अरण्यात रमून जावयास पाहिजे. महाराज, हाच हवेचा पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, हवा पृथ्वीवर वाढणाऱ्या सर्व झाडांना हलवत असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी घनदाट अरण्यात राहून संसाराच्या अनित्यतेबद्दल नित्य मनन करीत असता क्लेशांना हलवून खिळखिळे करून सोडावयास पाहिजे. महाराज, हवेचा हाच दुसरा गुण असला पाहिजे.''

३- ''महाराज, हवा आकाशात वाहत असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी लोकोत्तर धर्मामध्येच कार्यरत राहिले पाहिजे. महाराज, हाच हेवचा तिसरा गुण असला पाहिजे.''

४- ''महाराज, आणखी हवा आपल्यासोबत सुगंध वाहून नेत असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपल्या शीलांचा सुगंध आपल्यासोबत वाहून नेला पाहिजे. महाराज, हाच चौथा गुण असला पाहिजे.''

५- ''महाराज, हवेचे कुठेही राहण्याचे किंवा विश्रांतीचे निश्चित ठिकाण नसते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी घरदार त्यागून बंधूबांधवांच्या बंधनातून मुक्त व स्वच्छंदी असले पाहिजे. महाराज, हवेचा हाच पाचवा गुण असला पाहिजे. महाराज, सुत्तीनिपात ग्रंथात देवाधिदेव भगवान बुद्धांनी म्हटले आहे की, 'सगे सोबती वाढविले असता चिंता उत्पन्न होते, गृहस्थी जीवनात वासना उत्पन्न होतात, म्हणून सगेसोयरेही वाढवू नये आणि घरांच्याही मोहात पडू नये.' साधुशील लोकांची हिच जीवनपध्दती आहे.''

## २५. पर्वताचे पाच गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, पर्वताचे पाच गुण असले पाहिजे, तर ते पाच गुण कोणते?''

१. सुत्तनिपातः १-१२-१

१- ''महाराज, पर्वत अचल, दृढ आणि स्थिर असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी सन्मान, अपमान, सत्कार, तिरस्कार, प्रतिष्ठा, अप्रतिष्ठा, यश, अपयश, निंदा, प्रशंसा, सुख, दुःख, इष्ट, अनिष्ठ आणि सर्वच रूप, शब्द, गंध, रस, स्पर्श इत्यादीर धर्माच्या मोहक स्वरूपापासून स्वतःचे रक्षण केले पाहिजे. द्वेषास कारण ठरणाऱ्या धर्माविषयी द्वेष करू नये. मोह उत्पन्न करणाऱ्या धर्माविषयी द्वेष करून नये. मोह उत्पन्न करणाऱ्या धर्मासंबंधी कधीच मोह उत्पन्न होणार नाही, याची काळजी घेतली पाहिजे. त्यापासून कधी विचलीत होऊ नये. अगदी पर्वतासमान अचल आणि स्थिर झाले पाहिजे. महाराज, पर्वताचा हाच पहिला गुण असायला पाहिजे. महाराज, देवाधिदेव भगवान बुद्धांनी म्हटले सुद्धा आहे की, 'ज्याप्रमाणे भव्य आणि महाकाय पर्वत असा पर्वत कधीही वाऱ्याने हालत नाही किंवा डोलत नाही त्याचप्रमाणे भिक्षू निंदा किंवा प्रशंसेने मुळीच अस्थिर व चंचल होत नाहीत.''[१]

२- ''महाराज, आणखी कठोर पर्वत कधी कोणाशी घेणे देणे नाही, तर तो एकटाच आपल्या धूंदीत पडून राहतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी कोणाशिही भेटीगाठी घेण्यासंबंधी कठोर होऊन राहिले पाहिजे. संसारापासून दूर एकांतात मग्न राहिले पाहिजे. महाराज, पर्वताचा हाच दुसरा गुण असला पाहिजे. महाराज, देवाधिदेव भगवान बुद्धांनी म्हटले आहे की, 'गृहस्थ आणि प्रवर्जित यांच्याशी अधिक संपर्क न ठेवता एकटेच आपल्या ध्यानसाधनेची वाटचाल करणाऱ्या अल्पेच्छू अशा प्रवर्जितास मी श्रेष्ठ ब्राह्मण आहे असे मानतो.''[२]

३- ''महाराज, आणखी पर्वतावर बी रूजत नसते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपल्या मनात कधीच क्लेश रूजू देऊ नये. महाराज, पर्वताचा हाच तिसरा गुण असला पाहिजे. महाराज, स्थवीरसुभूती यांनीही म्हटले आहे की, 'माझ्या मनात जेव्हा मनोविकार उत्पन्न होतात, तेव्ह मी ते पाहून घेतो आणि स्वतः एकटाचे त्याचे निराकरण करीत असतो. जर तुम्ही वासना उत्पन्न करणाऱ्या धर्माकडे एकटाच त्याचे निराकरण करीत असतो. जर तुम्ही वासना उत्पन्न करणाऱ्या धर्माकडे पाहून वासनायुक्त होत असाल, द्वेष उत्पन्न करणाऱ्या कर्माकडे पाहून द्वेषी होत असाल आणि मोहक वस्तूंना पाहून मुर्ख बनत असाल, तर या वनातून खुशाल निघून जा. निर्मळ मनाच्या विशुध्द तपस्वांचीच ही भूमी आहे. आपल्या दुर्गुंणानेही भूमि अपवित्र करून घेऊ नका.' या वनातून तत्काळ निघून जा.''

१. धम्मपदगाथा ८१.

२. सुत्तनिपात ३-९-३५

४- ''महाराज, याशिवाय पर्वताचे शिखर फार उंच असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी सुद्धा आपल्या ज्ञानाची उंची गाठावयास पाहिजे. महाराज, पर्वताचा हाच चौथा गुण असावयास पाहिजे. महाराज, देवाधिदेव भगवान बुद्धांनी सुद्धा म्हटले आहे की, 'ज्यावेळी पंडित पुरूष अप्रमादाने प्रमाद दूर करतो, त्यावेळी तो प्रज्ञेच्या उंच सोपानावर चढून शोकमुक्त होऊन शोकाकूल अज्ञ लोकांना बघत असतो.' जसे की, एखाद्या पर्वत शिखरावर चढलेला माणूस खालच्या लोकांना बघत असतो?''

५- ''महाराज, आणखी पर्वताला कधी उचलले जाऊ शकत नाही किंवा जमिनीत गाडल्याही जाऊ शकत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी इतरांच्या स्तुतीमुळे चढून जाऊ नये किंवा निंदेमुळे खचूनही जाऊ नये महाराज, पर्वताचा हाच पाचवा गुण असला पाहिजे. महाराज, आपल्या भिक्षूंनी वाखाणणी करीत असता लहान सुध्दा म्हणाली होती की, 'संसारातील लोक लाभ झाला असता फुगून जातात आणि अलाभामुळे खट्टू होतात.' परंतु माझे श्रमण लाभ आणि हानी या दोन्ही अवस्थेत समान भावगुणाने स्थिर राहतात.''

## २६. अंतराळाचे पाच गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, अंतराळाचे पाच गुण असले पाहिजे, तर ते पाच गुण कोणते?''

१- ''महाराज, अंतराळात कोणत्याही प्रकारे पकडले जाणे शक्य नाही. त्याचप्रमाणे योगसाधकांनी कोणत्याही प्रकारे क्लेशांच्या हाती सापडू नये. महाराज, हाच अंतराळाचा पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, याशिवाय अंतराळात ऋषी, तपस्वी, देव आणि पक्षी नेहमी विचरण करीत असतात. त्याचप्रमाणे योगसाधक भिक्षूंनी संसारात जीवनयापन करीत असतात अनित्य, दुःख आणि अनात्म भावनेला आपल्या मनात राखून ठेवले पाहिजे. महाराज, अंतराळाचा हाच दुसरा गुण असला पाहिजे.''

३- ''महाराज, खुले अंतराळ भयावह वाटते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी संसारात पुन्हा-पुन्हा जन्म घेण्याच्या प्रक्रियेस घाबरून राहिले पाहिजे. संसारातील कोणत्याच स्थितीचा मोह धरू नये. महाराज, अंतराळाचा हाच तिसरा गुण असला पाहिजे.''

४- ''महाराज, अंतराळ अनंत, अफाट आणि अपरिमित असे आहे. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी शीलांचारासंबंधी अनंत, आणि अपरिमित ज्ञानी असे झाले पाहिजे. महाराज, अंतराळाचा हाच चौथा गुण असला पाहिजे.''

५- ''महाराज, अंतराळ कुणाच्याही आधारावर उभारलेले नाही. कुणामुळेही स्थिर झालेले नाही, कोणी त्यास गोळा केले नाही आणि कोणी त्याला थांबवून ठेवले नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी गृहस्थ कुळात, जातीत, लाभात, आवासात, कोणत्याही इतर बाधेत, प्रत्येयात किंवा क्लेश या सर्वात चिकटून राहू नये, तर त्यापासून वेगळे, अनासक्त, प्रतिष्ठामुक्त आणि अलिप्त असेच राहिले पाहिजे. महाराज, अंतराळाचा हाच पाचवा गुण असला पाहिजे. महाराज, आपल्या राहुल पुत्रास उपदेश करत असता स्वतः देवाधिदेव भगवान बुद्धांनी सांगितले आहे की, 'हे राहुल, ज्याप्रमाणे अंतराळ कशावरही प्रतिष्ठित झालेले नाही, त्याचप्रमाणे तू सुद्धा भावना करत जा. आकाशासमान भावना केली असता येणारे जाणारे बरे किंवा वाईट स्पर्श चित्ताला बाधा पोहचवत नाही.''[१]

## २७. चंद्राचे पाच गुण

''भंते नागसेन, चंद्राचे पाच गुण असले पाहिजे, असे तुम्ही म्हणतात, तर ते पाच गुण कोणते?''

१- ''महाराज, शुक्ल पक्षातील चंद्र हळूहळू वाढत जात असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आचार, शील, गुण, व्रतपरायणता, धर्मपुस्तकांचा अभ्यास, ध्यान, स्मृतिप्रस्थान, इंद्रिय, संयम, भोजनातील मात्रज्ञता आणि जागरूकता इत्यादी गुण हळूहळू वाढत गेले पाहिजे. महाराज, चंद्राचा हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, चंद्र हा फार मोठा अधिपती आहे. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपल्या इच्छाआकाक्षांचा बलशाली अधिपती व्हावयास पाहिजे. महाराज, चंद्राचा हाच दुसरा गुण असला पाहिजे.''

३- ''महाराज, चंद्र हा रात्रीच प्रवास करीत असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी एकांतातच अभ्यास केला पाहिजे. महाराज, चंद्राचा हाच तिसरा गुण असला पाहिजे.''

४- ''महाराज, चंद्राचे प्रतिबिंब विमानाच्या ध्वजावर अंकित झालेले असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपल्या शीलाचा ध्वज उभारून ठेवला पाहिजे. महाराज, हाच चंद्राचा चौथा गुण असला पाहिजे.''

५- ''महाराज, चंद्र कोणीही प्रार्थना केली नसली तरी तो उगवत असतो.

---

१. *मज्झिमनिकाय ४२४*

त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी कोणी प्रार्थना केली नसली तरी भिक्षेसाठी गृहस्थाच्या घरी गेले पाहिजे. महाराज, चंद्राचा हाच पाचवा गुण असला पाहिजे. महाराज, संयुक्तनिकायात देवाधिदेव भगवान बुद्धांनी म्हटले आहे की, 'हे भिक्षूंनो, चंद्रासमान भिक्षेसाठी गृहस्थाच्या घरी जा. शरीर आणि मनाचा संकोच बाळगून अगदी अपरिचितासारखे जा आणि परत या.''

## २८. सूर्याचे सात गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, सूर्याचे सात गुण असले पाहिजे, तर ते सात गुण कोणते?''

१- ''महाराज, सूर्य पाण्याला वाळवून टाकतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी सर्व क्लेशांना वाळवून टाकले पाहिजे. महाराज, हाच सूर्याचा पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, सूर्य हा काळ्याकुट्ट अंधार नष्ट करून टाकतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी राग, द्वेष, मोह, मन, आत्मवृष्टी, क्लेश आणि सर्वच प्रकारच्या वाईट आचाराचा अंधार पूर्णतः नष्ट केला पाहिजे. महाराज, सूर्याचा हाच दुसरा गुण असला पाहिजे.''

३- ''महाराज, याशिवाय सूर्य सतत फिरत असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी नेहमी आपले मन संयमित ठेवले पाहिजे. महाराज, सूर्याचा हाच तिसरा गुण असला पाहिजे.''

४- ''महाराज, याशिवाय सूर्य हा किरणांनीयुक्त असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी ध्यानभावना संपन्न होऊन राहिले पाहिजे. महाराज, सूर्याचा हाच चौथा गुण असला पाहिजे.''

५- ''महाराज, सूर्य हा संसारातील सर्व प्राणीमात्रांना उष्णता प्रदान करीत फिरत असतो. त्याप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपल्या आचार, गुण, व्रतचर्या, ध्यान, विमोक्ष, समाधी, समापत्ती, इंद्रियबळ, बोध्यंग, स्मृतिप्रस्थान, सम्यकप्रधान आणि ऋद्धिपाद इत्यादी गुणांनी सर्व देवता आणि मनुष्यांनीयुक्त अशा संसाराला ज्ञानाची उष्णता प्रदान करीत राहिले पाहिजे. महाराज, सूर्याचा हाच पाचवा गुण असला पाहिजे.''

६- ''महाराज, सूर्य हा सदैव राहूला घाबरत असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपल्या कर्माचा वाईट परिणामास, नर्क आणि क्लेशांच्या घनदाट

झाडाझुडपांनी व्यापलेल्या दुराचार आणि दुर्गतीच्या अत्यंत कठीण अशा या जंगलात, आत्मदृष्टीमुळे वाट चुकून वाईट मार्गाने जाणाऱ्या अज्ञानी लोकांना पाहून आपल्या मनात आवेग उत्पन्न केला पाहिजे आणि सतत भिऊन चालले पाहिजे. महाराज, सूर्याचा हाच सहावा गुण असला पाहिजे.''

७- ''महाराज, याशिवाय सूर्य आपल्या प्रकाशाद्वारे चांगले-वाईट सर्वच दाखवत असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी इंद्रियबळ, बोध्यंग, स्मृति प्रस्थान, सम्यकप्रधान, ऋद्धिपाद, लौकिक आणि लोकोत्तर इत्यादी धर्म सर्वांना दाखवले पाहिजे. महाराज, स्थवीरवंगीश यांनी सुद्धा म्हटले आहे की, 'ज्याप्रमाणे सूर्य उदय पावून सर्वच प्राणीमात्रांना शुभाशुभ, चांगले किंवा वाईट इत्यादी सर्वच वस्तू दाखवून देत असतो.' त्याचप्रमाणे धर्म जाणणारा भिक्षू अविद्येने झाकलेल्या जगाला सूर्योदयाप्रमाणे सर्व मार्ग दाखवित असतो.''

## २९. इंद्राचे तीन गुण

''भंते नागसेन, इंद्राचे तीन गुण असले पाहिजे. असे तुम्ही म्हणाला, तर ते तीन गुण कोणते?''

१- ''महाराज, इंद्र केवळ सुखाचाच उपभोग घेत असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी एकांताचे परमसुखच उपभोगले पाहिजे. महाराज, इंद्राचा हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, याशिवाय इंद्र हा सर्वच देवांना प्रसन्न करून त्यांना आपल्या अधिकाराखाली ठेवत असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी कुशल (पुण्यमय) धर्मात आपले मन शांत, उत्साहित आणि तत्पर असे बनवले पाहिजे. शिलाचे आचरण करण्यात प्रसन्न असले पाहिजे. उत्साहपूर्वक त्यात मग्न व्हायला पाहिजे. महाराज, इंद्राचा हाच दुसरा गुण असला पहिजे.''

३- ''महाराज, याशिवाय इंद्र हा कधीही असंतुष्ट होत नसतो, त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी एकांतस्थानाला कधीही कंटाळून जावू नये. महाराज, इंद्राचा हाच तिसरा गुण असला पाहिजे. महाराज, स्थवीरसुभूती यांनी सुद्धा म्हटले आहे की, 'हे भगवान बुद्धा ! जेव्हापासून मी आपल्या धर्मशासनात प्रवर्जित झालो,' तेव्हापासून माझ्या मनात कामभोगाप्रती आसक्ती निर्माण झाली असल्याचा एकही प्रसंग मला आठवत नाही.''

## ३०. चक्रवर्ती राजाचे चार गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, चक्रवर्ती राजाचे चार गुण असले पाहिजे तर ते चार गुण कोणते बरे?''

१- ''महाराज, चक्रवर्ती राजा संग्रह केलेल्या चार प्रकारच्या वस्तूंद्वारा आपल्या प्रजेला आनंदित ठेवतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी चार प्रकारच्या लोकांना वश करून ठेवले पाहिजे. महाराज, चक्रवर्ती राजाचा हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, याशिवाय चक्रवर्ती राजाच्या राज्यामध्ये चोर, लुटारू कधीही जनतेला आतंकित करीत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपल्या मनोराज्यास काम, राग, व्यापाद आणि हिंसा यांच्या वाईट विचारांची चांगलीच नांगी ठेचून काढली पाहिजे. महाराज, चक्रवर्ती राजाचा हाच दुसरा गुसण असला पाहिजे. महाराज, देवाधिदेव भगवान बुद्धांनी सुद्धा म्हटले आहे की, 'जो आपल्या वाईट विचारांना ठेचून काढण्याचा सतत प्रयत्न करतो, सावधानतापूर्वक सांसरिक पदार्थाच्या अनर्थावह कार्यावर दृष्टी ठेवतो, अज्ञानामुळे समस्त संसार ज्याला सुंदर समजतो, त्यापासून तो दूर राहतो, तोच मारांनी घातलेल्या बंधनाची फळी फोडण्यात समर्थ होऊ शकतो.''

३- ''महाराज, याशिवाय चक्रवर्ती नरेश प्रतिदिन चांगले आणि वाईट यांचा शोध घेत समुद्रापर्यंत या महापृथ्वीवर फेरफटका मारीत असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी दररोज आपल्या मन, वचन आणि कर्माची परीक्षा केली पाहिजे. आजचा दिवस तिन्ही प्रकारे निर्दोष कसा जाईल, याची त्याने काळजी घेतली पाहिजे. महाराज, चक्रवर्ती राजाचा हाच तिसरा गुण असला पाहिजे. महाराज, अंगुत्तरनिकयात देवाधिदेव भगवान बुद्धांनी म्हटले आहे की, 'माझी रात्र व दिवस कोणत्या प्रकारे व्यतीत होत आहे,' याचा नेहमी प्रवर्जिताने विचार केला पाहिजे.''

४- ''महाराज, याशिवाय चक्रवर्ती राजाच्या येथील आतील आणि बाहेरील पहारा अतिशय कडेकोर बंदोबस्त असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आतबाहेर क्लेशापासून संरक्षण करण्याकरिता स्मृतीचा पहारेदार बसवून ठेवला पाहिजे. महाराज, चक्रवर्ती राजाचा हाच चवथा गुण असला पाहिजे. महाराज, देवाधिदेव भगवान बुद्धांनी सांगितले आहे की, 'हे भिक्षूंनो, आर्य श्रावक अकुशला (पापा) पासून संरक्षण करण्याकरिता विश्वासू स्मृतीचा पहारेदार बसवून ठेवला पाहिजे.' कृशलाची भावना केली पाहिजे. दोषमय कृत्याचा त्याग करून दोषरहित कृत्याची पाठराखणी केली पाहिजे आणि स्वतःला परमशुद्ध आणि पवित्र ठेवले पाहिजे.''

**(प्रकरण तिसरे समाप्त)**

# (प्रकरण चवथे)

# उपमा कथा प्रश्न (पुढे चालू)

## ३१. वाळवीचा एक गुण

"भंते नागसेन, वाळवीचा एक गुण असला पाहिजे, असे तुम्ही म्हणाले, तर तो एक गुण कोणता?"

१- "महाराज, वाळवी स्वतःला वरून झाकून घेऊन त्याखाली स्वतः लपून राहते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी शील आणि संयमाने स्वतःच्या मनाला झाकून घेऊनच भिक्षाटन केले पाहिजे. महाराज, याप्रमाणे आपल्या मनाला शील आणि संयमाने झाकून घेतले असता भिक्षू सर्वच भयांपासून सुरक्षित राहतो. महाराज, वाळवीचा हाच एक गुण असला पाहिजे. महाराज, वंगतपुत्र स्थवीर उपसेन यांनी म्हटले आहे की, 'शील आणि संयमाने स्वतःच्या मनाला झाकून ठेवणारा योगी संसारातील कोणत्याच वस्तूबद्दल आसक्ती नसल्यामुळे सर्वच भयांपासून सहजच आपली सुटका करून घेत असतो."

## ३२. मांजरीचे दोन गुण

"भंते नागसेन, मांजरीचे दोन गुण असले पाहिजे असे तुम्ही म्हणता, तर ते दोन गुण कोणते?"

१- "महाराज, मांजर गुहा, बीळ, घर किंवा कोठेही राहत असली तरी ती नेहमी उंदराच्याच पातळीवर असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी गाव, जंगल, झाड, मोकळी जागा इत्यादी कोणत्याही ठिकाणी राहिले तरी नियमितपणे त्याने सतत "कायागता स्मृती" रूपी भोजनाच्या पातळीवर राहिले पाहिजे. महाराज, मांजरीचा हाच पहिला गुण असला पाहिजे."

२- "महाराज, मांजर जवळपासच आपली शिकार शोधत असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपल्या या पाच स्कंधाच्या उदय, स्थिती आणि लय (विनाश) या स्वरूपाचे नियमितपणे मनन केले पाहिजे. तसे असे - १) हे रूप आहे, हा रूपाचा उदय आहे आणि हा रूपाचा अस्त आहे, २) ही वेदना आहे, हा वेदनांचा उदय आहे आणि हा वेदनांचा अस्त आहे, ३) ही संज्ञा आहे, हा संज्ञांचा उदय असून हा संज्ञांचा अस्त (विनाश) आहे, ४) हे संस्कार आहेत, हा संस्कारांचा उदय आहे

आणि याप्रमाणे हे संस्कार विनाश पावतात आणि ५) हे विज्ञान आहे. हा विज्ञानाच्या उदय आहे आणि असा विज्ञानाचा विनाश घडून घेतो. महाराज, हाच मांजरीचा दुसरा गुण असला पाहिजे. महाराज, देवाधिदेव भगवान बुद्धांनी सांगितले आहे की, 'येथून दूर निघून जाण्याची काहीच आवश्यकता नाही, पुढील गोष्टीचा विचार करून काय लाभ?' आपल्या शरीराचे खरे स्वरूप काय आहे, ते वर्तमान काळातील व्यवहार पाहूनच समजून घेतले पाहिजे.''

### ३३. उंदराचा एक गुण

''भंते नागसेन, उंदराचा एक गुण असला पाहिजे असे तुम्ही म्हणता, तर तो एक गुण कोणता?''

१- ''महाराज, आहाराच्या शोधासाठीच उंदराची इकडे-तिकडे धावपळ चाललेली असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनो कुठेही जावयाचे असल्यास प्रथम आपल्या मनावर ताबा मिळूवन घ्यावयास पाहिजे. तरच कुठे जावे. महाराज, उंदराचा हाच एक गुण असला पाहिजे. महाराज, वंगतपुत्र स्थवीर उपसेन यांनी म्हटले आहे की, 'धर्मावर दृष्टी ठेऊनच ज्ञानी लोक विहार करीत असतात.' ते स्मृतिमान आणि उत्साहशील होऊन शांतमनाने विचरण करीत असतात.''

### ३४. विंचवाचा एक गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, विंचवाचा एक गुण असला पाहिजे, तर तो एक गुण कोणता होय?''

१- ''महाराज, विंचवाची नांगी हेच त्याचे हत्यार असल्यामुळे तो ती नांगी वर उंचावूनच चालत असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपले ज्ञानरूपी हत्यार उंच उभारूनच चालले पाहिजे. महाराज, विंचवाचा हाच एक गुण असला पाहिजे. महाराज, वंगतपुत्र स्थावीर उपसेन यांनीही म्हटले आहे की, 'ज्ञानाची तलवार उंच ठेवूनच ज्ञानी लोक विहार करीत असतात.' त्यांना कोणत्याच प्रकारचे भय नसते व यांचा कुणीही पराभव करू शकत नाही.''

### ३५. मुंगसाचा एक गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, मुंगसाचा एक गुण असला पाहिजे तर तो एक गुण कोणता?''

१- ''महाराज, एका विशेष प्रकारच्या वनस्पतीच्या जडी बुटीवर लोळल्यानंतर

मुंगुस साप पकडण्यासाठी जात असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपल्या मनाला मैत्रीरूपी जडीबुटीच्या औषधावसर लोटांगण घेऊन त्यानंतरच वैर, कलह, भांडण, विवाद आणि विरोधांनी भरलेल्या या संसारात फिरावयास गेले पाहिजे. महाराज, मुंगसाचा हाच एक गुण असला पाहिजे. महाराज, धर्मसेनापती स्थवीर सारिपुत्र यांनी सुद्धा सांगितले आहे की, 'म्हणूनच स्वतःच्या प्रती आणि दुसऱ्यांच्या प्रती नेहमी मैत्रीभावना केली पाहिजे.' मैत्रीयुक्त चित्तांनी या संसाराला व्यापून टाकले पाहिजे. हाच बुद्धांचा उपदेश आहे.''

## ३६. म्हाताऱ्या कोल्ह्याचे दोन गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, म्हाताऱ्या कोल्ह्याचे दोन गुण असले पाहिजे, तर ते दोन गुण कोणते ?''

१- ''महाराज, म्हाताऱ्या कोल्ह्यास जे काही खाद्य मिळेल, ते तो कोणत्याही प्रकारे घृणा न करता मनसोक्त खात असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी जे काही अन्न मिळेल, ते कोणत्याही प्रकारची घृणा न करता, शरीर रक्षणासाठी त्यात दोष न पाहता, जेवढे अन्न आवश्यक आहे, तेवढे निमुटपणे खाऊन घेतले पाहिजे. महाराज, म्हाताऱ्या कोल्ह्याचा हाच पहिला गुण असला पाहिजे. महाराज, स्थवीर काश्यप यांनी म्हटले सुद्धा आहे, 'आपल्या आश्रमातून निघून मी भिक्षेसाठी गावात गेलो. क्रमानुसार भिक्षा मागत मी भोजन करीत असलेल्या एका महारोगी मनुष्याच्या दारावर जाऊन उभा राहिलो. त्यांनी गळून गेलेल्या हातांनी काही भात माझ्या पात्रात आणून टाकला. त्यावेळी त्यांचे एक बोट सुद्धा गळून पडले. ते अन्न घेऊन मी एका भिंतीजवळ जाऊन भोजन करावयास बसलो.' परंतू ते भोजन करीत असता व त्यानंतर सुद्धा माझ्या मनात घृणा निर्माण झाली नाही.''[१]

२- ''महाराज, याशिवाय म्हाताऱ्या कोल्ह्यास जे काही खाद्य मिळाले, मग ते रूक्ष कोरडे आहे की, चांगले स्वादिष्ट आहे, याचा मुळीच विचार करीत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी जे काही अन्न मिळाले असेल ते सुकलेले कोरडे आहे की, स्वादिष्ट हो, सत्कारपूर्वक दिलेले आहे की, अपमानपूर्वक दिलेले आहे, असा मुळीच विचार करू नेय, तर जे काही मिळाले असेल ते संतोषपूर्वक खाऊन टाकले पाहिजे. महाराज, म्हाताऱ्या कोल्ह्याचा हाच दुसरा गुण असला पाहिजे. महाराज, वंगतपुत्र स्थवीर उपसेन यांनी म्हटले सुद्धा आहे की, 'सुकलेले कोरडे जरी भोजन मिळाले तरी ते

१. *थेरगाथा १०५४-१०५६*

संतोषपूर्वक खाऊन घेतले पाहिजे. स्वादिष्ट भोजनाची वाट पाहत बसू नये. जिभेचे चोचले पुरविण्याच्या मागे लागणाराचे मन कधीच ध्यानभावनेत लागत नाही. जे काही मिळेल त्यावर संतोष मानून घेणाराच भिक्षू व्रत पूर्ण करू शकतो.''

## ३७. हरीणाचे तीन गुण

''भंते नागसेन, हरिणांचे तीन गुण असले पाहिजे असे तुम्ही म्हणता, तर ते तीन गुण कोणते?''

१- ''महाराज, हरीण दिवसभर फिरत राहते आणि रात्रीला एखाद्या मोकळ्या जागी शांतपणे झोपी जात असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी दिवसभर जंगलात आणि रात्रीच्यावेळी मोकळ्या मैदानात ध्यानभावना केली पाहिजे. महाराज, हरिणाचा हाच पहिला गुण असला पाहिजे. महाराज, लोमहंस परियायामध्ये देवाधिदेव भगवान बुद्धांनी सांगितले आहे की, 'हे सारिपुत्र, थंडीच्या त्या रात्री जेव्हा कडाक्याची थंडी पडत असे, तेव्हा मी अगदी मोकळ्या जागेत राहत असे आणि सूर्योदय होताच जंगलात निघून जात असे. परंतु कडक उन्हाळ्याच्या दिवसात मात्र खुल्या जागेत दिवस व्यकती करून रात्रीच्या वेही जेथे वाराही प्रवेश करू शकत नाही.' अशा घनदाट अरण्यात निघून जात असे.''[१]

२- ''महाराज, पुन्हा हरीणावर कोणी भाला किंवा बाण सोडला, तर अशावेळी ते आपले शरीर अकुंचित करून उड्या मारीत पळून जात असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी क्लेश दृष्टीस पडताच आपल्या मनाला सुरक्षित ठेऊन तेथून निघून गेले पाहिजे. महाराज, हाच हरीणाचा दुसरा गुण असला पाहिजे.''

३- ''महाराज, एखादा माणूस दृष्टीस पडताच त्याने आपणास पाहू नये म्हणून हरीण तेथून पळून जाते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी झगडा, कलह, भांडण आणि व्यर्थ लफड्यात पडणाऱ्या दुःशील लोकांना पाहून तेथून दुसरीकडे निघून जायला पाहिजे. जेणेकरून ते लोक आपणास पाहू नये किंवा त्यास आपण पाहू नये. महाराज, हरीणाचा हाच तिसरा गुण असला पाहिजे. महाराज, धर्मसेनापती सारीपुत्र यांनी म्हटले सुद्धा आहे की, 'पापी, आळशी, निरूत्साही, मर्खू आणि दुराचारी लोक मला कधीच साथ देणार नाहीत.''[२]

---

१ मज्झिमनिकाय 'लोमहंस परियाण सत्त'

## ३८. बैलाचा चार गुण

''भंते नागसेन, बैलाचे चार गुण असले पाहिजे असे तुम्ही म्हणता, तर ते चार गुण कोणते बरे?''

१- ''महाराज, बैल आपले घर सोडून कधीही दुसरीकडे पळून जात नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपले शरीर स्वैर सोडू नये. ते अनित्य आणि नाशवान आहे. महाराज, बैलाचा हाच पहिला गुण असणे आवश्यक आहे.''

२- ''महाराज, जेव्हा बैलाला एखाद्या गाडीत जुंपले जाते, तेव्हा तो सुखाने असो की, दुःखाने असो पणती गाडी त्याला ओढावीच लागते. त्याचप्रमाणे महाराज, योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी एकदा ब्रह्मचर्य व्रत घेतले की ते सुखाने असो की दुःखाने असो; पण प्राणपणाला लावून जीवनभर ते घसास नेले. महाराज, बैलाचा हाच दुसरा गुण असला पाहिजे.''

३- ''महाराज, बैल दम घेऊन घेऊन पाणी पित असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आचार्य आणि उपाध्याय यांनी केलेला उपदेश मन लावून प्रेमाने ग्रहण केला पाहिजे. महाराज, बैलाचा हाच तिसरागुण असला पाहिजे.''

४- ''महाराज, बैलास कोणीही जुंपले, तरी तो गाडी ओढतच असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी स्थवीर, मध्यम वयाचे, नवीन भिक्षू आणि उपासक यांनी केलेले स्वागत आणि सत्कार डोके झुकवून स्वीकार केला पाहिजे. महाराज, बैलाचा हाच चौथा गुण असला पाहिजे. महाराज, धर्मसेनापती सारिपुत्र यांनी सांगितले आहे की, 'सात वर्षे वयाचा श्रामणेर असून तो जर मला काही शिकवत असेल, तर त्याचा मी सहर्ष स्वीकार करेन. अत्यंत प्रेमपूर्वक आणि आदर सत्कार करून त्याला पाहताच मी त्याचे स्वागत करेन.' पुन्हा पुन्हा मी आपल्या आचार्यांच्या स्थानावर त्याला सत्कारपूर्वक बसवेन.''

## ३९. डुकराचे दोन गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, डुकराचे दोन गुण असले पाहिजे, तर ते दोन गुण कोणते?''

१- ''महाराज, डुकर उन्हाळ्याच्या दिवसात जेव्हा उष्णता होऊ लागते. तेव्हा पाण्यात जाऊन बसत असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी द्वेषांच्या अग्नीने भाजल्यामुळे चित्त गरम झाले असता शीतल, अमृतासम अशा मैत्री-भावनेच्या जलकुंभात

बुडून जावयास पाहिजे. महाराज, डुकराचा हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, डुकर काडीकचरा किंवा चिखलात आपले नाक खुपसून खड्डा करीत असते व त्यातच ते पडून राहते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपल्या मनात विनम्रता बाळगून ध्यान भावनेत मग्न होऊन राहिले पाहिजे. महाराज, डुकराचा हाच दुसरा गुण असला पाहिजे. महाराज, पिंडोलभारद्वाजास्थवीर यांनी म्हटले सुद्धा आहे की, 'शरीराचा नाशवंत स्वभाव पाहून ज्ञानी पुरूष त्यावर विचार करतो आणि एकांतात एकांगीपणे ध्यान भावनेत मग्न होऊन जातो.''

## ४०. हत्तीचे पाच गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, हत्तीचे पाच गुण असले पाहिजे तर ते पाच गुण कोणते?''

१- ''महाराज, हत्ती चालत असता जणूकाही पृथ्वीला घाबरवून सोडतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूी आपल्या शरीरावर मनन करून सर्वच क्लेशांना घाबरवून सोडले पाहिजे. महाराज, हत्तीचा हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, याशिवाय हत्ती आपले शरीर फिरवीत असतांनासुद्धा सरळच वाहतो. इकडेतिकडे मुळीच लक्ष देत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी फिरल्यानंतरच पाहिले पाहिजे. आजूबाजूला, वरखाली दृष्टी नाही वळवली पाहिजे. केवळ दोन हातच पुढे पाहिले पाहिजे. महाराज, हत्तीचा हाच दुसरा गुण असला पाहिजे.''

३. ''महाराज, हत्ती (जंगली) आपल्या वास्तव्यासाठी कोणतीच अशी खास जागा निवडून ठेवीत नाही. तो जेथे खावयास मिळते तेथेच राहतो व तेथेच झोपही घेतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी गृहत्यागी झाले पाहिजे. कोणतेही स्थान ठरवून न ठेवता आपल्या भिक्षाटनासाठी बाहेर निघून गेले पाहिजे. आणि त्यानंतर जेथे कोठे चांगले, सुंदर, रम्य आणि अनुकूल स्थळ, मंडप, वृक्षछाया, गुहा किंवा पर्वताचा कडा दिसेल, तेथेच काही काळासाठी वास्तव्य केले पाहिजे. महाराज, हत्तीचा हाच तिसरा गुण असला पाहिजे.''

४- ''महाराज, हत्ती उत्तम कमळे फुललेल्या सरोवराच्या निर्मळ आणि शीतल अशा शुद्ध जलात जाऊन तेथे आनंदाने जलक्रीडा करीत असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी पवित्र आणि निर्मळ अशा धर्मरूपी जलाने लबालब भरलेल्या, विमुक्तीची कमळे फुललेल्या, स्मृतिप्रस्थानांच्या सरोवरात शिरून ज्ञानोद्वारे संस्कारांना

हलवून, पिळवटून तोडून टाकले पाहिजे. हिच योगी लोकांची योगक्रिडा आहे. महाराज, हत्तीचा हाच चौथा गुण असला पाहिजे.''

५- ''महाराज, याशिवाय हत्ती व्यवस्थित पाहूनच पाय उचलतो आणि व्यवस्थित पाहूनच पाय ठेवित असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी व्यवस्थित पाहूनच पाय उचलला पाहिजे व व्यवस्थित पाहूनच पाय ठेवला पाहिजे. जाणे, परत येणे, हातपाय जवळ घेणे, हातपाय लांब करणे इत्यादी सर्व कार्य करीत असता विचारपूर्वक स्मृती जागृत ठेऊनच केले पाहिजे.[१] महाराज, हत्तीचा हाच पाचवा गुण असला पाहिजे. महाराज, संयुक्तनिकायात देवाधिदेव भगवान बुद्धांनी सांगितले आहे की, 'शरीराचे संयमन करणे उत्तम आहे, वाचेचे संयमन करणे उत्तम आहे, मनाचे संयमन करणे उत्तम असून सर्वांचेच संयमन करणे उत्तम आहे.' जो प्रज्ञावान स्वतःला पूर्णतः वश करून घेतो, तोच सर्व प्रकारे संयमशील होय.''[२]

**(प्रकारण चौथे समाप्त)**

# (प्रकरण पाचवे)

# उपमा कथा प्रश्‍न (पुढे चालू)

## ४१. सिंहाचे सात गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, सिंहाचे सात गुण असले पाहिजे, तर ते सात गुण कोणते?''

१- ''महाराज, सिंह स्वच्छ व भुरकट असतो. त्याच्या शरीरावर कोणत्याही प्रकारचा डाग नसतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी निर्मळ, पवित्र आणि मनाने शांत असले पाहिजे. महाराज, सिंहाचा हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, सिंह आपल्या चार पायांनीच अत्यंत वेगाने धावत असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी चार ऋद्धिनीयुक्त सक्षम होऊन राहिले पाहिजे. महाराज, सिंहाचा हाच दुसरा गुण असला पाहिजे.''

३- ''महाराज, सिंहाला अत्यंत विलोभनीय अशी आयाळ असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी अत्यंत मनोहर शीलरूपी आयाळांनीयुक्त केसरी व्हावयास पाहिजे. महाराज, सिंहाचा हाच तिसरा गुण होय.''

४- ''महाराज, सिंह प्राण गेले तरी चालेल पण कोणापुढे कधी झुकत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी चीवर, पिंडपात, शयनासन आणि ग्लान प्रत्येय इत्यादी प्राप्त झाले नाही, तरी कोणापुढे वाकू नये. महाराज हाच सिंहाचा चौथा गुण असला पाहिजे.''

५- ''सिंह जेथे पंजा मारतो तेथेच नेमके खाऊ लागलो, उत्तम मांस कोठे मिळेल हे तो शोधात बसत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्ूंनी क्रमानुसार कोणतेही घर न वगळता भिक्षा मागत गेले पाहिजे. घर निवडून भिक्षा मागू नये. मिळालेल्या भिक्षेत स्वादिष्ट कोणते आहे, याचा शोध न घेता मुकाट्याने आनंदपूर्वक सेवन केले पाहिजे आणि हेही जीवनयात्रा चालवण्यापुरतेच खावे, पोटाच्या पलीकडे नाही. महाराज, सिंहाचा हाच पाचवा गुण असला पाहिजे.''

६- ''महाराज, सिंह स्वतः केलेल्या शिकारीमधून काहीही राखून ठेवत नाही. एकदा खाऊन जर टाकून दिले असेल, त्याच्याकडे पुन्हा ढुंकूनही पाहत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी काहीही संग्रह करून ठेवू नये.''

७- ''महाराज, सिंहाला जर शिकार मिळाली नाही, तरी तो त्यामुळे नाराज होत नाही, आणि मिळाली तरी तो आधाशीपणाने खाण्यासाठी त्यावर तुटून पडत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी जरी कधी भोजन मिळाले नाही, तरी त्यामुळे नाराजा होऊ नये व मिळाले असता अत्यंत विचारपूर्वक प्रमाण जाणून भोजनातील दोषावर दृष्टी ठेऊनच केवळ शरीररक्षणास पुरेसे तेवढेच सेवन केले पाहिजे. महाराज, सिंहाचा हाच सातवा गुण असला पाहिजे.''

''महाराज, स्थवीर महाकाश्यपांची स्तुती करतांना देवाधिदेव भगवान बुद्धांनी सांगितले होते की, 'हे भिक्षूंनो, काश्यप जे काही पात्रात मिळाले त्यावरच संतुष्ट राहणारांची प्रशंसा करणारा आहे. पिंडपात करण्यात तो कोणताच दोष घडू देत नाही.' जरी त्याच्या भिक्षापात्रात काहीच भिक्षा मिळाली नाही, तरी त्यामुळे तो त्रासून जात नाही आणि मिळाल्यानंतरही अत्यंत सावधानपूर्वक प्रमाणानुसार भोजनातील आदीनवाचा (दोषाचा) विचार करून केवळ शरीर धारणेकरीता आवश्यक तेवढेच खाऊन संतुष्ट राहतो.''[१]

## ४२. चक्रवाकाचे तीन गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, चक्रवाकाचे तीन गुण असले पाहिजे. तर ते तीन गुण कोणते?''

१- ''महाराज, चक्रवाक कधी जीवनभर आपल्या जोडीदारास सोडत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी जीवनभर चिंतनीय अशा अभ्यासाचा त्याग करू नये. महाराज, चक्रवाकाचा हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, च्रकवाक हा शेवाळ आणि पाण्यातील इतर वनस्पती खाऊन संतुष्ट राहतो. त्यामुळे त्याची शक्ती व सौंदर्य कधीच कमी होत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी जे काही मिळेल त्यावरच संतुष्ट राहिले पाहिजे. त्यामुळे त्यांच्या शील, समाधी, प्रज्ञा, विमुक्ती, ज्ञानदर्शन आणि इतर सर्वच प्रकारच्या पुण्य धर्मात कधीच कमीपणा येत नाही. महाराज, चक्रवाकाचा हाच दुसरा गुण असला पाहिजे.''

३- ''महाराज, चक्रवाक हा कधी कोणत्याच प्राण्यांना कष्ट देत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी कोणासही मारू नये किंवा कष्ट देक्ष नये. त्यांनी लज्जाशील, दयावंत आणि सर्वच प्राणीमात्रांच्याप्रती करूणाशील होऊन राहिले पाहिजे. महाराज,

१. *संयुक्त निकायः १६-१-३*

चक्रवाकाचा हात तिसरा गुण असला पाहिजे. महाराज, चक्रवाक जातकात देवाधिदेव भगवान बुद्धांनी सांगितले आहे की, 'जो कोणाचा वध करीत नाही आणि दुसऱ्याकडूनही करवून घेत नाही; तो स्वतः कोणाला हरवत नाही व दुसऱ्याकडून हरवून घेत नाही आणि सर्वच जीवांच्याप्रती मनात अहिंसाभाव ठेवतो.' त्याचे कोणाशीही कधी वैर नसते.''

## ४३. पेणाहिका पक्षीणीचे दोन गुण

''भंते नागसेन, पेणाहिका पक्षीणीचे दोन गुण असले पाहिजेत. असे तुम्ही म्हणाले, तर ते दोन गुण कोणते आहेत?''

१- ''महाराज, पेणाहिका (कोकिळा) पक्षीण आपल्या पतीच्या इर्ष्येमुळे आपल्या पिलांचे सुद्धा पालनपोषण करीत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपल्या मनात उद्‌भवणाऱ्या क्लेशांच्याप्रती इष्य्र बाळगली पाहिजे. महाराज, पेणाहिकाचा हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, पेणाहिका पक्षीण दिवसभर एकटीच जंगलात चारा खाऊन सायंकाळी आपल्या संरक्षणाकरीता कळपात येऊन मिसळते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपल्या मनातील गुंतागुंत सोडवून घेण्यासाठी एकांतवास धारण केले पाहिजे, तेथे जर मन लागत नसेल तर निंदेपासून वाचण्याकरिता संघात येऊन मिळाले पाहिजे. संघाच्या संरक्षणाखाली राहिले पाहिजे. महाराज, पेणाहिका पक्षीणीचा हाच दुसरा गुण असला पाहिजे. महाराज, पेणाहिका पक्षीणीचा हाच दुसरा गुण असला पाहिजे. महाराज, ब्रह्म संहपतीनी भगवान बुद्धापुढे म्हटले होते की, 'जंगलात दूर एकांतात राहिले पाहिजे. लोक जंजाळापासून अगदी मुक्त राहिले पाहिजे.' जर तेथेही मन रमले नाही तर त्याने स्मृतिमान संघाच्या संरक्षणाखाली येऊन राहिले पाहिजे.''[१]

## ४४. कबुतराचा एक गुण

''भंते नागसेन, कबुतराचा एक गुण असला पाहिजे असे तुम्ही म्हणता, तर तो एक गुण कोणता?''

१- ''महाराज, कबुतर हा दुसऱ्यांच्या घरी बसत असता तेथील कोणत्याही वस्तूला पाहून तो कधी मनात लालसा उत्पन्न होऊ देत नाही. त्याच्याप्रती एकदम अनासक्त असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी, गृहस्थ लोकांच्या घरी गेले

१. *थेर गाथा - १४२*

असता त्यांच्या घरच्या स्त्री-पुरूषांना पाहून, खूर्ची, बेंच, वस्त्र, अलंकार, भोजन किंवा इतर दुसऱ्या भोग वस्तू पाहून मनात त्या वस्तूंच्या प्रती लालच उत्पन्न होऊ देऊ नये, तर अनासक्त आणि अन्यमनस्क भावनेनेच राहिले पाहिजे, मी भिक्षू आहे, या गाष्टींचे सतत स्मरण ठेवले पाहिजे. महाराज, कबुतराचा हाच एक गुण असला पाहिजे. महाराज, चुल्ल नारद जातकात देवाधिदेव भगवान बुद्धांनी सांगितले आहे की, 'कोणत्याही उपासकाने गृहस्थाच्या घरी गेले असता तेथे खाण्यापिण्याचे काही जिन्नस मिळाले असता, त्याकडे दुर्लक्ष करावे व तेथील सौंदर्याकडे मन जाऊ देऊ नये.''

## ४५. घुबडाचे दोन गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, घुबडाचे दोन गुण असले पाहिजे तर ते दोन गुण कोणते?''

१- ''महाराज, घुबड आणि कावळ्यामध्ये स्वभावतःच शत्रूतव आहे. त्यामुळे घुबड रात्री कावळ्यांच्या थव्यामध्ये जाऊन अनेकांना मारून खाली पाडतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी अज्ञानाशी शत्रूत्व पत्करले पाहिजे. एकटेच एकांतात बसून अज्ञानाला एकदम नष्ट करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. महाराज, घुबडाचा हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, याशिवाय घुबड कोठेही एकांतात लपून बसते व डुलक्या घेते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी एकांतात ध्यानमग्न होऊन राहिले पाहिजे. महाराज, संयुक्त निकायात देवाधिदेव भगवान बुद्धांनी सुद्धा सांगितले आहे की, 'भिक्षू एकांतात ध्यानमग्न होऊन असे चिंतन करतो की, हे दुःख आहे; हा दुःखाचा समुदाय आहे, हा दुःखाचा निरोध असून हा दुःख निरोध करण्याचा मार्ग आहे.''

## ४६. सारस पक्षाचा एक गुण

''भंते नागसेन, सारस पक्षाचा एक गुण असला पाहिजे असे तुम्ही म्हणता, तर तो एक गुण कोणता?''

१- ''महाराज, सारस पक्षी आपल्या आवाजाद्वारे पुढे शुभ घडेल की अशुभ घडेल त्याची लोकांना जाणीव करून देत असतो. त्याप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी धर्मदेशना करीत असता नरक किती भयावह आहे आणि निर्वाण किती सुखदायक आहे, याची लोकांना जाणीव करून द्यावयास पाहिजे. महाराज, सारस पक्षाचा हाच गुण असला पाहिजे. महाराज, पिंडोल भारद्वाज स्थवीर यांनी सांगितले आहे की, 'नरकात किती

भय आणि यातना आहेत व निर्वाणात कसे सुखच सुख आहे.' योगीजनांनी या दोन्रुही स्पष्ट करून सांगितल्या पाहिजेत.''

## ४७. भुंग्याचे दोन गुण

''भंते नागसेन, भुंग्याचे दोन गुण असले पाहिजे असे तुम्ही म्हणाले, तर ते दोन गुण कोणते?''

१- ''महाराज, भुंगा उडत-उडत घरात येतो आणि इकडे-तिकडे फिरून कुठेही न थांबता तसाच बाहेर जातो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी भिक्षेकरिता गावात जाऊन, मिळालेले अन्न घेऊन कोठेही न थांबता सरळ निघून गेले पाहिजे. महाराज, भुंग्याचा हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, याशिवाय भुंगा दुसऱ्याला घरात राहत असला तरी तो त्यांची कोणत्याही प्रकारची नुकसान करीत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी गृहस्थ लोकांच्या घरी वेळोवळी जाऊन त्यांनी पुन्हा-पुन्हा याचना करून सतावू नये. कोणत्याही वस्तूंची मागणी करू नये, वाईट हावभाव करू नये, काही बोलू नये, त्यांच्या सुखदुःखात सहभागी होऊ नये. त्यांच्यासह पश्चाताप करीत बसू नये आणि त्यांच्यात कोणत्याही प्रकारचे विघ्न आणू नये. तथापि त्यांच्या वृद्धिची नेहमी कामना केली पाहिजे. महाराज, भुंग्याचा हाच दुसरा गुण असला पाहिजे. महाराज, दीघ्घनिकायातील लक्षण सूत्रात देवाधिदेव भगवान बुद्धांनी म्हटले आहे की, 'श्रद्धेने, शांतीने, विद्येने, त्यागाने, अनेक प्रकारच्या उत्तमोत्तम धर्माने, धनधान्याने, शेतीने, संपत्तीने, पुत्रानवे, स्त्रीने आणि गुराने, बांधनाने, शक्तीने सौंदर्याने नुकसान होणार नाही.' आणि सुखाने लोकांची कोणत्याच प्रकारे नाही. असाच भिक्षूंनी विचार करावा. सर्वांच्या लाभाची आणि भरभराटीची शुभकामना करावी.''[१]

## ४८. जळूचा एक गुण

''भंते नागसेन, तुम्ही जळूचा एक गुण असला पाहिजे, असे म्हणता तर तो एक गुण कोणता?''

१- ''महाराज, जळू जेथे पकडते, तेथेच भरपूर रक्त पीत असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी ज्या आलंबनावर ध्यान करीत असाते. त्यावरच आपले मन केंद्रित करीत असाते. त्याचे रूप, रंग, स्थान, वृद्धी, परीघ, ओळख, चिन्ह इत्यादी

१. *दीघ्घनिकायः सूत्र ३१*

सर्वच जाणून घेत असतो. याप्रमाणे ध्यानातील एकाग्रतेचा साठा साठवून तो विमुक्तीचा मधुर रस सतत पीत असतो. महाराज, जळूचा हाच एक गुण असला पाहिजे. महाराज, स्थवीर अनुरूद्ध यांनी सांगितले आहे, 'परिशुद्ध चित्ताने ध्यानातील एकाग्रता साठवून त्या चित्ताने विमुक्तीचा मधुर रस पीत राहिले पाहिजे.''

## ४९. सापाचे तीन गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, सापाचे तीन गुण असले पाहिजे. तर ते तीन गुण कोणते?''

१- ''महाराज, साप हा प्राणी पोटाच्या बळावर सरपटत चालत असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी प्रज्ञेच्या बळावर चालले पाहिजे. महाराज, प्रज्ञेच्या बळावर चालणारास सत्यज्ञानाचा लाभ होतो. तो भिक्षूंजीवनास अनुकूल असणाऱ्या वस्तूच ग्रहण करीत असतो, प्रतिकूल नाही. महाराज, सापाचा हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, याशिवाय साप जडीबुटीपासून आपले अंग वाचवूनच सरपटत चालत असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी दुराचारापासून स्वतःचा बचाव केला पाहिजे. महाराज, हाच सापाचा दुसरा गुण असला पाहिजे.''

३- ''महाराज, याशिवाय माणसाला पाहून साप भयभीत होत असतो व घाबरून जातो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंची वाईट विचारांमुळे ब्रह्मचर्य जीवन कंटाळणारे वाटण्याचे शक्यता निर्माण झाल्यास भयभीत झाले पाहिजे व त्यापासून घाबरून राहिले पाहिजे आणि असा विचार केला पाहिजे की, 'अरे ! आज माझ्या सोबत भयंकर धोका झाला, ही झालेली हानी कधीच भरून काढता येणार नाही.' महाराज, सापाचा हाच तिसरा गुण असला पाहिजे. महाराज, भल्लाटिय जातकात दोन किन्नरांनी सांगितले आहे की, 'हे शिकारी, आपल्या इच्छेविरूद्ध परस्परांचा विचार करीत आम्ही लोकांनी एक रात्र व्यर्थ घालवली. त्याबद्दल अत्यंत पश्चाताप करीत आपण शोक करीत आहोत.' अशी रात्र (व्यर्थच गेलेली) पुन्हा कधीच येणार नाही.''

## ५०. अजगराचा एक गुण

''भंते नागसेन, अजगराचा एक गुण असला पाहिजे, असे आपले म्हणणे आहे. तर मग सांगा की, तो एक गुण कोणता?''

१- ''महाराज, अनेक दिवसपर्यंत पोटभर आहार मिळत नसल्यामुळे विशालकाय

अजगर अर्धपोटी उपाशीच पडून राहते, तरीपण जे काही थोडेसे मिळेल तेवढ्यावरच जिवंत राहत असतो. त्याचप्रमाणे इतरावर निर्भर असतांना आपल्या पोटाची भूक शमविणाऱ्या भिक्षूला कोणासही काही न मागता नेहमी पोटभर आहार मिळणे दुर्लभ असते. तेव्हा चांगल्या कुलपुत्रांना अशावेळी चार-पाच घास अन्न खाऊन बाकीचे पोट पाण्याने भरावे. महाराज, अजगराचा हाच एक गुण असला पाहिजे. महाराज, धर्मसेनापती स्थवीर सारिपुत्र यांनी म्हटले सुद्धा आहे की, 'ओले कोरडे खाताना कसेही असो. परंतु अपचन होईपर्यंत खाऊ नये. अर्धपोटी किंवा मिताहारी होऊन राहणे शक्य असेल, त्याच भिक्षूंची प्रव्रजा सफली होत असते. अर्थात त्यांनीच प्रवर्जित करून व्हावे, चार-पाच घास अन्न खाल्यानंतर जर काही मिळाले नाही तर पाणी पिऊन घ्यावे.' आत्मसंयमी भिक्षूंकरीता एवढेच पुरेसे होते."[१]

**(प्रकरण पाचवे समाप्त)**

# (प्रकरण सहावे)

# उपमा कथा प्रश्न (पुढे चालू)

## ५१. कोळ्याचा एक गुण

''भंते नागसेन, तुमचे म्हणणे असे आहे की, कोळ्याचा एक गुण असला पाहिजे, तर तो गुण कोणता बरे?''

१- ''महाराज, कोळी नावाचा किडा रस्त्यावर आपले जाळे पसरून तेथेच बसून राहतो. अशावेही जर एखादा किडा, माशी किंवा पतंग त्यांच्या जाळ्यात अडकून पडलाच तर तो त्याला पकडून खात असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी सहाही द्वारांमध्ये स्मृतिप्रस्थानांचे जाळे पसरून बसून राहिले पाहिजे. अशा वेळी जर त्यात एखादा क्लेश अडकून पडला, तर तेथेच त्याला मारून टाकले पाहिजे. महाराज, कोळ्याचा हाच एक गुण असला पाहिजे. महाराज स्थवीर अनुरूद्ध यांनी सुद्धा म्हटले आहे की, 'श्रेष्ठ आणि उत्तम अशा स्मृतिप्रस्थानाद्वारा सहाही द्वारांवर आपल्या चित्तास अडवून धरले पाहिजे आणि जर त्यात एखादा क्लेश मध्ये पडला,' तर ज्ञानवंताने तेथेच त्याचा विनाश केला पाहिजे.''

## ५२. दूध पिणाऱ्या लहान मुलांचा एक गुण

''भंते नागसेन, दूध पिणाऱ्या लहान मुलाचा एक गुण असला पाहिजे, असे आपण म्हणाले होते, तर तो एक गुण कोणता बरे?''

१- ''महाराज, दूध पिणाऱ्या लहान मुलास फक्त त्याची स्वतःचीच काळजी असते, तो केवळ दूध पिण्यासाठीच रडत असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी फक्त चांगल्या उद्देशपूर्तीचीच काळजी घेतली पाहिजे. उपदेश करण्यात, धर्मचर्चा करण्यात, आचारविचारात, एकांतवासात, गुरूजनांच्या सहवासात, सत्संगात आणि इतर सर्वच ठिकाणी उच्च धर्मज्ञान प्राप्त करण्याचा हा एकच उद्देश मनाशी बाळगला पाहिजे. महाराज, हाच एक दूध पिणाऱ्या लहान मुलांचा गुण असला पाहिजे. महाराज, दिघ्घनिकायातील महापरिनिर्वाण सुत्रात देवाधिदेव भगवान बुद्धांनी सांगितले आहे की, 'हे आनंद ! ऐक ! चांगल्या उद्दिष्ठांसाठी प्रयत्न कर. त्यातच कार्यशील रहा.' कोणत्याही प्रकारची चूक न करता, शांतपणे स्वतःच स्वतःला संयमित ठेवून उच्च आणि चांगल्या उद्देशाच्या धुंदीत धुंद होऊन राहिले पाहिजे.''

## ५३. चित्रकार कासवाचा एक गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, चित्रकार कासवाचा एक गुण असला पाहिजे, तर तो गुण कोणता?''

१- ''महाराज, चित्रकार कासव पाण्यातील भितीमुळे पाण्याबाहेर निघून जमिनीवर फिरत असतो. पण त्यामुळे त्याचे आयुष्य मुळीच कमी होत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी प्रमादात ठाई असलेला धोका आणि अप्रमादात असलेले गुण ओळखले पाहिजे. असे केले असता त्याच्या भिक्षूभावात कोणत्याही प्रकारे कमीपणा येत नाही. तो तर निर्वाणाकडे जाऊन पोहचतो. महाराज, चित्रकार कासवाचा हाच एक गुण असला पाहिजे. महाराज, धम्मपदात देवाधिदेव भगवान बुद्धांनी सांगितले आहे, 'अप्रमादात रत होऊन प्रमादातील धोका जाणून घेणाऱ्या भिक्षूचे कधीच पतन होऊ शकत नाही,' तर तो निर्वाणाच्या अगदी जवळ जाऊन पोहोचतो.''[१]

## ५४. जंगलाचे पाच गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, जंगलाचे पाच गुण असले पाहिजे, तर ते पाच गुण कोणते?''

१- ''महाराज, जंगल हे चोरचिटुकार लोकांना लपून बसण्याचे उत्तम असे स्थान आहे. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी दुसऱ्याचा अपराध किंवा दोष क्षमेच्या भावनेने पचवून घेतला पाहिजे. कोणाही जवळ ते उघड करून सांगू नयेत. महाराज, हाच जंगलाचा पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, जंगल म्हणजे लोक वस्तीपासून अगदी लांब अंतरावर असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपले म राग, द्वेष, मोह, मानमर्यादा, क्लेश आणि आत्मदृष्टीचा जंजाळापासून स्वतःला अगदी दूर ठेवले पाहिजे. महाराज, जंगलाचा हाच दुसरा गुण असला पाहिजे.''

३- ''महाराज, जंगल हे लोकांच्या गोंगाटापासून सर्वथा मुक्त असे एकांत स्थान असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी पाप, वाईट व नीच गुणापासून अगदी मुक्त असले पाहिजे. महाराज, जंगलाचा हाच तिसरा गुण असला पाहिजे.''

४- ''महाराज, जंगल हे शांत शुध्द असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनीसुद्धा शांत, शुध्द नम्र आणि अभिमानापासून अलिप्त होऊन राहिले पाहिजे. महाराज, जंगलाचा हाच चौथा गुण असला पाहिजे.''

---

१. *धम्मपद अप्पमादवग्ग -३२*

५- ''महाराज, जंगल म्हणजे साधू मुनीजनांच्या राहण्याचे पवित्र स्थान असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी साधू व मुनीजनांच्याच संगतीमध्ये राहिले पाहिजे. महाराज, जंगलाचा हाच पाचवा गुण असला पाहिजे. महाराज, संयुक्त निकायात देवाधिदेव भगवान बुद्धांनी म्हटले आहे की, 'संयमशील आणि ध्यानभावना करणाऱ्या उत्साही आणि पंडितांनी एकांतात राहणाऱ्या श्रेष्ठ अशा सत्पुरूषांचा संगतीमध्येच राहिले पाहिजे.''

## ५५. वृक्षाचे तीन गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, वृक्षाचे तीन गुण असले पाहिजेत, तर ते तीन गुण कोणते?''

१- ''महाराज, झाडाच्या फांद्यांना फळे व फूले येतात. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी स्वतःला विमुक्तीची फूले व श्रामण्याची फळे येतील, असे कार्य केले पाहिजे. महाराज, हाच वृक्षाचा पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, वृक्षाखाली येऊन बसणाऱ्या लोकांना आपली थंडगार सावली प्रदान करीत असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपल्याकडे येणाऱ्या लोकांना सत्कारपूर्वक त्यांच्या कामाची वस्तू दिली पाहिजे. आणि धर्मांचा उपदेश दिला पाहिजे. महाराज, हाच वृक्षाचा दुसरा गुण असला पाहिजे.''

३- ''महाराज, वृक्ष आपली सावली देण्याच्या बाबतीत कोणत्याच प्रकारचा भेदभाव करीत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी सर्वच लोकांप्रती कोणत्याही प्रकारचा भेदभाव न करता समतेचा व्यवहार केला पाहिजे, कोणी चोर असो, मारेकरी असो, शत्रू असो की, वा मित्र असो त्या सर्वांच्याप्रती अशी मैत्री भावना केली पाहिजे की, या लोकांची हिंसा, क्रोध आणि पापकारक विचारंपासून सुटका होवो. महाराज, वृक्षाचा हाच तिसरा गुण असला पाहिजे. महाराज, धर्मसेनापती स्थवीर सारिपुत्र यांनी म्हटले आहे की, 'हत्या करण्यासाठी पदोपदी टपून बसलेल्या देवदत्ताप्रती, डाकू अंगुलिमालाप्रती, धनपाल हत्तीप्रती आणि प्रिय पुत्र राहुल या सर्वांच्याप्रती महामुनी भगवान बुद्धांच्या मनात सारखेच प्रेम होते.''

## ५६. ढगाचे पाच गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, ढगाचे पाच गुण असले पाहिजे, तर ते पाच गुण कोणते बरे?''

१- ''महाराज, ढग पाण्याचा वर्षाव करून धूळ आणि माती खाली बसवून देतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपल्या मनातील क्लेश शमवून टाकले पाहिजे. महाराज, ढगाचा हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, ढग पाण्याचा वर्षाव करून जमिनीची उष्णता नष्ट करून थंड करीत असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिंक्षूंनी आपल्या मैत्रीभावनेद्वारा देवता आणि मनुष्यसहित समस्त संसारास शीतल बनवून ठेवले पाहिजे. महाराज, ढगाचा हाच दुसरा गुण असला पाहिजे.''

३- ''महाराज, ढग पावसाचा वर्षाव करून बियांना अंकुर फोडतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी लोकांत श्रद्धेचे बीज पेरून त्यात दिव्य संपत्ती, मनुष्य संपत्ती आणि परमार्थ निर्वाण संपत्ती या तिन्ही संपत्तीचे अंकुर फोडले पाहिजे. महाराज, ढगाचा हाच तिसरा गुण असला पाहिजे.''

४- ''महाराज, ढग योग्यवेळी पाण्याचा वर्षाव करून जमिनीवरील गवत, झाडे, वेली, वृक्ष, जडीबुटी आणि इतर वनस्पती इत्यादी सर्वांचेच रक्षण करतो, त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी मनन करीत असता भिक्षूव्रताचे पालन केले पाहिजे. मनन करण्याच्या अभ्यासावरच सर्व पुण्यधर्म टिकून राहतात. महाराज, ढगाचा हाच चौथा गुण असला पाहिजे.''

५- ''महाराज, ढग पाण्याचा वर्षाव करताच पाण्याचे ओहळ वाहून नद्या, तलाव, बावळ्या, डोह, खड्डे, सरोवरे, गुहा आणि विहिरी इत्यादी सर्व तुडूंब भरून जातात. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी धर्ममेघाचा वर्षाव करून जिज्ञासू लोकांची मने ज्ञानजलांनी तुडूंब भरून दिली पाहिजेत. महाराज, ढगाचा हाच पाचवा गुण असला पाहिजे. महाराज, धर्मसेनापती स्थवीर सारिपुत्र यांनी म्हटले आहे की, 'शंभर आणि हजार योजने दूर असलेल्या जिज्ञासू लोकांना पाहून त्याचक्षणी तेथे जाऊन त्यांना महामुनी भगवान बुद्ध धर्मोपदेश देत असतात.''

## ५७. रत्नमण्याचे तीन गुण

''भंते नागसेन, रत्नमण्याचे तीन गुण असले पाहिजेत. असे आपले म्हणणे आहे. तर ते तीन गुण कोणते?''

१- ''महाराज, रत्नमणी अत्यंत शुध्द असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंची जीविका अत्यंत शुद्ध असली पाहिजे. महाराज, रत्नमण्याचा हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, याशिवाय रत्नमणी दुसऱ्या कोणत्याही वस्तूत मिळवून घेता येत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी वाईट मित्रात मिसळू नये. महाराज, हाच रत्नमण्याचा दुसरा गुण असला पाहिजे.''

३- ''महाराज, याशिवाय रत्नमणी दुसऱ्या मौल्यवान रत्नामध्येच ठेवला जातो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी उत्तम आणि श्रेष्ठ अशाच लोकांच्या संगतीत राहिले पाहिजे. जसे ज्यांनी सत्यमार्ग धरलेला आहे. जे फळावर स्थिर झालेले आहेत. जे शैक्ष्य होऊन गेले आहेत. ज्यांनी श्रोतापत्ती, सकृदागामी, अनागामी आणि अर्हतपद गाठले आहे, जे तीन विद्या, सहा अभिज्ञा, श्रमण भाव इत्यादी रत्नांनीयुक्त आहेत. त्यांचीच संगती धरली पाहिजे. महाराज, रत्नमण्याचा हाच तिसरा गुण असला पाहिजे. महाराज, देवाधिदेव भगवान बुद्धांनी सुत्त निपात म्हटले आहे की, 'सदैव स्मृती कायम ठेवावी. शुद्ध पुरूषांनी शुद्ध पुरूषांच्याच संगतीत राहिले पाहिजे. अशा ज्ञानवंताच्या संगतीत राहूनच ते आपल्या दुःखाचा अंत करण्यास समर्थ ठरू शकतील.''[१]

## ५८. शिकाऱ्याचे चार गुण

''भंते नागसेन, तुमचे म्हणणे असे आहे की, शिकाऱ्याचे चार गुण असले पाहिजेत, तर ते चार गुण कोणते?''

१- ''महाराज, शिकारी लवकर थकत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी साधना करतांना थकून जाऊ नये. महाराज, शिकाऱ्याचा हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, पुनः शिकारी नेहमी हरिणाच्याच पातळीवर आपले चित्त केन्द्रित करतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंची आपल्या ध्यान भावनेमध्येच आपले चित्त केन्द्रित करावयास पाहिजे. महाराज, शिकाऱ्याचा हाच दुसरा गुण असला पाहिजे.''

३- ''महाराज, शिकारी आपल्या कामासाठी योग्य वेळ कोणता याची पुरेपूर जाणीव असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी ही ध्यानभावना करण्यासाठी आसन लावून बसण्याचा योग्य काळ आणि आसनाहून उठण्याचा योगय काळ आहे. अशी एकांतात आसन मांडून ध्यानासाठी बसण्याचा उचित वेळ कोणता, याची जाणीव ठेवली पाहिजे. महाराज, शिकाऱ्याचा हाच तिसरा गुण असला पाहिजे.''

४- ''महाराज, याशिवाय हरिणाला पाहून 'आता याला मी निश्चितच पकडेन असा विचार करून शिकारी खूष होतो.' त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी

१. *सुत्तनिपात गाथा, २८२*

'या विषयावर अभ्यास करून मी पुढील अवस्था प्राप्त करीन' असा विचार करून ध्यानभावनेचे आलंबन पाहून मनातल्या मनात प्रसन्न व्हायला पाहिजे. महारज, शिकाऱ्याचा हाच चौथा गुण असला पाहिजे. महाराज, स्थवीर मोघराज यांनी म्हटलेले आहे की, 'आलंबन गवसल्यामुळे ध्यानभावनेत रत राहणारा भिक्षू अत्यंत प्रसन्न असतो. यामुळे वरची अवस्था सहजरित्या प्राप्त करीन.' असा तो निर्धार करतो."

## ५९. मासे पकडणाऱ्या कोळ्याचे दोन गुण

"भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, मासे पकडणाऱ्या कोळ्याचे दोन गुण असले पाहिजे, तर ते दोन गुण कोणते?"

१- "महाराज, कोळी पाण्यात जाळ टाकून माशांना आपल्या जाळ्यात अडकवून घेतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी सुद्धा श्रामण्य फळ आपल्या ज्ञानाच्या जाळात अडकवून घेतले पाहिजे. महाराज, कोळ्याचा हाच पहिला गुण असला पाहिजे."

२- "महाराज, याशिवाय कोळी थोडे खाद्या पाण्यात फेकून मोठमोठे मासे काढून घेतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपल्या सांसारिक उपकरणांचा त्याग केला पाहिजे. असे केल्याने त्यास मोठ्या श्रामण्य फळाचा लाभ घडून येतो. महाराज, हाच कोळ्याचा दुसरा गुण असला पाहिजे. महाराज, स्थवीर राहुल यांनी सांगितले आहे की, 'आपल्या सांसरिक उपसभोगाचा त्याग करणारा चार फळ, सहा अभिज्ञा आणि अनिमित्त, अप्रणिहित व शून्य स्वरूप असे निर्वाणपद इत्यादीचा लाभ आपल्या पदरी पाडून घेत असतो."

## ६०. सुताराचे दोन गुण

"भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, सुताराचे दोन गुण असले पाहिजे, तर ते दोन गुण कोणते?"

१- "महाराज, सुतार काळ्या धाग्यांनी प्रथम लाकडावर निशाण करून नंतर कापत असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी भगवान बुद्धांच्या उपदेशाची खूण करून शीलभमीवर उभे राहून श्रद्धेच्या हातांनी प्रज्ञेचा वासला घेऊन क्लेशांच्या वृक्ष कापून काढला पाहिजे. महाराज, सुताराचा हाच पहिला गुण असला पाहिजे."

२- "महाराज, याशिवाय सुतार वृक्षाच्या कापलेल्या फांद्या बाजूला सारून खोड तेवढे घेऊन जातो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी शास्वतवाद बरोबर आहे की, अशाश्वतवाद बरोबर आहे; जीवन म्हणजे शरीर होय की, जीव वेगळा आणि

शरीर वेगळे आहे; हे चांगले की, ते चांगले; जग कोणी बनवले की, ते आपोआपच तयार झाले; नाही ते आपोआपच तयार होऊ शकत नाही. पण माणसाच्या हाती यातील काहीही नाही; ब्रह्मचर्य व्रत पालन करण्यात काहीच अर्थ नाही; जीव नष्ट होऊन पुन्हा नवीन जीव उत्पन्न होतो; संस्कार नित्य आहेत; जो करतो तोच भोगत असतो. की, करणारा दुसरा आणि भोगणारा दुसरा आहे; हे आणि याशिवाय कर्मासंबंधी दुसऱ्या अशाच प्रकारच्या धारणा उराशी बाळगण्याच्या व्यर्थ वितंडवादात न पडता संस्कारांच्या अत्यंत शून्य व निःसार स्वभावाला पकडले पाहिजे. महाराज, सुताराचा हाच दुसरा गुण असला पाहिजे. महाराज, सुत्त निपातामध्ये देवाधिदेव भगवान बुद्धांनी सांगितले आहे की, 'भुस्सा झटकून फेकून द्या, खडेगोट निवडून बाहेर फेकावे, स्वतःला साधू म्हणून सांगत फिरणाऱ्या पण प्रत्यक्षात साधू नसलेल्या नकली साधूला आणि निरर्थक वादांना दूर सारावे.' पापी लोकांना आतिण वाईट विचरांना मुळीच थारा देऊ नये. शुद्ध पुरूषांनी स्मृतिमान होऊन शुध्द पुरूषांचाच सहवास पत्करला पाहिजे.''

**(प्रकरण सहावे समाप्त)**

## (प्रकरण सातवे)

# उपमा कथा प्रश्न (पुढे चालू)

### ६१. मडक्याचा एक गुण

"भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, मडक्याचा एक गुण असला पाहिजे, तर तो गुण कोणता?"

१- "महाराज, मडके भरले असले म्हणजे ते कधी वाजत नाही. याचप्रमपणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी श्रामण्य फळाचे शेवटचे शिखर गाठले आणि धर्मधुरंधर विद्वान झाले असले तरी बढाई मारू नये. अभिमान करू नये आणि गर्वाने फुगून जाऊ नये. तर याउलट सरळ, शांत आणि मितभाषी झाले पाहिजे. महाराज, मडक्याचा हाच एक गुण असला पाहिजे. महाराज, सुत्तनिपातात देवाधिदेव भगवान बुद्धांनी म्हटले आहे की, 'रिकामे मडके वाजत असते, पण पूर्ण भरलेले मडके अगदी शांत राहते.' मूर्ख माणूस रिकाम्या मडक्यासमानच असतो. परंतु ज्ञानी तुडूंब भरलेल्या सरोवरासमान अगदी शांत असतो."[१]

### ६२. कलहंसाचे दोन गुण

"भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, कलहंसाचे दोन गुण असले पाहिजेत, तर ते दोन गुण कोणते?"

१- "महाराज, कलहंस झोपेत असतानासुद्धा आपल्या शरीराचा तोल सांभाळून उभाच राहतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी सदैव तत्परतेने मनन करीत राहिले पाहिजे. महाराज कलहंसाचा हाच पहिला गुण असला पाहिजे."

२- "महाराज, याशिवाय कलहंस पक्षी एकदा प्यालेले पाणी कधीच उल्टी करून बाहेर काढत नाही. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी एकदा जडलेली श्रद्धा पुनः कधीच ढळू देऊ नये. जसे - ते सम्यकसंबुद्ध भगवान अतिशय महान आहेत, त्यांनी उपदेशिलेले धर्म सुविख्यात आहे. त्यांचा श्रावक संघ सन्मार्गावर आरूढ झालेला आहे. रूप, वेदना, संज्ञा, संस्कार व विज्ञान अनित्य आहेत. असे एकदा झालेले प्रश्न पुन्हा कधीच सोडू नये. महाराज, कलहंसाचा हाच दुसरा गुण असला पाहिजे. महाराज, देवाधिदेव भगवान बुद्धांनी सांगितले आहे की, 'जो मनुष्य ज्ञानाचे दर्शन करून एकदम

१. *सुत्तनिपातगाथा - ७२१*

परिशुध्द झालेला आहे, बुध्द धर्मानुसार आचरण करून जो पूर्णत्वाला पोहचला आहे. तो परमपद निर्वाणाचा केवळ एक मोठा भागच नव्हे, तर ते पद पूर्णपणे प्राप्त करून घेत असतो.''

## ६३. छत्राचे तीन गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, छत्राचे तीन गुण असले पाहिजेत, तर ते तीन गुण कोणते?''

१- ''महाराज, छत्र हे डोक्यावर डोलत असते. याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी क्लेशांच्या वरच्यावर राहिले पाहिजे. महाराज, छत्राचा हाच पहिलागुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, छत्र हे दांड्याचा आधारावर डोक्यावर स्थिरावले असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी योग्य पध्दतीने मनन करावयाच्या अभ्यासाद्वारे स्वतःला सांभाळून ठेवले पाहिजे. महाराज, छत्राचा हाच दुसरा गुण असला पाहिजे.''

३- ''महाराज, छत्र हवा, उष्णता आणि पाण्याला रोखून धरते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी वेगवेगळ्या श्रमण आणि ब्राह्मणांच्या निरनिराळ्या सिद्धांताचा वारा, तीन प्रकारच्या (राग, द्वेष व मोह) अग्नीचा संताप आणि क्लेशांचा पाऊस इत्यादी वादळास रोखून धरले पाहिजे. महाराज, धर्मसेनापसती स्थवीर सारिपुत्रानी सांगितले आहे की, 'ज्याप्रमाणे छिद्र नसलेले, दृढपणे उभारलेले मोठे छत्र, हवा, गर्मी आणि पावसाचे पाणी आत येऊ देत नाही.' त्याचप्रमाणे परमपवित्र बुद्धपुत्र क्लेशांच्या पावसापासून आणि तीन प्रकारच्या अग्नीच्या तापापासून संरक्षण करण्यासाठी शीलाचे छत्र धारण करीत असतात.''

## ६४. शेताचे तीन गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, शेताचे तीन गुण असले पाहिजेत, तर ते तीन गुण कोणते?''

१- ''महाराज, शेताला कालव्याद्वारे पाणी देऊन भिजवले जाते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपल्या व्रत व विनयाचे पालन करीत असता मातृकांच्या कालव्यांशी संबंधित होऊन राहिले पाहिजे. महाराज, शेताचा हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, शेतात वाफे (बांध्या) तयार केलेल्या असतात आणि त्यामुळे

पाणी अडवून धान्याचे पीक उत्तम प्रकारे पोषले जाते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी शील आणि लज्जेच्या मर्याथदत स्वतःला बांधून घेतले पाहिजे आणि त्या बांध्यातर्गत भिक्षूभावाला अडवून श्रामण्य फळाचे पाणी प्राशन केले पाहिजे. महाराज, हाच शेताचा दुसरा गुण असला पाहिजे.''

३- ''महाराज, शेत धानाच्या लोबांनी लदबदून जाते, ते पाहून शेतकऱ्याचे मन आनंदाने भरून जाते. थोडे धान पेरले असले, तरी पुष्कळ पीक पदी पडते आणि अधिक पेरले तर धानांनी वखारच भरून जाते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी उत्साहपूर्वक चांगले चांगले गुण आपल्यामध्ये उत्पन्न करून दायकांना प्रसन्न केले पाहिजे. थोडेसे दिलेले दान सुद्धा पुष्कळ होते आणि अधिक दिलेले दान तर अधिकच फलदायी ठरते. महाराज, शेताचा हाच तिसरा गुण असला पाहिजे. महाराज, विनयपिटकांचे आचार्य स्थवीर उपाली यांनी म्हटले आहे की, 'भिक्षूंनी पिकाऊ शेतासमान व्हावयास पाहिजे.' असेच उत्तम जीवनरूपी शेत थोडेसे दानरूपी बीज पेरले असता अधिकच फळ देणारे ठरते.''

## ६५. औषधाचे दोन गुण

''भंते नागसेन, औषधाचे दोन गुण असले पाहिजेत, असे तुम्ही म्हणता, तर ते दोन गुण कोणते?''

१- ''महाराज, औषधात कधी किडे पडत नाहीत. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपल्या मनात क्लेश पडू देऊ नयेत. महाराज, औषधाचा हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, औषध, दंशाच्य, स्पर्शाच्या, चढलेल्या, खालेल्या, प्यालेला, गिळलेल्या, चाटलेल्या इत्यादी सर्वच प्रकारच्या विषाला नष्ट करते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी राग, द्वेष, मोह, अभिमान, आत्मदृष्टी वगैरे सर्वच प्रकारच्या विषांचे शमन केले पाहिजे. महाराज, देवाधिदेव भगवान बुद्धांनी सांगितले आहे की, 'जो योगी संस्काराचा स्वभाव जाणून घेण्याची इच्छा करतो, त्यानी सर्वप्रथम क्लेशाच्या विषाचा प्रभाव नष्ट करून टाकला पाहिजे.''

## ६६. भोजनाचे तीन गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, अन्नाचे तीन गुण असले पाहिजे, तर ते तीन गुण कोणते?''

१- ''महाराज, भोजन (आहार) हे समस्त प्राणीमात्रांना आधार आहे.

त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी सर्वच प्राणीमात्रांना निर्वाण मार्गावर चालण्यासाठी आधार दिला पाहिजे. महाराज, भोजनाचा हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, भोजन सर्वच प्राण्यांच्या शक्तीची वृद्धी करीत असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी पुण्याची वृद्धी केली पाहिजे. महाराज भोजनाचा हाच दुसरा गुण असला पाहिजे.''

३- ''महाराज, सर्वांनाच भोजनाची आवश्यकता असते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी सर्व लोकांना प्रिय होऊन राहिले पाहिजे. महाराज, भोजनाचा हाच तिसरा गुण असला पाहिजे. महाराज, स्थवीर महामोग्गलायन यांनीही सांगितले आहे की, 'संयमाने, नियमाने, शीलाने आणि व्रतपालनाने योगीजनांनी लोकांना प्रिय होऊन राहिले पाहिजे.''

## ६७. धनुर्धराचे चार गुण

''भंते नागसेन, तुम्ही म्हणता की, धनुर्धराचे चार गुण असले पाहिजेत. तर ते चार गुण कोणते?''

१- ''महाराज, धर्नुधर बाण मारण्यासाठी आपल्या पायांचा नीट पवित्रा घेतो, गुडघे सरळ करतो, तुणीर करमेच्या आधाराने मागे अडवून ठेवतो. सर्व शरीराची शक्ती एकवटून निश्चल उभा राहतो. एका हातात धनुष्य पकडतो आणि दुसऱ्या हाताने तीर बाणावर चढवतो. मूठ दाबून धरतो, बोटे घट्ट आवळतो, गहा संकुचित करतो, तोंड बंद करतो, एक डोळा बंद करतो, निशाण सरळ करतो आणि असा आत्मविश्वास धारण करतो की, माझा तीर नेमका निशाणावरच छेद करील. त्याचप्रमाणे योगसाधना करणारा भिक्षू शीलाच्या भूमीवर वीर्याच्या पायांचा पवित्रा जमवीत असतो, क्षमाशीलता आणि दयेला सरळ करतो, संयमाच्या आड चित्ताला ठेवतो, यम नियमांनी स्वतःला स्थिर ठेवतो, इच्छा आणि उत्कंठाची घट्ट अशी मूठ आवळतो, मनन करावयाच्या अभ्यासाद्वारे चित्ताला लावितो, उत्साहाला ताणून धरतो, सहाही दरवाजे बंद करतो, स्मृतीस जागे करतो आणि असा आत्मविश्वास धारण करतो की, 'ज्ञानाच्या तीराने मी क्लेशाचा छेद केल्याशिवाय राहणार नाही.' महाराज, धनुर्धराचा हाच पहिला गुण असला पाहिजे.''

२- ''महाराज, धनुर्धर आपल्याजवळ वाकलेले किंवा तेढे झालेले तीर सरळ करावयाचे एक यंत्र (फडताळ) ठेवत असतो. जेणेकरून तीर तत्काळ सरळ करून घेता येते. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपल्या वाकडे तिकडे झालेल्या चित्तास

सरळ करण्यासाठी स्मृतिप्रस्थानाचे फडताळ आपल्या सोबत बाळगले पाहिजे. महाराज, धनुर्धराचा हाच दुसरा गुण असला पाहिजे.''

३– ''महाराज, धनुर्धर सर्वप्रथम एक निशाण तयार करून त्यावर नेम कसा धरावा व तीर कसा मारावा हा अभ्यास करीत असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी आपल्या शरीरावर मनन करण्याचा (कायागता स्मृतीचा) अभ्यास केला पाहिजे. महाराज, तो अभ्यास कसा करावा ? 'हे शरीर अनित्य आहे, दुःखदायक आहे, अनात्म आहे, विविध रोगांचे आगर आहे, कष्टप्रद आहे, मरणधर्मी आहे, पीडाजनक आहे, पापी आहे, बाधक आहे, आपल्याजवळ राहणारे नाही, संकटाचे माहेरघर आहे, मोठमोठ्या उपद्रवांना आधार देणारे आहे. यात भयच भय आहे, स्वच्छंदी आणि चंचल आहे, क्षणभंगूर आहे, अस्थिर आहे, असहाय्य आहे, अशरण आहे, निःसार आहे, शुन्यवत आहे, दोषपूर्ण आहे, असार आहे, मारक आहे, संस्कारी आहे, उत्पन्न होणारे आहे, वृद्धतवाकडे जाणारे आहे, आजारी पडणारे आहे, मरणाला कवटाळणारे आहे, शोक देणारे, तापदायक आणि क्लेश देणारे आहे असे ममन करावे.' महाराज, योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी याप्रमाणे मनन करण्याचा अभ्यास केला पाहिजे. महाराज, धनुर्धराचा हाच तिसरा गुण असला पाहिजे.''

४– ''महाराज, धनुर्धर सकाळ सायंकाळ नेमाने अभ्यास करीत असतो. त्याचप्रमाणे योगसाधना करणाऱ्या भिक्षूंनी सकाळ सायंकाळ नेमाने अभ्यास केला पाहिजे. महाराज, धनुर्धराचा हाच चौथा गुण असला पाहिजे. महाराज, धर्मसेनापती स्थवीर सारिपुत्र यांनी म्हटले आहे की, 'ज्याप्रमाणे धनुर्धर सकाळ सायंकाळ नेमाने अभ्यास करीत असतो, तो अभ्यास कधी टाळत नसल्यामुळे वेतन आणि भत्ता प्राप्त करती असतो. त्याचप्रमाणे बुद्धपुत्रांनी आपल्या शरीरावर नियमितपणे चिंतन करण्याचा अभ्यास केला पाहिजे.' शरीरावरील चिंतन करण्याच्या अभ्यासात मुळीच खंड पडत नसल्यामुळे त्यांना अर्हत पदाचा लाभ होतो.''

**(उपमा–कथा–प्रश्न समाप्त)**

# ग्रंथ विस्तार

राजा मिलिंदाचा दोनशे बासष्ट प्रश्नांचा हा पुर्वापार चालत आलेला ग्रंथ असून हा सहा खंड आणि बावीस प्रकरणांचा विस्तार करून सजविला आहे. यातील बेचाळीस प्रश्न गहाळ झालेले आहेत. गहाळ झालेले प्रश्न यात मिळवल्यास एकूण तीनशे चार प्रश्न होतात. हा ग्रंथ 'मिलिन्द प्रश्न' या नावाने बौद्ध जगतात प्रसिद्ध आहे.

## राजा मिलिन्दाची प्रव्रजा

राजा मिलिन्द आणि स्थवीर नागसेन, यांची प्रश्नोत्तरे समाप्त झाल्यानंतर चौऱ्यांशी लाख योजनांच्या परिसरात पसरलेली आणि चारही बाजूंनी समुद्रांनी वेढलेली ही पृथ्वी सहा वेळा कंप पावली, विजांचा कडकडाट झाला, देवतांनी दिव्य पुष्पांचा वर्षाव केला. महाब्रह्म साधुकार देऊ लागले आणि महासमुद्राच्या पोटात मेघगर्जनासमान गडगडाट होऊ लागला, हा चमत्कार पाहून राजा मिलिन्द यांनी आपल्या परिवारासह स्थवीर नागसेन यांना खाली वाकून पंचांग प्रणाम केला.

राजा मिलिन्दाचे अंतःकरण आनंदाने भरून गेले. बुद्धधर्म किती उच्च प्रतीचा आणि सत्य आहे याविषयी त्याला जाणीव झाली. त्रिरत्ना (बुद्ध, धर्म व संघ) संबंधी ज्या शंका होत्या, त्या सर्व दूर झाल्या. सर्वच गुंतावळा उकलल्या गेला. पूर्णपणे विश्वास जडला. स्थवीरांचे गुण, प्रव्रजा आणि आचारविचार पाहून राजाचे अंतःकरण गदगदून गेले. हृदयात श्रद्धा निर्माण झाली आणि तो अत्यंत नम्र झाला. दात काढून घेतलेल्या सापाप्रमाणे राजा म्हणाला – 'साधू! साधू!! भंते नागसेन, जे प्रश्न भगवान बुद्धांनाच विचारण्यासारखे होते, त्या समस्त प्रश्नांची आपण समर्पक उत्तरे दिलीत. या बुद्ध शासनात धर्मसेनापती सारिपुत्र यांना वगळल्यास दुसरा कोणीही आपल्यावाचून याप्रमाणे धर्मासंबंधी प्रश्नांची उत्तरे देऊ शकेल असे दिसत नाही. भंते नागसेन, यात जो काही माझ्याकडून अपराध घडला असेल, तर त्याबद्दल मला क्षमा करावी. आणि भंते नागसेन, आजपासून जन्मभर त्रिरत्नाची शरण ग्रहण केलेला आपला उपासक म्हणून माझा स्वीकार करावा.'

तेव्हा राजाने आपल्या अधिकारासमवेत स्थवीर नागसेनाचा मोठा सत्कार केला. तेथे त्यांनी 'मिलिन्द' नावाचे एक फार मोठे विहार बांधून ते स्थवीर नागसेन यांना दान म्हणून अर्पण केले, त्यात एक कोटी क्षिणाश्रव भिक्षूंची राहण्याची व्यवस्था करून दिली व त्यांची तो श्रद्धापूर्वक चारही प्रत्ययांद्वारे सेवा करू लागला.

त्यानंतर स्थविरांच्या प्रज्ञाबळामुळे त्याची श्रद्धा अधिकच वाढली. अशारितीने

काही दिवस घालवून शेवटी मिलिंद राजाने आपल्या राज्याचा सर्व भार आपल्या पुत्रावर सोपवला आणि स्वतः गृहत्याग करून प्रवर्जित झाला. पुढील आयुष्य राजाने विदर्शनाच्या एका मागून एक शिड्या गाठून अर्हत पदाची प्राप्ती करून घेतली.

म्हणूनच म्हटले आहे – संसारात एकमात्र प्रज्ञा हीच प्रशस्त आहे. धर्मश्रद्धा टिकवून ठेवणारा उपदेश महान आहे. प्रज्ञेमुळेच सर्व शंका विलयास जातात. त्यामुळेच पंडितजनांना शांतपदाची (निर्वाणाची) प्राप्ती होत असते. ज्यांची प्रज्ञा स्थिर झाली असून स्मृती विस्तार पावली असते, तेच बुद्धिमान पुरूष विशेष पूजेस पात्र ठरतात. तेच सर्वश्रेष्ठ आणि अलौकिक पुरूष होतात. याकरिता पंडित जनांची सदैव सेवा करावी. आपले हित दृष्टीपुढे ठेऊन मंदिर किंवा गुरूद्वारासमान ज्ञानवंतांची पूजा करावी आणि श्रद्धाभावाने त्यांची सेवा करावी.

**मिलिन्द आणि नागसेनाची प्रश्नोत्तरे समाप्त**